जॉन रीड (१८८७-१९२०)–अमेरिकेतील कम्युनिस्ट पक्षाचे एक संस्थापक, लेखक, वृत्तपत्रकार. १९१९ मध्ये अमेरिकेत त्यांचे हे पुस्तक प्रकाशित झाले आणि सोविएत समाजसत्तावादी प्रजासत्ताक संघात रशियन भाषेत प्रथम १९२३ मध्ये प्रसिद्ध झाले. त्यानंतर त्याचे पुन:प्रकाशन होत आले आहे.

रशियन भाषेतील पहिल्या आवृत्तीपासून सर्व आवृत्त्या लेनिन व क्रुप्स्काया यांच्या प्रस्तावनांसह प्रकाशित झाल्या आहेत.

जॉन रीड यांनी लेनिन यांना असामान्य पुढारी म्हणून संबोधले. त्यांच्यापाशी "अत्यंत गहन विचार सोप्या शब्दांमध्ये सांगण्याची, प्रत्यक्ष परिस्थितीचे विश्लेषण करण्याची हातोटी होती आणि धूर्तपणाबरोबरच कमालीचे बौद्धिक धाष्टर्य होते."

मानवतेच्या इतिहासात नव्या युगाचा आरंभ करणाऱ्या रशियामधील विजयी समाज-सत्तावादी क्रांतीबाबतचे सत्य सांगणारे जागतिक साहित्यामधील हे पहिले पुस्तक होय.



जॉन रीड

जॉन रीड

# जगाला हदरवलेले दहा दिवस



प्रगती प्रकाशन
मॉस्को




लोकवाङ्मय गृह प्रा. लि.
मुंबई

अनुवादक : अनिल हवालदार
संपादक : डॉ. रविन्द्र रसाळ

**Джон Рид**

10 ДНЕЙ, КОТОРЫЕ ПОТРЯСЛИ МИР

*на языке маратхи*

**John Reed**

TEN DAYS THAT SHOOK THE WORLD

*in Marathi*

पहिली आवृत्ती, १९७८
दुसरी आवृत्ती, १९८७

© मराठी अनुवाद, प्रगती प्रकाशन, १९७८

सोविएत संघात मुद्रित

P $\frac{0505030101-433}{014(01)-87}$ без объявл.

# अनुक्रमणिका

# लेनिन

आणि

# क्रुप्स्काया

यांच्या

# प्रस्तावना

# अमेरिकन आवृत्तीला प्रस्तावना

अत्यंत कुतूहलपूर्वक आणि किंचितही अवधान न ढळवता मी जॉन रीड यांचे 'जगाला हादरवलेले दहा दिवस' हे पुस्तक वाचून काढले. अगदी निःसंकोचपणे मी या पुस्तकाची जगातल्या कामगारांना शिफारस करतो. या पुस्तकाच्या कोटचवधी प्रती छापल्या जाव्यात आणि सर्व भाषांमधून त्याचा अनुवाद व्हावा अशी माझी इच्छा आहे. कामगारवर्गीय क्रांती आणि कामगारवर्गाची अधिसत्ता म्हणजे खरोखरीच काय याचे आकलन होण्याच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाच्या असलेल्या अशा घटनांचे वास्तवपूर्ण आणि अत्यंत ठळक दर्शन या पुस्तकात घडवलेले आहे. या समस्यांची व्यापकतेने चर्चा झाली आहे, पण कुणीही या विचारांचा स्वीकार किंवा त्याग करण्यापूर्वी, आपल्या निर्णयाच्या महत्त्वाचे पूर्ण आकलन त्याला झाले पाहिजे. आंतरराष्ट्रीय कामगार चळवळीची मूलभूत समस्या असलेला हा प्रश्न स्पष्ट करण्यास जॉन रीड यांचे पुस्तक निःसंशयरीत्या मदत करील.

१९१९ **निकोलाय लेनिन ( व्लादीमिर इल्यिच उल्यानोव )**

# रशियन आवृत्तीला प्रस्तावना

जॉन रीड यांनी आपल्या असामान्य पुस्तकाला 'जगाला हादरवलेले दहा दिवस' असे शीर्षक दिले होते. ऑक्टोबर क्रांतीच्या * पहिल्या दिवसांचे अत्यंत ठळक आणि प्रभावी वर्णन त्यात सादर केलेले आहे. ही केवळ घटनांची जंत्री नाही किंवा दस्तऐवजांचा हा संग्रह नाही, तर प्रत्यक्ष जीवनातील प्रसंगांची एक सलग मालिका आहे व ती इतकी वैशिष्टचपूर्ण आहे की, क्रांतीत सहभागी झालेल्या कुणाही व्यक्तीला हे पुस्तक वाचताना स्वतः अनुभवलेल्या तदृश प्रसंगांची आठवण झाल्यावाचून राहणार नाही. आणि जीवनामधील या प्रसंगांमधून आश्चर्यकारक सत्यतेने जनतेच्या भावनांचे, क्रांतीची प्रत्येक कृती स्पष्ट करणाऱ्या भावनांचे, दर्शन घडले आहे.

ज्याला या देशाची भाषा येत नाही किंवा या देशाच्या चालीरीती माहीत नाहीत अशा एका परदेशी माणसाने, एक अमेरिकन माणसाने, असे पुस्तक कसे लिहिले असेल याबद्दल प्रथम कुणालाही आश्चर्य वाटणे शक्य आहे... त्याने असंख्य घोटाळे केले असले पाहिजेत आणि अनेक आवश्यक बाबी त्याच्या हातून निसटल्या असल्या पाहिजेत असे वाटण्याची शक्यता आहे.

बहुतेक परदेशी माणसे रशियाबद्दल अगदी वेगळ्या पद्धतीने लिहितात. त्यांनी पाहिलेल्या घटनांचे योग्य आकलन करून घेण्यात एक तर त्यांना अपयश येते किंवा परस्परसंबंधित नसलेल्या अशा काही घटना ते हाताशी

---

* या पुस्तकात सर्वत्र तिचा नोव्हेंबर क्रांती म्हणून उल्लेख केलेला आहे. – सं.

धरतात, त्या नेहमीच नमुनेदार असतात असे नाही, आणि सरसहा निष्कर्ष काढायला त्यांचा वापर करतात.

पण अर्थातच फार थोडे परदेशी लोक क्रांतीला प्रत्यक्ष साक्षी होते.

जॉन रीड हे तटस्थ निरीक्षक नव्हते, तर एक मनस्वी क्रांतिकारक होते, घटनांचा अर्थ समजून घेणारे, महान लढ्याचा अर्थ समजून घेणारे एक कम्युनिस्ट होते. ही समज असल्यामुळे त्यांच्या ठायी तीव्र अवगाहनशक्ती निर्माण झाली व अशी अवगाहनशक्ती नसती तर अशा प्रकारचे पुस्तक कधीही लिहिले गेले नसते.

रशियन लोक क्रांतीबद्दल वेगळ्या पद्धतीने लिहितात: एक तर ते तिचे संपूर्ण मूल्यमापन करतात किंवा ज्या प्रसंगांमध्ये त्यांनी भाग घेतला होता त्या प्रसंगांचे वर्णन करतात. रीड यांचे पुस्तक खऱ्याखुऱ्या जनतेच्या सामूहिक क्रांतीचे विशाल चित्र नजरेसमोर उभे करते आणि म्हणून युवकांच्या दृष्टीने, भावी पिढ्यांच्या दृष्टीने, ऑक्टोबर क्रांती हा ज्यांना गत इतिहास असेल अशांच्या दृष्टीने, या पुस्तकाला विशेष महत्त्व राहील. रीड यांचे पुस्तक एका परीने महाकाव्य आहे.

जॉन रीड यांनी आपले आयुष्य रशियन क्रांतीशी निगडित केले होते. सोविएत रशिया त्यांचे प्रेयस बनला होता. रशियामध्ये विषमज्वराने त्यांना मृत्यू आला आणि क्रेमलिन भिंतीखाली लाल चौकात त्यांचे दफन करण्यात आले. क्रांतीमध्ये धारातीर्थी पडलेल्या वीरांच्या अंत्ययात्रेचे अनुपम वर्णन करणाऱ्या जॉन रीड यांच्यासारख्या व्यक्तीला हा सन्मान अगदी उचित आहे.

**नदेज्दा क्रुप्स्काया** *

---

* व्ला. इ. लेनिन यांच्या पत्नी.

# प्रस्तावना

हे पुस्तक म्हणजे पराकोटीला पोचलेल्या इतिहासाचा – मी स्वतः पाहिलेल्या इतिहासाचा – एक तुकडा आहे. जेव्हा कामगार आणि सैनिकांच्या अग्रभागी असलेल्या बोल्शेविकांनी रशियातील राज्यसत्ता काबीज केली व सोविएतांच्या हाती सुपूर्द केली त्या नोव्हेंबर क्रांतीचे तपशीलवार वर्णन करण्याव्यतिरिक्त या पुस्तकाचा दुसरा कोणताही अभिनिवेश नाही.

साहजिकच, उठावाचे केंद्र असलेल्या आणि राजधानीचे शहर असलेल्या "लाल पेत्रोग्राद"शी पुस्तकातील अधिकांश भाग संबंधित आहे. पण वाचकाने हे समजून घेतले पाहिजे की, पेत्रोग्रादमध्ये जे काही घडले त्याचीच कमी-अधिक तीव्र प्रमाणात, थोडयाशा भिन्न भिन्न कालांतराने, सबंध रशियाभर पुनरावृत्ती घडली.

मी लिहित असलेल्या अनेक पुस्तकांपैकी पहिले असलेल्या या पुस्तकात, ज्या घटना मी स्वतः पाहिल्या आणि अनुभवल्या किंवा ज्या घटनांना खात्रीशीर पुराव्याचे पाठबळ आहे, अशा कालक्रमवृत्तान्ताशी मी स्वतःला मर्यादित ठेवले पाहिजे. या कथनापूर्वी, नोव्हेंबर क्रांतीची पार्श्वभूमी आणि ती घडण्याची कारणे यांची थोडक्यात रूपरेषा सांगणारी दोन प्रकरणे समाविष्ट केली आहेत. मला जाणीव आहे की, ही दोन प्रकरणे वाचण्यास कठीण जातील, पण त्यानंतरचा मजकूर आकलन होण्यासाठी ती आवश्यक आहेत.

वाचकाच्या मनात अनेक प्रश्न उद्भवतील. बोल्शेविकवाद म्हणजे काय? बोल्शेविकांनी कोणत्या प्रकारच्या सरकारची स्थापना केली? नोव्हेंबर क्रांतीपूर्वी घटनात्मक सभेचा जर बोल्शेविकांनी पुरस्कार केला होता, तर नंतर त्यांनी शस्त्रबळावर तिला बरखास्त का केले? आणि बोल्शेविक-

वादाचा धोका दृश्यमान होईपर्यंत जर भांडवलदारवर्गाने घटनात्मक सभेला विरोध केला होता, तर नंतर त्याने तिचा पुरस्कार का केला?

या आणि इतर अनेक प्रश्नांना या ठिकाणी उत्तर देता येणार नाही. दुसऱ्या पुस्तकात, 'कोर्निलोव ते ब्रेस्त-लितोव्स्क'* मध्ये, («Kornilov to Brest-Litovsk») मी जर्मनीबरोबरच्या शांतता तहापर्यंतच्या क्रांतीच्या काळाचा मागोवा घेतला आहे. त्या पुस्तकात क्रांतिकारक संघटनांचे मूळ आणि त्यांची कार्ये जनतेच्या भावनांमध्ये होत गेलेली उत्क्रांती,. घटनात्मक सभेचे विसर्जन, सोविएत राज्याची रचना आणि ब्रेस्त-लितोव्स्क वाटाघाटींचा क्रम व त्यांची निष्पत्ती यांचा खुलासा मी करीत आहे...

बोल्शेविकांच्या वाढत्या लोकप्रियतेचा विचार करताना हे समजून घेणे आवश्यक आहे की, रशियन आर्थिक जीवन आणि रशियन सेना ७ नोव्हेंबर १९१७ रोजी विस्कळीत बनल्या नव्हत्या, तर त्यापूर्वी कित्येक महिने आधीच विस्कळीत बनल्या होत्या व ती १९१५ मध्ये सुरू झालेल्या प्रक्रियेची तर्कसंगत निष्पत्ती होती. जुर्मनीशी अलग शांतता तह करण्याच्या इराद्याने, झारच्या दरबारात वर्चस्व असलेल्या भ्रष्टाचारी प्रतिगाम्यांनी बुद्धयाच रशियाला खिळखिळे बनविण्याचे प्रयत्न चालविले होते. १९१५ च्या उन्हाळ्यात मोठी माघार घ्यायला भाग पाडणारा आघाडीवरील शस्त्रास्त्रांचा तुटवडा, सेनेमध्ये आणि मोठ्या शहरांमध्ये निर्माण झालेले खाद्यपदार्थांचे दुर्भीक्ष्य, १९१६ मध्ये बंद पडलेले मालाचे उत्पादन आणि बंद पडलेली वाहतूक – या सर्व गोष्टी म्हणजे घातपाताच्या महाप्रचंड मोहीमेचा एक भाग होत्या हे आता आपल्याला माहीत झाले आहे. मार्चमधील** क्रांतीने या सर्व गोष्टींना वेळीच पायबंद घातला.

जगातल्या अत्यंत दलित अशा १६ कोटी जनतेने जिच्यामुळे अचानक स्वातंत्र्य मिळविले त्या महान क्रांतीच्या अनुषंगाने येणाऱ्या काहीशा गोंधळाच्या परिस्थितीतही, नव्या राजवटीच्या पहिल्या काही महिन्यांमध्येच अंतर्गत सुव्यवस्था आणि सैन्याची लढण्याची ताकद अशा दोन्हींमध्ये खूपच सुधारणा झाली.

पण हा "मधुचंद्र" अल्पकाळ टिकला. मालमत्ताधारी वर्गांना केवळ

---

*हे पुस्तक पुरे करण्यापूर्वीच रीड मरण पावले आणि ते कधीही प्रकाशित झाले नाही. – सं.

**जुन्या कालगणनेनुसार फेब्रुवारी. – सं.

राजकीय क्रांती पाहिजे होती, ज्यायोगे झारच्या हातून सत्ता काढून घेऊन ती त्यांच्या सुपूर्द झाली असती. फ्रान्स किंवा अमेरिकेप्रमाणे त्यांना रशियाला घटनाप्रधान प्रजासत्ताक बनवायचे होते; किंवा इंग्लंडप्रमाणे घटनात्मक राजसत्ता प्रस्थापित करायची होती. याउलट बहुसंख्य जनतेला खरीखुरी औद्योगिक आणि शेतकी लोकशाही पाहिजे होती.

१९०५ च्या क्रांतीचा वृत्तान्त कथन करणाऱ्या 'रशियाचा संदेश' («Russia's Message») नामक आपल्या पुस्तकात, विल्यम इंग्लिश वॉलिंग* यांनी रशियन कामगारांच्या मन:स्थितीचे फार उत्तम चित्रण केले आहे व याच कामगारांनी पुढे बोल्शेविकवादाला जवळ जवळ एकमताने पाठिंबा दिला. ते लिहितात:

> "त्यांना (कामकरी लोकांना) समजून चुकले की स्वतंत्र सरकारच्या कारकीर्दीतही, जर ते इतर वर्गांच्या हाती पडले, तर त्यांना तशीच उपासमार पुढे सहन करावी लागण्याची शक्यता होती...
>
> "रशियन कामगार हा क्रांतिकारक आहे, पण तो हिंसाचारी नाही, पोथीनिष्ठ नाही किंवा बुद्धीहीनही नाही. अडथळ्यांमागच्या लढायांना तो तयार आहे, पण त्याने त्यांचा अभ्यास केला आहे आणि जगातल्या कामगारांमध्ये त्याने एकटयानेच हे लढाईचे तंत्र प्रत्यक्ष अनुभवाने आत्मसात केले आहे. आपल्यावर दडपशाही गाजविणाऱ्या भांडवलदारवर्गाविरुद्ध लढायला तो सज्ज आहे आणि अखेरपर्यंत लढण्याची त्याची इच्छा आहे. पण इतर वर्गांच्या अस्तित्वाकडे तो दुर्लक्ष करीत नाही. नजीक येणाऱ्या कटु संघर्षात इतर वर्गांनी कोणती तरी एक बाजू घ्यावी एवढीच फक्त त्याची मागणी आहे...
>
> "त्या सर्वांनी (कामगारांनी) मान्य केले की, आमच्या (अमेरिकन) राजकीय संस्था त्यांच्या स्वत:पेक्षा अधिक चांगल्या आहेत, पण एका जुलूमशहाच्या ऐवजी दुसऱ्या जुलूमशहाला (भांडवलदारवर्गाला) स्वीकारण्यास ते फारसे उत्सुक नाहीत...

---

* विल्यम इंग्लिश वॉलिंग (१८७७-१९३६)–अमेरिकन अर्थशास्त्रज्ञ आणि समाजशास्त्रज्ञ, कामगारवर्गीय चळवळीवरील आणि समाजसत्तावादावरील अनेक पुस्तकांचे लेखक. «Russia's Message» हे पुस्तक अमेरिकेत १९०८ मध्ये प्रकाशित झाले.–सं.

"रशियातील कामगार मॉस्को, रीगा आणि ओडेसा येथे शेकड्यां-नी गोळ्या खाऊन मेले, फासावर चढले, प्रत्येक रशियन बंदीगृहात हजारोंनी कैद होऊन पडले, वाळवंटांमध्ये आणि आर्क्टिक प्रदेशांमध्ये हद्दपार झाले – हे सर्व त्यांनी सोसले ते काही गोल्डफील्ड्स आणि क्रिपल-क्रीकमधल्या कामगारांना मिळालेल्या संदिग्ध सवलतींसाठी खासच नव्हे..."

आणि अशा प्रकारे परकी युद्धाच्या दरम्यानच रशियात राजकीय क्रांतीचा सामाजिक क्रांतीत विकास घडला व बोल्शेविकवादाच्या विजयात त्याची परिणती झाली.

सोविएत सरकारला विरोध करणाऱ्या अमेरिकेतील रशियन माहिती केंद्राचे संचालक श्री. सॅक आपल्या 'रशियन लोकशाहीचा जन्म' («The Birth of the Russian Democracy») या पुस्तकात म्हणतात:

"बोल्शेविकांनी आपले स्वतःचे मंत्रिमंडळ बनविले, त्यात निकोलाय लेनिन पंतप्रधान होते आणि लेव ट्रॉट्स्की परराष्ट्र मंत्री होते. मार्चमधील क्रांतीनंतर ताबडतोब स्पष्ट दिसून आले की, ते सत्तेवर येणे अपरिहार्य आहे. क्रांतीनंतरचा बोल्शेविकांचा इतिहास हा त्यांच्या सातत्यशील वाढीचा इतिहास आहे..."

परदेशी लोक आणि विशेषतः अमेरिकन, वारंवार रशियन कामगारांच्या "अज्ञाना"वर बोट ठेवतात. हे खरे आहे की, पाश्चात्त्य जनतेच्या ठायी असलेल्या राजकीय अनुभवाची त्यांच्यात उणीव आहे, पण स्वयंसंघटनामध्ये ते अतिशय उत्तम तयार होते. १९१७ मध्ये रशियन ग्राहक सहकारी संस्थांचे १.२ कोटीपेक्षा अधिक सभासद होते; आणि खुद्द सोविएते ही त्यांच्या संघटनाकुशल बुद्धिमत्तेची द्योतक आहेत. त्याशिवाय, समाजसत्तावादी तत्त्वप्रणालीत आणि तिच्या प्रत्यक्ष अंमलबजावणीत इतकी सुशिक्षित जनता कदाचित जगात इतरत्र कुठेही आढळणार नाही.

विल्यम इंग्लिश वॉलिंग त्यांच्या वैशिष्ट्यांचे असे वर्णन करतात:

"रशियातील बहुसंख्य कामकरी जनतेला लिहा-वाचायला येते. अनेक वर्षेपर्यंत देशात अशांत परिस्थिती राहिल्याने, तिच्यामधून नि-

र्माण झालेल्या बुद्धिमान व्यक्तींच्या नेतृत्वाचाच केवळ तिला फायदा मिळाला असे नाही, तर रशियाचे राजकीय आणि सामाजिक पुनरुज्जीवन करण्याच्या उद्देशाने कामकरी जनतेकडे वळलेल्या, तेवढ्याच प्रमाणातल्या क्रांतिकारक सुशिक्षित वर्गाच्या मोठ्या भागाच्या नेतृत्वाचाही लाभ तिला मिळाला..."

बहुतेक लेखक आपली सोविएत सरकारबाबतची वैरभावना व्यक्त करताना असा दावा करतात की, रशियन क्रांतीचा शेवटचा टप्पा म्हणजे बोल्शेविकवादाच्या पाशवी हल्ल्यांविरुद्धचा "प्रतिष्ठितांचा" केवळ संघर्ष होता. पण वस्तुतः मालमत्ताधारी वर्गांना जेव्हा जनक्रांतिकारी संघटनांच्या वाढत्या सामर्थ्याची जाणीव झाली, तेव्हा त्या संघटनांना नष्ट करून क्रांती थोपविण्याचा त्यांनीच प्रयत्न केला. मालमत्ताधारी वर्गांनी निराशेच्या चरमसीमेला जाऊन अविचारी उपायांचाही अवलंब केला. केरेन्स्की मंत्रिमंडळाला आणि सोविएतांना नष्ट करण्यासाठी वाहतूक विस्कळीत करण्यात आली आणि अंतर्गत कलह चेतविण्यात आले; कारखान्यांमधील समित्यांना चिरडण्यासाठी कारखाने बंद पाडण्यात आले, इंधन आणि कच्चा माल यांचा पुरवठा भलतीकडेच वळविण्यात आला; आघाडीवर सेना-समित्या मोडण्यासाठी मृत्युदंडाची शिक्षा पुन्हा अंमलात आणली गेली व लष्करी पराभवांकडे जाणूनबुजून दुर्लक्ष करण्यात आले.

बोल्शेविक आग भडकवायला हे सारे उत्तम इंधन होते. वर्गयुद्धाचा प्रचार करून आणि सोविएतांच्या सर्वश्रेष्ठतेचे प्रतिपादन करून बोल्शेविकांनी उलट उत्तर दिले.

या दोन आत्यंतिक टोकांच्या दरम्यान, त्यांना पूर्णतया किंवा अर्धवटरीत्या पाठिंबा देणाऱ्या इतर गटांमध्ये तथाकथित "नेमस्त" समाजवादी – मेन्शेविक, समाजवादी-क्रांतिकारक आणि अनेक छोटे पक्ष – यांचा समावेश होता. या गटांवरही मालमत्ताधारी वर्गांनी हल्ले चढविले, पण त्यांच्या स्वतःच्या तत्त्वप्रणालींनीच त्यांची प्रतिकारशक्ती पांगळी करून टाकली होती.

सर्वसाधारणपणे मेन्शेविकांचे आणि समाजवादी-क्रांतिकारकांचे असे मत होते की, सामाजिक क्रांतीसाठी आर्थिकदृष्टचा रशिया परिपक्व बनला नव्हता – केवळ **राजकीय** क्रांती शक्य होती. त्यांच्या व्याख्येनुसार, सत्ता हाती घ्यायला रशियन जनता पुरेशी सुशिक्षित नव्हती; असे करण्याचा कोणताही प्रयत्न केल्यास अपरिहार्यतः निर्माण होणाऱ्या प्रतिक्रियेचा फायदा

उठवून एखादा निर्दय संधिसाधू जुनी राजवट पुन्हा स्थापित करील अशी शक्यता होती. आणि याचा परिणाम असा घडला की, जेव्हा "नेमस्त" समाजवाद्यांना बळेच सत्तारूढ व्हावे लागले, तेव्हा सत्तेचा वापर करायला ते घाबरले.

त्यांचा असा विश्वास होता की, पाश्चात्त्य युरोपला ज्ञात असलेल्या राजकीय आणि आर्थिक विकासाच्या टप्प्यांमधून रशियाला जाणे भाग आहे व अखेरीस इतर सर्व जगाबरोबरच त्याच्यामध्येही परिपूर्ण समाजसत्तावादाचा उदय होईल. साहजिकच त्यांनी मालमत्ताधारी वर्गांशी सहमत व्यक्त केले की, रशिया हे प्रथम संसदीय राज्य बनले पाहिजे — मात्र पाश्चात्त्य लोकशाहीपेक्षा त्यात अधिक सुधारणा केल्या पाहिजेत. याचा परिणाम म्हणून, सरकारमध्ये मालमत्ताधारी वर्गांचा सहभाग व्हावा असा त्यांनी आग्रह धरला.

इथून पुढे पाऊल टाकून त्यांना पाठिंबा देणे सोपे होते. "नेमस्त" समाजवाद्यांना भांडवलदारवर्गाची गरज होती. पण भांडवलदारवर्गाला मात्र "नेमस्त" समाजवाद्यांची गरज नव्हती. याचा परिणाम असा होत गेला की, समाजवादी मंत्र्यांना एकेका टप्प्याने आपला संपूर्ण कार्यक्रम मागे घेणे भाग पडले, तर मालमत्ताधारी वर्ग अधिकाधिक दुराग्रही बनत गेले.

आणि अखेरीस जेव्हा बोल्शेविकांनी हा सबंध पोकळ समझोता उधळून लावला, तेव्हा भांडवलदारवर्गाच्या बाजूने मेन्शेविक आणि समाजवादी-क्रांतिकारक लढत असल्याचे आढळून आले... आज जगातल्या जवळजवळ प्रत्येक देशात हीच परिस्थिती दृष्टीस पडते.

मला असे वाटते की, बोल्शेविक ही एक संहारक शक्ती नसून, त्याउलट विधायक कार्यक्रम असलेला आणि तो अंमलात आणण्यासाठी पुरेशी सत्ता हाती असणारा तो रशियातील एकमेव पक्ष होता. जर त्यांनी त्यावेळी सत्ता हाती घेतली नसती तर मला याबाबत यत्किंचितही संदेह नाही की, शाही जर्मनीच्या फौजा डिसेंबरात पेत्रोग्राद आणि मॉस्कोत घुसल्या असत्या व रशियाच्या मानगुटीवर पुन्हा झार स्वार झाला असता...

सोविएत सरकार सत्तारूढ होऊन अख्खे एक वर्ष उलटून गेले तरी अजूनही बोल्शेविक उठावाला "साहस" म्हणण्याची फॅशन आहे. ते साहस होते हे तर खरेच, पण आजवर मानवजातीने कधी केले नव्हते असे ते एक अतिशय सुंदर साहस होते, कष्टकरी जनतेच्या मूर्धस्थानी राहून त्याने झपाट्याने इतिहासात प्रवेश केला व तिच्या अफाट परंतु साध्या साध्या

इच्छांसाठी सर्व काही पणाला लावले. मोठ्या इस्टेटींची जमीन किसानांमध्ये वाटता यावी यासाठी एव्हाना यंत्रणा स्थापित केली होती. उद्योगधंद्यांमध्ये कामगारांचे नियंत्रण अंमलात आणण्यासाठी कारखाना समित्या व ट्रेड युनियना होत्या. प्रत्येक खेड्यात, शहरात, नगरात, जिल्ह्यात आणि प्रांतात कामगारांच्या, सैनिकांच्या, किसानांच्या प्रतिनिधींची सोविएते स्थानिक कारभार चालविण्यास सज्ज झाली होती.

बोल्शेविकवादाबाबत कुणाचे काहीही मत असो, पण हे निर्विवाद आहे की, रशियन क्रांती ही मानवी इतिहासामधील एक महान घटना आहे आणि बोल्शेविकांचा उदय ही जागतिक महत्त्वाची घडामोड आहे. ज्याप्रकारे इतिहासकार पॅरिस कम्यूनच्या कहाणीच्या अत्यंत छोटयातल्या छोटया तपशीलांसाठी कागदपत्रांची धुंडाळणी करीत आहेत, त्याचप्रमाणे पुढे त्यांना जाणून घ्यायची इच्छा होईल की, १९१७ च्या नोव्हेंबरात पेत्रोग्रादमध्ये काय घडले होते, लोकांना सचेतन करणारी कोणती भावना होती, त्यांचे पुढारी कसे होते, काय बोलत होते व कोणती कृती करीत होते. हे ध्यानात घेऊन मी प्रस्तुत पुस्तक लिहिले आहे.

संघर्षाच्या काळात माझ्या भावना तटस्थ नव्हत्या पण त्या महान दिवसांची कथा सांगताना, सत्याची नोंद करण्यात स्वारस्य असलेल्या एका नेक वार्ताहराच्या नजरेतून प्रसंगांकडे पाहण्याचा मी प्रयत्न केला आहे.

न्यूयॉर्क, १ जानेवारी, १९१९ **जॉन रीड**

# टीपा आणि खुलासे *

सर्वसामान्य वाचकाला रशियन संघटनांच्या बाहुल्यामुळे — राजकीय गट, समित्या आणि मध्यवर्ती समित्या, सोविएते, दूमा आणि संघ — खूपच गोंधळून गेल्यासारखे होईल. यासाठी मी प्रस्तुत ठिकाणी काही थोडक्या संक्षिप्त व्याख्या आणि खुलासे देत आहे.

## राजकीय पक्ष

घटनात्मक सभेच्या निवडणुकांना पेत्रोग्रादमध्ये एकोणीस पक्षीय तिकीटांवर उमेदवार उभे होते आणि काही प्रांतीय शहरांमधून तर चाळीस पक्षीय तिकीटांवर उभे होते; पण पुढे सादर केलेला राजकीय पक्षांच्या उद्दिष्टांचा आणि घडणीचा गोषवारा या पुस्तकात उल्लेखिलेल्या गटांपुरता आणि विभागांपुरताच मर्यादित आहे. त्यांच्या कार्यक्रमांचा आशय आणि ते ज्या सामाजिक थरांचे प्रतिनिधित्व करीत आहेत त्या समाजातील थरांचे साधारण स्वरूप यांवरच केवळ लक्ष देणे शक्य आहे...

---

* जॉन रीड यांनी सादर केलेल्या टीपा आणि खुलाशांमध्ये काही चुका असल्या तरी ह्या टीपा आणि खुलासे बरेच महत्त्वपूर्ण आहेत. नोव्हेंबर क्रांतीपूर्वीच्या राजकीय संबंधांचा त्यांनी किती सखोल अभ्यास केला होता याचे दर्शन त्यावरून घडते आणि त्याहूनही अधिक महत्त्वाचे म्हणजे लेखकाच्या राजकीय आवडी-नावडींचे व भिन्न युद्धमान पक्षांबाबत आणि गटांबाबत त्याने केलेल्या मूल्यमापनाचे अवगाहन होते. — सं.

१. **राजपक्षीय** – वेगवेगळ्या छटांचे राजपक्षीय, **ऑक्टोबरवादी**, इ. एकेकाळी अत्यंत प्रबळ असलेले हे गट इतःपर उघडपणे अस्तित्वात नाहीत; एक तर ते भूमीगत राहून कार्य करतात किंवा त्यांचे सदस्य कॅडेटांमध्ये सामील झाले, कारण कॅडेटांनी हळूहळू त्यांचा राजकीय कार्यक्रम स्वीकारला. या गटातील रोद्झिआन्को व शूल्गिन या प्रतिनिधींचा प्रस्तुत पुस्तकात उल्लेख आहे.

२. **कॅडेट**. त्यांच्या पक्षाच्या नांवाच्या आद्याक्षरांवरून, 'सनदशीर लोकशाहीवादी' («Constitutional Democrats»), त्यांना कॅडेट म्हणून संबोधण्यात येऊ लागले. त्यांचे अधिकृत नांव 'जनस्वातंत्र्य पक्ष' असे आहे. मालमत्तादार वर्गांमधील उदारमतवाद्यांचा मिळून बनलेल्या कॅडेटांचा पक्ष झारच्या अमदानीपर्यंत **राजकीय** सुधारणा घडविणारा सर्वात मोठा पक्ष होता व त्याचे अमेरिकेतील 'प्रोग्रेसिव्ह पार्टी'शी थोडेफार साधर्म्य होते. १९१७ च्या मार्चमध्ये प्रथम क्रांतीची ज्वाला भडकली तेव्हा कॅडेटांनी पहिले हंगामी सरकार बनविले. कॅडेट मंत्रिमंडळ एप्रिलमध्ये उलथून टाकण्यात आले, कारण झार सरकारच्या साम्राज्यवादी उद्दिष्टांसह दोस्त राष्ट्रांच्या साम्राज्यवादी उद्दिष्टांना त्याने आपली अनुकूलता प्रकट केली. क्रांती जसजशी अधिकाधिक प्रमाणात सामाजिक क्रांती बनत चालली, तसतसे कॅडेट अधिकाधिक पुराणमतवादी बनत गले. या पुस्तकातील त्यांचे प्रतिनिधी: मिल्युकोव, विनावेर, शात्स्की.

२ अ. **'सार्वजनिक व्यक्तींचा गट.'** कोर्नीलोव प्रतिक्रांतीशी संबंध ठेवल्यामुळे कॅडेट जनतेमध्ये अप्रिय झाल्यानंतर, मॉस्कोमध्ये 'सार्वजनिक व्यक्तींच्या गटा'ची स्थापना करण्यात आली. अखेरच्या केरेन्स्की मंत्रिमंडळात 'सार्वजनिक व्यक्तींच्या गटा'मधील प्रतिनिधींना काही खाती देण्यात आली. या 'गटा'चे रोद्झिआन्को आणि शूल्गिनसारखे आध्यात्मिक नेते असूनही, आपण बिगरपक्षीय आहोत असे 'गटा'ने जाहीर केले. हा 'गट' अधिक "आधुनिक" बँकर, व्यापारी आणि कारखानदारांचा मिळून बनला होता व त्यांच्या (सोविएतांच्या) शस्त्रानेच – आर्थिक संघटनानेच – सोविएतांशी सामना केला पाहिजे हे समजण्याइतपत ते बुद्धिमान होते. या 'गटा'चे प्रतिनिधी: लियानोझोव, कोनोवालोव.

३. **जन-समाजवादी** किंवा **त्रुदोविक** (कामगार गट). संख्यात्मकदृष्ट्या लहान असलेल्या या पक्षात सावधचित्त प्रज्ञावंत, सहकारी संस्थांचे नेते आणि पुराणमतवादी किसान यांचा समावेश होता. समाजवादी असल्याचा दावा

करणाऱ्या या लोकांनी वास्तवात मात्र मध्यमवर्गीयांच्या — कारकून, दुकान-दार इ. — हितसंबंधांना पाठिंबा दिला. बव्हंश किसान प्रतिनिधींनी मिळून बनलेल्या चौथ्या शाही दूमामधील 'कामगार गटाची समन्वयवादी परंपरा पुढे चालविणारे हे वंशज होते. १९१७ च्या मार्च क्रांतीची ज्वाला भडकली तेव्हा शाही दूमामध्ये केरेन्स्की हे त्रुदोविकांचे पुढारी होते. जन-समाजवादी हा राष्ट्रवादी पक्ष आहे. या पुस्तकातील त्यांचे प्रतिनिधी : पेशेखोनोव, चैकोव्स्की.

४. **रशियन सामाजिक-लोकशाही कामगार पक्ष.** मूळचे मार्क्सप्रणीत समाजवादी. १९०३ मध्ये भरलेल्या पक्ष-काँग्रसमध्ये, डावपेचांच्या प्रश्नावर मतभेद घडून पक्षाची दोन गटांमध्ये विभागणी झाली — बहुसंख्य (बोल्शिन्स्त्वो) आणि अल्पसंख्य (मेन्शिन्स्त्वो). यापासूनच "बोल्शेविक" आणि "मेन्शेविक" ही नांवे निर्माण झाली — 'बहुसंख्याकांचे सभासद' आणि 'अल्पसंख्याकांचे सभासद.' हे दोन्ही गट दोन वेगवेगळे पक्ष बनले, दोघेही स्वतःला 'रशियन सामाजिक लोकशाही कामगार पक्ष' असे म्हणवून घेऊ लागले आणि दोघेही आपण मार्क्सवादी असल्याचा दावा करू लागले. १९०५ च्या क्रांतीपासून प्रत्यक्षात बोल्शेविक हे अल्पसंख्य ठरले होते, पण १९१७ च्या सप्टेंबरात पुन्हा ते बहुसंख्य बनले.

अ. **मेन्शेविक.** समाजाने स्वाभाविक उत्क्रांतीनुसार समाजसत्तावादाकडे प्रगती घडवली पाहिजे आणि कामगारवर्गाने राजकीय सत्ता प्रथम हस्तगत केली पाहिजे, असे मानणाऱ्या सर्व छटांच्या समाजवाद्यांचा या पक्षात समावेश आहे. हा सुद्धा राष्ट्रवादी पक्ष आहे. हा पक्ष समाजवादी-प्रज्ञावंतांचा होता आणि मालमत्ताधारी वर्गांच्या हाती शिक्षणाची सर्व साधने असल्याने, प्रज्ञावंत स्वाभाविकपणे त्या वर्गांच्या शिक्षणानुसार वागले आणि त्यांनी या मालमत्ताधारी वर्गांची कड घेतली. या पुस्तकात त्यांचे प्रतिनिधी : दान, लीबेर, त्सेरेतेली.

ब. **मेन्शेविक-आंतरराष्ट्रीयवादी.** मेन्शेविकांचा जहाल मतवादी गट, आंतरराष्ट्रीयवादी आणि मालमत्ताधारी वर्गांशी कोणताही संयोग घडविण्यास विरोधी; तरीही पुराणमतवादी मेन्शेविकांपासून तुटून पडण्यास नाखुष आणि बोल्शेविकांनी पुरस्कारलेल्या कामगारवर्गीय अधिसत्तेला विरोधी. ट्रॉट्स्की या गटाचे दीर्घकाळपर्यंत सदस्य होते. या गटाच्या नेत्यांमध्ये : मार्तोव, मार्तीनोव.

क. **बोल्शेविक.** मेन्शेविकांमध्ये आणि सर्व देशांमधील तथाकथित "बहु-

संख्य समाजवाद्यां"मध्ये वर्चस्वाने अस्तित्वात असलेल्या "नेमस्त" किंवा "संसदीय" समाजसत्तावादाच्या परंपरेपासून आपण पूर्णतः अलग आहोत हे ठासून सांगण्यासाठी आता हे लोक स्वतःला **कम्युनिस्ट पक्ष** म्हणवून घेतात. उद्योगधंदे, जमीन, नैसर्गिक साधनसंपत्ती आणि अर्थपुरवठ्याच्या संस्था बळाने ताब्यात घेऊन समाजसत्तावादाला लौकर प्रस्थापित करण्यासाठी तावडतोबीने कामगारवर्गीय उठाव घडविण्याचा आणि सरकारी सत्तेचे लगाम हाती घेण्याचा प्रस्ताव बोल्शेविकांनी मांडला. कारखान्यामधील कामगारांच्या इच्छा प्रामुख्याने हा पक्ष व्यक्त करीत असला, तरी त्याबरोबरच गरीब किसानांच्या मोठ्या विभागाच्या इच्छाही तो प्रकट करतो. "बोल्शेविक" म्हणजे जास्तीत जास्त हक्कांची करारी मागणी करणारे "कमालवादी" नव्हेत. कमालवाद्यांचा वेगळा गट आहे (५ ब. परिच्छेद पहा.)

ड. **संयुक्त सामाजिक लोकशाहीवादी-आंतरराष्ट्रीयवादी.** या गटाचे 'नोवाया झीझ्न' (नवे जीवन) नांवाचे एक अत्यंत प्रभावी मुखपत्र होते व त्यावरून त्याला 'नोवाया झीझ्न' गट असेही म्हणत. प्रज्ञावंतांचा हा एक अगदी छोटा गट होता. या गटाचे पुढारी मॉक्सिम गोर्की होते व वैयक्तिकरीत्या कामगारवर्गातील काही जणांचे त्यांना अनुयायीत्व लाभले असले तरी या गटाला कामगारवर्गामधून फारसा पाठिंबा नव्हता. प्रज्ञावंतवर्गात समाविष्ट होणाऱ्या या लोकांचा मेन्शेविक-आंतरराष्ट्रीयवाद्यांप्रमाणेच कार्यक्रम असला, तरी 'नोवाया झीझ्न' गटाने दोन मोठ्या गटांपैकी कोणत्याही एका गटाशी स्वतःला बांधून घेण्यास ठाम नकार दिला. बोल्शेविकांच्या डावपेचांना त्यांनी विरोध केला, तरी सोविएत सरकारमध्ये ते राहिले. या पुस्तकात या गटाचे इतर प्रतिनिधी: अविलोव, क्रामारोव.

ढ. **'येदिन्स्त्वो'** (एकता). एक अत्यंत छोटा आणि अखंडपणे घटत जाणारा गट. १८८० नंतरच्या काळातील रशियन सामाजिक-लोकशाही चळवळीचे एक संस्थापक आणि तिचे एक महान तत्त्ववेत्ते प्लेखानोव यांच्या सर्वस्वी वैयक्तिक अनुयायांचा हा गट बनलेला होता. आता वृद्ध झालेले प्लेखानोव कमालीचे राष्ट्रभक्त होते व मेन्शेविकांच्या दृष्टीने सुद्धा कमालीचे पुराणमतवादी ठरले. बोल्शेविकांनी क्रांती सरकारमध्ये प्रचंड उलथापालथ घडवून आणल्यानंतर 'येदिन्स्त्वो' नष्ट झाला.

५. **समाजवादी-क्रांतिकारक पक्ष.** त्यांच्या नांवाच्या आद्याक्षरांवरून त्यांना 'एस्सेर' म्हणत. मूळचा किसानांचा क्रांतिकारक पक्ष, "लढवय्या संघटनां"चा पक्ष – दहशतवादी. मार्च क्रांतीनंतर, जे पूर्वी कधीही समाजवादी

नव्हते असे अनेक लोक या पक्षात सामील झाले. केवळ जमीनविषयक खासगी मालमत्ता नष्ट करावी आणि जमीन मालकांना भरपाई देण्यात यावी, अशी या पक्षाने त्यावेळी भूमिका घेतली होती. अखेरीस किसानांच्या वाढत्या क्रांतिकारक भावनांच्या दबावाखाली "भरपाई" कलम रद्द करणे एस्सेरांना भाग पडले व त्याच्याच परिणामी १९१७ च्या शरद ऋतूमध्ये अधिक तरुण आणि अधिक जहाल प्रज्ञावंत लोक मुख्य पक्षातून फुटून बाहेर पडले व त्यांनी 'डावा समाजवादी-क्रांतिकारक पक्ष' स्थापन केला. एस्सेरांना त्यानंतर 'उजवे समाजवादी-क्रांतिकारक' म्हणून जहाल गट नेहमी संबोधू लागले. एस्सेरांनी मेन्शेविकांचे राजकीय धोरण अनुसरले व त्यांच्या जोडीने ते कार्य करू लागले. अखेरीस ते श्रीमंत किसानांचे, प्रज्ञावंतांचे आणि अतिदूरच्या ग्रामीण विभागांमधील राजकीयदृष्ट्या अशिक्षित जनतेचे प्रतिनिधी बनले. पण मेन्शेविकांपेक्षा यांच्यात राजकीय आणि आर्थिक मतांच्या अधिक विस्तृत भिन्न छटा होत्या. या पानांमध्ये उल्लेखिलेल्या त्यांच्या पुढाऱ्यांमध्ये: अव्क्सेन्तियेच, गोत्स, केरेन्स्की, चेर्नोव, "बाबुष्का"* ब्रेश्कोव्स्काया.

अ. **डावे समाजवादी-क्रांतिकारक.** तत्त्वतः बोल्शेविकांच्या कामगारवर्गीय अधिसत्तेच्या कार्यक्रमाशी सहमत असले, तरी प्रथमतः बोल्शेविकांच्या कठोर डावपेचांचे अनुकरण करण्यास अनुत्सुक होते. तरीही डावे समाजवादी-क्रांतिकारक सोविएत सरकारमध्ये काही खाती, विशेषतः शेतकी खाते, सांभाळीत राहिले. अनेकवेळा ते सरकारमधून बाहेर पडले, पण नेहमी पुन्हा परतले. किसान जसे वाढत्या संख्येने एस्सेरांमधून बाहेर पडून डाव्या समाजवादी-क्रांतिकारक पक्षात सामील होऊ लागले, तसे हा सोविएत सरकारला पाठिंबा देणारा, मोठ्या जमिनींच्या मालमत्ता भरपाईविना ताब्यात घेऊन खुद्द किसानांनीच आपापसात त्यांची विल्हेवाट लावावी, असे मत व्यक्त करणारा किसानांचा मातबर पक्ष बनला. त्याच्या पुढाऱ्यांमध्ये: स्पिरिदोनोवा, करेलीन, कामकोव, कोलेगायेव.

ब. **कमालवादी.** १९०५ मधील क्रांतीच्या वेळी कमाल समाजवादी कार्यक्रमाच्या तात्काळ अंमलबजावणीची मागणी करणारी प्रभावी किसान चळवळ चालू असता समाजवादी-क्रांतिकारक पक्षामधून फुटून बाहेर पडलेली एक शाखा. आता किसान अराजकवाद्यांचा एक नगण्य गट.

---

* रशियन भाषेत "बाबुष्का" म्हणजे आजी. —सं.

# संसदीय कार्यपद्धती

रशियन सभा आणि संमेलने आमच्या पद्धतीपेक्षा युरोपीय धर्तीवर अधिकतर आयोजित केली जातात. सर्वसाधारणपणे पहिले काम म्हणजे अधिकाऱ्यांची, चिटणीसांची आणि अध्यक्षमंडळाची निवडणूक हे असते.

**अध्यक्षमंडळ** म्हणजे अध्यक्षीय समिती असून, सभागृहात प्रतिनिधित्व करणाऱ्या गटाच्या आणि राजकीय दलांच्या प्रतिनिधींचा तिच्यात समावेश असतो व या प्रतिनिधींची संख्या सभागृहातील त्यांच्या एकूण संख्येच्या प्रमाणात असते. अध्यक्षमंडळ कामकाजाचा क्रम निश्चित करते आणि अध्यक्षांच्या निमंत्रणानुसार त्याचे सदस्य आळीपाळीने सभापतीस्थानावर आरूढ होतात.

प्रत्येक प्रश्न प्रथम सर्वसामान्य पद्धतीने मांडला जातो आणि नंतर त्याच्यावर चर्चा होते व चर्चेच्या अखेरीस भिन्न गट आपापले ठराव मांडतात आणि प्रत्येक ठराव स्वतंत्रपणे मतास टाकला जातो. कामकाजाच्या क्रमाच्या पहिल्या अर्ध्या तासात ठिकऱ्या उडविल्या जाऊ शकतात आणि बहुधा तसेच घडते. "आणीबाणीच्या" सबबीखाली, तिला सभागण नेहमीच मान्यता देतो, श्रोतृगणातून कुणीही व्यक्ती उठून कोणत्याही विषयावर काहीही बोलू शकते. जमावच सभेचे नियंत्रण करतो आणि छोटीशी घंटा वाजवून सभेचे काम पुढे चालू ठेवण्यापलिकडे आणि वक्त्यांना व्यासपीठ देण्यापलिकडे सभापतींना फारसे काम उरत नाही. अधिवेशनाचे बहुतेक सारे खरे काम भिन्न गटांच्या आणि राजकीय दलांच्या अंतर्गत बैठकांमध्येच घडते व हे गट आणि दले जवळजवळ नेहमीच एकजुटीने आपली मते देतात व त्यांचे नेते त्यांचे प्रतिनिधित्व करतात. मात्र त्याचा परिणाम असा होतो की, प्रत्येक महत्त्वाच्या नव्या मुद्द्याच्या किंवा मतदानाच्या वेळी, भिन्न गटांना आणि राजकीय दलांना आपल्या अंतर्गत बैठका भरविता याव्यात म्हणून अधिवेशनाच्या कामात सुटी जाहीर करावी लागते.

जमाव कमालीचा गोंगाट करतो, वक्त्यांना शाबासकी देत असतो किंवा त्यांची हेटाळणी करतो, अध्यक्षमंडळाच्या योजनांचा धुव्वा उडवीत असतो. पारंपारिक आरोळ्यांमध्ये पुढील उद्‌गार आढळतात: "कृपा करून पुढे बोला!" किंवा "ते खरं आहे!", "बरोबर!", "पुरे!", "मुर्दाबाद!", "धिक्कार असो!" आणि "शांत रहा!", "एवढा गोंगाट करू नका!"

# जन-संघटना

१. **सोविएत.** या शब्दाचा अर्थ "मंत्रिमंडळ". झारच्या अमदानीत राज्याच्या शाही मंत्रिमंडळाला **गसुदारस्त्वेन्नीय सवेत** असे म्हणत. पण क्रांतीपासून मात्र, सोविएत हा शब्दप्रयोग कामगारवर्गीय उत्पादक संघटनांच्या सदस्यांनी निवडलेल्या विशिष्ट प्रकारच्या संसदेसाठी वापरला जातो – कामगारांच्या, किंवा सैनिकांच्या, किंवा किसानांच्या प्रतिनिधींचे सोविएत. म्हणून या संस्थांपुरताच हा शब्द मी मर्यादित ठेवला आहे. रशियातील प्रत्येक नगरात, शहरात आणि खेड्यात निवडलेल्या स्थानिक सोविएतांव्यतिरिक्त – आणि मोठ्या नगरांमधील वॉर्ड सोविएतांव्यतिरिक्त – जिल्हा किंवा प्रांतीय सोविएते आहेत आणि राजधानीमधील अखिल रशियन सोविएतांच्या मध्यवर्ती कार्यकारी समितीला तिच्या आद्याक्षरांवरून केंद्रीय कार्यकारी समिती असे म्हणतात (पुढे पहा, "मध्यवर्ती समित्या"). मार्च क्रांतीनंतर लौकरच जवळ जवळ सर्वत्र कामगारांच्या आणि सैनिकांच्या प्रतिनिधींची सोविएते एकत्र झाली. पण त्यांच्या विशिष्ट हितसंबंधांच्या खास प्रसंगी, कामगारांचे आणि सैनिकांचे विभाग स्वतंत्रपणे एकत्र भेटत राहिले. बोल्शेविकांनी सरकार उलथून टाकीपर्यंत, किसान प्रतिनिधींची सोविएते मात्र इतर दोन सोविएतांमध्ये सामील झाली नाही. कामगारांच्या आणि सैनिकांच्या सोविएतांप्रमाणेच त्यांचे संघटन केलेले होते व राजधानीमध्ये अखिल रशियन किसान सोविएतांची कार्यकारी समिती होती.

२. **ट्रेड युनियना.** जरी बव्हंशी औद्योगिक प्रकारात असल्या, तरी रशियन कामगार संघटनांना अद्याप ट्रेड युनियना म्हणून संबोधिले जात होते आणि बोल्शेविक क्रांतीच्या वेळी त्यांची सभासदसंख्या तीस ते चाळीस लाखांच्या घरात होती. या कामगार संघटनाही एका अखिल रशियन संस्थेत संघटित केलेल्या होत्या व त्यांची मध्यवर्ती कार्यकारी समिती राजधानीमध्ये होती.

३. **कारखाना समित्या.** क्रांतीच्या अनुषंगाने शासकीय यंत्रणा मोडून पडली होती. त्याचा फायदा घेऊन, उद्योगधंद्यांवर नियंत्रण प्रस्थापित करण्याच्या प्रयत्नात, कारखान्यांमधील कामगारांनी उत्स्फूर्तपणे निर्माण केलेल्या या संघटना होत्या. क्रांतिकारक कृतीने कारखाने ताब्यात घेऊन ते चालवायचे, हे त्यांचे कार्य होते. कारखाना समित्यांचीही स्वतःची अखिल रशियन

संघटना होती व पेत्रोग्रादमधील तिची मध्यवर्ती समिती ट्रेड युनियनांशी सहकार्य करीत होती.

४. **दूमा.** या शब्दाचा सर्वसाधारण अर्थ "मसलत मंडळ". क्रांतीनंतर सहा महिनेपर्यंत लोकशाही प्रकारात टिकलेल्या जुन्या शाही दूमाचा १९१७ च्या सप्टेंबरात स्वाभाविक रीतीने मृत्यू घडला. या पुस्तकात संदर्भ असलेले नगर-दूमा म्हणजे पुनर्संघटित नगरपालिका मंडळ असून त्याचा वारंवार नगरपालिकीय स्वयंशासन म्हणून उल्लेख करण्यात येई. थेट आणि गुप्त मतदानपद्धतीने त्याची निवड करण्यात येई व बोल्शेविक क्रांतीच्या वेळी जनतेवर पकड ठेवण्यात त्याला अपयश येण्याचे एकमेव कारण म्हणजे वर्ग-भेदांवर आधारलेल्या संघटनांच्या वाढत्या सामर्थ्यापुढे केवळ राजकीय प्रति-निधित्व करणाऱ्या सर्व संघटना एकजात निःष्प्रभ ठरल्या होत्या.

५. **झेम्स्त्वो.** यांचा सर्वसामान्य अर्थ 'जिल्हा परिषदा'. झारच्या कार-कीर्दीत अत्यल्प शासकीय सत्ता असलेल्या या निम-राजकीय, निम-सामाजिक संस्थांचा विकास व त्यांचे नियंत्रण, जमीनदारवर्गामधील प्रज्ञावंत उदारमत-वाद्यांनी प्रामुख्याने केले. किसानांमध्ये शिक्षणाचा प्रसार करणे व सामाजिक सेवा करणे हे त्यांचे सर्वांत महत्त्वाचे कार्य होते. युद्धकाळात, रशियन सैन्याच्या खाण्यापिण्याची व कपडचालत्त्याची जबाबदारी हळूहळू पूर्णपणे झेम्स्त्वोंनी आपल्या अंगावर घेतली, तसेच परदेशी मालाची खरेदी करण्याचे काम त्या करू लागल्या व आघाडीवर सैनिकांमध्ये त्यांच्या कार्याचे स्वरूप अमेरिकेतील ख्रिश्चन युवक संघटनेच्या धर्तीचे होते. मार्च क्रांतीनंतर, ग्रामीण भागांमध्ये स्थानिक शासकीय संस्थांमध्ये रूपांतर करण्याच्या दृष्टीने झेम्स्त्वोंचे लोकशाहीकरण करण्यात आले. पण नगर दूमांप्रमाणे त्याही सोवि-एतांशी स्पर्धा करू शकल्या नाही.

६. **सहकारी संस्था.** या कामगारांच्या आणि किसानांच्या ग्राहक सह-कारी संस्था होत्या व क्रांतीपूर्वी सबंध रशियाभर त्यांचे दशलक्षावधी सभा-सद होते. उदारमतवाद्यांनी आणि "नेमस्त" समाजवाद्यांनी आरंभलेल्या सहकारी चळवळीला क्रांतिकारक समाजवादी गटांचा पाठिंबा लाभला नाही, कारण कामगारांच्या हाती उत्पादन-साधनांची संपूर्ण मालकी व वाटप सो-पविण्याचा तो एक केवळ मधला टप्पा होता. मार्च क्रांतीनंतर सहकारी संस्थांचा वेगाने प्रसार घडला आणि जन-समाजवादी, मेन्शेविक व समाज-वादी-क्रांतिकारकांनी त्यांच्यावर आपले वर्चस्व प्रस्थापित केले. बोल्शेविक क्रांतीपर्यंत या सहकारी संस्थांनी पुराणमतवादी राजकीय शक्ती म्हणून कार्य

केले. पण तरीही, व्यापाराची आणि वाहतुकीची जुनी व्यवस्था कोलमडून पडली तेव्हा याच सहकारी संस्थांनी रशियाचे भरणपोषण केले.

७. **सेना समित्या.** युद्धआघाडीवर जुन्या राजवटीच्या अधिकाऱ्यांच्या प्रतिगामी प्रभावाविरुद्ध सामना करण्यासाठी सैनिकांनी सेना समित्या स्थापन केल्या होत्या. प्रत्येक कंपनीची, रेजिमेंटची, ब्रिगेडची, डिव्हिजनची आणि कोअरची स्वतःची समिती होती व त्या सर्वांवर सेना समितीची निवड केलेली होती. मध्यवर्ती सेना समिती जनरल स्टाफशी सहकार्य करीत होती. क्रांतीनंतर सेनेमधील शासकीय कारभार कोलमडून पडल्यावर, सैनिकांच्या राहण्या-जेवण्याची व्यवस्था पाहणाऱ्या दुय्यम लष्करी खात्याची बव्हंश जबाबदारी सेना समित्यांच्या खांद्यांवर येऊन पडली आणि काही ठिकाणी तर सैनिकांचे नेतृत्व करण्याची कामगिरीही त्यांना पार पाडावी लागली.

८. **नौदल समित्या.** नाविक दलांमध्ये सेना समित्यांप्रमाणे काम करणाऱ्या संघटना.

## मध्यवर्ती समित्या

१९१७ च्या वसंत ऋतुमध्ये आणि उन्हाळ्यात, सर्व प्रकारच्या संघटनांच्या अखिल रशियन परिषदा पेत्रोग्रादमध्ये भरल्या होत्या. कामगारांच्या, सैनिकांच्या आणि किसानांच्या सोविएतांच्या राष्ट्रीय काँग्रेस भरल्या होत्या, ट्रेड युनियनांच्या, कारखाना समित्यांच्या, सेना आणि नाविक दल समित्यांच्या (त्याशिवाय लष्करी आणि नाविक दलामधील वेगवेगळ्या तुकड्यांच्या प्रतिनिधींच्या काँग्रेस देखील), सहकारी संस्थांच्या राष्ट्रजमातीच्या इत्यादी काँग्रेस भरल्या होत्या. आपल्या विशिष्ट हितसंबंधांचे सरकारमध्ये रक्षण करण्यासाठी या प्रत्येक परिषदेने एक मध्यवर्ती समिती किंवा मध्यवर्ती कार्यकारी समिती निवडली होती. हंगामी सरकार जसजसे अधिक क्षीण होत गेले, तसतशा या मध्यवर्ती समित्यांना अधिकाधिक शासकीय सत्ता हाती घेणे भाग पडले.

प्रस्तुत पुस्तकात नमूद केलेल्या सर्वाधिक महत्त्वाच्या मध्यवर्ती समित्या पुढीलप्रमाणे :

**संघांचा संघ.** १९०५ च्या क्रांतीमध्ये, प्राध्यापक मिल्युकोव आणि इतर उदारमतवाद्यांनी व्यावसायिक लोकांचे – डॉक्टर, वकील इ. – संघ स्थापन केले. हे सारे एका मध्यवर्ती संघटनेमध्ये – संघांच्या संघामध्ये – एक-

बटले होते. १९०५ मध्ये संघांच्या संघाने क्रांतिकारक लोकशाहीबरोबर काम केले; पण १९१७ मध्ये मात्र, संघांच्या संघाने बोल्शेविक उठावाला विरोध केला आणि सोविएतांविरुद्ध संपावर गेलेल्या सरकारी कर्मचाऱ्यांची त्याने एकजूट करून सोविएत सत्तेच्या आदेशांना धुडकावून लावले.

**केंद्रीय कार्यकारी समिती.** कामगारांच्या आणि सैनिकांच्या प्रतिनिधींच्या सोविएतांची अखिल रशियन मध्यवर्ती कार्यकारी समिती. तिच्या आद्याक्षरांवरून तिला ओळखले जात असे.

**त्सेंत्रोफ्लोत** ('मध्यवर्ती नाविक केंद्र') – मध्यवर्ती नाविक दल समिती.

**विक्झेल.** रेल्वे कामगार संघाची अखिल रशियन मध्यवर्ती समिती. तिच्या आद्याक्षरांवरून तिला ओळखीत.

## इतर संघटना

**लाल रक्षक.** रशियातील शस्त्रसज्ज कारखाना-कामगार. १९०५ च्या क्रांतीच्या दरम्यान लाल रक्षक प्रथम संघटित झाले आणि शहरामध्ये सुव्यवस्था राखण्यासाठी सेनेची जेव्हा गरज निर्माण झाली तेव्हा १९१७ च्या मार्चमध्ये पुन्हा अस्तित्वात आले. त्यावेळी ते शस्त्रास्त्रांनी सुसज्ज होते आणि त्यांना नि:शस्त्र करण्याचे हंगामी सरकारचे सर्व प्रयत्न कमी-अधिक प्रमाणात अयशस्वी ठरले. क्रांतीमधील प्रत्येक मोठ्या अरिष्टाच्या वेळी प्रशिक्षणविरहित आणि बेशिस्त अवस्थेत लाल रक्षक रस्त्यांवर उतरले, पण त्यांच्यात क्रांतिकारक जोम मात्र ठासून भरलेला होता.

**श्वेत रक्षक.** खाजगी मालमत्ता नष्ट करण्याच्या बोल्शेविकांच्या प्रयत्नाला विरोध करण्यासाठी क्रांतीच्या अखेरच्या टप्प्यांमध्ये अवतीर्ण झालेले भांडवलदारी स्वयंसेवक. त्यांपैकी अनेकजण विश्वविद्यालयीन विद्यार्थी होते.

**तेखिन्त्सी.** मध्य आशियामधील मुसलमान टोळ्यांमधून तयार केलेली सैन्यातील तथाकथित "रानटी डिव्हिजन". ती जनरल कोर्निलोव यांची व्यक्तिश: अनुयायी होती. आंधळ्या निष्ठेबद्दल व युद्धातील पाशवी क्रौर्याबद्दल तेखिन्त्सी ख्यातनाम होते.

**आहुती पलटणी.** किंवा धडक पलटणी. महिलांची पलटण ही आहुती पलटण म्हणून जगाला ज्ञात आहे, पण पुरुषांच्याही अनेक आहुती पलटणी होत्या. शौर्यशाली उदाहरणाच्या आधारे सेनेमध्ये शिस्त आणि वीरश्री दृढ करण्याच्या उद्देशाने, या पलटणींची १९१७ च्या उन्हाळ्यात केरेन्स्की यांनी

स्थापना केली होती. कमालीच्या राष्ट्रवादी प्रवृत्तीच्या तरुण देशभक्तांचा आहुती पलटणींमध्ये मुख्यतः समावेश होता. हे तरुण बव्हंश मालमत्ताधारी वर्गांमधील लोकांचे पुत्र होते.

**अधिकाऱ्यांचा संघ**. सेना समित्यांच्या वाढत्या सत्तेचा राजकीयदृष्टचा मुकाबला करण्यासाठी सैन्यातील प्रतिगामी अधिकाऱ्यांनी स्थापन केलेली संघटना.

**सेंट जॉर्जचे सरदार.** लढाईतील खास शौर्यासाठी सेंट जॉर्ज क्रूस बहाल करण्यात येत असे. हा क्रूस धारण करणारा आपोआपच "सेंट जॉर्जचा सरदार" बनत असे. लष्करवादाला पाठिंबा देणाऱ्यांचा या संघटनेत प्रभाव होता.

**किसान संघ.** १९०५ मध्ये किसान संघ ही क्रांतिकारक किसानांची संघटना होती. पण १९१७ मध्ये मात्र ती अधिक श्रीमंत किसानांची राजकीय प्रवक्ती बनली, किसान प्रतिनिधींच्या सोविएतांच्या वाढत्या सत्तेविरुद्ध आणि क्रांतिकारक ध्येयांविरुद्ध लढू लागली.

## कालक्रम आणि वर्णरचना

या पुस्तकात सर्वत्र जुन्या रशियन कालगणनेऐवजी मी आपल्या कालगणनेचा वापर केला आहे. रशियन कालगणना आपल्यापेक्षा तेरा दिवसांनी मागे होती.

रशियन नांवांची आणि शब्दांची वर्णरचना लिहिताना मी कोणत्याही शास्त्रीय नियमाचे अनुसरण न करता, त्या उच्चारांच्या जवळपास जाईल अशी आत्यंतिक सोपी वर्णरचना इंग्लिशभाषी वाचकाला देण्याचा प्रयत्न केला आहे.

## उगमस्थाने

या पुस्तकामधील बव्हंश सामग्री माझ्या स्वतःच्या टिपणांमधून घेतलेली आहे. पण त्याचबरोबर, वर्णन केलेल्या संबंधित काळामधील जवळ जवळ प्रत्येक दिवसाचा आढावा घेणाऱ्या शेकडो निवडक रशियन वर्तमानपत्रांची विविधांगी फाईल; 'रशियन डेली न्यूज' या इंग्रजी भाषेतील वर्तमानपत्राच्या आणि 'जर्नल द रूस्सी' व 'एन्टाँट' या दोन फ्रेंच वर्तमानपत्रांच्या

फायलींचाही मी आधार घेतला. पण या सर्वांपेक्षा अतिमूल्यवान होते 'बुलेटिन द ला प्रेस'; ते पेत्रोग्रादमधील फ्रेंच माहिती शाखेतर्फे दररोज प्रसारीत होत होते आणि रशियन वृत्तपत्रसृष्टीमधील सर्व महत्त्वाच्या घडामोडींचा, भाषणांचा आणि भाष्यांचा त्यात समावेश असे. याची १९१७ च्या वसंतापासून १९१८ च्या जानेवारी अखेरीपर्यंतची जवळ जवळ संपूर्ण फाईल माझ्याजवळ आहे.

उपरोक्त गोष्टींव्यतिरिक्त, १९१७ च्या सप्टेंबरच्या मध्यापासून १९१८ च्या जानेवारी अखेरीपर्यंत, पेत्रोग्रादच्या भिंतींवर चिकटवलेला प्रत्येक जाहीरनामा, हुकूमनामा आणि जाहीर घोषणा, माझ्यापाशी उपलब्ध आहे. तसेच सर्व सरकारी हुकूमनाम्यांची आणि आदेशांची सर्व अधिकृत प्रकाशने व बोल्शेविकांनी ताबा घेतल्यानंतर विदेश मंत्रालयात सापडलेली गुप्त तहांची आणि इतर दस्तऐवजांची अधिकृत सरकारी प्रकाशने माझ्याजवळ आहेत.

## प्रकरण पहिले

# पार्श्वभूमी

१९१७ च्या सप्टेंबरच्या अखेरी, रशियाच्या दौऱ्यावर असलेले समाजशास्त्राचे एक परदेशी प्राध्यापक पेत्रोग्रादमध्ये मला भेटायला आले. क्रांतीचा वेग कमी होत आहे अशा तऱ्हेची माहिती त्यांना व्यापारी मंडळींनी आणि प्रज्ञावंतांनी दिली होती. प्राध्यापक महाशयांनी त्याबाबत एक लेख लिहिला आणि नंतर देशामधील औद्योगिक शहरांना व किसानसमुदायांना भेटी द्यायला प्रारंभ केला. प्रत्यक्षात क्रांतीला जोरदार वेग येत असल्याचे त्यांना आढळून आल्याने ते कमालीचे चकित झाले. वेतनी कामगारांमध्ये आणि भूमी करणाऱ्यांमध्ये "सगळी जमीन किसानांना, सगळे कारखाने कामगारांना" अशली भाषा ऐकू येणे नित्याचे बनले होते. प्राध्यापकांनी जर युद्ध आघाडीला भेट दिली असती तर सबंध सेना शांततेबाबत बोलत असलेली त्यांना आढळली असती...

प्राध्यापक बुचकळ्यात पडले, पण त्यांनी तसे गोंधळून जाण्याचे कारण नव्हते; दोन्ही निरीक्षणे बरोबर होती. मालमत्ताधारी वर्ग अधिक रूढीप्रिय बनत चालला होता, जनता अधिक जहाल बनत चालली होती. व्यापाऱ्यांमध्ये आणि प्रज्ञावंतांमध्ये सर्वसाधारणपणे अशी भावना प्रबळ होत चालली होती की, क्रांती फार दूरपर्यंत जाऊन पोचली होती, फार काळपर्यंत टिकून राहिली होती; सर्व काही सुरळीत घडणे आता आवश्यक आहे. केरेन्स्की यांच्या हंगामी सरकारला पाठिंबा देणाऱ्या वर्चस्वधारी "नेमस्त" समाजवादी गटांची, अबारोन्त्सी-[1]* मेन्शेविकांची आणि समाजवादी-क्रांतिकारकांची ही धारणा होती.

---

*अशा तऱ्हेच्या खुणा त्या त्या प्रकरणाशी संबंधित परिशिष्टांचे संदर्भ आहेत.

१७ ऑक्टोबरला "नेमस्त" समाजवाद्यांच्या अधिकृत मुखपत्राने* म्हटले होते :

"... क्रांतीच्या नाटकाचे दोन अंक आहेत : जुन्या राजवटीचा नाश आणि नव्या राजवटीची निर्मिती. पहिला अंक प्रदीर्घ काळपर्यंत चालला. आता दुसरा अंक सुरू करायची वेळ झालीय आणि तो लौकरात लौकर संपवला पाहिजे. एका थोर क्रांतिकारकाने म्हटल्याप्रमाणे, 'मित्रांनो, क्रांती संपविण्याची घाई करू या. जो तिला फार काळपर्यंत टिकू देईल त्याला तिची फळे मिळायची नाहीत...'"

पण कामगार, सैनिक आणि किसान समुदायांमध्ये मात्र अशी जोरदार भावना होती की, 'पहिला अंक' अजून खेळलाच गेला नव्हता. आपल्या सैनिकांना माणुसकीने वागविण्याची सवय नसलेल्या अधिकाऱ्यांशी आघाडीवर सेना समितीची सतत टक्कर घडत होती; तिकडे पिछाडीवर किसानांनी निवडलेल्या भूमी समित्या सरकारचे जमीनविषयक कायदे प्रत्यक्षात अंमलात आणण्याच्या प्रयत्नात बंदिवासाची शिक्षा भोगत होत्या; आणि कारखान्यांमधील कामगारांना[2] काळ्या याद्यांशी व ताळेबंद्यांशी सामना करावा लागत होता. एवढ्यावरच थांबले नव्हते तर, परतणाऱ्या राजकीय हद्दपारांना देशातील "अनिच्छित" नागरिक म्हणून वगळण्यात येत होते; आणि काही बाबतीत, परदेशांमधून आपल्या गावी परतणाऱ्या लोकांवर, १९०५ साली केलेल्या क्रांतिकारक कृतींबद्दल खटले भरून त्यांना कारावासात डांबण्यात येत होते.

लोकांच्या बहुविध असंतोषाला "नेमस्त" समाजवाद्यांचे एकच उत्तर होते : डिसेंबरात भरणाऱ्या घटनात्मक सभेची वाट पहा. पण जनता तेवढ्यावर समाधानी नव्हती. घटनात्मक सभा ही उत्तमच होती; पण अशा काही विशिष्ट गोष्टी होत्या की ज्यांच्यासाठी रशियन क्रांती घडविण्यात आली होती व ज्यांच्यासाठी मंगळ मैदानावरच्या**, बंधुत्वाचे दर्शन घडवणा-

---

* मध्यवर्ती कार्यकारी समितीच्या 'इझ्वेस्तिया' (समाचार) वृत्तपत्राचा येथे संदर्भ आहे. त्यावेळी ते मेन्शेविकांच्या आणि समाजवादी-क्रांतिकारकांच्या हाती होते. — सं.

** मंगळ मैदान — पेत्रोग्रादमधील (आताचे लेनिनग्राद) एक चौक. मार्च लोकशाहीवादी क्रांतीमध्ये एकतंत्री सत्तेविरुद्ध लढताना धारातीर्थी पडलेल्यांचे ५ एप्रिल १९१७ रोजी तेथे दफन करण्यात आले. — सं.

त्या कबरस्तानामध्ये क्रांतिकारक हुतात्मे आपले देह कुजवीत होते, त्या गोष्टी साध्य करणे आवश्यकच होते. शांतता, किसानांना भूमी आणि उद्योगधंद्यांवर कामगारांचे नियंत्रण ह्या त्या गोष्टी होत्या व घटनात्मक सभा होवो अथवा न होवो, या उद्दिष्टांना साध्य करायलाच हवे होते. घटनात्मक सभा सतत लांबणीवर टाकण्यात येत होती आणि लोक पुरेसे शांत होईपर्यंत – त्यांच्या मागण्या थोड्या कमी होईपर्यंत – कदाचित पुन्हा एकदा घटनात्मक सभा पुढे ढकलली गेली असती! कोणत्याही परिस्थितीत क्रांती घडून आठ महिने उलटले होते आणि या काळात दाखविण्याजोगे कार्य फारच थोडे घडले होते...

दरम्यान सेनेतून पळून जाऊन सैनिकांनी शांततेचा प्रश्न सोडवायला आरंभ केला होता, किसानांनी जमीनदारांचे भव्य वाडे जाळून त्यांच्या मोठमोठ्या मालमत्ता आपल्या ताब्यात घेतल्या होत्या, कामगारांनी घातपात घडवले होते आणि संप केले होते... अर्थात स्वाभाविकपणेच कोणत्याही प्रकारची लोकशाहीवादी तडजोड करण्याविरुद्ध कारखानदारांनी, जमीनदारांनी आणि सेनाधिकाऱ्यांनी आपले सारे प्रयत्न पणाला लावले होते.

निःष्प्रभ सुधारणा आणि कडक दडपशाहीचे उपाय यांच्या दरम्यानच हंगामी सरकारच्या धोरणामध्ये आलटून पालटून बदल घडत होते. समाजवादी मजूर मंत्र्यांनी फर्मान काढले की, सर्व कामगार समित्यांनी इतःपर केवळ कामाच्या तासांनंतरच सभा घ्याव्यात. आघाडीवरच्या सैनिकांमध्ये, विरोधी राजकीय पक्षांच्या "आंदोलकां"ना पकडण्यात आले, जहाल वर्तमानपत्रे बंद पाडण्यात आली आणि क्रांतिकारक प्रचारकांना मृत्युदंडाच्या शिक्षा ठोठावण्यात आल्या. लाल रक्षकांना निःशस्त्र करण्याचे प्रयत्न झाले. प्रांतांमध्ये सुव्यवस्था राखण्यासाठी कझाकांना पाठवण्यात आले.

मालमत्ताधारी वर्गांबरोबर सहकार्य करणे आवश्यक आहे असे समजणाऱ्या "नेमस्त" समाजवाद्यांनी आणि मंत्रिमंडळातील त्यांच्या पुढाऱ्यांनी या उपाययोजनांना पाठिंबा दिला. जनता त्यांना सोडून जाऊ लागली व शांतता, किसानांना आणि उद्योगधंद्यांवर कामगारांचे नियंत्रण यांचा पुरस्कार करणाऱ्या व कामगारवर्गाच्या सरकारचा आग्रह धरणाऱ्या बोल्शेविकांना जाऊन मिळू लागली. १९१७ च्या सप्टेंबरात परिस्थिती अत्यंत नाजुक बनली. देशातील बहुसंख्य जनतेचा प्रचंड विरोध असतानाही, मालमत्ताधारी वर्गांबरोबर संमिश्र सरकार स्थापन करण्यात केरेन्स्कींना आणि "नेमस्त"

समाजवाद्यांना यश आले ; त्याच्या परिणामी, मेन्शेविक आणि समाजवादी-क्रांतिकारक लोकांचा विश्वास कायमचा गमावून बसले.

ऑक्टोबरच्या मध्याच्या सुमारास, 'राबोची पूत' (कामगारांचा मार्ग) मध्ये, 'समाजवादी मंत्री'[3] या शीर्षकाखालील लेखात, लोकांच्या "नेमस्त" समाजवाद्यांविरोधीच्या भावना व्यक्त झालेल्या होत्या :

"त्यांनी केलेल्या सेवांची यादी पुढीलप्रमाणे आहे :

**त्सेरेतेली :** कामगारांना नि:शस्त्र केले, जनरल पोलोव्त्सेव यांच्या मदतीने क्रांतिकारक सैनिकांना काटशह देऊन त्यांच्यावर मात केली आणि सैन्यामध्ये मृत्युदंडाच्या शिक्षेला मंजुरी दिली.

**स्कोबेलियेव :** भांडवलदारांच्या नफ्यांवर १०० टक्के कर बसविण्याची आरंभी घोषणा केली आणि कारखान्यांमधील कामगार समित्या विसर्जित करण्याच्या* प्रयत्नाने अखेर केली.

**अव्क्सेन्तियेव :** शेकडो किसानांना, भूमी समित्यांच्या सभासदांना कारगृहात डांबले आणि डझनावारी कामगार-किसान वृत्तपत्रे बंद पाडली.

**चेर्नोव :** फिन्लंडच्या संसदेला विसर्जित करण्याचा आदेश देणाऱ्या "शाही" जाहीरनाम्यावर सही केली.

**साविन्कोव :** जनरल कोर्निलोव यांच्याशी उघड उघड मैत्रीचा करार केला. या देशोद्धारकाला (कोर्निलोव) पेत्रोग्रादचा विश्वासघात करणे शक्य न होण्याची कारणे म्हणजे ती साविन्कोव यांच्या कुवतीबाहेरची होती.

**झारूदनी :** अलेक्सीन्स्की आणि केरेन्स्की यांच्या संमतीने क्रांतीच्या कितीतरी सर्वोत्तम कार्यकर्त्यांना, सैनिकांना आणि खलाशांना तुरुंगात डांबले.

**निकितिन :** रेल्वे कामगारांविरुद्ध नीच पोलिसी कारवाया केल्या.

**केरेन्स्की :** यांच्याबद्दल काही न बोलणेच इष्ट. यांच्या सेवांची यादी फारच लांबलचक आहे..."

बाल्टिक काफल्याच्या प्रतिनिधींच्या हेल्सिंगफोर्स येथील काँग्रेसमध्ये एक ठराव मंजूर करण्यात आला. त्या ठरावाचा आरंभ पुढीलप्रमाणे होता :

"भांडवलदारवर्गाच्या वतीने बेशरम राजकीय धमकावण्या देऊन,. महान क्रांतीला बदनाम करणाऱ्यांपैकी आणि तिचा नाश करणाऱ्यांपैकी व त्यायोगे क्रांतिकारक जनतेचा नाश करणाऱ्यांपैकी एक म्हणून "समाजवादी", राजकीय साहसबाज केरेन्स्की यांना हंगामी सरकारमधून ताबडतोब हाकलून लावावे अशी आम्ही मागणी करतो..."

या सर्व गोष्टींचा प्रत्यक्ष परिणाम म्हणजे बोल्शेविकांचा उदय...

१९१७ च्या मार्चमध्ये तव्रीचेस्की प्रासादावर जेव्हा कामगारांच्या आणि सैनिकांच्या लाटांवर लाटा धडकल्या व डळमळत्या शाही दूमाला रशियाची सर्वोच्च सत्ता हाती घेण्यास त्यांनी भाग पाडले तेव्हापासून, क्रांतीच्या क्रमामधील प्रत्येक बदल लोकांच्या, कामगारांच्या, सैनिकांच्या आणि किसानांच्या समूहांनी घडवून आणला. त्यांनी मिल्युकोव मंत्रिमंडळाला भिरकावून लावले; त्यांच्याच सोविएतने जगासमोर रशियन शांततेच्या अटींची घोषणा केली "विलीनीकरणाशिवाय, नुकसानभरपाईशिवाय लोकांना आत्मनिर्णयाचा हक्क"; आणि पुन्हा जुलैमध्ये विस्कळीत कामगारवर्गाच्या उत्स्फूर्त उठावाने पुन्हा एकदा तव्रीचेस्की प्रासादावर हल्ला चढवला आणि रशियन सरकार सोविएतांनी आपल्या हाती घ्यावे अशी मागणी केली.

त्या काळात एका छोट्या राजकीय गटाच्या* स्वरूपात अस्तित्वात असलेल्या बोल्शेविकांनी चळवळीचे नेतृत्व स्वतःकडे घेतले. या उठावाच्या दारुण अपयशाच्या परिणामी लोकमत त्यांच्या विरुद्ध बनले व पेत्रोग्रादचे सेंट अंतुआन** समजल्या जाणाऱ्या वीबोर्ग विभागात पुढारीविहीन कामगारांचे जमाव चुपचाप परत गेले. त्यानंतर बोल्शेविकांची पारध सुरू झाली;

---

*मार्च १९१७ च्या भांडवलदारी क्रांतीनंतरच्या ताबडतोबीच्या काळात, भूमीगत अवस्थेतून नुकताच बाहेर पडलेला बोल्शेविक पक्ष सदस्यसंख्येत तुलनात्मकदृष्ट्या लहान होता. – सं.

**सेंट अंतुआन – अठराव्या आणि एकोणीसाव्या शतकांच्या अखेरीस क्रांतिकारक उठावांमध्ये कामगारवस्तीच्या लढाऊपणासाठी प्रसिद्ध असलेले पॅरिसमधील एक उपनगर. वीबोर्ग विभागात पेत्रोग्रादमधील कामगारवस्ती होती. – सं.

शेकडोंना अटक झाली, त्यांत ट्रॉट्स्की,* मादाम कल्लोनताय ** आणि कामेनियेव यांचा समावेश होता. लेनिन आणि झिनोवियेव *** कायद्यापासून दूर पळण्यासाठी अज्ञातवासात गेले; बोल्शेविक वृत्तपत्रे बंद पाडण्यात आली.

---

* ट्रॉट्स्की (ब्रोन्स्टीन) — १८९७ पासून रशियन सामाजिक-लोकशाही कामगार पक्षाचे सभासद, मेन्शेविक. १९१७ च्या उन्हाळयात बोल्शेविक पक्षात दाखल झाले. पण तरीही बोल्शेविकांचे धोरण त्यांना पटले नाही व लेनिनवादाविरुद्ध आणि पक्षाच्या धोरणाविरुद्ध त्यांनी छुप्या रीतीने व उघड पद्धतीने संघर्ष केला. त्यांच्या या वर्तनाबद्दल १९२७ मध्ये त्यांची पक्षातून हकालपट्टी करण्यात आली. — सं.

** कल्लोनताय (१८७२-१९५२) — १९१५ पासून बोल्शेविक पक्षाच्या सदस्या, नोव्हेंबर क्रांतीनंतर एक प्रमुख मुत्सद्दी. कॉमिंटर्नच्या आंतरराष्ट्रीय महिला सचिवालयाच्या चिटणीस. — सं.

*** झिनोवियेव (रादोमीस्लस्की) — अनेकवेळा बोल्शेविकवादापासून च्युत झाले आणि अखरीस मार्क्सवाद-लेनिनवादापासून कायमचे दुरावले. १९१७ च्या नोव्हेंबरात त्यांनी आणि कामेनियेव यांनी 'नोवाया झीझ्न' नामक मेन्शेविक वृत्तपत्रात एक लेख छापून विश्वासघाती कृत्य केले; सशस्त्र उठावाबाबतच्या मध्यवर्ती समितीच्या निर्णयाला या लेखातून त्यांनी विरोध प्रकट केला होता व अशा रीतीने बोल्शेविकांची योजना उघडकीस आणली होती. बोल्शेविक पक्षाच्या सदस्यांना उद्देशून लिहिलेल्या आपल्या पत्रात (चौथी आवृत्ती, खंड २६, पान १८५) लेनिन यांनी या कृतीला संपफोडी म्हणून संबोधले होते आणि झिनोवियेव व कामेनियेव यांना पक्षातून हाकलून द्यावे अशी मागणी केली होती. नोव्हेंबर क्रांतीच्या विजयानंतर, मेन्शेविकांच्या, समाजवादी-क्रांतिकारकांच्या आणि 'जनसमाजवाद्यांच्या' प्रतिनिधींबरोबर संमिश्र सरकार स्थापन करण्याच्या कल्पनेला झिनोवियेव यांनी पाठिंबा दिला होता. या देशात समाजसत्तावादाची उभारणी शक्य नाही असे सांगून, तथाकथित नव्या विरोधी पक्षाचा प्रमुख म्हणून १९१५ मध्ये ते वावरू लागले. हा विरोधी पक्ष ट्रॉट्स्कीशी सख्य राखून होता. सतत पक्षविरोधी गटबाजीच्या कारवाया केल्याबद्दल झिनोवियेव यांना १९२७ मध्ये पक्षामधून हाकलून लावण्यात आले. पक्षात त्यांनी पुन:प्रवेश मिळविला, पण पुन्हा त्यांनी पक्षविरोधी आणि सोविएतविरोधी कार्य चालू ठेवले व त्यांची पुनश्च पक्षातून हकालपट्टी झाली. — सं.

बोल्शेविक हे जर्मनांचे हस्तक आहेत असा प्रक्षोभकांनी आणि प्रतिगाम्यांनी ओरडा केला. त्यांचा कांगावा एवढा जोरदार होता की, जगातल्या जनतेचा त्यांच्या विधानांवर विश्वास बसला.

पण या आरोपांना सिद्ध करण्यास हंगामी सरकार असमर्थ ठरले; जर्मनांबरोबर कट केल्याचे सिद्ध करणारे कागदपत्र बनावट * असल्याचे आढळून आले; आणि खटल्याविना, नाममात्र जामीनावर किंवा अजिबात जामीन न घेता, एकेका बोल्शेविकाची तुरुंगामधून सुटका करण्यात आली. अखेरीस फक्त सहाजण तुरुंगात राहिले. सतत पलटत राहणारे हंगामी सरकार नपुंसक आणि चंचल आहे, हे विधान कुणीही खोडून काढू शकत नव्हते. अखिल जनतेला अत्यंत प्रिय असलेली घोषणा बोल्शेविकांनी पुन्हा एकदा उठवली: "सर्व सत्ता सोविएतांच्या हाती!" – आणि यात केवळ त्यांचा स्वार्थ नव्हता, कारण त्या काळात त्यांचे कट्टर शत्रू असलेल्या "नेमस्त" समाजवाद्यांचे सोविएतांमध्ये बाहुल्य होते.

पण याहूनही अधिक जोरदार काम त्यांनी केले व ते म्हणजे कामगारांच्या, सैनिकांच्या आणि किसानांच्या अत्यंत वेडचाबागडचा, साध्या इच्छांचा स्वीकार करून त्यांच्या आधारे त्यांनी आपला ताबडतोबीचा कार्यक्रम बनवला. अशा प्रकारे अबारोन्त्सी-मेन्शेविक आणि समाजवादी-क्रांतिकारक भांडवलदार-वर्गाशी समझोता करण्यात गुंतले होते तेव्हा बोल्शेविकांनी वेगाने जनतेची मने काबीज केली. जुलैमध्ये त्यांची पारध केली जात होती, तिटकारा केला जात होता; पण सप्टेंबरच्या दरम्यान राजधानीतील कामगार, बाल्टिक काफल्याचे खलाशी आणि सैनिक हे संपूर्णपणे त्यांच्या बाजूचे बनले होते. मोठ्या शहरांमध्ये[4] सप्टेंबरात झालेल्या नगरपालिकांच्या निवडणुका महत्त्वाच्या होत्या; जूनमध्ये ७० टक्के जागा मिळविणाऱ्या मेन्शेविकांना आणि समाजवादी-क्रांतिकारकांना फक्त १८ टक्के जागा मिळाल्या होत्या...

परदेशी निरीक्षकांना घोटाळ्यात टाकणारी एक घटना आहे: सोविएतांच्या मध्यवर्ती कार्यकारी समित्यांनी, मध्यवर्ती सेना आणि नाविक दल समित्यांनी,** काही कामगार संघटनांच्या मध्यवर्ती समित्यांनी – त्यात

---

* कुप्रसिद्ध 'सीस्मन दस्तऐवजां'पैकीच हे काही कागदपत्र होते.

बोल्शेविक नेत्यांना बदनाम करण्यासाठी सीस्मन नामक अमेरिकन प्रतिगामी पत्रकाराने सोविएतविरोधी बनावट कागदपत्रांचा एक संग्रह अमेरिकेत प्रसिद्ध केला होता. – सं.

** पहा – 'टीपा आणि खुलासे'.

ठळकपणे टपाल व तारखात्याचे कामगार आणि रेल्वे कामगार यांचा समावेश आहे – अत्यंत कडवेपणाने बोल्शेविकांना विरोध केला होता ही वस्तुस्थिती होती या सर्व मध्यवर्ती समित्या उन्हाळयाच्या मध्याच्या सुमारास किंवा त्याही आधी निवडण्यात आल्या होत्या व त्यावेळी मेन्शेविकांना आणि समाजवादी-क्रांतिकारकांना लोकांचा जोरदार पाठिंबा होता. आता मात्र त्यांनी कोणत्याही प्रकारच्या नव्या निवडणुका घेणे लांबणीवर टाकले किंवा निवडणुका घेण्यास प्रतिबंध केला. खरे म्हणजे कामगारांच्या आणि सैनिकांच्या प्रतिनिधींच्या सोविएतांच्या घटनेनुसार अखिल रशियन काँग्रेस सप्टेंबरात भरवायला पाहिजे होती. पण घटनात्मक सभा अवघ्या दोन महिन्यांवर आली होती या सबबीवर केंद्रीय कार्यकारी समिती बैठक भरवीत नव्हती व घटनात्मक सभेच्या वेळी सोविएते आपला अधिकारत्याग करतील, असे तिने सुचविले होते. दरम्यान सबंध देशभर स्थानिक सोविएतांमधून, सैनिकांच्या आणि खलाशांच्या संघटनांच्या शाखांमधून व तुकडयांमधून बोल्शेविकांचा विजय होत चालला होता. किसानांची सोविएते अद्याप रूढीप्रिय राहिली होती, कारण सुस्त ग्रामीण भागांमध्ये राजकीय जाणीवेचा अत्यंत सावकाशपणे विकास घडत होता आणि एक सबंध पिढीभर समाजवादी-क्रांतिकारक पक्ष किसानांमध्ये चळवळीचे कार्य करीत होता... पण तरीही किसानांमध्ये एक क्रांतिकारक गट तयार होत होता. ऑक्टोबरमध्ये समाजवादी-क्रांतिकारकांच्या डाव्या गटात फूट पडून त्याने डावा समाजवादी-क्रांतिकारकांचा नवा राजकीय पक्ष स्थापन केला तेव्हा हे स्पष्ट झाले.

त्याचवेळी प्रतिगामी शक्तींचा आत्मविश्वास सर्वत्र वाढत चालल्याची चिन्हे स्पष्ट दिसू लागली होती.[5] उदाहरणार्थ, पेत्रोग्रादमधील त्रोईत्स्की प्रहसन रंगमंदिरात 'झारची पापे' नांवाचा एक खेळ चालू असताना काही राजनिष्ठांनी मध्येच व्यत्यय आणला व "सम्राटाचा आपमान" केल्याबद्दल नटांना जिवंत जाळण्याची धमकी दिली. काही वृत्तपत्रांनी "रशियन नेपोलियन"साठी उसासे टाकायला आरंभ केला. कामगार प्रतिनिधींच्या सोविएतांचा ( सोविएत राबोचिख देपुतातोव ) "सोविएत सबाचिख देपुतातोव" – म्हणजे कुत्र्यांचे प्रतिनिधी – असा उल्लेख करण्याची भांडवलदारी प्रज्ञावंतांना नित्याची सवय पडली होती.

१५ ऑक्टोबरला माझे एका बडया रशियन भांडवलदाराशी, "रशियन रॉकफेलर" म्हणून ओळखल्या जाणाऱ्या स्तेपान गेओर्गियेविच लिआनोझोव या राजकीयदृष्टया कॅडेटपंथी गृहस्थांशी, संभाषण घडले.

ते म्हणाले, "क्रांती हे एक आजारपण आहे. एखाद्या आजारी मुलाला बरे करण्यासाठी जसा हस्तक्षेप करावा लागतो त्याप्रमाणे आज ना उद्या परकी सत्तांनी इथे हस्तक्षेप केला पाहिजे. अर्थात थोड्याफार प्रमाणात हे अयोग्य ठरेल, पण आपल्या देशांमध्ये बोल्शेविकवादाचा किती धोका आहे, 'कामगारवर्गीय अधिसत्ता' आणि 'जागतिक सामाजिक क्रांती' यांसारख्या संसर्गजन्य विचारांचा किती धोका आहे, हे राष्ट्रांना समजले पाहिजे... हा हस्तक्षेप करावा लागणार नाही अशी एक शक्यता आहे. वाहतूक विस्कळीत करण्यात आली आहे, कारखाने बंद केले जात आहेत आणि जर्मनांचे आगेकूच चालू आहे. उपासमार आणि पराभव यांमुळे रशियन जनता वठणीवर येईल..."

श्री. लिआनोझोव यांचे ठाम मत होते की, काहीही झाले तरी कामगारांच्या कारखाना समित्यांच्या अस्तित्वाला मान्यता देणे किंवा कामगारांना उद्योगधंद्यांच्या व्यवस्थापनात भागीदारी देऊ करणे व्यापाऱ्यांच्या आणि कारखानदारांच्या दृष्टीने सर्वथा अशक्य ठरेल.

"बोल्शेविकांच्या बाबतीत बोलायचे तर दोनांपैकी एका पद्धतीने त्यांचा निकाल लावता येईल. पेत्रोग्राद खाली करायचे, नंतर वेढ्याची परिस्थिती जाहीर करायची आणि मग त्या विभागाचा लष्करी सेनापती कोणत्याही कायदेशीर उपचारांविना या सद्‌गृहस्थांचा समाचार घेऊ शकेल... **किंवा, उदाहरणार्थ, घटनात्मक सभेने कोणत्याही प्रकारच्या कल्पनावादी प्रवृत्ती व्यक्त केल्या, तर शस्त्रबळाच्या जोरावर त्यांना उधळून लावता येईल...**"

हिवाळा जवळ येत चालला होता—महाभयंकर रशियन हिवाळा. व्यापारी-कारखानदारांच्या वर्तुळात मी चर्चा ऐकली होती: "हिवाळा हा नेहमीच रशियाचा सर्वोत्तम मित्र होता. कदाचित आता तो क्रांतीपासून आमची मुक्तता करील." गोठलेल्या युद्धआघाडीवर केविलवाण्या, निरुत्साही सेना पूर्वीप्रमाणेच उपासमार सहन करीत होत्या, मरत होत्या. रेलगाड्या बंद पडत होत्या, खाद्यपदार्थ कमी होत होते, कारखाने बंद पडत होते. भांडवलदारवर्ग लोकांच्या जीवनाशी घातकी खेळ करीत आहे, आघाडीवर पराभवाला कारणीभूत होत आहे, असा आत्यंतिक निराशेला पोचलेल्या लोकांनी ओरडा केला. "देशाला आपल्या कर्तव्याची जाग आणण्यासाठी रीगाची किंमत आम्हाला मोजावी लागणार काय?" असा जनरल कोर्निलोव यांनी जाहीररीत्या सवाल टाकला आणि नंतर लगेचच रीगा शत्रूच्या हाती शरण गेले.

वर्गलढा एवढ्या पराकोटीला जाऊ शकतो, हे अमेरिकनांच्या दृष्टीने अतर्क्य आहे. पण उत्तर आघाडीवरील अधिकाऱ्यांना मी वैयक्तिकरीत्या भेटलो होतो आणि सैनिक समित्यांशी सामोपचार करण्यापेक्षा लष्कराचा संहार होणे त्यांनी प्रांजळपणे श्रेयस्कर मानले होते. कॅडेट पक्षाच्या पेत्रोग्राद शाखेच्या चिटणीसांनी मला सांगितले की, देशाचे आर्थिक जीवन कोलमडून टाकणे हा क्रांतीला बदनाम करण्याच्या मोहीमेतील एक भाग होता. एका मित्रराष्ट्राच्या मुत्सद्द्याने – त्यांचे नांव गुप्त ठेवण्याचे मी त्यांना वचन दिले आहे – आपल्या स्वतःच्या माहितीच्या आधारे या विधानाला पुष्टी दिली. मला ठाऊक आहे की, खार्कोवनजीकच्या काही कोळसा खाणींना खुद्द त्यांच्या मालकांनीच आगी लावल्या किंवा त्यांच्यामध्ये पाणी सोडले, मॉस्कोतील कापड गिरण्यांमधील अभियंत्यांनी गिरण्या सोडून जाताना यंत्र-सामग्री बिघडवून ठेवली, रेलमार्गावरील काही अधिकारी आगगाड्यांची इंजिने मोडून टाकण्याच्या प्रयत्नात असताना कामगारांनी त्यांना पकडले...

क्रांतीपेक्षा, एवढेच नव्हे तर हंगामी सरकारपेक्षा जर्मन परवडले, असे मालमत्ताधारी वर्गामधील मोठ्या विभागाचे मत होते आणि तसे उघडपणे बोलून दाखविण्याची त्यांना मुळीच लाज वाटत नसे. ज्या रशियन घरात मी रहात होतो तेथे जेवणाच्या टेबलाशी बहुधा संभाषणाचा विषय जर्मनांच्या आगमनासंबंधी असे, आपल्याबरोबर ते "कायदा आणि सुव्यवस्था" घेऊन येतील, याविषयीचा असे... एका संध्याकाळी मी मॉस्कोतील एका व्यापाऱ्याच्या घरी गेलो होतो; चहापानाच्या वेळी टेबलाशी बसलेल्या अकरा लोकांना आम्ही सवाल केला की, त्यांना "विल्हेल्म आणि बोल्शेविक" यांच्यापैकी कोण चालेल. त्या अकरांपैकी दहाजणांनी विल्हेल्मला अनुकूलता दर्शविली...

सट्टेबाजांनी सार्वत्रिक गोंधळाचा फायदा उठवून अफाट धनसंपदा गोळा केली आणि खयालीखुशालींमध्ये व सरकारी अधिकाऱ्यांच्या मुठी दाबण्यात पैसा उडवला. खाद्यपदार्थांची आणि इंधनाची साठेबाजी करण्यात आली किंवा गुप्तपणे देशाबाहेर स्वीडनकडे त्यांची रवानगी करण्यात आली. उदाहरणार्थ, क्रांतीच्या पहिल्या चार महिन्यांमध्ये, पेत्रोग्रादच्या मोठ्या सरकारी गुदामांमधून धान्याचे राखीव साठे उघडपणे लुटण्यात आले व सुमारे दोन वर्षे पुरेल एवढा धान्यसाठा प्रथम जेथे होता, तो सबंध शहराला महिनाभर खाऊ घालण्यास पुरेसा ठरणार नाही अशी परिस्थिती निर्माण झाली... हंगामी सरकारमधील शेवटच्या पुरवठा मंत्र्यांच्या अधिकृत अहवालानुसार,

व्लादिवस्तोकमध्ये पौंडाला दोन रूबल या घाऊक भावाने सरसकट कॉफी खरेदी करण्यात आली आणि पेत्रोग्रादमधील गिऱ्हाईकाला त्याच पौंडभर कॉफीला तेरा रूबल मोजावे लागले. मोठ्या शहरांमधील सर्व दुकानांमधून भावारी खाद्यपदार्थ आणि कपडे उपलब्ध होते; पण फक्त श्रीमंत लोकच ते खरेदी करू शकत होते.

एका प्रांतिक गावामधील एक व्यापारी कुटुंब सट्टेबाज बनलेले मला माहीत होते. रशियन माणसे त्याला माराद्योर (लुटारू, पिशाच) म्हणत. त्या कुटुंबातील तीन मुलांनी लाच चारून स्वतःची लष्करी सेवेमधून मुक्तता करून घेतली होती. एकाने खाद्यपदार्थांचा काळाबाजार चालवला होता. दुसरा लेना खाणींमधील बेकायदेशीर सोने फिन्लंडमधील कुणा अज्ञात मंडळींना विकत होता. तिसऱ्याचे एका चॉकलेट कारखान्याच्या कारभारात बरेच मोठे वजन होते. स्थानिक सहकारी संस्थांना हा कारखाना माल पुरवीत होता व त्या बदल्यात त्या सहकारी संस्था त्याच्या सर्व गरजा भागवीत होत्या. त्यामुळे आम जनतेला रेशन कार्डांवर फक्त पाव पौंड काळा पाव मिळत असताना त्याला मात्र पांढरा पाव, साखर, चहा, खडीसाखर, केक आणि लोणी भरपूर प्रमाणात मिळत होते... असे असूनही युद्धआघाडीवरील सैनिकांना जेव्हा थंडीमुळे, उपासमारीमुळे व थकव्यामुळे इतःपर लढणे अशक्य ठरले तेव्हा ही कुटुंबीय मंडळी किती सात्त्विक संतापाने किंचाळत होती: "भेकड कुठले!" "ते रशियन आहेत" ही किती "शरमेची" बाब आहे... अखेरीस गुदामांमध्ये लपवून ठेवलेले प्रचंड साठे बोल्शेविकांनी शोधून काढले व जप्त केले तेव्हा या कुटुंबियांच्या दृष्टीने ते अट्टल "चोर" ठरले होते.

या सर्व बाह्य कुजक्या वातावरणाखाली जुन्या काळच्या काळ्या शक्ती वावरत होत्या, दुसऱ्या निकोलायच्या अधःपातापासून आजपर्यंत त्यांच्यात काहीही बदल घडला नव्हता, त्या अद्याप गुप्तपणे वावरत होत्या आणि कमालीच्या क्रियाशील होत्या. कुप्रसिद्ध आख्रानाचे (गुप्त पोलिस) हस्तक अद्याप काम करीत होते, कधी झारसाठी तर कधी झारविरुद्ध, कधी केरेन्स्कीसाठी तर कधी केरेन्स्कीविरुद्ध – जो कुणी पैसे देईल त्याच्यासाठी... अंधारात काळे शंभर सारख्या सर्व प्रकारच्या भूमीगत संघटना या ना त्या स्वरूपात प्रतिगामित्वाला पुन्हा स्थापित करण्याच्या प्रयत्नांमध्ये गुंतलेल्या होत्या.

या भ्रष्टाचारी, बीभत्स अर्धसत्यांच्या वातावरणात, दर दिवसागणिक

एक स्वच्छ स्वर निनादत होता, बोल्शेविकांचा घनगंभीर सामूहिक आवाज घुमत होता: "सर्व सत्ता सोविएतांच्या हाती! सर्व सत्ता कोटी कोटी सामान्य कामगारांच्या, सैनिकांच्या, किसानांच्या प्रत्यक्ष प्रतिनिधींच्या हाती! आम्हाला भूमी पाहिजे, भाकरी पाहिजे, अर्थशून्य लढाई संपवा, गुप्त राजकारणाला, सट्टेबाजीला, विश्वासघाताला संपवा... क्रांती धोक्यात आहे आणि तिच्याबरोबर जगभरच्या जनतेचे ध्येय धोक्यात आहे!"

मार्चच्या आरंभीच्या दिवसात कामगारवर्ग आणि मध्यमवर्ग यांच्यामधील सुरू झालेला संघर्ष, सोविएते आणि सरकार यांच्यामधील संघर्ष, आता पराकोटीला पोचण्याच्या बेतात होता. एकाच झेपेत मध्ययुगापासून विसाव्या शतकापर्यंतचा पल्ला मारून रशियाने स्तंभित झालेल्या जगाला, प्राणांतिक झुंजीतल्या राजकीय आणि सामाजिक अशा क्रांतीच्या दोन तऱ्हांचे दर्शन घडविले.

या एवढ्या साऱ्या महिन्यांच्या उपासमारीनंतर आणि भ्रमनिरासानंतर, रशियन क्रांतीने केवढे जोमदार सामर्थ्य व्यक्त केले होते! भांडवलदारवर्गाने आपल्या रशियाला याहून अधिक चांगले ओळखायला पाहिजे होते. लौकरच रशियामध्ये क्रांतीचे "आजारपण" पूर्ण ताकदीने येणार होते...

मागे वळून पाहता, नोव्हेंबर उठावापूर्वीचा रशिया हा जणू दुसऱ्या युगातला भासतो, कमालीचा जुनाटपंथी वाटतो. अधिक नव्या, अधिक गतीशील जीवनाशी आपण फार वेगाने तद्रूप झालो; रशियन राजकारण त्याच वेगाने पूर्णतया डावीकडे झुकले आणि कॅडेटना "जनतेचे शत्रू" ठरवून बंडखोर ठरविण्यात आले, केरेन्स्की 'प्रतिक्रांतिकारक' बनले, त्सेरेतेली, दान, लीबेर, गोत्झ आणि अव्क्सेन्तियेव यांसारखे "मध्यम" समाजवादी पुढारी त्यांच्या अनुयायांच्या दृष्टीने आत्यंतिक प्रतिगामी ठरले व विक्तोर चेर्नोव आणि माक्सिम गोर्की यांच्यासारखे लोकसुद्धा उजव्या गटाचे बनले...

१९१७ च्या डिसेंबरच्या मध्यास, समाजवादी-क्रांतिकारकांच्या पुढाऱ्यांच्या एका गटाने ब्रिटिश राजदूत सर जॉर्ज ब्युकॅनन यांची खाजगीरीत्या भेट घेतली आणि त्यांनी सर जॉर्ज यांना विनविले की, ते तिथे आले होते ही वस्तुस्थिती कृपया त्यांनी कुणाला सांगू नये, कारण त्यांना "अतिरेकी उजव्या पंथाचे मानले जात होते."

"आणि विचार करा," सर जॉर्ज म्हणाले. "एक वर्षापूर्वी माझ्या सरकारने मला सूचना दिली होती की, मी मिल्युकोव यांची भेट घेऊ नये, कारण ते कमालीचे वामपंथी होते!"

रशियामध्ये, विशेषत: पेत्रोग्रादमध्ये, सप्टेंबर आणि ऑक्टोबर हे वर्षातले कमालीचे वाईट महिने आहेत. आकाश सदैव ढगाळलेले असते, दिवस लहान होत असतात आणि पावसाची सतत धार लागलेली असते. वाटेवर रबरबीत, निसरडा चिखल झालेला होता आणि जाडजूड बुटांना चिकटून त्याचे सर्वत्र ठसे उमटत होते. नगरपालिकेचा कारभार पूर्णतया बंद पडल्यामुळे परिस्थिती अधिकच बिकट बनली होती. फिन्लंडच्या आखातामधून चावरे दमट वारे घोंघावत येत होते आणि थंडगार धुक्याच्या लाटा रस्त्यांमधून उमटत होत्या. काटकसर करण्याच्या उद्देशाने, तसेच झेपेलिन विमानांच्या हल्ल्याच्या धास्तीने, रात्रीच्या वेळी रस्त्यावरचे दिवे फार कमी होते आणि त्यांच्यामधील अंतर दूर दूर होते; खासगी घरांमध्ये आणि गाळ्यांमध्ये संध्याकाळी ६ वाजल्यापासून मध्यरात्रीपर्यंत विजचे दिवे पेटते रहात होते, एकेका मेणबत्तीला चाळीस सेंट किंमत पडत होती व रॉकेलचा जबरदस्त तुटवडा होता. दुपारी तीन वाजल्यापासून सकाळी दहा वाजेपर्यंत अंधार दाटलेला होता. चोऱ्या आणि घरफोड्या वाढल्या होत्या. गाळ्यांच्या घरांमध्ये पुरुष मंडळी भरलेल्या रायफली घेऊन आळीपाळीने सबंध रात्रभर पहारा देत होती. ही परिस्थिती हंगामी सरकारच्या अमदानीत होती.

दर आठवड्यागणिक खाद्यपदार्थांचा अधिक तुटवडा भासू लागला. पावाचा दर दिवशीचा शिधा दीड पौंडावरून एक पौंडावर आला, मग पाऊण, अर्धा आणि पाव पौंडापर्यंत घसरला. अखेरीस तर पावाविना संपूर्ण आठवडा लोटला. प्रत्येकाला दर महिन्याला दोन पौंड साखर मिळेल असे ठरले होते, पण ती क्वचितच मिळत होती. चॉकलेटची वडी किंवा बेचव पौंडभर मिठाई घ्यायला सात ते दहा रूबल मोजावे लागत होते — म्हणजे किमान एक डॉलर. शहरातल्या निम्म्या बाळांना दूध मिळत नव्हते; अनेक हॉटेलांमध्ये आणि घरांमध्ये दुधाचे महिनोन् महिने दर्शन घडत नव्हते. फळांच्या मोसमात रस्त्याच्या कोपऱ्यावर एकेक सफरचंद आणि पेअर रूबलपेक्षा थोड्या कमी किंमतीला विकले जात होते...

दूध, पाव, साखर आणि तंबाखू यांसाठी थंडी-पावसात तासन् तास रांगेत उभे रहावे लागत होते. रात्रभर चाललेल्या बैठकीहून घरी परतताना, पहाटेपूर्वीच ही ख्वोस्त (शेपटी) लांबत चाललेली मी पाहिली होती. या रांगेत बहुसंख्य बायका उभ्या असत आणि काहींच्या कडेवर त्यांची तान्ही मुले असत... कार्लाईल यांनी आपल्या 'फ्रेंच क्रांती'मध्ये फ्रेंच जनतेचे वर्णन करताना म्हटले आहे की, रांगेत उभे राहण्याच्या सहनशीलतेत फ्रेंचांचा

कुणी हात धरणार नाही. "पूज्य" निकोलायच्या कारकीर्दीत १९१५ सालापासून रशियाला रांगेत उभे राहण्याची सवय लागली होती आणि तेव्हापासून १९१७ च्या उन्हाळयापर्यंत ही व्यवस्था मधून मधून चालत अखेरीस कायम स्वरूपात प्रस्थापित झाली होती. जरा कल्पना करा, रशियन हिवाळयाच्या त्या कडाक्याच्या थंडीत अर्धवस्त्र जनता पेत्रोग्रादच्या त्या थंडगार रस्त्यांवर दिवस दिवस उभी रहात होती! वस्तुतः रशियन लोकांचा स्वभाव कमालीचा चांगला आहे, पण पावाच्या रांगांमध्ये तासन् तास तिष्ठत उभे राहिल्यानंतर कधी कधी उमटणारे असंतोषाचे त्यांचे कडवर, तिखट उद्गार मला ऐकायला मिळाले आहेत...

अर्थात रविवारसकट सर्व रात्री सर्व नाटचगृहे चालू होती. मरीईन्स्की थिएटरमध्ये एका नव्या बॅलेमध्ये कार्साविना काम करीत होती आणि सर्व नृत्यप्रेमी रशियन जनता तिला पहायला येत होती. शल्यापिन यांचे गाण्याचे कार्यक्रम चालू होते. अलेक्सान्द्रिन्स्की थिएटरमध्ये तल्स्तोय लिखित 'महाभयंकर इवानचा मृत्यू' या मेयेरहोल्ड * यांच्या नाटचनिर्मितीचे पुनरुज्जीवन चालू होते; आणि मी पाहिलेल्या प्रयोगाच्या वेळी मला विशेषतः आठवते की, शाही पेज विद्यालयातला ** एक विद्यार्थी पूर्ण गणवेशात नाटकाला आला होता व दोन अंकांच्या मध्यांतरात, राजचिन्हे काढून टाकलेल्या रिकाम्या शाही बॉक्सकडे तोंड करून सलाम ठोकीत होता... 'क्रिवोये झेरकालो' (तिरपा आरसा) नाटक कंपनीने श्नित्झलर *** यांच्या 'रीगेन'ला थाटात सादर केले.

हर्मिताज आणि इतर कला-सज्जांना मॉस्कोला हलविण्यात आले असले तरी दर आठवडयाला चित्रांची प्रदर्शने भरत होती. कला, साहित्य आणि सुगम तत्त्वज्ञानावरची व्याख्याने ऐकण्यासाठी बुद्धिमान महिलांच्या झुंडीच्या झुंडी लोटत होत्या. थिऑसाफिस्टांच्या कार्याला त्यावेळी जोराचा बहर आला होता. आणि रशियात इतिहासामध्ये प्रथमच प्रवेशलेल्या मोक्ष-सेनेने ख्रिस्तचरित्र निरुपणाच्या सभा घोषित करणाऱ्या पत्रकांनी साऱ्या भिंती

---

* मेयेरहोल्ड (१८७४-१९४०) – सोविएत नाटच दिग्दर्शक व नट. – सं.

** शाही पेज विद्यालय – झारकालीन रशियामधील सेनापतींच्या आणि उच्चभ्रूंच्या मुलांसाठी असलेले खास लष्करी विद्यालय. – सं.

*** आर्थर श्नित्झलर (१८६२-१९३१) – आस्ट्रियन लेखक. – सं.



व्ला. इ. लेनिन, १९१७

भरून टाकल्या होत्या व या सभांची रशियन श्रोत्यांना मोठी मौज वाटत होती, तसेच आश्चर्यही वाटत होते...

अशा प्रसंगी नेहमी घडते त्याप्रमाणे, क्रांतीकडे जास्तीत जास्त दुर्लक्ष करून, शहरातले सामान्य नित्याचे व्यवहार चालूच होते. कवींची काव्य-रचना चालू होती—पण ती क्रांतीबद्दलची कवने नव्हती. वास्तववादी चित्र-कार मध्ययुगीन रशियन इतिहासामधील प्रसंग रंगवीत होते—पण क्रांतीबद्दल त्यांच्या चित्रविषयांमध्ये लवलेशही नव्हता. फ्रेंच भाषा शिकण्यासाठी आणि कंठसाधनेसाठी प्रांतांमधून श्रीमंत व्यक्ती राजधानीमध्ये येत होत्या व सोनेरी किनारीची नारिंगी टोपी लेऊन आणि नक्षीकाम केलेल्या कॉकेशिअन तलवारी लटकावून आनंदी तरुण देखणे लष्करी अधिकारी हॉटेलांच्या आवारांमधून भटकत होते. कनिष्ठ दर्जाच्या अधिकाऱ्यांच्या बायका दुपारच्या वेळी चहाला एकमेकींकडे जमत होत्या, प्रत्येक महिला आपल्या सोन्याच्या किंवा चांदीच्या किंवा हिऱ्या-माणकांच्या छोटया डबीतून साखर आणि लोकरीच्या हातमो-जातून पावाचा अर्धा तुकडा बरोबर घेऊन जात होती व झार परत सत्तेवर यावा किंवा जर्मनांची सत्ता यावी किंवा नोकरांचा प्रश्न सुटेल असे काहीतरी घडावे अशी इच्छा करीत होती... एका दुपारी माझ्या एका मित्राची मुलगी कमालीची संतापून, जळफळत घरी आली, कारण ट्रामधल्या महिला कंडक्टरने तिला 'कॉम्रेड' म्हणून संबोधले!

त्यांच्या सभोवार महान रशियाची भूमी प्रसववेदनांनी तळमळत होती, एका नव्या जगाला जन्म देऊ पहात होती. ज्या नोकरांना एकेकाळी जना-वरांसारखे वागवण्यात येत होते आणि त्यांना कामाबद्दल फुटकळ मोबदला दिला जात होता, असे लोक आता स्वतंत्र बनत होते. बुटांच्या जोडीला शंभरहून अधिक रूबल मोजावे लागत होते आणि सरासरी मासिक वेतन पस्तीस रूबल झाल्याने, रांगेमध्ये उभे राहून आपले जोडे झिजवण्यास नो-करांनी नकार दिले. पण याहीपेक्षा आणखी काही घडले होते. नव्या रशिया-मध्ये प्रत्येक स्त्री-पुरुषाला मतदानाचा हक्क होता; नव्या आणि धक्कादायी गोष्टी सांगणारी कामगारवर्गीय वर्तमानपत्रे होती; सोविएते होती; आणि युनियना होत्या. घोडागाडी हाकणाऱ्यांचीसुद्धा युनियन होती; पेत्रोग्राद सोविएतमध्ये त्यांचाही प्रतिनिधी होता. वेटर आणि हॉटेलनोकर एकत्रित झाले व बक्षिशी नाकारू लागले. उपहारगृहाच्या भिंतीवर त्यांनी पाटया लावल्या, 'येथे बक्षिशी स्वीकारली जात नाही'—किंवा 'टेबलाशी सेवा

करून माणसाला आपला चरितार्थ चालवावा लागतो म्हणून त्याला बक्षिशी देऊ करून त्याचा अपमान करण्याचे कारण नाही!'

आघाडीवर सैनिक आपल्या अधिकाऱ्यांशी झगडा करीत होते आणि आपल्या समित्यांद्वारे स्वयंशासनाचे शिक्षण घेत होते. अपूर्व रशियन संघटना ठरलेल्या कारखान्यांमधील कारखाना समित्या* जुन्या व्यवस्थेशी सामना करून अनुभव आणि ताकद मिळवीत होत्या आणि आपल्या ऐतिहासिक कामगिरीची जाणीव करून घेत होत्या. सबंध रशिया वाचायला शिकत होता आणि राज्यशास्त्र, अर्थशास्त्र, इतिहास यांचा **अभ्यास करीत होता**—कारण लोकांना **ज्ञानप्राप्तीची** इच्छा होती... प्रत्येक नगरात, आघाडीवरील बहुसंख्य शहरांत प्रत्येक राजकीय गटाचे स्वतःचे वर्तमानपत्र होते—काहीवेळा तर अनेक वर्तमानपत्रे होती. हजारो संघटना लक्षावधी पत्रके वाटत होत्या आणि सैन्यामध्ये, खेड्यांमध्ये, कारखान्यांमध्ये व रस्त्यांमधून त्यांचा पाऊस पाडत. दीर्घकाळपर्यंत आवरून धरलेली ज्ञानप्राप्तीची तहान क्रांतीबरोबर चौफेर उसळली आणि तिने विराट रूप धारण केले. एकट्या स्मोल्नी संस्थेमधून, पहिल्या सहा महिन्यांमध्ये, दर दिवशी टनांवारी साहित्य गाड्या भरभरून, आगगाड्या भरभरून देशाच्या कोनाकोपऱ्यात पाठवले जात होते. तृषार्त मरुभूमी ज्याप्रमाणे पाणी शोषून घेते त्याप्रमाणे रशियन जनता साहित्य प्राशन करीत होती. आणि हे साहित्य म्हणजे भ्रष्ट करणाऱ्या दंतकथा, विपर्यस्त इतिहास, शर्करावगुंठित धार्मिक प्रचार किंवा सस्त्या कादंबऱ्या नव्हते—तर सामाजिक आणि आर्थिक तत्त्वप्रणालींचा, तत्त्वज्ञानाचा, तल्स्तोय, गोगोल आणि गोर्की यांच्या पुस्तकांचा या साहित्यात समावेश होता...

आणि रशियाला शब्दांच्या महापुराखाली बुडवून टाकणाऱ्या त्या चर्चा, सभा, वादविवाद यांच्यापुढे कार्लाईल यांचा "फ्रेंच भाषेचा महापूर" एक बारीक धार ठरला. नाट्यगृहांमध्ये, सर्कसच्या तंबूमध्ये, शाळांच्या इमारतींमध्ये, क्लबांमध्ये, सोविएत बैठक दालनांमध्ये, युनियनांच्या मुख्य ठाण्यांमध्ये, बराकींमध्ये व्याख्याने, भाषणे, चर्चा यांना ऊत आला होता...

---

*'टीपा आणि खुलासे' पहा.

३० मे—३ जून रोजी भरलेल्या कारखाना समित्यांच्या पेत्रोग्राद परिषदेने प्रचंड बहुसंख्येने (तीन चतुर्थांश प्रतिनिधींनी) बोल्शेविकांना पाठिंबा दिला.—सं.

आघाडीवरच्या खंदकांमधून, खेड्यातल्या चौकांमधून, कारखान्यांमधून सभा भरत होत्या... पुतिलोव कारखान्यामधील चाळीस हजार कामगारांचा श्रोतृसमुदाय सभेला लोटे तेव्हा मोठा अवर्णनीय देखावा पहायला मिळे; मग ती सभा सोशल-डेमोक्रॅट्सची असो, समाजवादी-क्रांतिकारकांची असो, अराजकवाद्यांची असो, कुणालाही काही सांगायचे असो, जोपर्यंत वक्ते बोलत होते तोपर्यंत श्रोते ऐकायला तयार होते! पेत्रोग्रादमध्ये आणि सबंध रशियाभर, कित्येक महिनेपर्यंत रस्त्यावरचा प्रत्येक चौक सार्वजनिक व्यास-पीठ बनला होता. आगगाड्यांमधून, ट्रामगाड्यांमधून सतत सर्वत्र सहजस्फूर्त वादविवाद झडत होते...

आणि दोन खंडांमधील लोकांना एकत्र आणणाऱ्या अखिल रशियन परिषदा व काँग्रेसा—सोविएतांची, सहकारी संस्थांची, झेम्स्त्वोंची,* राष्ट्रजमातींची, धर्मगुरुंची, किसानांची, राजकीय पक्षांची संमेलने; लोक-शाही परिषद, मॉस्को परिषद, रशियन प्रजासत्ताकाच्या मंडळाची परि-षद... पेत्रोग्रादमध्ये एकाच वेळी तीन चार संमेलने नेहमी चालत होती. प्रत्येक सभेमध्ये वक्त्याच्या भाषणावर कालमर्यादा घालण्याचे प्रयत्न हाणून पाडले जात होते आणि प्रत्येक व्यक्तीला आपल्या मनातील विचार बोलून दाखविण्याचे स्वातंत्र्य होते...

रीगाच्या पाठीमागच्या बाजूस असलेल्या बाराव्या सेनेच्या आघाडीवर आम्ही गेलो तेव्हा रोडावलेले, अनवाणी सैनिक चिखलभरल्या खंदकांमध्ये कमालीच्या निराश मन:स्थितीत बसलेले आम्हाला आढळले; जेव्हा त्यांनी आम्हाला पाहिले तेव्हा ताडकन उठून ते उभे राहिले. त्यांचे चेहरे सुकुन गेले होते, त्यांच्या फाटक्या कपड्यांमधून त्यांच्या शरीरावरच्या निळ्या शिरा स्पष्ट दिसत होत्या. त्यांनी उत्सुकतेने आम्हाला विचारले—"तुम्ही **वाचायला** काही आणलंत काय?"

बदल घडल्याच्या बाह्य आणि दृश्य खुणा जरी अस्तित्वात होत्या, अलेक्सान्द्रिन्स्की थिएटरपुढच्या महान येकातेरीनाच्या पुतळ्याच्या हातात छोटा लाल झेंडा फडकत होता आणि असेच थोडेसे विटलेले लाल झेंडे सार्वजनिक इमारतींवर फडकत होते हे जरी खरे होते, शाही निशाणे व गरुडचिन्हे फाडून टाकली होती किंवा झाकून टाकली होती हे जरी खरे होते, महाउग्र नगर-पोलीसच्या जागी नरमाईने वागणारी नि:शस्त्र नागरी

---

*'टीपा आणि खुलासे' पहा.

मिलिशिआ रस्त्यांमधून गस्त घालत होती हे जरी खरे होते, तरी जुन्या काळची आठवण देणाऱ्या कितीतरी अजब खुणा अद्याप अस्तित्वात होत्या.

उदाहरणार्थ, महान पीटरने रशियावर सक्तीने लादलेली दर्जावार फिती लावण्याची पद्धती, अद्याप वर्चस्व राखून होती. शाळकरी मुलापासून प्रत्येकजण आपला नेमून दिलेला गणवेष वापरीत होता, बटणांवर आणि खांद्यावरच्या फितींवर शाही चिन्हे लावीत होता. संध्याकाळी पाचाच्या सुमाराला, मोठ्या बराकीसारख्या सरकारी मंत्रालयांच्या इमारतींमधून खालच्या मानेने बाहेर पडणाऱ्या, गणवेष परिधान केलेल्या, काखेत पोर्टफोलिओचे ओझे बाळगत जाणाऱ्या उतार वयाच्या लोकांनी रस्ते भरून जात होते. आपल्यापेक्षा किती वरिष्ठांचा मृत्यू घडल्यास कॉलेजिएट असेसरचे किंवा प्रिव्ही कौन्सिलरचे सन्माननीय पद आपल्याला प्राप्त होईल व भरपूर पेन्शनीवर आपण कसे सेवानिवृत्त होऊ शकू आणि कदाचित सेंट ॲन क्रूसाचा * मान कसा लाभेल, याबद्दलचे विचार त्या लोकांच्या मनात बहुधा चालत असत...

असे म्हटले जाते की, क्रांती ऐन भरात आली असताना, सेनेटर सोकोलोव एके दिवशी सेनेटच्या बैठकीला साध्या नागरी पोषाखात आले, तेव्हा झारच्या सेवेत नियुक्त केलेला गणवेष परिधान न केल्याबद्दल त्यांना बैठकीत प्रवेश देण्यात आला नाही!

अशा सबंध खळबळलेल्या आणि विघटित राष्ट्राच्या पार्श्वभूमीवर जागृत झालेल्या रशियन जनसागराची भव्य मिरवणूक निघाली होती...

---

* सेंट ॲन क्रूस – गळ्याभोवती फितीमध्ये अडकवलेला झारकालीन बहुमानदर्शक क्रूस. – सं.

## प्रकरण दुसरे

# येणारा झंझावात

रशियाचा लष्करी हुकूमशहा होण्याची आकांक्षा मनी बाळगून जनरल कोर्निलोव यांनी सप्टेंबरात पेत्रोग्रादवर चाल केली. त्यांच्या पाठीमागे भांडवलदारवर्गाची पोलादी मूठ असल्याचे अचानक उघडकीस आले. क्रांतीला चिरडून टाकण्याचा भांडवलदारवर्गाने धीटपणे प्रयत्न केला. काही समाजवादी मंत्री या प्रयत्नात सामील होते ; केरेन्स्कींवरसुद्धा संशय प्रगट करण्यात आला[1]. साविन्कोव यांना त्यांच्या पक्षाच्या मध्यवर्ती समितीने – समाजवादी-क्रांतिकारकांनी – खुलाशासाठी पाचारण केले, पण साविन्कोव यांनी कोणत्याही प्रकारचा खुलासा करण्यास नकार दिल्याने त्यांची हकालपट्टी करण्यात आली. सैनिक समित्यांनी कोर्निलोव यांना अटक केली. सेनापतींना बडतर्फ करण्यात आले, मंत्र्यांना त्यांच्या अधिकारपदांवरून तात्पुरते दूर करण्यात आले आणि मंत्रिमंडळ कोसळले.

भांडवलदारवर्गाच्या कॅडेट पक्षासह नवे सरकार स्थापन करण्याचा केरेन्स्की यांनी प्रयत्न केला. त्यांच्या पक्षाने, समाजवादी-क्रांतिकारकांनी, कॅडेटांना वगळण्याचा त्यांना आदेश दिला. पण केरेन्स्कींनी तसे करण्यास नकार दिला आणि समाजवाद्यांनी जर आपला हेका पुढे चालू ठेवला तर राजिनामा देण्याची धमकी दिली. तरीही लोकांच्या भावना त्या क्षणी एवढ्या तीव्र होत्या की, केरेन्स्की यांना विरोध करण्याचे धैर्य झाले नाही व प्रश्नावर उपाय सापडेपर्यंत, केरेन्स्की यांच्या नेतृत्वाखाली जुन्या मंत्र्यांपैकी पाचजणांच्या हंगामी नियामकमंडळाने* सत्ताग्रहण केले.

---

*हंगामी नियामकमंडळात केरेन्स्की, निकितिन, तेरेश्चेन्को, वेर्खोव्स्की आणि वेर्देरेव्स्की यांचा समावेश होता. – सं.

कोर्निलोव प्रकरणामुळे सर्व समाजवादी गट – "नेमस्त" तसेच क्रांतिकारकवादी – आत्मरक्षणाच्या प्रबळ भावनेने एकत्रित आले. कोर्निलोव प्रकरणांची पुनरावृत्ती होऊ देणे इष्ट नव्हते. क्रांतीला पाठिंबा देणाऱ्या तत्त्वांना जबाबदार राहणारे नवे सरकार निर्माण करण्याची आवश्यकता होती. म्हणून पेत्रोग्रादमध्ये सप्टेंबरात भरणाऱ्या लोकशाही परिषदेला प्रतिनिधी पाठविण्याचे केंद्रीय कार्यकारी समितीने जन-संघटनांना निमंत्रण दिले.

केंद्रीय कार्यकारी समितीमध्ये ताबडतोब तीन गट उदयाला आले. बोल्शेविकांनी मागणी केली की, सोविएतांची अखिल रशियन काँग्रेस बोलावण्यात यावी व त्यांनी सत्ता हाती घ्यावी. चेर्नोव यांच्या नेतृत्वाखालील "मध्यम" समाजवादी-क्रांतिकारकांना कामकोव आणि स्पिरिदोनोवा यांच्या नेतृत्वाखालील डावे समाजवादी-क्रांतिकारक येऊन मिळाले, मार्तोव यांच्या नेतृत्वाखालील मेन्शेविक-आंतरराष्ट्रीयवादी व बोग्दानोव आणि स्कोबेलियेव यांच्या नेतृत्वाखालील "मध्यम" मेन्शेविक * येऊन मिळाले व या सर्वांनी मिळून विशुद्ध समाजवादी सरकारची मागणी केली. उजव्या गटाच्या मेन्शेविकांच्या मूर्धनस्थानी असलेल्या त्सेरेतेली, दान आणि लीबेर यांनी, तसेच अव्क्सेन्तियेव आणि गोत्स यांच्या नेतृत्वाखालील उजव्या समाजवादी-क्रांतिकारकांनी आग्रह धरला की, नव्या सरकारमध्ये मालमत्ताधारी वर्गांना प्रतिनिधित्व मिळालेच पाहिजे.

त्यानंतर ताबडतोबच पेत्रोग्राद सोविएतमध्ये बोल्शेविकांना बहुमत लाभले आणि मॉस्को, कीएव, ओडेसा व इतर शहरांमधील सोविएतांनी पेत्रोग्रादचा कित्ता गिरवला.

यामुळे सावध होऊन केंद्रीय कार्यकारी समितीवर नियंत्रण गाजविणाऱ्या मेन्शेविकांनी आणि समाजवादी-क्रांतिकारकांनी निर्णय घेतला की, कोर्निलोव यांच्या धोक्यापेक्षा त्या सर्वांना लेनिन यांच्या धोक्याची अधिक भीती वाटत होती. लोकशाही परिषदेच्या[2] प्रतिनिधींच्या रचनेची त्यांनी फेररचना केली आणि सहकारी संस्थांमधील व इतर रूढीप्रिय संस्थांमधील प्रतिनिधींचा अधिक प्रमाणात समावेश केला. पण खास प्रतिनिधी घुसवलेल्या या सभेनेही **कॅडेटांशिवाय संमिश्र सरकार** स्थापन करावे असे प्रथम मतदान केले. केवळ केरेन्स्की यांच्या राजिनामा देण्याच्या उघड धमकीमुळे आणि "प्रजासत्ताक

---

*'टीपा आणि खुलासे' पहा.

धोक्यात आहे" अशा "नेमस्त" समाजवाद्यांच्या इशारेवजा ओरड्यामुळे, भांडवलदारवर्गाबरोबर सहयोग करण्याच्या तत्त्वाला थोड्या बहुमताने परिषदेची अनुकूलता प्राप्त करण्यात आली व कोणतीही कायदेशीर सत्ता नसलेल्या 'रशियन प्रजासत्ताकाचे हंगामी सल्लागार मंडळ' नामक सल्ला-मसलत देणाऱ्या स्वरूपाच्या संसदेची स्थापना करण्यास मान्यता मिळविण्यात आली. नव्या मंत्रिमंडळात मालमत्ताधारी वर्गांचे पूर्णतया वर्चस्व होते आणि 'रशियन प्रजासत्ताकाच्या मंडळा'मध्ये त्यांनी प्रमाणाबाहेर खुर्च्या अडवल्या होत्या.

वस्तुस्थिती अशी होती की, केंद्रीय कार्यकारी समिती इतःपर सोविएतांच्या सर्वसाधारण प्रतिनिधींची संस्था राहिली नव्हती व सप्टेंबरात नियुक्त असलेल्या सोविएतांच्या दुसऱ्या अखिल रशियन काँग्रेसला बोलावण्यास तिने बेकायदेशीररीत्या नकार दिला होता. ही काँग्रेस बोलावण्याचा किंवा तिला बोलावण्याला परवानगी देण्याचा तिचा अजिबात इरादा नव्हता. तिच्या अधिकृत मुखपत्राने, 'इझ्वेस्तिया'ने (समाचार), सुचवायला आरंभ केला होता की, सोविएतांचे कार्य जवळ जवळ संपत आले आहे[3] आणि लौकरच त्यांचे विसर्जन करण्यात येईल... यावेळीही नव्या सरकारने आपल्या धोरणाचा एक भाग म्हणून "बेजबाबदार संघटना" – म्हणजे सोविएते – बरखास्त करण्याची घोषणा केली.

उत्तरादाखल, २ नोव्हेंबरला पेत्रोग्रादमध्ये अखिल रशियन सोविएतांनी बैठकीसाठी एकत्र यावे आणि रशियाचा राज्यकारभार आपल्या हाती घ्यावा असे बोल्शेविकांनी आवाहन केले. त्याचवेळी, 'लोकांशी फितुरी करणाऱ्या सरकार'[4] मध्ये सामील होणार नाही असे निवेदन करून 'रशियन प्रजासत्ताकाच्या मंडळा'मधून त्यांनी अंग काढून घेतले.

पण बोल्शेविक बाहेर पडले तरी कमनशिबी मंडळात शांतता नांदू शकली नाही. आता सत्तास्थानी आरूढ झालेले मालमत्ताधारी वर्ग मग्रूर बनले. कॅडेटांनी जाहीर केले की, रशियाला प्रजासत्ताक म्हणून घोषित करण्याचा सरकारला कायदेशीररीत्या मुळीच हक्क नाही. सैनिकांच्या आणि खलाशांच्या समित्या नष्ट करण्यासाठी सैन्यात आणि नाविक दलात कडक उपाययोजना करण्याची त्यांनी मागणी केली व सोविएतांची बदनामी केली. गृहाच्या दुसऱ्या बाजूस मेन्शेविक-आंतरराष्ट्रीयवाद्यांनी आणि डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांनी तात्काळ शांतता प्रस्थापित करण्याचा, किसानांना जमिनी देण्याचा व उद्योगधंद्यांवर कामगारांचे नियंत्रण स्थापित करण्याचा – म्हणजे जवळ जवळ बोल्शेविकांच्या कार्यक्रमाचाच – पुरस्कार केला.

कॅडेटांना उत्तर देणारे मार्तोव यांचे भाषण मी ऐकले होते. आत्यंतिक आजारी अवस्थेत असलेल्या माणसाप्रमाणे – प्रत्यक्षात त्यांची तशीच स्थिती होती – दोन्ही खांदे व्यासपीठावरच्या मेजावर खाली झुकवून घोगऱ्या आवाजात ते बोलत होते. त्यांचा आवाज जेमतेम ऐकू येत होता. उजव्या बाजूच्या बाकांकडे हाताचे बोट रोखून ते म्हणाले :

"तुम्ही आम्हाला पराभूतवादी म्हणता, पण जे शांततेचा तह करण्यासाठी अधिक योग्य संधीची वाट पहात बसतात, शांततेचा तह लांबणीवर टाकण्याचा जे आग्रह धरीत आहेत, रशियन सेनेचा पूर्ण खातमा होईपर्यंत, भिन्न साम्राज्यवादी गटांमध्ये रशिया हा वाटप-विषय होईपर्यंत शांतता लांबणीवर टाकण्याचा आग्रह धरीत आहेत, तेच खरे पराभूतवादी आहेत... भांडवलदारवर्गाच्या हितसंबंधांचे रक्षण करणारे धोरण तुम्ही रशियन जनतेवर लादू पाहता आहात. पण शांततेचा प्रश्न विनाविलंब उपस्थित केला पाहिजे... मग तुम्हाला आढळून येईल की, ज्यांना तुम्ही जर्मनांचे हस्तक म्हणता त्या झिम्मेरवाल्डवादी * लोकांनी सर्वत्र लोकशाहीवादी जनतेची सदसद्विवेकबुद्धी जागी करण्याचे कार्य वृथाच केलेले नाही..."

या दोन गटांच्या दरम्यान मेन्शेविक आणि समाजवादी-क्रांतिकारक हेलकावे खात होते, डावीकडून जनतेमध्ये वाढत जाणाऱ्या असंतोषाच्या दबावाखाली अपरिहार्यपणे झुकत चालले होते. हाडवैरामुळे सभागृहातील सदस्य भिन्न गटांमध्ये विभागले गेले व त्यांच्यात समझोता घडणे अशक्य ठरले.

दीर्घकाळ अपेक्षित असलेल्या पॅरिसमध्ये भरलेल्या मित्र-राष्ट्रांच्या परिषदेची घोषणा झाल्यानंतर जेव्हा परराष्ट्र धोरणाचा ज्वलंत प्रश्न पुढे आला तेव्हा परिस्थिती ही अशी होती...

लोकशाही अटींवर लौकरात लौकर शांतता तह करण्यात यावा याबाबत रशियामधील सर्व समाजवादी पक्षांचे तत्त्वत: एकमत होते. १९१७ च्या मे मध्येच पेत्रोग्राद सोविएतने, तेव्हा ती मेन्शेविकांच्या आणि समाजवादी-क्रांतिकारकांच्या वर्चस्वाखाली होती, सुविख्यात रशियन शांतता कलमे जाहीर केली होती. मित्र-राष्ट्रांनी युद्धाच्या उद्दिष्टांची चर्चा करण्या-

---

* युरोपातील समाजवाद्यांच्या क्रांतिकारक-आंतरराष्ट्रीयवादी गटाचे सदस्य. १९१५ मध्ये स्वित्झर्लंडमधील झिम्मेरवाल्ड येथे भरलेल्या आंतरराष्ट्रीय परिषदेतील त्यांच्या सहभागामुळे त्यांना हे नांव पडले.

साठी एक परिषद भरवावी अशी त्यांमध्ये मागणी केलेली होती. ऑगस्ट-मध्ये ही परिषद बोलावण्याचे वचन देण्यात आले होते; मग ती सप्टेंबरपर्यंत पुढे ढकलण्यात आली; नंतर ऑक्टोबरपर्यंत; आणि आता ती १० नोव्हेंबरला निश्चित करण्यात आली होती. *

हंगामी सरकारने दोन प्रतिनिधी सुचविले – जनरल अलेक्सेयेव, प्रतिगामी लष्करी माणूस आणि तेरेश्चेन्को, परराष्ट्रमंत्री. सोविएतांनी आपल्या वतीने स्कोबेलियेव यांची निवड केली व जाहीरनामा – सुप्रसिद्ध नकाज[5] म्हणजे आदेशपत्र – आखला. हंगामी सरकारने स्कोबेलियेव यांच्यावर आणि त्यांच्या नकाजवर आक्षेप घेतले; मित्र-राष्ट्रांच्या राजदूतांनीही निषेध व्यक्त केला आणि अखेरीस ब्रिटिश हाऊस ऑफ कॉमन्समध्ये प्रश्नाला उत्तर देताना बोनार लॉ** यांनी थंडपणे सांगितले की, "माझ्या माहितीनुसार पॅरिस परिषदेमध्ये युद्धाच्या उद्दिष्टांबाबत मुळीच चर्चा करण्यात येणार नाही, तर युद्ध कोणत्या पद्धतींनी चालू ठेवावे याची चर्चा करण्यात येईल..."

यावर रूढीप्रिय रशियन वर्तमानपत्रांनी आपला आनंद व्यक्त केला. बोल्शेविकांनी ओरडा केला, "पहा, मेन्शेविकांच्या आणि समाजवादी-क्रांतिकारकांच्या तडजोडवादी धोरणांमुळे त्यांची **काय** अवस्था झाली!"

हजारो मैल लांबीच्या युद्धआघाडीवरील रशियन सेनेमधील लक्षावधी सैनिकांमध्ये उसळलेल्या सागराप्रमाणे खळबळ माजली होती व त्यांची शेकडो प्रतिनिधीमंडळे राजधानीमध्ये गर्दी करून एकच मागणी करीत होती, "आम्हाला शांतता हवी!"

नदीपलिकडच्या त्सिर्क मॉडर्नमध्ये भरलेल्या लोकांच्या एका मोठ्या सभेला मी गेलो होतो. अशा रात्रीच्या सभांची संख्या सतत वाढत चालली होती. त्या मोडखळीस आलेल्या, अंधाऱ्या सर्कसच्या रिंगणात एका बारक्या तारेवर पाच छोटे दिवे मिणमिणत होते आणि रिंगणापासून छतापर्यंत सैनिकांची, खलाशांची, कामगारांची, महिलांची खच्चून गर्दी भरलेली होती. सारेजण आपले प्राण कानात आणून ऐकत होते. एक

---

*हंगामी सरकार कोसळल्यामुळे ही परिषद होऊ शकली नाही. – सं.

**एन्ड्र्यू बोनार लॉ (१८५८-१९२३) – इंग्लिश मुत्सद्दी, कॉंझर्व्हेटिव्ह पक्षाचा प्रमुख. १९१७ मध्ये लॉईड जॉर्ज यांच्या संमिश्र सरकारमधील कोषाधिकारी आणि हाऊस ऑफ कॉमन्सचे पुढारी. – सं.

सैनिक बोलत होता, पाचशे अठ्ठेचाळीसाव्या डिव्हिजनचा – ही डिव्हिजन कुठे होती आणि कशी होती ते माहीत नाही :

"कॉम्रेडहो," तो ओरडला. त्याच्या ओढलेल्या चेहऱ्यामधून आणि आत्यंतिक निराश हातवाऱ्यांमधून खरीखुरी वेदना उमटली. "वरची माणसं आम्हाला नेहमी सांगत राहतात की, आणखी त्याग करा, आणखी त्याग करा, पण ज्यांच्यापाशी सारं काही आहे ती माणसं सुखरूप राहतात.

"आम्ही जर्मनीशी युद्ध करतोय. आमचे अधिकारी म्हणून काम करायला या, असं जर्मन सेनापतींना आम्ही कधी आमंत्रण देऊ काय? पण भांडवलदारांशीही आमचं युद्ध चाललंय, तरी आम्ही त्यांना आमच्या सरकारमध्ये बोलावतोय...

सैनिक म्हणतो, "मी कशासाठी लढतोय ते मला सांगा; कॉन्स्टन्टीनोपलसाठी का स्वतंत्र रशियासाठी? लोकशाहीसाठी का भांडवलदारी लुटारूपणासाठी? मी क्रांतीचं रक्षण करतोय असं जर तुम्ही मला सिद्ध करून दाखवलंत तर मी स्वतःहून लढायला जाईन आणि मला लढाईवर सक्तीनं पाठवण्यासाठी मृत्युदंडाची शिक्षा द्यावी लागणार नाही.

"जेव्हा भूमी किसानांची होईल, कारखाने कामगारांचे होतील आणि सत्ता सोविएतांची होईल, तेव्हा आम्हाला जाणवेल की, आम्ही कशासाठी तरी लढत आहोत आणि आम्ही त्यासाठी लढू!"

बराकींमध्ये, कारखान्यांमध्ये, रस्त्यांवरच्या चौकांमध्ये अखंडपणे सैनिक वक्ते बोलत होते. सर्वांचा एकच आकांत चालला होता की, लढाई संपवा; जर सरकारने शांतता प्रस्थापित करण्यासाठी जोरदार प्रयत्न केले नाही तर सैन्य खंदक सोडून बाहेर पडेल आणि सैनिक आपापल्या घरी निघून जातील.

आठव्या सेनेचा एक प्रवक्ता म्हणाला: "आम्ही दुर्बळे बनलो आहोत, आमच्या प्रत्येक कंपनीत अगदी थोडी माणसे जिवंत राहिलीत. त्यांनी आम्हाला अन्नपाणी, बूट आणि नवी कुमक पुरवली पाहिजे, नाही तर लौकरच फक्त रिकामे खंदक राहतील. शांतता किंवा रसद पुरवठा यांपैकी एक काहीतरी मिळाले पाहिजे... एक तर सरकारने लढाई संपवली पाहिजे किंवा सैन्याला कुमक पुरवली पाहिजे..."

शेहेचाळीसाव्या सैबेरियन तोफखान्यातला एकजण म्हणाला:

"अधिकारी लोक आमच्या समित्यांबरोबर काम करावयास तयार नाहीत, विश्वासघाताने ते आम्हाला शत्रूच्या तावडीत देत आहेत, आमच्या आंदोलकांना ते मृत्युदंडाची शिक्षा ठोठावतात; आणि प्रतिक्रांतिकारक

सरकार या अधिकाऱ्यांना पाठिंबा देते. आम्हाला वाटले होते की, क्रांती-नंतर शांतता स्थापन होईल. पण आता अशा गोष्टी बोलायला सुद्धा सरकारने बंदी केली आहे आणि त्याचवेळी आम्हाला खायला पुरेसे अन्न देत नाही किंवा लढायला पुरेसा दारूगोळा पुरवीत नाही..."

रशियाचा बळी देऊन शांतता प्रस्थापित करण्यात येईल अशा युरोपातून अफवा येत आहेत[6]...

फ्रान्समध्ये रशियन सैनिकांना मिळालेल्या वाईट वागणुकीच्या वार्तेने असंतोषामध्ये भर पडली आहे. पहिल्या ब्रिगेडमधील सैनिकांनी, आपल्या मायदेशातील कॉम्रेड मंडळींचे अनुकरण करून अधिकाऱ्यांच्या जागी सैनिक समित्या स्थापन करण्याचा प्रयत्न केला व सलोनिकीला जाण्याचा हुकूम ठोकरून लावून, रशियाला परत पाठवावे अशी मागणी केली. त्यांना वेढा घालून त्यांची उपासमार करण्यात आली व नंतर त्यांच्यावर तोफांचा भडिमार करून त्यांच्यापैकी अनेकांना ठार करण्यात आले[7]...

२६ ऑक्टोबर रोजी मरीईन्स्की प्रासादामधील शुभ्र संगमरवरी आणि किरमिजी दालनामध्ये मी गेलो. तेथे प्रजासत्ताकाच्या मंडळाची बैठक भरली होती व शांततेसाठी तहानलेल्या आणि थकूनभागून गेलेल्या देशातील जनता ज्याची कमालीच्या उत्कंठेने वाट पहात होती ते सरकारच्या परराष्ट्र धोरणासंबंधीचे तेरेश्चेन्को यांचे जाहीर निवेदन ऐकणार होतो.

एक उंचापुरा, मुलायम चेहऱ्याचा आणि गालाची हाडे थोडी वर असलेला, अत्यंत नीटस पोषाख केलेला तरुण माणूस सौम्य आवाजात आपले काळजीपूर्वक लिहिलेले, कोणत्याही प्रकारच्या कबुलीजबाबात न सापडणारे भाषण वाचत होता[8]. त्यात विशेष काहीही नव्हते... दोस्तांच्या साहाय्याने जर्मन लष्करवादाला चिरडून टाकण्यासंबंधीचे तेच जुनेपुराणे भाषण – रशियाच्या "राज्याच्या हितांविषयी", स्कोबेलियेवच्या नकाजमुळे उद्भवलेल्या "अडथळयांच्या" परिस्थितीसंबंधी तीच टकळी. त्यांनी आपले भाषण पुढील मुख्य मुद्द्यावर संपवले :

"रशिया ही महान सत्ता आहे. काहीही घडले तरी रशिया ही महासत्ताच राहील. आपण सर्वांनी रशियाचे रक्षण केले पाहिजे, आपण एका महान ध्येयाचे रक्षक आहोत आणि एका महासत्तेचे सुपुत्र आहोत, हे आपण दाखवून दिले पाहिजे."

या भाषणाने कुणाचेही समाधान झाले नाही. प्रतिगाम्यांना "कडक" साम्राज्यवादी धोरण पाहिजे होते; सरकार शांततेसाठी दबाव आणील असा

लोकशाहीवादी पक्षांना हवाला पाहिजे होता... बोल्शेविकांच्या पेत्रोग्राद सोविएतचे मुखपत्र असलेल्या 'राबोची इ सोल्दात' (कामगार आणि सैनिक) मधील अग्रलेख मी प्रस्तुत ठिकाणी उद्धृत करतो :

**"खंदकांमधील सैनिकांना सरकारचे उत्तर**

आमचे सर्वात मितभाषी मंत्री श्री. तेरेश्चेन्को यांनी खंदकांमधील सैनिकांना प्रत्यक्षात आपल्या संसदपूर्व भाषणात पुढील उत्तर दिले आहे :

१. आम्ही दोस्त राष्ट्रांशी निकटपणे एकत्रित आहोत. (तेथील जनतांशी नव्हे तर सरकारांशी.)

२. हिवाळी मोहीमेच्या शक्याशक्यतेसंबंधी लोकशाहीवादी चर्चा करून काही उपयोग नाही. त्याचा निर्णय आमच्या दोस्तांच्या सरकारांकडून केला जाईल.

३. जुलैच्या पहिल्या तारखेचा आक्रमक पवित्र्यातील हल्ला लाभदायी व सुखद ठरला. (त्याच्या परिणामांचा मात्र त्यांनी उल्लेख केला नाही.)

४. आमचे दोस्त आमची पर्वा करीत नाहीत हे खरे नाही. मंत्रीमहाशयांच्या हाती अत्यंत महत्त्वाची निवेदने आहेत. (निवेदने? प्रत्यक्ष कृतींबद्दल काय? ब्रिटिश नौदल काफल्याच्या वर्तणुकीचा अर्थ काय?[१] हद्दपार प्रतिक्रांतिकारक जनरल गुर्को यांच्याबरोबर ब्रिटिश राजाने चालविलेल्या वाटाघाटींचे काय? मंत्रीमहाशयांनी या सर्व गोष्टींचा उल्लेख केलेला नाही.)

५. स्कोबेलियेव यांनी दिलेला नकाज वाईट आहे; दोस्तांना तो आवडत नाही आणि रशियन मुत्सद्द्यांनाही तो आवडत नाही. "दोस्तांच्या परिषदेत आम्ही सर्वांनी एकाच भाषेत बोलले पाहिजे."

काय एवढेच? होय, फक्त एवढेच. यातून बाहेर पडायचा मार्ग कोणता? यावर उपाय म्हणजे दोस्तांवर आणि तेरेश्चेन्को यांच्यावर विश्वास टाकणे. शांतता केव्हा येईल? दोस्त जेव्हा तिला येऊ देतील त्यावेळी.

खंदकांमधील सैनिकांना शांततेबद्दल सरकारने अशा प्रकारे उत्तर दिले!

आता रशियन राजकारणाच्या पार्श्वभूमीवर एका अमंगळ शक्तीच्या – कझाकांच्या – अंधुक आकृती आकार घेऊ लागल्या होत्या. गोर्की यांच्या 'नोवाया झीझ्न' (नवे जीवन) वर्तमानपत्राने या कझाकांच्या हालचालींकडे लक्ष वेधले :

> "क्रांतीच्या आरंभी कझाकांनी लोकांवर गोळ्या झाडायला **नकार दिला.** कोर्निलोवनी पेत्रोग्रादवर चाल केली तेव्हा त्यांच्यापाठोपाठ जाण्यास त्यांनी **नकार दिला.**
>
> क्रांतीबद्दलच्या निष्क्रिय निष्ठेपासून कझाक आता तिच्या विरुद्ध सक्रिय राजकीय आक्रमक पवित्रा घेण्यापर्यंत येऊन ठेपले आहेत..."

कालेदिन या दॉनच्या कझाकांच्या **अतामान**ला (सरदाराला) कोर्निलोव प्रकरणात सहभागी झाल्याबद्दल हंगामी सरकारने बडतर्फ केले. त्याने राजिनामा देण्यास साफ नकार दिला व आपल्या सभोवती तीन महाप्रचंड कझाक सेना गोळा करून नवोचेर्कास्क शहरी कट-कारवाया रचीत व धमक्या घालीत तो बसून राहिला. त्याची ताकद एवढी मोठी होती की, त्याच्या आज्ञाभंगाकडे सरकारला दुर्लक्ष करणे भाग पडले. एवढेच नव्हे तर कझाक सेनांच्या संघाच्या मंडळाला अधिकृतरीत्या मान्यता द्यावी लागली आणि नव्याने स्थापन झालेल्या सोविएतांचे कझाक विभाग बेकायदेशीर म्हणून जाहीर करावे लागले...

ऑक्टोबरच्या पहिल्या पंधरवड्यात एका कझाक प्रतिनिधीमंडळाने केरेन्स्की यांची भेट घेतली व कालेदिन याच्यावरील आरोप मागे घ्यावेत अशी उर्मटपणे मागणी केली; तसेच सोविएतांच्या आहारी गेल्याबद्दल मंत्रिमंडळाच्या अध्यक्षांना ठपका दिला. कालेदिनला त्रास न देण्याचे केरेन्स्कींनी मान्य केले आणि नंतर असे म्हटल्याचे ऐकिवात आहे की, "सोविएत नेत्यांच्या दृष्टीनं मी दहशतवादी आणि जुलमी आहे... हंगामी सरकारच्या वतीनं बोलायचं तर सोविएतांवर ते मुळीच अवलंबून नाही, उलट सोविएते अस्तित्वात आहेत याचा त्याला अत्यंत खेद होतो."

याच सुमारास आणखी एका कझाक शिष्टमंडळाने ब्रिटिश राजदूताची भेट घेतली व "स्वतंत्र कझाक जनतेचे" आम्ही प्रतिनिधी आहोत असे धिटाईने सांगून वाटाघाटी केल्या.

दॉनमध्ये कझाक प्रजासत्ताकासारखी काही तरी गोष्ट स्थापन झाली होती.

कुबानने आपले स्वतंत्र कझाक राज्य असल्याचे घोषित केले होते. रोस्तोव-ऑन-दॉन आणि येकातेरीनोस्लाव येथील सोविएते सशस्त्र कझाकांनी उधळून लावली व खार्कोव येथील कोळसा खाणींच्या संघाच्या मुख्य ठाण्या-वर छापा घातला. कझाक चळवळीच्या सर्व अभिव्यक्ती समाजसत्तावाद-विरोधी आणि लष्करवादी होत्या. कालेदिन, कोर्निलोव, जनरल दुतोव, जनरल कराउलोव आणि जनरल बार्दिझी यांसारखे उमराव व मोठे जमीन-दार कझाकांचे पुढारी होते आणि मॉस्कोतील मातबर व्यापाऱ्यांचा व बँक-रांचा त्यांना पाठिंबा होता...

जुना रशिया वेगाने कोसळून पडत होता. युक्रेन, फिन्लंड, पोलंड, श्वेत रशिया, या ठिकाणी राष्ट्रवादी चळवळींनी जोर धरला होता व त्या अधिक धीट बनल्या होत्या. मालमत्ताधारी वर्गांचे वर्चस्व असलेल्या स्थानिक सरकारांनी स्वायत्ततेचा दावा करून पेत्रोग्रादचे हुकूम मानण्यास नकार दिला होता. हेल्सिंगफोर्स येथे फिन्लंडच्या सेनेटने हंगामी सरकारला पैसे कर्जाऊ देण्यास नकार दिला, फिन्लंड स्वायत्त झाल्याचे घोषित केले आणि रशियन फौजा मागे काढून घ्याव्यात अशी मागणी केली. कीएवमधील भांडवलदारी रादाने* युक्रेनच्या सीमा एवढ्या विस्तारीत नेल्या की, अखेरीस दक्षिण रशियातील सर्वांत सुपीक शेतजमिनी युक्रेनमध्ये सामावल्या गेल्या, पूर्वेकडे उराल्सपर्यंत त्याचा विस्तार पसरला व राष्ट्रीय सैन्याची उभारणी करायला तिने आरंभ केला. मुख्यमंत्री विन्निचेन्को यांनी जर्मनीशी स्वतंत्र तह करण्याच्या सूचक हालचाली सुरू केल्या – आणि हंगामी सरकार हतबल झाले. सैबेरिया, कॉकेशस यांनी स्वतंत्र घटनात्मक सभांची मागणी केली. या सर्व राष्ट्रांमध्ये, सत्ताधारी व कामगारसैनिक प्रतिनिधींची सोविएते यांच्यात घनघोर संघर्ष सुरू झाला होता.

परिस्थिती दर दिवसागणिक अधिक गोंधळाची बनत चालली. लाखो सैनिक आघाडी सोडून पळून जात होते आणि त्यांचे अफाट, ध्येयशून्य थवे सबंध देशभर भटकू लागले होते. ताम्बोव आणि त्वेर गुबेर्नियात किसानांना जमिनींसाठी वाट पाहून कंटाळा आला होता, सरकारच्या दडपशाही धोरणाने ते चिडले होते व जमीनदारांचे वाडे जाळून टाकायला आणि जमीनदारांची कत्तल करायला त्यांनी आरंभ केला होता. मॉस्को, ओडेसा आणि दॉन-

---

* रादा – १९१७ च्या एप्रिलमध्ये स्थापन झालेले युक्रेनचे प्रतिक्रांतिकारी भांडवलदार-राष्ट्रवादी सरकार.

मधील कोळसा खाणी महाप्रचंड संपांमुळे व टाळेबंद्यांमुळे हादरून निघत होत्या. वाहतूक विस्कळीत झाली होती; सैन्याची उपासमार चालली होती व मोठ्या शहरांमध्ये पाव मिळत नव्हता.

लोकशाहीवादी आणि प्रतिगामी गटांच्या ओढाताणीत सापडलेले सरकार काहीही करू शकत नव्हते; जेव्हा त्याला बळेच कृती करणे भाग पडत असे तेव्हा त्याने नेहमीच मालमत्ताधारी वर्गांच्या हिताची राखण केली. किसानांमध्ये सुव्यवस्था स्थापन करण्यासाठी, संप फोडण्यासाठी, कझाकांना पाठविण्यात आले. ताश्कंदमध्ये सरकारी अधिकाऱ्यांनी सोविएत दडपून टाकले. देशातील विस्कटलेल्या आर्थिक जीवनाची पुनश्च घडी बसविण्यासाठी स्थापन केलेले पेत्रोग्रादमधील अर्थ मंडळ भांडवल आणि श्रमाच्या परस्परविरोधी शक्तींच्या वादात अडकले व त्याचा कारभार थंडावला. अखेरीस केरेन्स्की यांनी त्याचे विसर्जन केले. कॅडेटांचा पाठिंबा असलेल्या जुन्या राजवटीमधील लष्करी लोकांनी मागणी केली की, सैन्यात आणि नौदलात पुन्हा शिस्त स्थापन करण्यासाठी कडक उपाय योजण्यात यावेत. नौदलाचे माननीय मंत्री अॅडमिरल वेर्देरेव्स्की आणि युद्धमंत्री जनरल वेर्खोव्स्की यांनी वृथाच आग्रह धरला की, सैनिकांच्या आणि खलाशांच्या समित्यांशी सहकार्य करण्याच्या पायावर आधारलेली केवळ नवी, स्वेच्छापूर्ण, लोकशाहीवादी शिस्तच सैन्याला आणि नौदलाला वाचवू शकेल. पण त्यांच्या शिफारशी दुर्लक्षिण्यात आल्या.

लोकांचा राग जास्तीत जास्त भडकविण्याचा प्रतिगाम्यांनी जणू चंग बांधला होता. कोर्निलोव यांच्यावरील खटल्याची वेळ जवळ येत चालली होती. भांडवलदारी वृत्तपत्रे अधिकाधिक प्रमाणात त्यांचे समर्थन करीत होती, "महान रशियन देशभक्त" म्हणून त्यांचा गौरव करीत होती. बूर्झेव * यांच्या 'ओबश्चेये देलो' (सामायिक ध्येय) या वर्तमानपत्राने कोर्निलोव, कालेदिन आणि केरेन्स्की यांच्या हुकूमशाहीची मागणी केली!

प्रजासत्ताक मंडळाच्या वार्ताहर सज्जात एक दिवस बूर्झेव यांच्याशी माझे बोलणे झाले. लहानखोर, खांदे खाली झुकलेली आकृती, सुरकुतलेला

---

* बूर्झेव – लेखक, बोल्शेविकांविरुद्धचे उदारमतवादी भांडवलदारी 'ओबश्चेये देलो' या वर्तमानपत्राचे प्रकाशक. नोव्हेंबर क्रांतीनंतर लौकरच बूर्झेव देशांतर करून पॅरिसला गेले व तेथे त्यांनी आपल्या वर्तमानपत्राचे प्रकाशन पुन्हा चालू केले. त्यावेळी त्यांचा राजतंत्रवादी कल बनला. – सं.

चेहरा, जाड भिंगांच्या आडून पाहणारे लघुदृष्टीदोषी डोळे, विस्कटलेले केस आणि दाढीमधून उमटलेल्या पांढऱ्या केसांच्या रेघा – बूर्त्झेव हे असे होते.

"तरुण माणसा, माझे शब्द ध्यानात ठेव!" ते मला म्हणाले. "रशियाला एका भक्कम पुरुषाची गरज आहे. आता आम्हाला क्रांतीवरचे लक्ष बाजूला वळवून जर्मनांवर केंद्रित केलं पाहिजे. कोर्निलोवचा पराभव करणारे महामूर्ख अडाणी होते; आणि या अडाणी मूर्ख लोकांच्या पाठीशी जर्मनांचे हस्तक आहेत. कोर्निलोव यांचा जय व्हायला पाहिजे होता..."

राजसत्तेचा उघडपणे कैवार घेणारी अतिरेकी उजव्या गटांची मुखपत्रे – पूरीश्केविच यांची 'नरोद्नी त्रिबून' (जनतेचा आवाज), 'नोवाया रूस' (नवा रशिया) आणि 'झिवोये स्लोवो' (जिवंत शब्द) – क्रांतिकारक लोकशाही उलथून टाकावी असा खुलेपणाने पुरस्कार करीत होती.

२३ ऑक्टोबरला रीगाच्या आखातात जर्मन आरमारी तुकडीशी नाविक लढाई झाली. पेत्रोग्राद धोक्यात होते असा बहाणा करून, राजधानी खाली करण्याच्या योजना हंगामी सरकारने आखल्या. प्रथम दारूगोळ्याचे मोठमोठे कारखाने उठवून ते सबंध रशियाभर विखुरण्यात येणार होते; नंतर खुद्द सरकार मॉस्कोला हलणार होते. ताबडतोब बोल्शेविकांनी ओरड केली की, क्रांतीला दुबळे करण्याच्या उद्देशाने लाल राजधानीला सरकार सोडून जात आहे. रीगा जर्मनांना विकण्यात आले होते; आता पेत्रोग्रादचा विश्वासघाताने बळी देण्यात येत होता!

भांडवलदारी वृत्तपत्रांना आनंद झाला होता. कॅडेटांचे वृत्तपत्र 'ऱ्येच'ने (व्याख्यान) म्हटले होते, "मॉस्कोत सरकारला निवांत वातावरणात काम करता येईल, तेथे अराजकवाद्यांकडून हस्तक्षेप होणार नाही." कॅडेट पक्षाच्या उजव्या गटाचे पुढारी रोद्झिआन्को यांनी 'उत्रो रस्सियी'मध्ये (रशियातील सकाळ) जाहीर केले होते की, जर्मनांनी पेत्रोग्राद घेणे हे एक वरदानच ठरेल, कारण त्यामुळे सोविएते नष्ट होतील आणि क्रांतिकारक बाल्टिक काफल्यापासून मुक्तता होईल:

"पेत्रोग्राद धोक्यात आहे (त्यांनी लिहिले). मी स्वत:शी म्हणतोय, 'पेत्रोग्रादची ईश्वर चिंता वाहो.' त्यांना भीती वाटते की, जर पेत्रोग्राद पडले तर मध्यवर्ती क्रांतिकारक संघटना नष्ट होतील. त्याला माझे उत्तर असे आहे की, जर या सर्व संघटना नष्ट झाल्या तर मला खूप आनंद होईल; कारण त्या रशियावर केवळ संकटे आणतील...

"पेत्रोग्रादच्या पाडावाबरोबर बाल्टिक काफलाही नष्ट होईल... पण



कारखाना समित्यांची परिषद, पेत्रोग्राद, ३० मे – ३ जून, १९१७



ग्रेनेडधारींच्या बराकींमध्ये सैनिकांची सभा. वक्ता बाल्टिक नौदलातील एक खलाशी, ऑक्टोबर १९१७

त्याबाबत खेद करायचे कारण राहणार नाही; बहुतेक युद्धनौका पूर्णतः नीतिभ्रष्ट झाल्या आहेत."

लोकांच्या विरोधाचे एवढे जोरदार तुफान उठले की, राजधानी खाली करण्याची योजना रद्द करावी लागली.

दरम्यान रशियावर सोविएतांची काँग्रेस एखाद्या रुद्र मेघासारखी ओठंगून राहिली होती व त्यातून विजेचे कडकडाट घुमत होते. या काँग्रेसला केवळ सरकारचाच नव्हे, तर सर्व "नेमस्त" समाजवाद्यांचा विरोध होता. मध्यवर्ती सेना आणि नौदल समित्या, काही ट्रेड युनियनांच्या मध्यवर्ती समित्या, किसान सोविएते आणि सर्वात अधिक म्हणजे खुद्द केंद्रीय कार्यकारी समिती पराकाष्ठेचे प्रयत्न करून ही काँग्रेस भरण्याला प्रतिबंध करीत होती. पेत्रोग्राद सोविएतने स्थापन केलेली, पण आता केंद्रीय कार्यकारी समितीच्या हाती असलेली 'इझ्वेस्तिया' आणि 'गोलोस सोल्दाता' (सैनिकाचा आवाज) ही वृत्तपत्रे, समाजवादी-क्रांतिकारक पक्षाच्या वृत्तपत्रांच्या अख्ख्या तोफखान्याप्रमाणे – 'देलो नरोदा' (जनतेचे ध्येय) व 'वोल्या नरोदा' (जनतेची इच्छाशक्ती) यांच्या प्रमाणेच – काँग्रेसविरोधी टीकेचा भडिमार करीत होती.

सबंध देशभर प्रतिनिधी पाठवून, स्थानिक सोविएतांच्या समित्यांना व सेना समित्यांना तारेने संदेश पाठवून काँग्रेसच्या निवडणूका थांबविण्याच्या अथवा लांबणीवर टाकण्याच्या सूचना देण्यात आल्या. काँग्रेसविरुद्ध सार्वजनिकरीत्या गंभीर प्रस्ताव मंजूर करण्यात आले; घटनात्मक सभेची तारीख जवळ आली असताना काँग्रेस भरविणे अप्रस्तुत आहे असा लोकशाहीवाद्यांनी विरोधी सूर लावला; आघाडीवरच्या, झेम्स्त्वोच्या युनियनच्या, किसान संघाच्या, कझाख सेनांच्या संघाच्या, लष्करी अधिकारी संघाच्या, सेंट जॉर्ज पदकाचे मानकरी असलेल्या सरदारांच्या, "आहुती पलटणींच्या"* प्रतिनिधींचे निषेध प्रगट होत होते... रशियन प्रजासत्ताकाच्या मंडळानेही एकमुखाने अमान्यता दर्शविली. मार्चमधील रशियन क्रांतीने स्थापन केलेली संपूर्ण प्रचंड यंत्रणा सोविएतांची काँग्रेस रोखू पहात होती...

याच्या दुसऱ्या बाजूला कामगारवर्गाची – कामगार, सामान्य सैनिक आणि गरीब किसानांची – आकारहीन इच्छाशक्ती होती. अनेक स्थानिक सोविएते एव्हाना बोल्शेविक बनली होती; शिवाय औद्योगिक कामगारांच्या

---

*'टीपा आणि खुलासे' पहा.

संघटना होत्या, कारखाना समित्या; आणि बंडखोर सेना व नौदल संघटना. काही ठिकाणी लोकांना त्यांचे सोविएत प्रतिनिधी निवडायला प्रतिबंध करण्यात आला तेव्हा त्यांनी "अवशिष्ट बैठका" भरवून आपल्यातल्या एकाची पेत्रोग्रादला जाण्यासाठी नियुक्ती केली. इतरत्र त्यांनी जुन्या अडथळा आणणाऱ्या समित्या नष्ट केल्या व नव्या स्थापन केल्या. हे सर्व महिने आतल्या आत धुमसत राहिलेल्या क्रांतीच्या आगींवर जमून हळूहळू घट्ट बनत चाललेल्या पापुद्र्याला बंडाच्या जोरदार लाटेने उचलून फेकले. सोविएतांची अखिल रशियन कॉंग्रेस भरविणे केवळ उत्स्फूर्त जनआंदोलनालाच शक्य होते...

प्रत्येक दिवशी बोल्शेविक वक्ते बराकींमधून व कारखान्यांमधून दौरे काढत होते, "यादवी युद्धाच्या सरकारचा" तीव्र निषेध करीत होते. एका रविवारी आम्ही सारे एका भरभक्कम वाफेवर चालणाऱ्या ट्रामगाडीमधून निघालो. चिखलाने रबरबलेल्या रस्त्यांमधून, कारखान्यांच्या इमारती व भलीमोठी प्रार्थनामंदिरे यांच्यामधून, दणदणाट करीत श्लीस्सेलबर्ग प्रोस्पेक्तवरील ओबुखोव कारखाना या सरकारी दारूगोळयाच्या कारखान्यात तिने आम्हाला पोचवले.

एका अजस्र अपुऱ्या बांधलेल्या इमारतीच्या उघडयाबोडक्या विटांच्या भिंतींच्या मधल्या भागात सभा भरली होती. लाल कपडयाचे आच्छादन घातलेल्या व्यासपीठाभोवती काळ्या कपडयांमधले दहा हजार स्त्रीपुरुष जमले होते. लाकडांच्या ओंडक्यांवर व विटांवर लोकांनी दाटी केली होती, काहीजण उंचावरच्या तुळयांवर बसले होते. त्या जनसंमर्दाचा कमालीचा उत्सुक आणि घनगंभीर नाद ऐकू येत होता. ढगाळलेल्या अंधाऱ्या आकाशामधून कधीमधी सूर्य बाहेर डोकावत होता आणि खिडक्यांच्या रिकाम्या चौकटींमधून घुसून येणारे त्याचे तांबूस प्रकाशझोत, आमच्याकडे माना उंचावून पाहणाऱ्या जनताजनार्दनाच्या साध्याभोळ्या चेहऱ्यांवर पडत होते.

शिडशिडीत, कॉलेजातील विद्यार्थ्यांच्या चणीचे व कलाकाराप्रमाणे संवेदनाक्षम मुद्रा असलेले लुनाचार्स्की, सोविएतांनी सत्ता का हाती घेतली पाहिजे ते समजावून सांगत होते. देशाचा बुद्धयाच नाश घडवू पाहणाऱ्या, सेनेचा नाश करणाऱ्या, नवा कोर्निलोव निर्माण व्हावा यासाठी अनुकूल संधी उत्पन्न करणाऱ्या क्रांतीच्या शत्रूंपासून तिचा बचाव करण्यासाठी सोविएतांशिवाय दुसऱ्या कशाचीही हमी नव्हती.

रूमानियाच्या आघाडीवरून आलेल्या एका रोड, दीनवाण्या सैनिकाने मोठ्या आवेशाने ओरडून म्हटले :

"कॉम्रेडहो! आघाडीवर आमची उपासमार होत आहे, थंडीने आम्ही गोठून जात आहोत. आम्ही निष्कारण मरत आहोत. अमेरिकन कॉम्रेडना मी सांगितलेय, मरेपर्यंत रशियन क्रांतीला कधीही सोडणार नाहीत असा अमेरिकेत निरोप पोचवा. जगातील जनता जागी होऊन आम्हाला मदत करीपर्यंत आम्ही आमच्या सर्व ताकदीनिशी किल्ला लढवत राहू! अमेरिकेमधल्या कामगारांना सांगा, उठा आणि सामाजिक क्रांती-साठी लढा!"

नंतर सडपातळ बांध्याचे, हळू आवाजात बोलणारे, खंबीर पेत्रोव्स्की बोलायला आले :

"आता कृतींची वेळ आहे, शब्दांची नव्हे. आर्थिक परिस्थिती वाईट आहे, पण तिची आपण सवय करून घेतली पाहिजे. आपली उपासमार करण्याचा आणि थंडीत गोठवून मारण्याचा ते प्रयत्न करताहेत. आपल्याला भडकवण्याचा ते प्रयत्न करताहेत. पण त्यांना समजू दे की, ते मर्यादेपलि-कडे जाऊ शकतात — जर त्यांनी आमच्या कामगारवर्गाच्या संघटनांवर हात टाकला, तर गाळकचरा साफ करतात तसे आम्ही त्यांना पृथ्वीतलावरून साफ करून टाकू!"

बोल्शेविक वृत्तपत्रांचा एकाएकी विस्तार झाला. 'राबोची पूत' आणि 'सोल्दात' (सैनिक) या दोन पक्षीय वर्तमानपत्रांशिवाय, किसानांसाठी 'देरेवेन्स्काया बेद्नोता' (गावचे गरीब) नांवाचे नवे वर्तमानपत्र निघू लागले व त्याच्या दररोज पाच लाख प्रती छापल्या जाऊ लागल्या; आणि ३० ऑक्टोबरपासून 'राबोची इ सोल्दात' निघू लागले. त्याच्या अग्रलेखात बोल्शेविक दृष्टिकोन साररूपाने सामावला होता :

> "चौथ्या वर्षाची हिवाळी मोहीम म्हणजे सैन्याचा आणि देशाचा संहार ठरेल. पेत्रोग्रादच्या सुरक्षिततेला धोका निर्माण झाला आहे. लोकांच्या दुर्दैवाचा प्रतिक्रांतिकारकांना आनंद होतोय... आत्यंतिक निराशेला पोचलेले किसान उघड बंड करून उठलेत. जमीनदार आणि सरकारी अधिकारी सूडाच्या ईर्ष्येने पेटून त्यांची कत्तल करताहेत. कारखाने आणि खाणी बंद पडत आहेत. कामगारांना उपासमारीची धास्ती आहे. भांडवलदार आणि त्यांचे सेनापती यांना सैन्यात आंधळी

शिस्त पुन्हा स्थापन करायची इच्छा आहे. भांडवलदारवर्गाचा पाठिंबा मिळालेले कोर्निलोववादी घटनात्मक सभेची बैठक मोडण्याची उघडपणे तयारी करीत आहेत.

"केरेन्स्की सरकार लोकांच्या विरुद्ध आहे. ते देशाचा नाश करील...

हे वृत्तपत्र पुढील गोष्टींचा पुरस्कार करते:

"सर्व सत्ता सोविएतांच्या हाती – राजधानीत आणि प्रांतांमध्ये अशा दोन्ही ठिकाणी.

"सर्व आघाड्यांवर ताबडतोब युद्धविराम. जनतांमध्ये प्रामाणिक लोकसत्तावादी शांततेची प्रस्थापना.

"जमीनदारांच्या मालमत्ता भरपाईविना किसानांच्या ताब्यात.

"औद्योगिक उत्पादनावर कामगारांचे नियंत्रण.

"निष्ठेने आणि सचोटीने निवडलेली घटनात्मक सभा."

*

प्रस्तुत ठिकाणी याच वर्तमानपत्रातील – जर्मनांचे हस्तक म्हणून जगाला माहीत झालेल्या बोल्शेविकांच्या वृत्तपत्रातील – एक उतारा उद्धृत करणे मोठे स्वारस्यपूर्ण ठरेल:

"कोटचवधी मृत माणसांच्या रक्ताने माखलेला जर्मन कैसर आपले सैन्य पेत्रोग्रादवर लोटू पाहतोय. आमच्याप्रमाणेच शांततेची इच्छा धरणाऱ्या जर्मन कामगारांना, सैनिकांना, खलाशांना आणि किसानांना आवाहन करू या... या नतद्रष्ट युद्धाविरुद्ध उठून उभे रहा!

"रशियामधील कामगार, सैनिक आणि किसान यांच्या वतीने खरोखरीच बोलू शकेल व मुत्सद्द्यांना डावलून जर्मन फौजांना थेट आवाहन करू शकेल, जर्मन भाषेत जर्मन खंदक घोषणांनी भरून टाकील, असे क्रांतिकारक सरकारच केवळ हे करू शकेल... आमचे वैमानिक या घोषणा सर्व जर्मनीभर प्रसारीत करतील..."

प्रजासत्ताक मंडळातील गृहाच्या दोन बाजूंमधील दरी दिवसागणिक रुंदावत होती.

डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांच्या वतीने कारेलिन म्हणाले "दोस्तांच्या युद्धरथाला रशियाला जुंपण्यासाठी मालमत्ताधारी वर्ग क्रांतिकारक

राज्य यंत्रणेचा वापर करू पहात आहेत! क्रांतिकारक पक्ष पूर्णतः या धोरणाच्या विरुद्ध आहेत..."

जन-समाजवाद्यांचे प्रतिनिधित्व करणाऱ्या म्हाताऱ्या निकोलाय चैंकोव्स्कींनी आपल्या भाषणात किसानांना जमीन देण्यास विरोध केला आणि कॅडेटांची बाजू घेतली :

"सैन्यामध्ये आपण तात्काळ कडक शिस्त अंमलात आणली पाहिजे... अगदी युद्धाच्या आरंभापासून मी अखंडपणे सांगत आलोय की, युद्धकाळात सामाजिक आणि आर्थिक सुधारणा हाती घेणे हा गुन्हा आहे. आपण हा गुन्हा करीत आहोत आणि तरीही मी या सुधारणांचा शत्रू नाही, कारण मी समाजवादी आहे..."

डाव्यांकडून ओरडा झाला, "आमचा तुमच्यावर विश्वास नाही!" उजव्यांनी मात्र जोरदार टाळ्यांचा कडकडाट केला...

कॅडेटांच्या वतीने बोलणाऱ्या अद्झेमोव यांनी सांगितले की, कशासाठी लढता आहात हे सैन्याला सांगण्याची मुळीच गरज नाही, कारण शत्रूला रशियन प्रदेशाबाहेर हाकलून लावणे हे आपले आद्यकर्तव्य आहे याची प्रत्येक सैनिकाला जाणीव असायला हवी.

खुद्द केरेन्स्की दोनदा बोलायला आले व राष्ट्रीय एकजुटीचे त्यांनी मोठ्या आवेगाने आवाहन केले. एकदा तर भाषणाच्या अखेरीस त्यांना रडू कोसळले. पण सभागृहातील सदस्यांनी निर्विकारपणे त्यांचे भाषण ऐकले व मधून मधून उपहासात्मक टोमणे मारून अडथळे आणले.

केंद्रीय कार्यकारी समितीचे आणि पेत्रोग्राद सोविएतचे मुख्य ठाणे असलेली स्मोल्नी इन्स्टिटयूट शहराच्या एका टोकाला, नेवा नदीच्या विस्तृत पात्रानजीक उभी होती. चिखलभरल्या रस्त्यांमधून गोगलगायीच्या गतीने जाणाऱ्या, प्रचंड खडखडाट करणाऱ्या आणि लोकांनी खच्चून भरलेल्या ट्रामगाडीतून मी तेथे गेलो. ट्रामचा रस्ता जेथे संपत होता तेथे स्मोल्नी कॉन्व्हेन्टच्या इमारतीचे फिकट सोनेरी किनार असलेले डौलदार धूरकट निळ्या रंगाचे सुंदर घुमट उभे होते; आणि त्या शेजारी दोनशे यार्ड लांबीची व तीन मजली उंच अशी बराकीवजा दर्शनी भागाची स्मोल्नी इन्स्टिटयूटची इमारत उभी होती व तिच्या प्रवेशद्वारावर दगडात कोरलेली भव्य राजचिन्हे अजूनही गर्वाने पहात असल्याचा भास होत होता...

जुन्या राजवटीच्या काळात येथे रशियन उमरावांच्या मुलींसाठी सुप्रसिद्ध कॉन्व्हेन्ट शाळा होती व तिला खुद्द राणीचा आश्रय होता.

आता या इन्स्टिटच्यूटचा ताबा कामगार व सैनिकांच्या क्रांतिकारक संघटनांनी घेतला होता. तिच्या अंतर्गत शंभरपेक्षा अधिक मोठी दालने होती, त्यांच्या भिंती शुभ्र पांढऱ्या होत्या व ती जवळ जवळ मोकळीच होती. त्यांच्या दारांवर अद्याप काचेचे मीनाकाम केलेल्या पाटचा होत्या व अमुक दालन 'क्रमांक ४—मुलींचा वर्ग' किंवा 'शिक्षिकांची खोली' अशी माहिती येणाऱ्या जाणाऱ्याला वाचायला मिळत होती; पण याच पाटचांवर ओबडधोबड अक्षरातल्या पाटचा नव्या व्यवस्थेच्या ताकदीची साक्ष देत होत्या: 'पेत्रोग्राद सोविएतची कार्यकारी समिती' आणि 'केंद्रीय कार्यकारी समिती' आणि 'परराष्ट्र खाते मंडळ'; 'समाजसत्तावादी-सैनिक संघ', 'अखिल रशियन ट्रेड युनियनांची मध्यवर्ती समिती', 'कारखाना समित्या', 'मध्यवर्ती सेना समिती'; आणि त्याचप्रमाणे राजकीय पक्षांच्या मध्यवर्ती कचेऱ्या व गटा गटाने सल्लामसलतीची दालने...

लांबच लांब महिरपीदार व्हरांड्यांमध्ये तुरळक विजेचे दिवे पेटत होते आणि सैनिकांच्या व कामगारांच्या लगबगीने जाणाऱ्या आकृतींची गर्दी उडालेली दिसत होती. काहींच्या पाठींवर वर्तमानपत्रांची, घोषणापत्रकांची, सर्व प्रकारच्या छापील प्रचारसाहित्याची मोठमोठी ओझी लादलेली दिसत होती. लाकडी तक्तपोशीवर त्यांच्या दणकट बुटांचा घनगंभीर व अखंड नाद घुमत होता... सर्वत्र पाटचा चिकटवल्या होत्या: "कॉम्रेडहो! तुमच्या आरोग्यासाठी, स्वच्छता राखा!" प्रत्येक मजल्याच्या जिन्याच्या तोंडाशी किंवा जिन्यांच्या मधल्या चौकांमध्ये लांबलचक टेबलांवर भिन्न भिन्न राजकीय पक्षांच्या पुस्तिका व साहित्य विक्रीसाठी ठेवलेले होते.

खालच्या मजल्यावरील ऐसपैस, बैठ्या छताचे भोजनगृह अद्याप भोजनासाठीच वापरले जात होते. दोन रूबल देऊन मी जेवणाचे तिकीट घेतले आणि इतर हजारो लोकांबरोबर रांगेत उभा राहून जेवणाचे पदार्थ घेण्याची वाट पाहू लागलो. लांबलचक टेबलांशी वीस स्त्रीपुरुष भल्या मोठ्या कढयांमधून कोबीचे सार, मांसाचे तुकडे व खीर लांबोड्या पळ्यांनी ढवळून वाढीत होते, काळ्या पावाच्या लाद्या तेथे पडल्या होत्या. पत्र्याच्या एका कपातल्या चहाला पाच कोपेक द्यावे लागत होते. टोपलीतून प्रत्येकजण एक तेलकट लाकडी चमचा उपसून घेत होता. लाकडी टेबलांच्या नजीक मांडलेली बाकडी भुकेल्या श्रमजीवींनी गच्च भरलेली होती, आपल्या पुढ्यातल्या अन्नावर ते तुटून पडत होते, मोठमोठ्याने गप्पा गोष्टी करत होते, बोलत होते, हास्यविनोद करीत होते.

वरच्या मजल्यावर आणखी एक भोजन दालन होते. ते केंद्रीय कार्यकारी समितीसाठी राखून ठेवलेले होते, पण तेथे कुणीही जात होता. येथे पावावर लोण्याचा जाड थर लावून मिळायचा व लागतील तेवढे पेले चहा मिळायचा.

दुसऱ्या मजल्यावरच्या दक्षिण कक्षात बैठकांचे मोठे सभागृह होते. हे पूर्वीचे इन्स्टिटयूटचे नृत्य-दालन होते. या पांढऱ्याशुभ्र दालनात शेकडो नक्षीदार विजेचे दिवे बसवलेली शुभ्र मुलाम्याची झुंबरे लटकावलेली होती व अजस्र खांबांच्या दोन ओळींनी हे दालन विभागलेले होते. एका बाजूला व्यासपीठ होते व त्याच्या दोन्ही बाजूंना शाखादार दीपस्तंभ उभे होते आणि मागील बाजूस असलेल्या सोनेरी चौकटीमधून शाही चित्र कापून काढण्यात आले होते. उत्सवप्रसंगी या ठिकाणी लष्करी अधिकाऱ्यांचे व धर्मगुरुंचे रुबाबदार पोषाख चमकत असायचे, ही राजकुलीन स्त्रियांची मनोरंजनभूमी होती.

दालनाच्या पलिकडेच बाहेरच्या बाजूला सोविएतांच्या काँग्रेसच्या ओळखपत्रे समितीची कचेरी होती. मी तेथे उभा राहून येणाऱ्या नव्या प्रतिनिधींना न्याहाळत होतो — मजबूत बांध्याचे दाढीवाले सैनिक येत होते, काळ्या डगल्यांमधले कामगार येत होते, काही लांब दाढी राखलेले शेतकरीही येत होते. तेथे काम करणारी तरुणी प्लेखानोव यांच्या 'येदिन्स्त्वो'* गटातली होती. त्या येणाऱ्या लोकांकडे तुच्छतेने बघून ती हसत होती. "पहिल्या काँग्रेसमधील प्रतिनिधींपेक्षा ही अगदी वेगळी माणसं आहेत," तिने शेरा मारला. "पहा किती रांगडी आणि अडाणी माणसं दिसताहेत ही! अगदी गावंढळ..." तिचे म्हणणे खरे होते. रशियाचा अंतर्भाग क्रांतीने ढवळून निघाला होता आणि अगदी तळातली माणसे आता सर्वांत वरच्या थरावर आली होती. जुन्या केंद्रीय कार्यकारी समितीतर्फे नेमलेल्या ओळखपत्रे समितीने, एका पाठोपाठ एका प्रतिनिधीवर आरोप ठेवायला आरंभ केला की, त्यांची बेकायदेशीररीत्या निवड झालेली होती. बोल्शेविकांच्या मध्यवर्ती समितीचे प्रतिनिधी काराखान यावर नुसते हसले. "काळजी करू नका," ते त्या प्रतिनिधींना म्हणाले, "वेळ येईल तेव्हा तुम्हाला दिसून येईल की तुमच्या जागा तुम्हाला मिळाल्यात..."

'राबोची इ सोल्दात'ने म्हटले होते:

---

* 'टीपा आणि खुलासे' पहा.

> "काँग्रेस होणार नाही, सर्व प्रतिनिधींनी पेत्रोग्राद सोडून जाणे इष्ट ठरेल, अशा प्रकारची विधाने करून काँग्रेस मोडण्याचा प्रयत्न करणाऱ्या संघटना समितीमधील काही सदस्यांच्या खटाटोपांकडे नव्या अखिल रशियन काँग्रेसच्या प्रतिनिधींचे लक्ष वेधण्यात आले आहे... या अफवांकडे लक्ष देऊ नका... महान दिवस लौकरच येत आहेत..."

२ नोव्हेंबरपर्यंत कोरम पुरा होणार नव्हता हे स्पष्ट होते, म्हणून काँग्रेसचे उद्घाटन ७ तारखेपर्यंत पुढे ढकलण्यात आले. पण आता सबंध देश जागा झाला होता; आपला पराभव झाल्याची मेन्शेविकांना आणि समाजवादी-क्रांतिकारकांना जाणीव झाली होती. अचानकपणे त्यांनी आपले पवित्रे बदलले आणि जास्तीत जास्त "नेमस्त" समाजवादी प्रतिनिधी निवडा, अशा आशयाच्या तारा आपल्या प्रांतीय संघटनांना पाठवण्याचा सपाटा लावला. त्याचवेळी किसानांच्या सोविएतांच्या कार्यकारी समितीने आणीबाणीची घोषणा करून, कामगार आणि सैनिक जी काही पावले उचलतील त्यांना काटशह देण्यासाठी १३ डिसेंबरला किसान काँग्रेस भरविण्याचे आवाहन केले.

बोल्शेविक काय करणार आहेत? शहरामधून अफवा पसरल्या की, कामगार आणि सैनिक सशस्त्र बंड करणार आहेत. भांडवलदारी आणि प्रतिगामी वृत्तपत्रांनी उठावाचे भाकित केले व सरकारला आग्रह केला की, पेत्रोग्राद सोविएतच्या सदस्यांना अटक करावी, किंवा निदान काँग्रेसच्या बैठकीला प्रतिबंध करावा. 'नोवाया रूस'सारख्या वर्तमानपत्रांनी तर, बोल्शेविकांची सरसहा कत्तल करण्याचा उघड उघड सल्ला दिला.

गोर्कीचे वृत्तपत्र 'नोवाया झीझ्न' बोल्शेविकांशी सहमत होते की, प्रतिगामी क्रांतीला नष्ट करण्याचा प्रयत्न करीत होते आणि जरूर पडली तर शस्त्राच्या बळावर त्यांचा प्रतिकार करणे भाग होते. पण क्रांतिकारक लोकशाहीच्या सर्व पक्षांनी एकच एक संयुक्त आघाडी उभारणे आवश्यक होते :

> "जोपर्यंत लोकशाहीने आपल्या प्रमुख शक्ती संघटित केलेल्या नाहीत, जोपर्यंत त्याच्या प्रभावाला जोरदार विरोध होत आहे, तोपर्यंत हल्ला चढविणे फायद्याचे ठरणार नाही. पण जर विरोधी

घटकांनी बळाचा वापर केला तर मात्र क्रांतिकारक लोकशाहीने सत्ता काबीज करण्यासाठी लढाईमध्ये उतरावे आणि अशा परिस्थितीत जनतेचे सर्वांत व्यापक विभाग त्याचे बळ टिकवून धरतील . . . ”

गोर्कींनी प्रतिपादन केले की, प्रतिगामी आणि सरकारी अशी दोन्ही प्रकारची वृत्तपत्रे बोल्शेविकांना हिंसात्मक बनविण्यासाठी डिवचत आहेत. पण अशा वेळी उठाव करणे म्हणजे एका नव्या कोर्निलोव प्रकरणाला रस्ता खुला करून देण्यासारखे आहे. बोल्शेविकांनी अफवा खोडून काढाव्या असे गोर्की यांनी आवाहन केले. पोत्रेसोवने ‘देन’ (दिवस) या मेन्शेविक वृत्तपत्रात नकाशासकट एक सनसनाटी वार्ता छापली. बोल्शेविकांच्या मोहीमेची गुप्त योजना आपण उघडकीला आणली आहे असा त्याने दावा केला होता.

जणू जादू घडावी त्याप्रमाणे “नेमस्त” आणि पुराणमतवादी गटांच्या मध्यवर्ती समित्यांच्या व केंद्रीय कार्यकारी समितीच्या इशाऱ्यांनी, घोषणांनी[10], आवाहनांनी भिंती भरून गेल्या होत्या. सर्व प्रकारच्या लोकमत-प्रदर्शनांचा त्यांनी निषेध केला होता व चळवळयांकडे लक्ष देऊ नये अशी कामगारांना आणि सैनिकांना काकुळतीने विनंती केली होती. उदाहरणार्थ, समाजवादी-क्रांतिकारक पक्षाच्या लष्करी विभागाने प्रसृत केलेले हे निवेदन पहा :

“पुन्हा शहरात अफवा पसरत आहेत की, लोकमतप्रदर्शन करण्याचा बेत शिजत आहे. या अफवांचा उगम कुठून झाला? उठावाचे समर्थन करण्याचा अधिकार या चळवळयांना कोणत्या संघटनेने दिला? केंद्रीय कार्यकारी समितीमध्ये बोल्शेविकांना याबाबत सवाल विचारण्यात आला तेव्हा त्यांनी या बाबतीत कानांवर हात ठेवले . . .

“पण केवळ या अफवांमुळेही फार मोठा धोका निर्माण होत आहे. असे सहज घडण्याची शक्यता आहे की, बहुसंख्य कामगारांच्या, सैनिकांच्या आणि किसानांच्या मन:स्थितीचा विचार न करता काही भडक माथ्याच्या व्यक्ती कामगार आणि सैनिकांच्या एका विभागाला रस्त्यावर यायला, बंड करण्याला त्यांना प्रवृत्त करायला डिवचतील.

“क्रांतिकारक रशिया सध्या ज्या धोक्याच्या काळामधून जात आहे अशा वेळी कुठल्याही उठावाचे सहजपणे यादवी युद्धात रूपांतर

होण्याची शक्यता आहे आणि अत्यंत कष्टपूर्वक उभारलेल्या कामगार, किसान आणि सैनिकांच्या सर्व संघटना नष्ट होण्याचा त्यापासून संभव आहे... या उठावाचा फायदा घेऊन क्रांतीचा नाश करण्याचा, विल्हेल्मला आघाडी खुली करण्याचा आणि घटना-सभा छिन्नविच्छिन्न करण्याचा प्रतिक्रांतिकारकांचा कट शिजत आहे...

"आपल्या जागी ठामपणे चिकटून रहा! बाहेर पडू नका!"

२८ ऑक्टोबरला, स्मोल्नीच्या व्हरांड्यांमध्ये कामेनियेव नांवाच्या एका लहान चणीच्या, तांबूस टोकदार दाढी राखलेल्या आणि जोरजोराने हातवारे करीत बोलणाऱ्या एका इसमाशी माझी भेट झाली. पुरेसे प्रतिनिधी येतील अशी त्याला मुळीच खात्री वाटत नव्हती. तो म्हणाला, "जर काँग्रेस भरली तर ती जनतेच्या प्रबळतम भावनांचे प्रतिनिधित्व करील. जर बोल्शेविकांचे बहुमत झाले, तसे ते होईल असे मला वाटते, तर सोविएतांच्या हाती सत्ता सुपूर्द करावी अशी आम्ही मागणी करू आणि मग हंगामी सरकारला राजिनामा द्यावा लागेल..."

उंचापुरा, फिकट चेहऱ्याचा, चष्मा लावणारा वोलोदार्स्की नांवाचा तरुण अधिक ठामपणे बोलत होता. "'लीबेर-दान*' व इतर तडजोड-वादी काँग्रेसचा घात करीत आहेत. जर बैठकीला प्रतिबंध करण्यात त्यांना यश आले – तर तिच्यावर अवलंबून न राहण्याइतके आम्ही जरूर वास्तव-वादी आहोत!"

२९ ऑक्टोबरच्या तारखेखाली माझ्या टिपणवहीत त्या दिवशीच्या वर्तमानपत्रांमधून उतरवून घेतलेल्या पुढील नोंदी आहेत:

"मोगीलेव (वरिष्ठ सेनाधिकाऱ्यांचे मुख्य ठाणे). येथे निष्ठावंत गार्ड रेजिमेंटस्, 'अतिक्रूर डिव्हिजन', कझाक आणि 'आहुती पलटणी' एकवटल्या आहेत.

"पाव्लोव्स्क, त्सारस्कोये सेलो आणि पीटरहॉफ लष्करी अधि-कारी विद्यालयांमधील युंकरांना** पेत्रोग्रादला येण्यासाठी सज्ज होण्या-

---

*लीबेर आणि दान (मेन्शेविकांची नांवे.)

**युंकर – उमरावकुलातील मुलांना झारच्या सेनेत लष्करी अधिकारी बनविण्यासाठी शिक्षण देणाऱ्या लष्करी विद्यालयातील कॅडेट. – सं.

च्या आज्ञा सरकारने दिल्या. ओरानियेनबॉमचे युंकर शहरात आले.

"पेत्रोग्रादमधील शिबंदीतील चिलखती गाडी डिव्हिजनचा काही भाग हेमंत प्रासादात तळ टाकून बसला.

"ट्रॉट्स्की यांच्या सहीने निघालेल्या हुकुमांनुसार, सेस्त्रोरेत्स्क येथील सरकारी शस्त्रास्त्र कारखान्यात तयार केलेल्या हजारो रायफली पेत्रोग्रादच्या कामगारांच्या प्रतिनिधींना देण्यात आल्या.

"नीझ्नेलीतेइनी भागातील नागरी मिलिशिआच्या सभेत ठराव मांडण्यात आला की, सर्व सत्ता सोविएतांच्या हवाली करण्यात यावी."

काहीतरी घडणार आहे हे प्रत्येकाला माहीत होते, पण नक्की काय घडणार ते कुणालाच ठाऊक नव्हते. अशा त्या धामधुमीच्या दिवसांमधल्या गोंधळाच्या घटनांचा हा एक केवळ नमुना आहे.

३० ऑक्टोबरच्या रात्री स्मोल्नीमध्ये झालेल्या पेत्रोग्राद सोविएताच्या बैठकीत, सशस्त्र उठावाचा सोविएतचा बेत म्हणजे "सोविएतांची काँग्रेस बदनाम करून तिला उधळून लावण्याचा प्रतिगाम्यांचा प्रयत्न होय..." ही भांडवलदारी वृत्तपत्रांची विधाने म्हणजेही प्रतिगामी प्रयत्नच होय, असे ट्रॉट्स्की म्हणाले. "पेत्रोग्राद सोविएतने," त्यांनी जाहीर केले, "कोणतेही लोकमतप्रदर्शन करण्याची आज्ञा दिलेली नाही. जर तसे करण्याची गरज भासली तर आम्ही करू आणि आम्हाला पेत्रोग्रादच्या शिबंदीचा पाठिंबा असेल... ते (सरकार) प्रतिक्रांतीची तयारी करीत आहेत; आम्ही त्यांना आक्रमक पवित्र्याने उत्तर देऊ आणि ते निष्ठुर व निर्णायक असेल."

पेत्रोग्राद सोविएतने निदर्शनाचा हुकूम दिला नव्हता हे खरे आहे, पण उठावाच्या प्रश्नाचा बोल्शेविक पक्षाची मध्यवर्ती समिती विचार करीत होती. २३ च्या सबंध रात्रभर त्यांची बैठक चालली होती. बैठकीला पक्षातील सर्व प्रज्ञावंत, नेते आणि पेत्रोग्रादच्या कामगारांचे व शिबंदीचे प्रतिनिधी हजर होते. प्रज्ञावंतांपैकी फक्त लेनिन आणि ट्रॉट्स्की उठावाला अनुकूल होते. लष्करी लोकांनी सुद्धा विरोध केला. मते घेण्यात आली. उठावाचा पराभव झाला!

मग एक रांगडा कामगार उभा राहिला. संतापाने त्याचा चेहरा वेडावाकडा झाला होता. "मी पेत्रोग्रादच्या कामगारवर्गाच्या वतीनं बोल-

तोय," कठोर सुरात तो म्हणाला: "आम्ही उठावाच्या बाजूचे आहोत. तुम्हाला तुमच्या मार्गानं काय करायचं ते करा, पण मी आत्ताच तुम्हाला बजावून ठेवतो की, तुम्ही जर सोविएतांचा नाश होऊ दिलात, तर **तुमचा आमचा संबंध संपला!**" काही सैनिकांनी त्याला दुजोरा दिला... आणि त्यानंतर त्यांनी पुन्हा मते घेतली – उठावाचा विजय झाला...*

तरीही, रिआझानोव, कामेनियेव आणि झिनोवियेव यांच्या पुढारीपणाखालील बोल्शेविकांच्या उजव्या गटाने सशस्त्र उठावाविरुद्ध आपली मोहीम चालूच ठेवली. ३१ ऑक्टोबरच्या** सकाळी 'राबोची पूत'मध्ये लेनिन

---

*१९१७ च्या ऑक्टोबरात बोल्शेविक पक्षाच्या मध्यवर्ती समितीच्या ऐतिहासिक बैठकीत सशस्त्र उठावाबाबतच्या वादविवादाचा वृत्तांत प्रस्तुत ठिकाणी चुकीचा दिला आहे. सशस्त्र उठाव करण्याचा निर्णय २३ ऑक्टोबर १९१७ रोजी मध्यवर्ती समितीच्या गुप्त बैठकीत घेण्यात आला. लेनिन, बुब्नोव, द्झेर्झिन्स्की, झिनोवियेव, कामेनियेव, कल्लोन्ताय, लोमोव, स्वेर्दलोव, सकोलनिकोव, स्तालिन, ट्रॉट्स्की आणि उरित्स्की यांनी त्या बैठकीत भाग घेतला होता. लेनिन यांनी मांडलेल्या ठरावाला झिनोवियेव आणि कामेनियेव यांनी विरोध केला. सहा दिवसांनंतर, २९ ऑक्टोबरला, मध्यवर्ती समितीची अधिक विस्तृत बैठक भरली. तिला पेत्रोग्रादच्या पक्ष समितीच्या कार्यकारी आयोगाचे, लष्करी संघटनेचे, पेत्रोग्राद सोविएतचे, ट्रेड युनियनांचे, कारखाना समित्यांचे, रेल्वे कामगारांचे आणि पेत्रोग्राद जिल्हा पक्ष समितीचे प्रतिनिधी हजर होते. या बैठकीत लेनिन यांनी मध्यवर्ती समितीच्या मागील बैठकीत मंजूर केलेला ठराव वाचून दाखवला. आपल्या भाषणात लेनिन यांनी अधोरेखित केले की, रशिया आणि युरोप अशा दोन्ही ठिकाणच्या वस्तुनिष्ठ राजकीय परिस्थितीमुळे अत्यंत निर्णायक, अत्यंत क्रियाशील धोरणाचा स्वीकार करणे भाग पडत आहे आणि याचाच एकमेव अर्थ म्हणजे सशस्त्र उठाव केला पाहिजे. मध्यवर्ती समितीच्या सशस्त्र उठावाच्या निर्णयाचे स्वागत करणारा आणि त्याला पाठिंबा देणारा ठराव लेनिन यांनी मांडला. ठरावाला १९ विरुद्ध २ मतांनी मंजुरी मिळाली, चौघे तटस्थ राहिले. झिनोवियेव आणि कामेनियेव यांनी पुन्हा मध्यवर्ती समितीच्या ठरावाविरोधी मतदान केले. – सं.

**ही तारीख चुकीची आहे. तो अंक १ नोव्हेंबरला प्रसिद्ध झाला. – सं.

यांच्या 'भाईंना उद्देशून पत्रा'[11]चा पहिला हप्ता प्रसिद्ध झाला. हे पत्र म्हणजे जगातील अत्यंत धीट राजकीय प्रचारांच्या नमुन्यांपैकी एक होय. कामेनियेव आणि रिआझानोव यांचे आक्षेप आधाराला धरून लेनिन यांनी त्या पत्रात अत्यंत गंभीरपणे उठावाचे असे समर्थन केले होते.

त्यांनी लिहिले होते :

> "'लिबेरदानांची बाजू घेऊन सर्व सत्ता सोविएतांच्या हाती' ही आपली घोषणा आपण सोडून दिली पाहिजे, किंवा आपण उठाव तरी केला पाहिजे. या दोन्हींच्या मधला मार्ग नाही..."

त्याच दिवशी प्रजासत्ताकाच्या मंडळात कॅडेट नेते पॉल मिल्युकोव यांनी अत्यंत ओजस्वी, कडवट भाषण[12] केले. स्कोबेलियेव यांच्या नकाझ-ला जर्मनधार्जिणा म्हणून त्यांनी शिक्का मारला, तेरेश्चेन्को यांचा उपहास केला. त्यांनी जाहीर केले की, 'क्रांतिकारक लोकशाही' रशियाला मारक ठरत आहे आणि उघडपणे सांगून टाकले की, रशियन राजनीतीपेक्षा आप-ल्याला जर्मन राजनीती अधिक पसंत आहे... त्यांचे भाषण चालू असता सबंध वेळ डाव्या पक्षांचे लोक गोंधळ करीत होते...

बोल्शेविक प्रचाराला मिळणाऱ्या यशाच्या महत्त्वाकडे सरकार काना-डोळा करू शकत नव्हते. २९ तारखेला सरकारच्या आणि प्रजासत्ताक मंडळाच्या संयुक्त आयोगाने घाईघाईने दोन कायदे तयार केले : एक होता किसानांना तात्पुरती जमीन देण्याबाबतचा आणि दुसरा होता शांततेच्या जोरदार परराष्ट्र धोरणाला रेटा देण्याचा. दुसऱ्याच दिवशी केरेन्स्कींनी सैन्यातील मृत्युदंडाची शिक्षा तहकूब केली. त्याच दुपारी मोठा गाजावाजा करून नव्या 'प्रजासत्ताकीय राजवट दृढ करणाऱ्या आणि अराजक व प्रतिक्रांती यांच्या विरुद्ध लढणाऱ्या आयोगा'च्या पहिल्या बैठकीचे उद्घाटन करण्यात आले. या आयोगाचा इतिहासात पुढे मागमूसही सापडत नाही. दुसऱ्या दिवशी सकाळी इतर दोन वार्ताहरांबरोबर मी केरेन्स्कींची मुलाखत घेतली[13] – वार्ताहरांना भेटण्याची त्यांची ती अखेरची वेळ.

ते कडवटपणे म्हणाले, "रशियन जनता आर्थिक थकव्यानं गांजली आहे. दोस्त राष्ट्रांनी तिची घोर निराशा केली आहे! रशियन क्रांती संपली असं जगाला वाटतंय. पण अशी चूक करू नका. रशियन क्रांती आत्ता कुठं सुरू होतेय..." कदाचित त्यांना स्वतःला जाणीव नव्हती एवढे त्यांचे शब्द भविष्यात खरे ठरणार होते.

३० ऑक्टोबरला पेत्रोग्राद सोविएतची सबंध रात्रभर चाललेली बैठक कमालीची वादळी होती. मी त्या बैठकीला हजर होतो. "नेमस्त" समाजवादी प्रज्ञावंत, अधिकारी, सेना-समितीचे सदस्य, केंद्रीय कार्यकारी समिती हे सर्व तिथे पूर्ण ताकदीने हजर होते. त्यांच्या विरुद्ध कामगार, किसान आणि सामान्य सैनिक उभे ठाकले होते. ते साधे-बागडे होते, पण त्यांच्यात आवेश होता.

त्वेरमधील गोंधळाबाबत माहिती सांगताना एका किसानाने म्हटले की, भूमी समित्यांमधील सभासदांना अटक झाल्यामुळे तशी परिस्थिती उद्‌भवली होती. "हा केरेन्स्की म्हणजे दुसरा तिसरा कुणी नसून जमीनदारांची ढाल आहे," तो ओरडून म्हणाला. "घटना सभेत आम्ही कोणत्याही परिस्थितीत जमीन ताब्यात घेणारच आहोत हे त्यांना माहीत आहे, म्हणून घटना सभा नाहीशी करण्याचा ते प्रयत्न करताहेत!"

पुतिलोव कारखान्यात यंत्रावर काम करणाऱ्या एका कामगाराने कथन केले की, इंधन नाही किंवा कच्चा माल नाही अशा सबबींखाली तेथील पर्यवेक्षक एकामागून एक विभाग बंद करीत चालले आहेत. त्याने जाहीर केले की, लपवून ठेवलेले प्रचंड साठे कारखाना समितीने उघडकीला आणले.

"हे प्रक्षोभक कृत्य आहे," तो म्हणाला. "त्यांना आमची उपासमार करायची आहे – किंवा आम्हाला हिंसेला प्रवृत्त करायचं आहे!"

सैनिकांमधील एकाने बोलायला आरंभ केला, "कॉम्रेडहो! माणसं जिथं आपली थडगी खोदतात आणि त्यांना खंदक म्हणतात अशा ठिकाणाहून मी तुम्हाला शुभेच्छा घेऊन आलोय!"

नंतर एक उंच, रोड तरुण सैनिक उभा राहिला. त्याच्या डोळ्यांमध्ये विलक्षण चमक होती. त्याचे जोरदार आरोळ्यांनी स्वागत झाले. तो चुद्‌नोवस्की होता. जुलैमधील लढाईत तो ठार झाला अशी बातमी होती आणि आता तो परत मृताचा जिवंत झाला होता.

"सैनिकांचा इतःपर आपल्या अधिकाऱ्यांवर विश्वास राहिलेला नाही. आमच्या सोविएतची बैठक बोलावण्यास नकार देणाऱ्या सेना समित्यांनी सुद्धा आमचा विश्वासघात केलाय... घटना सभा जेव्हा भरवण्याचे ठरले आहे तेव्हाच ती भरली पाहिजे अशी सैनिकांची इच्छा आहे आणि जे तिला पुढे ढकलण्याचा प्रयत्न करतील ते आमच्या शिव्याशापांचे धनी ठरतील – आणि ते केवळ शाब्दिक शिव्याशाप नसतील, सैन्याकडे बंदुकी असतात याची आठवण ठेवा..."

पाचव्या सेनेत चालू असलेल्या घटना सभेच्या निवडणुकीची धामधूम त्याने वर्णन केली. "अधिकारी आणि विशेषत: मेन्शेविक व समाजवादी-क्रांतिकारक बुद्धयाच बोल्शेविकांना लंगडं करण्याचा प्रयत्न करीत आहेत. खंदकांमध्ये आमची वर्तमानपत्रं वाटायची बंदी करण्यात आलीय. आमच्या वक्त्यांना अटक होतेय –"

"पाव मिळत नाही त्याबद्दल का बोलत नाहीस?" दुसरा एक सैनिक ओरडला.

"केवळ भाकरीवर माणूस आता जगणार नाही," चुद्नोवस्कीने तिखट स्वरात उत्तर दिले.

त्याच्या पाठोपाठ एक अधिकारी उठला. वितेब्स्क सोविएतचा तो प्रतिनिधी होता, मेन्शेविक-अबारोनेत्स * होता :

"सत्ता कुणाकडं आहे हा प्रश्न नाही. अडचण सरकारने निर्माण केलेली नाही, लढाईनं केलीय... आणि कोणताही बदल घडण्यापूर्वी लढाई जिंकली पाहिजे –" त्यासरशी उपहासदर्शक आरोळ्या उमटल्या. "ही बोल्शेविक चळवळी मंडळी धोकेबाज आहेत!" सबंध सभागृह हसण्याने दणाणून उठले. "क्षणभर आपण वर्गलढा विसरून जाऊ या –" पण त्यापुढे तो बोलू शकला नाही. एक आवाज ओरडला, "तुम्हाला हेच हवंय!"

त्या काळात पेत्रोग्रादचे रूप काहीसे अजब दिसत होते. कारखान्यांमध्ये समित्यांच्या खोल्या रायफलींच्या ढिगांनी भरलेल्या होत्या, निरोप्यांची लगबग चालत होती, लाल रक्षक ** कवायती करीत होते... दररोज रात्रंदिवस सर्व बराकींमध्ये सभा भरत होत्या आणि अखंड वादविवाद झडत होते. उदास अंधाऱ्या सायंकाळी रस्त्यांमधून गर्दी वाढत जाई, नेव्स्की रस्त्यावर जनसागराच्या लाटा खालून वर धडपडत हेलकावू लागत. वर्तमानपत्रांवर लोक तुटून पडत... वाटमाऱ्या एवढ्या वाढल्या होत्या की, आडरस्त्याने एकटे दुकटे जाणे धोक्याचे ठरले होते... एका दुपारी सादोवाया रस्त्यावर मी एक भयानक दृश्य पाहिले. चोरी करताना सापडलेल्या एका सैनिकाला शेकडो लोकांच्या जमावाने झोडपून, तुडवून ठार मारले... गोठवणाऱ्या थंडीत तासन् तास लांबच लांब रांगांमध्ये पाव आणि दुधासाठी कुडकुडत उभ्या राहणाऱ्या बायकांभोवती काही रहस्यमय व्यक्ती

---

* 'टीपा आणि खुलासे' पहा.

** 'टीपा आणि खुलासे' पहा.

चकरा मारू लागल्या आणि त्यांच्या कानात कुजबुजू लागल्या की, ज्यू लोकांनी खाद्यपदार्थांचा पुरवठा अडवून धरलाय — आणि लोकांची उपासमार होत असताना सोविएतचे सभासद मात्र चैनीत जगताहेत.

स्मोल्नी येथे दारावर आणि बाहेरच्या प्रवेशद्वारांशी कडक पहारे बसवले होते. प्रत्येकाजवळ परवान्याची विचारणा केली जात होती. समित्यांच्या खोल्यांमधून चोवीस तास वर्दळ चालू होती, शेकडो सैनिक आणि कामगार जागा मिळेल तेथे फरशीवरच पथाऱ्या टाकून झोपत होते. वरच्या मजल्यावरच्या मोठ्या सभागृहात पेत्रोग्राद सोविएतच्या गोंगाटात चाललेल्या बैठकांना हजार माणसांनी दाटी केली होती.

संध्याकाळपासून सकाळपर्यंत जुगारी अड्डे तुफान गर्दीने चालत होते, शँपेनच्या बाटल्या फुटत होत्या, दोन दोन लाख रूबलच्या पैजा लावल्या जात होत्या. शहराच्या मध्यभागात दागिन्यांनी मढलेल्या आणि उंची केसाळ कोट घातलेल्या वेश्या रात्रीच्या वेळी रस्त्यांवर चकरा मारीत होत्या, कॅफेंमधून गर्दी करीत होत्या...

राजनिष्ठांचे कट, जर्मन हेरांचा सुळसुळाट, काळाबाजारवाल्यांच्या आणि चोरटा व्यापार करणाऱ्यांच्या काळ्या कारवाया...

आणि धुवाधार पावसात, गोठवणाऱ्या थंडीत, मेघाच्छादित आकाशाखाली गदगदणारी ती नगरी वेगाने धावत होती — कुठे?

## प्रकरण तिसरे

# झंझावातापूर्वी

एखाद्या कमकुवत सरकारची बंडखोर जनतेशी गाठ पडते तेव्हा अशी एक वेळ येऊन ठेपते की, अधिकाऱ्यांच्या प्रत्येक कृतीने जनता प्रक्षुब्ध होते व कृतीला देण्यात येणाऱ्या प्रत्येक नकाराने तिचा तिरस्कार वाढत जातो.

पेत्रोग्राद खाली करण्याच्या ठरावावर प्रचंड वादळ उठले. असे काही करण्याचा सरकारचा इरादा नव्हता असा केरेन्स्कींनी जाहीररीत्या उच्चार केला तेव्हा लोकांनी त्यांची हेटाळणी केली.

क्रांतीच्या दबावाखाली अडकलेले 'हंगामी' भांडवलदारांचे सरकार ('राबोची पूत' गर्जून म्हणाले) खोटी आश्वासने देऊन आपली सुटका करून घेऊ पहात आहे आणि सांगत आहे की, पेत्रोग्राद सोडून पळून जाण्याचा आपला केव्हाही इरादा नव्हता, राजधानी दुसऱ्यांच्या हाती देण्याची आपली इच्छा नाही...

खार्कोवमध्ये * तीस हजार कोळसा खाण कामगार संघटित झाले आणि त्यांनी I. W. W. ** च्या घटनेतील प्रस्तावनेचा स्वीकार केला: "कामगार-

---

* कदाचित, दोनेत्स्क कोळसा खाण या ठिकाणी जॉन रीडना अभिप्रेत असावी. – सं.

** I. W. W. (जागतिक औद्योगिक कामगार) – अमेरिकेतील एक सार्वजनिक क्रांतिकारक ट्रेड युनियन संघटना. रशियामध्ये घडलेल्या क्रांतिकारक घटनांपासून स्फूर्ती घेऊन १९०५ साली तिची स्थापना करण्यात आली. पण पुढे तिचे सांप्रदायिक संघटनात अधःपतन घडल्याने व जनतेशी पूर्वीप्रमाणे निकट संबंध न राहिल्याने १९३० नंतरच्या काळात तिचे कार्य बंद पडले. या संघटनेच्या ऐन बहराच्या काळात जॉन रीड तिचे क्रियाशील सदस्य होते. – सं.

वर्ग आणि मालकवर्ग यांच्यात काहीही साधर्म्य नाही." कझाकांनी खाण कामगारांची पांगापांग केल्यानंतर, काही खाण कामगारांना कामावरून दूर करण्यात आले आणि बाकीच्या खाणींमधील कामगारांनी सार्वत्रिक संप पुकारला. या अशांततेचा बंदोबस्त करण्यासाठी, व्यापार आणि उद्योग खात्याचे मंत्री कोनोवालोव यांनी आपले साहाय्यक ओर्लोव यांची पूर्ण अधिकारांसहित नेमणूक केली. ओर्लोव यांच्याबद्दल खाण कामगारांच्या मनात कमालीचा तिरस्कार होता. पण केंद्रीय कार्यकारी समितीने त्यांच्या नेमणूकीला आपला पाठिंबा दर्शविला, एवढेच नाही तर दॉन खोऱ्यामधून कझाकांना परत बोलावून घेण्याची मागणी करण्यास नकार दिला...

याच्या पाठोपाठ कालुगा येथील सोविएत बरखास्त करण्यात आले. सोविएतमध्ये बोल्शेविकांचे बहुमत प्रस्थापित झाले तेव्हा त्यांनी काही राजकीय कैद्यांची मुक्तता केली. त्यासरशी नगरपालिकेच्या दूमाने सरकारी कमिस्सारची परवानगी घेऊन मिन्स्कहून लष्कर बोलावले आणि सोविएतच्या मुख्य ठाण्यावर तोफांचा भडिमार केला. बोल्शेविक शरण आले. पण इमारतीबाहेर पडताच कझाकांनी त्यांच्यावर हल्ला चढवला. "मॉस्को आणि पेत्रोग्रादसकट सगळीकडच्या बोल्शेविक सोविएतांची आम्ही अशी वाट लावून टाकू" अशा आरोळ्या ते ठोकीत होते. या घटनेने सबंध रशियात चिंतेचे वातावरण निर्माण केले.

उत्तरेकडील सोविएतांची, बोल्शेविक क्रीलेन्को यांच्या अध्यक्षतेखालील प्रादेशिक काँग्रेस पेत्रोग्रादमध्ये संपत आली होती. अखिल रशियन काँग्रेसच्या हाती सर्व सत्ता देण्यात यावी असा ठराव तिने प्रचंड बहुमताने संमत केला. ठरावाच्या अखेरीस बंदिगृहांमधील बोल्शेविकांना उद्देशून एक संदेश देण्यात आला होता. त्या संदेशात म्हटले होते की, तुमच्या मुक्तीचा क्षण आता अगदी नजीक येऊन ठेपला आहे म्हणून आनंद साजरा करा. त्याच सुमारास कारखाना समित्यांच्या पहिल्या अखिल रशियन परिषदेने[1] सोविएतांच्या बाजूने आपला पाठिंबा असल्याचे ठामपणे जाहीर केले आणि एक महत्त्वपूर्ण विचार मांडला:

"झारशाहीपासून राजकीयदृष्ट्या मुक्तता करून घेतल्यानंतर, आपल्या उत्पादक कार्यक्षेत्रात लोकशाही राजवट विजयी झालेली पाहण्याची कामगारवर्गाला इच्छा आहे. वर्चस्वधारी वर्गांच्या गुन्हेगारी धोरणामुळे निर्माण होणाऱ्या आर्थिक विघटनाच्या वातावरणात स्वाभा-

विकपणे उत्पन्न होणाऱ्या औद्योगिक उत्पादनावरील कामगारांच्या नियंत्रणामधून हे उत्तमरीत्या व्यक्त झाले आहे..."

रेल आणि दळणवळण खात्याचे मंत्री लिवेरोव्स्की यांनी राजिनामा द्यावा अशी मागणी रेलकामगारांची युनियन करीत होती...

केंद्रीय कार्यकारी समितीच्या वतीने स्कोबेलियेव यांनी आग्रह धरला की, दोस्तांच्या परिषदेत नकाझ सादर करण्यात यावा व तेरेश्चेन्को यांना पॅरिसला पाठवण्याबद्दल आपला औपचारिक निषेध व्यक्त केला. तेरेश्चेन्को यांनी राजिनामा देण्याची तयारी दर्शवली...

आपल्या सैन्याचे पुनर्संघटन करण्यात अपयशी ठरलेले जनरल वेर्खोव्स्की मंत्रिमंडळाच्या बैठकांना कधी मधीच उपस्थित रहात होते...

नोव्हेंबरच्या ३ तारखेला बूर्त्सेव यांच्या 'ओबश्चिये देलो'मध्ये मोठमोठे मथळे छापले होते:

"नागरिकांनो! पितृभूमीचे रक्षण करा!

मला कालच समजले की, राष्ट्रीय संरक्षण आयोगाच्या एका बैठकीत, कोर्निलोवच्या पाडावाला जबाबदार असणाऱ्या प्रमुख व्यक्तींपैकी एक असलेले युद्धमंत्री जनरल वेर्खोव्स्की यांनी असा एक ठराव मांडला की, दोस्तांना डावलून एक स्वतंत्र शांतता तह करण्यात यावा.

हा रशियाचा विश्वासघात आहे!

तेरेश्चेन्को यांनी जाहीर केले की, वेर्खोव्स्की यांच्या ठरावाची हंगामी सरकारने तपासणीसुद्धा केली नाही.

"तुम्ही तिथं असता तर आपण वेड्यांच्या इस्पितळात बसलो आहोत असं तुम्हाला वाटलं असतं," तेरेश्चेन्को म्हणाले.

जनरल वेर्खोव्स्की यांचे बोलणे ऐकून आयोगाचे सदस्य स्तंभित झाले.

जनरल अलेक्सेयेव तर रडले.

छे! छे! हा वेडेपणा नव्हे! त्याहूनही महाभयानक आहे. हा रशियाचा सरळसरळ विश्वासघात आहे!

वेर्खोव्स्की यांच्या बोलण्याबाबत केरेन्स्की, तेरेश्चेन्को आणि नेक्रासोव यांनी तात्काळ आमच्यापाशी जाब दिला पाहिजे.

नागरिकहो, जागे व्हा!

रशिया विकला जातोय!
त्याचे रक्षण करा!"

प्रत्यक्षात वेर्खोव्स्की म्हणाले होते की, शांतता तह करण्याबाबत दोस्तांवर दबाव आणला पाहिजे, कारण रशियन सैन्यामध्ये इतःपर लढण्याचे बळ राहिलेले नाही.

यावर रशियात आणि परदेशात अशा दोन्ही ठिकाणी प्रचंड खळबळ माजली. वेर्खोव्स्की यांना "प्रकृती अस्वास्थ्याच्या सबबीवर बेमुदत रजा" देण्यात आली आणि ते सरकारमधून बाहेर पडले. 'ओबश्चेये देलो' बंद पाडण्यात आले...

रविवार तारीख ४ नोव्हेंबर हा दिवस 'पेत्रोग्राद सोविएत दिन' म्हणून घोषित करण्यात आला होता. शहरात अनेक सभा आयोजित केल्या होत्या. संघटनासाठी आणि वर्तमानपत्रांसाठी पैसा उभारायला हे निमित्त केले होते; खरे म्हणजे आपल्या सामर्थ्याचे प्रदर्शन करण्यासाठी हे सर्व योजले होते. एकाएकी जाहीर करण्यात आले की, त्याच दिवशी कझाक क्रूसाची मिरवणूक काढतील. १८१२ साली आपल्या दिव्य चमत्काराने नेपोलियनला मॉस्कोमधून हुसकावून लावणाऱ्या एका पुतळीच्या सन्मानार्थ म्हणे ही मिरवणूक काढण्यात येणार होती. वातावरण स्फोटक बनले होते; एखाद्या ठिणगीमधून यादवी पेटली असती. पेत्रोग्राद सोविएतने एक जाहीरनामा काढला. त्याचा मथळा होता 'कझाक बंधूंनो!'

"आम्हा कामगार आणि सैनिकांच्या विरुद्ध तुम्हा कझाकांना भडकवण्यात येत आहे. आपल्यामध्ये वैराची पेरणी करण्याचे काम आपले समान शत्रू असलेले लष्करी सेनापती, बँकर, जमीनदार, माजी अधिकारी, झारचे माजी सेवक असे दडपशहा, विशेषाधिकार असलेले वर्ग करीत आहेत... सर्व लाचखाऊ, धनिक, राजपुत्र, उमराव, सेनापती आपला द्वेष करतात आणि त्यांच्यात तुमच्या कझाक सेनापतींचा सुद्धा समावेश आहे. पेत्रोग्राद सोविएत नष्ट करायला आणि क्रांती चिरडून टाकायला ते सदैव टपून बसले आहेत...

"४ नोव्हेंबरला कुणी तरी कझाकांची धार्मिक मिरवणूक आयोजित करत आहे. या मिरवणुकीत भाग घ्यावा किंवा न घ्यावा हे

ठरवणे प्रत्येक व्यक्तीच्या स्वतंत्र विवेकबुद्धीवर अवलंबून आहे. आम्ही या बाबतीत ढवळाढवळ करू इच्छित नाही किंवा आम्ही कुणाला अडवतही नाही..."

मिरवणुकीचा बेत घाईघाईने रद्द करण्यात आला...

बराकींमध्ये आणि शहरातील कामगार वस्त्यांमध्ये बोल्शेविक प्रचार करीत होते, "सर्व सत्ता सोविएतांच्या हाती!" तर काळ्या शक्तींचे हस्तक लोकांना उठावाचे आवाहन करीत होते व यहुद्यांची, दुकानदारांची, समाजवादी पुढाऱ्यांची कत्तल करायला उद्युक्त करीत होते...

एका बाजूला राजनिष्ठ वृत्तपत्रे हिंसक दडपशाहीला उत्तेजन देत होती – दुसऱ्या बाजूला लेनिन यांचा आवाज गर्जत होता, "उठाव करा! .. आम्ही आता क्षणभरही थांबू शकत नाही!"

भांडवलदारी वृत्तपत्रेही अस्वस्थ झाली होती.[2] 'बिर्जेवीये वेदोमोस्ती' (एक्स्चेंज गॅझेट) म्हणत होते की, "समाजाच्या अत्यंत मूलभूत तत्त्वांवर – वैयक्तिक सुरक्षितता आणि खाजगी मालकीच्या मान्यतेवर" बोल्शेविक प्रचाराने हल्ला चढविला आहे.

पण "नेमस्त" समाजवादी नियतकालिके सर्वांत विरोधी होती.[3] "बोल्शेविक हे क्रांतीचे सर्वांत धोकेबाज शत्रू आहेत," असे 'देलो नरोदा'ने म्हटले होते. मेन्शेविक 'देन' म्हणत होते: "सरकारने आपले रक्षण केले पाहिजे आणि त्याबरोबर आमचेही." प्लेखानोव यांच्या 'येदिन्स्त्वो' (एकता)[4] वृत्तपत्राने, पेत्रोग्रादच्या कामगारांना शस्त्रसज्ज केले जात होते या वस्तुस्थितीकडे सरकारचे लक्ष वेधले होते आणि बोल्शेविकांविरुद्ध कडक उपाय योजण्याची मागणी केली होती.

प्रतिदिनी सरकार अधिकाधिक हतबल होत चालले होते. नगरपालिकेचा कारभारसुद्धा कोलमडून पडला होता. अत्यंत धाडसी दरोड्यांच्या आणि खुनांच्या बातम्यांनी सकाळच्या वृत्तपत्रांचे रकानेच्या रकाने भरले जात होते आणि गुन्हेगार बिनधास्त मोकाट वावरत होते...

पण दुसरीकडे सशस्त्र कामगार रात्रीच्या वेळी रस्त्यांवर गस्त घालीत होते, चोरांशी झटापटी करीत होते आणि जेथे सापडतील तेथील शस्त्रे ताब्यात घेत होते.

एक नोव्हेंबर रोजी, पेत्रोग्रादचे लष्करी सेनानी कर्नल पाल्कोवनिकोव यांनी एक घोषणा प्रसृत केली:

“देश सध्या अत्यत कठीण परिस्थितीमधून जात असतानाही, सशस्त्र मिरवणुका काढण्याची आणि कत्तली करण्याची बेजबाबदार आवाहने पेत्रोग्रादच्या परिसरात केली जात आहेत व दर दिवसागणिक चोऱ्यांचे आणि अव्यवस्थेचे प्रमाण वाढत आहे.

या परिस्थितीमुळे नागरिकांचे जीवन विस्कळीत बनले आहे आणि सरकारच्या व नगरपालिकेच्या संस्थांच्या पद्धतशीर कार्यात व्यत्यय येत आहे.

देशाबाबतच्या माझ्या जबाबदारीची आणि कर्तव्याची पूर्ण जाणीव ठेवून मी आज्ञा करतो की:

१. प्रत्येक लष्करी तुकडीने खास सूचनांनुसार आणि आपल्या शिबंदीच्या परिसरात, सरकारी व सार्वजनिक संस्थांचे रक्षण करण्यासाठी नगरपालिकेला, कमिस्सारांना आणि मिलिशिआला सर्वतोपरी साहाय्य करावे.

२. विभागीय प्रमुख अधिकारी आणि नगर मिलिशिआचे प्रतिनिधी यांच्या सहकार्याने गस्तीचा बंदोबस्त करावा व गुन्हेगार आणि सेनेतून पळून गेलेले सैनिक यांना पकडण्याबाबत उपाययोजना कराव्यात.

३. बराकींमध्ये प्रवेश करून सैनिकांना सशस्त्र मिरवणुकांची आणि कत्तलींची चिथावणी देणाऱ्या सर्व लोकांना अटक करून त्यांची रवानगी नगराच्या दुसऱ्या सेनानींच्या मुख्य ठाण्याकडे करावी.

४. कोणत्याही सशस्त्र मिरवणुकीला किंवा बंडाळीला प्रारंभीच उपलब्ध सैन्याच्या साह्याने चिरडून टाकावे.

५. घरांच्या बेकायदेशीर झडत्या घेण्याला आणि बेकायदेशीर अटकांना प्रतिबंध करण्यात कमिस्सारांना मदत करावी.

६. आपल्या अख्त्यारामधील विभागात घडणाऱ्या सर्व घटनांची पेत्रोग्राद लष्करी विभागाच्या अधिकाऱ्यांना ताबडतोब वर्दी द्यावी.

सेनानींवर सोपवलेल्या जबाबदाऱ्या पार पाडल्या जाव्यात यासाठी सर्व सेना समित्यांनी आणि संघटनांनी सेनानींना पूर्णतया मदत करावी असे मी आवाहन करतो.”

प्रजासत्ताकाच्या मंडळात केरेन्स्की यांनी जाहीर केले की, बोल्शेविकांच्या तयारीची सरकारला पूर्ण जाणीव आहे आणि कोणत्याही प्रसंगाला[5] तोंड द्यायला सरकारजवळ पुरेसे बळ आहे. सारख्याच प्रकारचे घातपाती

कार्य करीत असल्याचा त्यांनी 'नोवाया रूस' आणि 'राबोची पूत' अशा दोघांवरही आरोप केला. ते पुढे म्हणाले, "पण वृत्तपत्रांना संपूर्णतया स्वातंत्र्य असल्याने छापील असत्यांशी मुकाबला करणे सरकारला शक्य नाही..."* त्यांनी असे जाहीर केले की, बोल्शेविझम व राजेशाही — एकाच प्रकारच्या प्रचाराचे हे दोन पैलू आहेत आणि प्रतिक्रांती हेच त्यांचे उद्दिष्ट आहे. काळ्या शक्तींनाही मनापासून असेच व्हायला हवे आहे. ते पुढे म्हणाले :

"माझा सर्वनाश तर अटळ आहे, पण माझ्यावर काय आपत्ती कोसळतात हे महत्त्वाचे नाही. माझ्यात असे बोलण्याचे धारिष्टच आहे की, शहरात जे काही गूढ वातावरण निर्माण झाले आहे त्याला बोल्शेविकांच्या प्रक्षुब्ध कारवाया कारणीभूत आहेत!"

२ नोव्हेंबरला सोविएतांच्या काँग्रेससाठी फक्त पंधरा प्रतिनिधींचे आगमन झाले. दुसऱ्या दिवशी शंभर आले आणि त्याच्या दुसऱ्या सकाळी आलेल्या पावणेदोनशेपैकी एकशे तीन बोल्शेविक होते... कोरमसाठी चारशे प्रतिनिधींची गरज होती आणि काँग्रेस सुरू व्हायला अवघा तीन दिवसांचा अवधी होता...

मी स्मोल्नीमध्ये बराच वेळ घालवला. आता तेथे प्रवेश मिळविणे सोपे राहिले नव्हते. बाहेर दारांवर दुहेरी पहारा बसवला होता आणि पुढील दारातून आत आल्यावर प्रवेशासाठी लोकांची लांबच लांब रांग उभी होती. एका वेळी चारच लोकांना आत सोडत होते आणि त्यांच्या ओळखपत्रांची कसून तपासणी होत होती व त्यांच्या कामाबद्दल अनेक प्रश्न विचारले जात होते. पास दिले जात होते आणि ही पास-पद्धती दर काही तासांनी बदलली जात होती; कारण हेरांचा सुळसुळाट माजला होता...

एके दिवशी मी बाहेरच्या प्रवेशद्वाराशी आलो तेव्हा ट्रॉट्स्की आणि त्यांची पत्नी माझ्या पुढेच असल्याचे मी पाहिले. त्यांना एका सैनिकाने अडवले. ट्रॉट्स्कींनी आपले खिसे चाचपले, पण त्यांना पास सापडेना.

"काही हरकत नाही," अखेरीस ते म्हणाले. "तू मला ओळखतोस. माझं नांव ट्रॉट्स्की."

---

*हे विधान काही सरळपणाचे नव्हते. हंगामी सरकारने यापूर्वीच जुलैमध्ये बोल्शेविक वृत्तपत्रांवर बंदी आणली होती आणि पुन्हा तसेच करण्याचा त्याचा विचार चालला होता.

"तुमच्याजवळ पास नाही," तो सैनिक ठाम आवाजात उत्तरला. "तुम्ही आत जाऊ शकत नाही. कुणाच्याही नांवाशी मला काही एक कर्तव्य नाही."

"पण मी पेत्रोग्राद सोविएतचा अध्यक्ष आहे."

"छान," तो सैनिक उत्तरला, "जर तुम्ही एवढे मोठे गृहस्थ आहात तर तुमच्याजवळ निदान कागदाचं एक बारीक चिटोरं तरी असलं पाहिजे."

ट्रॉट्स्कींनी कमालीचा संयम राखला. "तुझ्या मुख्य अधिकाऱ्याशी माझी गाठ घालून दे," ते म्हणाले. सैनिकाने टाळाटाळ केली. अशा प्रत्येकासाठी आपल्या मुख्य अधिकाऱ्याला त्रास देण्याची आपली इच्छा नाही अशी त्याने कुरबुर केली. अखेरीस त्याने पहाऱ्यावरच्या प्रमुख सैनिकाला पाचारण केले. ट्रॉट्स्कींनी त्याला सारा प्रकार समजावून सांगितला. "माझं नांव ट्रॉट्स्की," त्यांनी पुन्हा एकवार सांगितले.

"ट्रॉट्स्की?" त्या दुसऱ्या सैनिकाने डोके खाजवीत म्हटले. अखेरीस बराच वेळ विचार केल्यावर तो म्हणाला, "कुठंतरी हे नांव ऐकल्यासारखं वाटतं. ठीक आहे कॉम्रेड, आपण आत जाऊ शकता..."

व्हरांड्यात माझी काराखान यांच्याशी गाठ पडली. नवे सरकार कसे असेल याची रूपरेषा त्यांनी मला सांगितली.

"सोविएतांच्या मार्फत लोकांच्या भावना व्यक्त करणारी, स्थानिक शक्तींना पूर्ण वाव देणारी एक लवचिक संघटना. सध्याचे हंगामी सरकार झारच्या सरकारप्रमाणेच स्थानिक जनतेच्या इच्छा-आकांक्षांना मूर्त रूप देण्यात अडथळा आणीत आहे... नव्या समाजाचा पुढाकार खालून येईल. रशियन सामाजिक लोकशाही कामगार पक्षाच्या घटनेबरहुकूम सरकारची घडण केली जाईल. सोविएतांच्या अखिल रशियन काँग्रेसच्या वारंवार होणाऱ्या बैठकांना जबाबदार असलेली नवी केंद्रीय कार्यकारी समिती संसद बनेल; मंत्र्यांऐवजी वेगवेगळ्या खात्यांचे नेतृत्व कॉलेगियाकडे—समित्यांकडे—राहील व त्या सोविएतांना थेट जबाबदार राहतील..."

३० ऑक्टोबरला, आधीच ठरवून घेतलेल्या वेळेनुसार, स्मोल्नीच्या अगदी वरच्या मजल्यावरील एका छोटया, अत्यंत साध्या खोलीत मी ट्रॉट्स्कींची भेट घेतली. खोलीच्या मध्यभागी एका रिकाम्या मेजाशी एका ओबडधोबड खुर्चीवर ट्रॉट्स्की बसले होते. मला त्यांना फारसे प्रश्न विचारावे लागले नाही; एका तासाहून अधिक वेळ ते अत्यंत जलद आणि

Военно-Революціон.
Комитетъ
при
ПЕТР. С. Р. и С. Д:

Комендантскій отдѣлъ.

16 ноября 1917 г.

№ 955

Смольный Институтъ.



Пропускъ.

Дано сіе Джону Риду
Корресп. амер. соц. прессы

срокомъ по 1 декабря

на право свободнаго входа въ Смольный Институтъ.

Комендантъ Ф. Дзержинский

Дѣлопроизводитель

जॉन रीड यांना स्मोल्नीमध्ये जाण्यासाठी दिलेली प्रवेशपत्रिका

सातत्याने बोलत होते. त्यांच्या बोलण्याचा सारांश त्यांच्याच शब्दात मी पुढे देत आहे:

"हंगामी सरकारच्या हातात अजिबात सत्ता नाही. खरे नियंत्रण भांडवलदारवर्गाच्या हाती आहे, पण अबारोन्त्सी पक्षांबरोबर लटका सहयोग करून त्याचे पांघरूण त्या नियंत्रणावर घालण्यात आले आहे. कबूल केलेल्या जमिनींची वाट पाहून दमलेले किसान या क्रांतीच्या दरम्यान बंडाळया करीत असलेले आपण पाहताच आहात; आणि सबंध देशभर कष्टकरी जनतेमध्ये हीच चीड स्पष्टपणे दृग्गोचर होत आहे. केवळ यादवी युद्धाच्या साहाय्यानेच भांडवलदारवर्गाला आपले वर्चस्व कायम राखणे शक्य आहे. फक्त कोर्निलोव पद्धतीनेच भांडवलदारवर्ग आपले नियंत्रण राखू शकेल. पण भांडवलदारवर्गाजवळ ताकद नाही... सैन्य आमच्या बाजूने आहे. समन्वयवादी आणि शांततावादी, समाजवादी-क्रांतिकारक आणि मेन्शेविक आपले सर्व अधिकार गमावून बसले आहेत — कारण किसान आणि जमीनदार, सैनिक आणि सेनाधिकारी, कामगार आणि मालक

यांच्यामधील संघर्षाने कधी नव्हते एवढे तीव्र, अमिट स्वरूप घेतले आहे. केवळ जनसमूहांच्या एकजुटीनेच, केवळ कामगारवर्गीय अधिसत्तेच्या विजयानेच क्रांती साध्य करता येईल व लोक बचावतील...

"सोविएते ही जनतेची सर्वांत परिपूर्ण प्रतिनिधी आहेत – क्रांतिकारक अनुभव, विचार आणि उद्दिष्टे या दृष्टीने परिपूर्ण आहेत. खंदकात लढणाऱ्या सैनिकांच्या, कारखान्यात काम करणाऱ्या कामगारांच्या आणि शेतात राबणाऱ्या किसानांच्या पाठबळावर उभारलेली ही सोविएते म्हणजे क्रांतीचा मुख्य आधार आहेत.

"सोविएतांविना सत्ता निर्माण करण्याचा एक प्रयत्न करण्यात आला आहे – आणि त्यातून फक्त सत्ताविहीनता निर्माण झाली आहे. रशियन प्रजासत्ताकाच्या मंडळाच्या आवारात सर्व प्रकारच्या प्रतिक्रांतिकारक कारवाया सध्या शिजत आहेत. कॅडेट पक्ष हा प्रतिक्रांतीच्या लढाऊपणाचे प्रतिनिधित्व करतो. त्याउलट सोविएते जनतेच्या उद्दिष्टाचे प्रतिनिधित्व करतात. या दोन छावण्यांच्या दरम्यान इतर विशेष महत्त्वाचे गट नाहीत... ही **अंतिम लढत** आहे. आपल्या सर्व शक्ती गोळा करून भांडवलदारी प्रतिक्रांती आमच्यावर हल्ला करण्याच्या क्षणाची वाट पाहते आहे. आमचे उत्तर निर्णायक असेल. नुकते मार्चमध्ये सुरू झालेले आणि कोर्निलोव प्रकरणात पुढे सरकलेले कार्य आम्ही पुरे करू..."

नव्या सरकारच्या परराष्ट्र धोरणाबद्दल ते म्हणाले:

"आमचे पहिले काम असेल सर्व युद्ध आघाड्यांवर ताबडतोबीच्या युद्ध-विरामाचे आणि लोकशाहीवादी शांतता तहाच्या अटींची चर्चा करण्यासाठी लोकांची परिषद बोलावण्याचे. युरोपातून मिळणाऱ्या क्रांतिकारक प्रतिसादाच्या प्रमाणावर शांतता तहामधून आम्हाला मिळणाऱ्या लोकशाहीचे प्रमाण अवलंबून राहील. आम्ही जर येथे सोविएतांचे सरकार निर्माण केले तर युरोपात ताबडतोब शांतता प्रस्थापित करण्यात तो एक प्रभावी घटक ठरेल; कारण मग हे सरकार सर्व देशांमधील जनतांना, त्यांच्या सरकारांना डावलून, थेटपणे तात्काळ युद्ध-विरामाचे आवाहन करील. शांतता तह करण्याच्या वेळी रशियन क्रांतीचा पुढील दिशेने जोर राहील: 'खालसाकरण होऊ नये, नुकसानभरपाई मागण्यात येऊ नये, जनतेच्या स्वयंनिर्णयाच्या हक्काला मान्यता द्यावी' व **युरोपचे संघात्मक प्रजासत्ताक** स्थापन करावे...

"या युद्धाच्या अखेरीस, मुत्सद्द्यांनी नव्हे तर कामगारवर्गाने नव्याने

निर्माण केलेला युरोप मला दिसतो आहे. युरोपचे संघात्मक प्रजासत्ताक– युरोपची संयुक्त राज्ये–स्थापन झाली पाहिजेत. राष्ट्रीय स्वायत्तता इतःपर पुरी पडत नाही. आर्थिक उत्क्रांतीमुळे राष्ट्रांच्या सीमा नष्ट करणे आवश्यक ठरले आहे. जर युरोप असाच राष्ट्रीय गटांमध्ये विभाजित राहिला, तर साम्राज्यवाद पुन्हा आपल्या कारवायांना आरंभ करील. युरोपचे संघात्मक प्रजासत्ताकच केवळ जगाला शांतता देऊ शकेल." त्यांनी स्मित केले–त्यांचे खासे सुंदर, किंचित उपहासात्मक स्मित. "पण जोपर्यंत युरोपीय जनता कृती करणार नाही तोपर्यंत हे साध्य होणार नाही–आता..."

आता प्रत्येकजण अशी अपेक्षा करीत होता की, एका भल्या सकाळी बोल्शेविक अचानक रस्त्यांवर येतील आणि सफेद कॉलरवाल्या लोकांना थाडथाड गोळ्या घालून ठार मारून टाकतील. पण खरा उठाव मात्र अगदी स्वाभाविकरीत्या व उघडपणे झाला.

हंगामी सरकारने पेत्रोग्रादच्या शिबंदीला आघाडीवर पाठवण्याचा बेत केला होता.

पेत्रोग्राद शिबंदीमध्ये सुमारे साठ हजार लोक होते आणि क्रांतीमध्ये त्यांनी महत्त्वाची कामगिरी बजावली होती. मार्चमधील घडामोडींचा रोख याच लोकांनी बदलून टाकला होता, सैनिक प्रतिनिधींची सोविएते यांनीच निर्माण केली होती आणि पेत्रोग्रादच्या वेशींबाहेर कोर्निलोवला यांनीच पळवून लावले होते.

आता त्यांच्यापैकी बहुसंख्य बोल्शेविक बनले होते. शहर खाली करण्याबाबत हंगामी सरकारने बोलणे लावले तेव्हा याच पेत्रोग्राद शिबंदीने ठणकावून सांगितले होते, "जर राजधानीचं रक्षण करण्याची तुमची ताकद नसेल तर शांतता तह करा; जर तुम्हाला तह करायला जमत नसेल तर चालते व्हा आणि खऱ्याखुऱ्या जनतेच्या सरकारला जागा मोकळी करून द्या..."

पेत्रोग्रादच्या शिबंदीच्या भूमिकेवर उठावाच्या कोणत्याही प्रयत्नाचे यशापयश अवलंबून होते हे स्पष्ट होते. शिबंदीमधील तुकड्यांच्या जागी "खात्रीलायक" फौजांना–कझाकांच्या आणि "आहुती पलटणींना"–आणून ठेवण्याची सरकारची योजना होती. सेना समित्यांनी, "नेमस्त" समाजवाद्यांनी आणि केंद्रीय कार्यकारी समितीने सरकारला पाठिंबा दिला. तब्बल आठ महिने पेत्रोग्रादची शिबंदी राजधानीतल्या बराकींमध्ये आरामात चैन करीत आहे आणि तिकडे त्यांचे भाईबंद मात्र खंदकांमध्ये उपासमार

सोसत आहेत, मृत्युमुखी पडत आहेत, असा जोरदार प्रचार करणारी विस्तृत मोहीम आघाडीवर आणि पेत्रोग्रादमध्ये सुरू करण्यात आली.

अर्थात या आरोपात थोडेफार तथ्य होते की, तुलनात्मकरीत्या आराम-शीर आयुष्याऐवजी हिवाळी मोहीमेतील कष्टांना कवटाळायला शिबंदीतील तुकड्या अनुत्सुक होत्या पण आघाडीवर जाण्यास त्यांनी का नकार दिला त्याला इतरही काही कारणे होती. सरकारच्या हेतूंबद्दल पेत्रोग्राद सोविएतला धास्ती वाटत होती आणि आघाडीवरून सामान्य सैनिकांनी निवडलेले शेकडो प्रतिनिधी येऊन म्हणत होते, "आम्हाला कुमकेची जरूरी आहे हे खरं, पण त्याहूनही अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे पेत्रोग्राद आणि क्रांती सुरक्षित असली पाहिजेत... कॉम्रेडहो, तुम्ही पिछाडी सांभाळा आणि आम्ही आघाडी सांभाळून धरतो!"

२५ ऑक्टोबरला पेत्रोग्राद सोविएतच्या कार्यकारी समितीची गुप्त बैठक भरली. खास लष्करी समिती स्थापन करण्याबाबत त्या बैठकीत विचारविनिमय करण्यात आला. त्याच्या दुसऱ्याच दिवशी पेत्रोग्राद सोवि-एतच्या एका सैनिक विभागाने एका सभेत आपली समिती निवडली. तिने ताबडतोब भांडवलदारी वृत्तपत्रांवर बहिष्कार जाहीर केला आणि सोविएतां-च्या काँग्रेसला विरोध केल्याबद्दल केंद्रीय कार्यकारी समितीचा निषेध केला. २९ तारखेला, पेत्रोग्राद सोविएतच्या खुल्या अधिवेशनात, ट्रॉट्स्कींनी ठराव मांडला की, लष्करी क्रांतिकारक समितीला सोविएतने औपचारीक मान्यता द्यावी. ते म्हणाले, "लढाईवर जाण्यासाठी आणि जरूर पडल्यास मरण्यासाठी, आपण आपली खास संघटना निर्माण केली पाहिजे..." सैनिक समित्यांशी आणि सेनानींबरोबर सल्लामसलत करण्यासाठी सोविएततर्फे एक आणि शिबंदीतर्फे एक, अशी दोन प्रतिनिधीमंडळे आघाडीवर पाठव-ण्याचा निर्णय घेण्यात आला.

प्स्कोव येथे सोविएतच्या प्रतिनिधींची उत्तर आघाडीचे सेनापती जनरल चेरेमिसोव यांच्याशी भेट झाली. पेत्रोग्रादच्या शिबंदीला तात्काळ खंदकां-मध्ये येण्याचा आदेश दिला आहे आणि हाच आपला अखेरचा शब्द, असे जनरलनी रोखठोक सांगितले. शिबंदीच्या प्रतिनिधीमंडळाला पेत्रोग्राद सोड-ण्याची परवानगी नाकारण्यात आली...

पेत्रोग्राद सोविएतमधील सैनिकी विभागाच्या प्रतिनिधीमंडळाने मागणी केली की, पेत्रोग्राद विभागाच्या वरिष्ठ सेनाधिकाऱ्यांमध्ये त्यांच्या प्रतिनि-धीला प्रवेश देण्यात यावा. नकार देण्यात आला. पेत्रोग्राद सोविएतने मागणी

केली की, सैनिक विभागाच्या मान्यतेशिवाय कोणतेही हुकूम प्रसृत करण्यात येऊ नयेत. मागणी फेटाळून लावण्यात आली. प्रतिनिधींना उर्मटपणे सांगण्यात आले, "आम्ही फक्त केंद्रीय कार्यकारी समिती ओळखतो. तुम्हाला आम्ही ओळखत नाही; तुम्ही जर एखादा कायदा मोडलात, तर आम्ही तुम्हाला अटक करू."

३० तारखेला*, पेत्रोग्रादमधील सर्व तुकड्यांच्या प्रतिनिधींच्या सभेत एक ठराव संमत करण्यात आला: "पेत्रोग्रादची शिबंदी इतःपर हंगामी सरकारला मानीत नाही. पेत्रोग्राद सोविएत हे आमचे सरकार आहे. लष्करी क्रांतिकारक समितीमार्फत आम्ही फक्त पेत्रोग्राद सोविएतच्या हुकुमांचे पालन करू." पेत्रोग्राद सोविएतच्या सैनिक विभागाकडून सूचनांची वाट पहा, असा स्थानिक लष्करी तुकड्यांना हुकूम देण्यात आला.

दुसऱ्याच दिवशी केंद्रीय कार्यकारी समितीने आपली सभा बोलावली. तिच्यात प्रामुख्याने अधिकारी मंडळींचा भरणा होता. सेनानींशी सहकार्य करण्यासाठी त्यांनी एक समिती स्थापन केली आणि शहराच्या भागांमध्ये कमिस्सारांची नेमणूक केली.

३ तारखेला स्मोल्नी येथे सैनिकांच्या एका जंगी सभेत ठरविण्यात आले:

> "लष्करी क्रांतिकारक समितीच्या स्थापनेला मानवंदना देऊन पेत्रोग्राद शिबंदी अभिवचन देत आहे की, समितीच्या सर्व कृतींमध्ये ती आपला पूर्ण पाठिंबा देईल, क्रांतीच्या हितासाठी आघाडी आणि पिछाडी यांच्यामध्ये निकटतर ऐक्य प्रस्थापित करण्यासाठी पूर्ण पाठिंबा देईल.
>
> "शिबंदी याव्यतिरिक्त जाहीर करीत आहे की, क्रांतिकारक कामगारवर्गाच्या साह्याने, पेत्रोग्रादमधील क्रांतिकारक सुव्यवस्था कायम राखण्याचे ती आश्वासन देत आहे. कोर्निलोववाद्यांनी किंवा भांडवलवाद्यांनी कोणत्याही प्रकारचे प्रक्षोभक कृत्य करण्याचा प्रयत्न केल्यास त्यांचा **अत्यंत निष्ठुरपणे समाचार** घेण्यात येईल".

लष्करी क्रांतिकारक समितीला आता आपल्या सामर्थ्याची जाणीव झाल्यानंतर तिने पेत्रोग्रादच्या वरिष्ठ सेनाधिकाऱ्यांना खडसावून सांगितले की, बऱ्या बोलाने त्यांनी समितीचे वर्चस्व मान्य करावे. सर्व छापखान्यांना

---

*ही सभा ३१ ऑक्टोबरला झाली.—सं.

तिने हुकूम सोडले की, समितीच्या संमतीशिवाय त्यांनी कोणतीही आवाहने किंवा जाहीर घोषणा छापू नयेत. सशस्त्र कमिस्सारांनी क्रोनवेर्स्क शस्त्रागारावर छापा घालून शस्त्रांचा आणि दारूगोळ्याचा प्रचंड साठा आपल्या ताब्यात घेतला व कालेदिनचे मुख्य ठाणे नवोचेर्कास्क येथे दहा हजार बागनेटाची पाठवणूक थोपवली...

सरकारला धोक्याची एकाएकी जाणीव झाली आणि समिती विसर्जित केली तर तिच्या सदस्यांना अभय देण्यात येईल असे जाहीर करण्यात आले. पण एव्हाना खूप उशीर झाला होता. वरिष्ठ सेनाधिकारी मंडळात पेत्रोग्राद सोविएतला प्रतिनिधित्व देण्यास तयारी आहे, असा निरोप ५ नोव्हेंबरच्या मध्यरात्री खुद्द केरेन्स्कींनी मालेव्स्की यांच्यामार्फत पाठवला. लष्करी क्रांतिकारक समितीने हे मान्य केले. एक तासानंतर, हंगामी युद्धमंत्री जनरल मानिकोव्स्की यांनी केरेन्स्कींचा प्रस्ताव रद्दबातल ठरवला...

मंगळवारी सकाळी, ६ नोव्हेंबरला, एका पोस्टरने सबंध शहरात एकच खळबळ माजवली. त्या पोस्टरवर मजकूर होता: "कामगार आणि सैनिक प्रतिनिधींच्या पेत्रोग्राद सोविएतशी संलग्न लष्करी क्रांतिकारक समितीतर्फे":

**पेत्रोग्रादच्या जनतेला उद्देशून.**

नागरिकहो! प्रतिक्रांतीने आपला विषारी फणा वर उचलला आहे. सोविएतांची अखिल रशियन काँग्रेस चिरडून टाकण्यासाठी आणि घटनात्मक विधानसभा मोडून टाकण्यासाठी कोर्निलोववादी आपल्या शक्ती एकवटत आहेत. याच वेळेला गुंडांकडून पेत्रोग्रादच्या जनतेला प्रक्षुब्ध करण्याचे व रक्तपाताला उद्युक्त करण्याचे प्रयत्न होण्याची शक्यता आहे.

अशा वेळी प्रतिक्रांतिकारकांपासून आणि गुंडांपासून शहराचे संरक्षण करण्याची व क्रांतिकारक सुव्यवस्था राखण्याची जबाबदारी कामगार आणि सैनिक प्रतिनिधींचे पेत्रोग्राद सोविएत आपल्या अंगावर घेत आहे.

पेत्रोग्रादची शिबंदी कोणतीही हिंसा अगर कोणताही गोंधळ होऊ देणार नाही. दंगलखोरांना आणि ब्लॅक हंड्रेडपंथी चळवळ्यांना लोकांनी पकडावे व तात्काळ नजीकच्या बराकींमध्ये सोविएत कमिस्सारांच्या हवाली करावे. पेत्रोग्रादच्या रस्त्यांवर चोऱ्या किंवा मारामाऱ्या करून

उपद्रव देण्याचा काळ्या शक्तींनी किंचित जरी प्रयत्न केला तरी त्या गुन्हेगारांचा ताबडतोब पुरा निःपात करण्यात येईल!

नागरिकहो! आपण आत्मसंयमन करावे आणि पूर्ण शांतता राखावी असे आम्ही आवाहन करतो. सुव्यवस्था आणि क्रांतीचे उद्दिष्ट खंबीर हातांमध्ये आहे..."

३ तारखेला बोल्शेविकांच्या पुढाऱ्यांची एक ऐतिहासिक बैठक गुप्तपणे झाली. झालकिंद* यांच्या निरोपानुसार मी दाराबाहेर व्हरांड्यात उभा होतो; आणि वोलोदार्स्की जेव्हा बाहेर आले तेव्हा आत काय चालले आहे त्याची त्यांनी मला खबर दिली.

लेनिन म्हणाले: "६ नोव्हेंबर म्हणजे फार लौकर होईल. उठावासाठी आपला अखिल रशियन पाया पाहिजे; आणि ६ तारखेपर्यंत काँग्रेसचे सर्व प्रतिनिधी आलेले नसतील... याउलट ८ नोव्हेंबर म्हणजे फार उशीर होईल. त्या वेळेपर्यंत काँग्रेस संघटित झाली असेल आणि लोकांच्या एवढ्या मोठ्या संघटित संस्थेला चटकन, निर्णायक कृती करणे अवघड असते. आपण ७ तारखेला कृती केली पाहिजे, ज्या दिवशी काँग्रेसची बैठक सुरू होत आहे, म्हणजे आपण तिला सांगू शकू, 'ही पहा सत्ता! तिचं तुम्ही काय करणार आहात?'"

वरच्या मजल्यावरच्या एका खोलीत एक रोड चेहऱ्याचा, लांब केस वाढवलेला इसम बसला होता. एके काळी तो झारच्या सैन्यात अधिकारी होता, नंतर क्रांतिकारक बनला, त्यानंतर त्याला हद्दपार करण्यात आले होते. या इसमाचे नांव अव्सेयेन्को होते, पण त्यांना अंतोनोव नांवाने लोक हाक मारीत. ते चांगले गणितज्ज्ञ आणि बुद्धिबळपटु होते; राजधानी काबीज कशी करायची त्याच्या काळजीपूर्वक योजना ते आखत होते.

सरकारही आपल्या बाजूने तयारी करीत होते. सबंध आघाडीवर पसरलेल्या सेना विभागांमधून अत्यंत निवडक अशा निष्ठावंत तुकड्यांना गुपचुप पेत्रोग्रादला येण्याचे हुकूम देण्यात आले. युंकर तोफखान्याचे हेमंत प्रासादामध्ये मोर्चे उभारण्यात आले. जुलैमधील घटनांनंतर कझाकांची गस्त प्रथमच पुन्हा रस्त्यांवर चालू झाली. सर्व प्रकारच्या आज्ञाभंगांचा "पूर्ण ताकदीने" समाचार घेतला जाईल अशा धमकावणीवजा हुकुमांची

---

*झालकिंद – नोव्हेंबर उठावातील एक क्रियाशील सहभागी; पेत्रोग्राद बोल्शेविक संघटनेचे सदस्य. – सं.

पल्कोवनिकोवनी फेर सुरू केली. सार्वजनिक शिक्षण मंत्री किश्किन, ज्यांचा मंत्रिमंडळात सर्वांत अधिक तिरस्कार केला जात असे, यांची पेत्रोग्रादची सुव्यवस्था राखण्यासाठी खास कमिस्सार म्हणून नेमणूक करण्यात आली. त्यांनी आपल्यासारखीच अत्यंत अप्रिय अशी दोन नांवे – रूटेनबर्ग आणि पाल्चिन्स्की – आपले साहाय्यक म्हणून सुचवली. पेत्रोग्राद, क्रॉन्स्ताद्त आणि फिन्लंड येथे आणीबाणीची परिस्थिती जाहीर करण्यात आली. त्यावर भांडवलदारी 'नोवोये व्रेम्या'ने (नवयुग) उपरोधाने शेरा मारला होता:

> "आणीबाणीची परिस्थिती कशाला? सरकारच्या हातात आता सत्ता राहिलेली नाही. त्याच्याजवळ नैतिक अधिकार राहिलेला नाही आणि ताकद वापरायला आवश्यक असलेली यंत्रणा जवळ राहिलेली नाही... अत्यंत अनुकूल परिस्थितीत फार तर ते वाटाघाटी करू शकेल, अर्थात त्याच्याशी कुणी वाटाघाटीला तयार झाले तर. त्यापेक्षा त्याचा अधिकार अधिक नाही..."

रशियन प्रजासत्ताकाच्या मंडळात काय चालले आहे त्याचा मागोवा घेण्यासाठी सोमवारी सकाळी, ५ तारखेला, मी मरीईन्स्की प्रासादात चक्कर टाकली. तेरेश्चेन्को यांच्या परराष्ट्र धोरणावर तेथे खडाजंगी माजली होती. बूर्त्सेव – वेर्खोव्स्की प्रकरणाचे पडसादही उमटत होते. इटलीचे राजदूत सोडून इतर सर्व मुत्सद्दी हजर होते. कार्सोच्या दुर्घटनेनंतर ते कमालीचे निराश बनलेत असे जो तो म्हणत होता...

ज्यावेळी मी आत गेलो त्यावेळी डावे समाजवादी-क्रांतिकारक करेलीन लंडन 'टाईम्स'मधील अग्रलेख मोठ्याने वाचून दाखवत होते. त्यात म्हटले होते, "बोल्शेविकवादावर एकच उपाय आहे – गोळ्या!"

कॅडेठांकडे वळून ते ओरडले, "तुमचंही असंच मत आहे!"

उजवीकडून आवाज आले, "होय! होय!"

"होय, तुम्हाला असं वाटतं हे मला माहीत आहे," संतापून करेलीन म्हणाले. "पण तसं वागण्याची तुमच्यात हिंमत नाही!"

त्यानंतर, एखाद्या देखण्या नटाप्रमाणे दिसणारे, मऊ पिंगट दाढीचे आणि कुरळ्या सोनेरी केसांचे, स्कोबेलियेव उठून उभे राहिले आणि त्यांनी बिचकत बिचकत सोविएत नकाझचे समर्थन केले. त्यांच्या पाठोपाठ बोलायला उभ्या राहणाऱ्या तेरेश्चेन्को यांच्यावर आरंभीच डाव्या गटाच्या लोकांनी



यांचे वेषांतरातील छायाचित्र. इवानोव असे एका कामगाराचे
ओळखपत्र त्यांनी धारण केले होते

मधील जुलैनंतरच्या घडामोडीनंतर शेवटच्या भूमिगत काळात
लेनिन या नांवाने वावरत होते

1

Ц. К. признает, что как между-
народное положеніе русской рево-
люціи (возстаніе во флотѣ в Гер-
маніи, как крайнее проявленіе
нарастанія всемірной соціалисти-
ческой революціи, затѣм угроза
мира имперіалистов с цѣлью
удушенія революціи в Россіи),
— так и военное положеніе
(несомнѣнное рѣшеніе русской
буржуазіи и Керенскаго с К° сдать
Питер нѣмцам), — так и
пріобрѣтеніе большинства
пролетарской партіей в Сов-
ѣтах, — все это в связи с
крестьянским возстаніем
и с поворотом народнаго

v во всей Европѣ

सशस्त्र उठावाच्या ठरावाचे लेनिननी लिहिलेले पहिले पान

२३ ऑक्टोबर १९१७ ला केंद्रीय समितीने ऐतिहासिक सभेत तो ठराव मंजूर केला

"राजिनामा द्या! राजिनामा द्या!" असा एकच ओरडा केला. त्यांनी आग्रहाने प्रतिपादन केले की, पॅरिसला जाणाऱ्या सरकारी आणि केंद्रीय कार्यकारी समितीच्या प्रतिनिधींनी समान दृष्टिकोनाचा म्हणजे तेरेश्चेन्को यांचा स्वतःचा – पाठपुरावा करावा. त्यानंतर सैन्यात शिस्त पुन्हा प्रस्थापित करण्याबद्दल, विजयश्री मिळेपर्यंत लढाई चालू ठेवण्याबद्दल काही शब्द... एकच गोंधळ, दंगा आणि डाव्या गटाच्या कडव्या विरोधाची पर्वा न करता प्रजासत्ताकाचे मंडळ आपल्या दैनंदिन कामाला लागले.

सभागृहात एका बाजूला बोल्शेविकांच्या आसनांच्या रांगा होत्या – ज्या दिवशी बोल्शेविकांनी मंडळ सोडले त्याच दिवसापासून त्या रांगा मोकळ्या पडल्या होत्या. बोल्शेविकांबरोबरच सभागृहातले चैतन्य गेले होते. पायऱ्या उतरून खाली जात असताना मला असे जाणवले की, इथे या सभागृहात कितीही कडाक्याचे वादंग माजले तरी बाहेरच्या अशांत जगातले खरे आवाज या उंच छताच्या थंडगार सभागृहात कधीही ऐकू येणार नाहीत. ह्या हंगामी सरकारचे तारू फुटले आहे – मिल्युकोव मंत्रिमंडळाचे तारू ज्या युद्ध आणि शांततेच्या खडकावर फुटले त्याच खडकावर... माझ्या अंगावर कोट घालताना दरवान कुरबुरला, "गरीब बापड्या रशियाचं काय होणार काही समजत नाही... हे सगळे मेन्शेविक, बोल्शेविक आणि त्रुदोविक... हे युक्रेन आणि हे फिन्लंड, हे जर्मन साम्राज्यवादी आणि इंग्रज साम्राज्यवादी... मी पंचेचाळीस वर्षांचा आहे आणि या जागेत जेवढी बडबड ऐकली तेवढी बडबड मी सबंध आयुष्यात कधीही ऐकली नाही..."

व्हरांड्यात प्राध्यापक शात्स्की यांची गाठ पडली. उंदरासारख्या तोंडाची, उठावदार कोटातली ही व्यक्ती कॅडेट पक्षाच्या सभांमध्ये वजन ठेवून होती. बरीच चर्चा झालेल्या बोल्शेविकांच्या मोर्चाबद्दल त्यांचे काय मत आहे असे मी विचारले. त्यांनी खांदे उडवून तुसड्या आवाजात म्हटले:

"ती नुसती जनावरं आहेत जनावरं! त्यांची मोर्चा काढायची हिंमत होणार नाही आणि त्यांनी हिंमत केलीच तर चुटकीसरशी त्यांना उडवून लावण्यात येईल... आमच्या दृष्टीनं मोर्चा निघणं वाईट ठरणार नाही, कारण मग ते स्वतःहूनच सर्वनाशाला आमंत्रण करतील आणि घटनात्मक विधानसभेत त्यांची ताकदच उरणार नाही...

"पण महाशय, घटनात्मक विधानसभेसमोर कोणत्या प्रकारच्या सरकारची योजना मी मांडणार आहे तिची रूपरेषा तर ऐकून घ्या. आप-

7—2023

त्याला माहीतच आहे की, घटनात्मक प्रकल्पाची योजना तयार करण्यासाठी हंगामी सरकारबरोबर काम करणाऱ्या, प्रजासत्ताक मंडळाने स्थापलेल्या एका आयोगाच्या मी अध्यक्ष आहे... तुमच्या अमेरिकेत आहे त्याप्रमाणं आमच्या विधानसभेची दोन सभागृहं असतील. खालच्या गृहात प्रादेशिक प्रतिनिधी बसतील; वरच्या गृहात स्वतंत्र व्यवसायांमधले, झेम्स्त्वोंचे, सहकारी संस्थांचे, तसेच ट्रेड युनियनांचे प्रतिनिधी बसतील..."

बाहेर पश्चिमेकडचे चावरे, ओलसर वारे सुटले होते आणि पायाखालचा थंडगार चिखल बुटांच्या तळव्यांमध्ये मुरून आतपर्यंत घुसला होता. मोर्स्काया रस्त्यावरून युंकरांच्या दोन कंपन्या झोकात लेफ्ट-राईट करीत समोरून गेल्या. झारच्या काळी सैनिक गाणी म्हणत जात त्याप्रमाणे एक जुने समूहगीत गात ते जात होते... पहिल्याच चौकात मी पाहिले की, नगर-मिलिशिआ घोड्यांवर स्वार होऊन फिरत होते आणि त्यांच्या कमरांना चकचकीत चामडी पिशव्यांमध्ये पिस्तुले लटकली होती. लोकांचा एक छोटासा जमाव त्यांच्याकडे मुकाटपणे टक लावून पहात होता. नेव्स्की रस्त्याच्या कोपऱ्यावर, लेनिन यांनी लिहिलेली 'बोल्शेविक सत्ता राखू शकतील का?' या शीर्षकाची पुस्तिका मी विकत घेतली. ही खरेदी मी एक तिकीट देऊन केली. किरकोळ चिल्लरीऐवजी अशी तिकीटे देऊन वस्तू खरेदी करता येत. नेहमीच्या रहदारी करणाऱ्या ट्रामगाड्या नागमोडी सरपटत जात होत्या. त्यांच्या दारांबाहेर नागरिक आणि सैनिक कसेबसे दाटीवाटीने लोंबकळत जात होते. त्यांच्या कसरती पाहून थिओडोर शॉन्ट्स * यांनाही हेवा वाटला असता... कडेच्या पादचारी मार्गांवर, सैन्यातून पळून आलेले सैनिक, एका रांगेत गणवेषातच उभे राहून, सिगारेटी आणि सूर्यफुलाच्या बिया विकत होते...

नेव्स्की मार्गावर त्या ओलसर संध्याप्रकाशात लोकांचे जमाव ताज्या वर्तमानपत्रांसाठी झटापट करीत होते. प्रत्येक सपाट जागी चिकटवलेल्या पोस्टरांवरील अनेक आवाहने[6] आणि घोषणा वाचून त्यांचा अर्थ लावण्याचा प्रयत्न काही लोक करीत होते; केंद्रीय कार्यकारी समिती, किसान सोविएते, "**नेमस्त**" समाजवादी पक्ष, सेना समित्या अशा सर्वांकडून आवाहने करण्यात येत होती; त्यांमध्ये कामगारांना आणि सैनिकांना धमक्या होत्या,

---

* थिओडोर शॉन्ट्स – त्या काळचे एक प्रसिद्ध कसरतपटु. – सं.

शिव्यागाळी होती, घरी बसून रहा अशा काकुळतीने केलेल्या विनवण्या-सुद्धा होत्या, सरकारला पाठिंबा देण्याच्या विनंत्या होत्या...

एक चिलखती मोटार मंदगतीने रस्त्यावर ये-जा करीत होती. तिचा भोंगा कर्कश्यपणे वाजत होता. प्रत्येक कोपऱ्यावर, प्रत्येक चौकात, लोकांच्या झुंडी दाटीवाटीने उभ्या होत्या; सैनिक आणि विद्यार्थी एकमेकांशी वादविवाद घालीत होते. हळू हळू रात्रीचा अंधार पसरला, दूर दूर अंतरावरचे रस्त्यावरचे दिवे मिणमिणू लागले, लोकांच्या झुंडी अविरतपणे लोटत होत्या... कोणत्याही वादळाआधी पेत्रोग्रादमध्ये नेहमी असे घडते.

साऱ्या शहरात अशांततेचे वातावरण होते. प्रत्येक मोठ्या आवाजा-गणिक लोक दचकत होते. पण अजून बोल्शेविकांचा पत्ता नव्हता; सैनिक बराकीत थांबून होते, कामगार कारखान्यांमध्ये वाट पहात होते... कझान कॅथेड्रलजवळच्या एका सिनेमागृहात आम्ही सिनेमा पहायला गेलो होतो— वासना आणि कट-कारस्थानांनी खच्चून भरलेला तो एक सनसनाटी इटा-लियन चित्रपट होता. पुढे पिटामध्ये काही सैनिक आणि खलाशी बालस-दृश्य कुतूहलाने पडद्यावरची दृश्ये पहात होते; एवढा हिंसाचार आणि एवढ्या खुनाखुनी का चालल्या आहेत याचे जणू त्यांना आकलन होत नव्हते.

तेथून मी घाईघाईने स्मोल्नीकडे गेलो. सर्वांत वरच्या मजल्यावर खोली क्रमांक १० मध्ये लष्करी क्रांतिकारक समितीची अखंड बैठक चालू होती. लाझीमिर नांवाच्या, भूरकट केसांच्या एका अठरा वर्षांच्या मुलाकडे बैठकीचे अध्यक्षपद होते. जाता जाता त्याने मला पाहिले तेव्हा तो किंचित थबकला आणि थोडेसे लाजून त्याने हस्तांदोलन केले.

"पीटर-पॉल गढी नुकतीच आमच्या बाजूला येऊन मिळाली आहे," आनंदाने हसून तो म्हणाला. "एक मिनिटापूर्वीच एका तुकडीकडून आम्हाला संदेश मिळाला. तिने पेत्रोग्रादला यावे असा सरकारने हुकूम दिला होता. लोकांना संशय आला तेव्हा त्यांनी गात्चिना येथे आगगाडी थांबवली आणि आमच्याकडे प्रतिनिधीमंडळ पाठवले. त्यांनी विचारले, "काय घडलं काय? तुम्हाला काय म्हणायचंय? आम्ही आत्ताच ठराव पास केलाय, 'सर्व सत्ता सोविएतांच्या हाती'. लष्करी क्रांतिकारक समितीने उलटा निरोप धाडला, "भाईहो! क्रांतीच्या वतीने आम्ही तुमचे स्वागत करतो. पुढील सूचना मिळेपर्यंत आहात तिथेच थांबा!"

त्याने सांगितले की, सर्व टेलिफोन तोडलेले होते. पण कारखान्यां-

बरोबर आणि बराकींबरोबर लष्करी टेलिफोनोग्राफच्या यंत्रणेच्या साह्याने दळणवळण स्थापित करण्यात आले होते...

निरोप्यांची आणि कमिस्सारांची सतत वर्दळ चालू होती. दाराबाहेर डझनभर स्वयंसेवक उभे होते. निरोप मिळताच शहराच्या दुसऱ्या टोकापर्यंत खबर पोचवायला सज्ज होते. त्यांच्यापैकी एक जिप्सींच्या तोंडवळ्याचा होता आणि त्याच्या अंगावर लेफ्टनंटचा गणवेश होता. तो फ्रेंच भाषेत म्हणाला, "बटण दाबताच सर्व हालचाली तात्काळ घडतील..."

त्याच वेळी तेथून पद्‌वोईस्की गेले. या हडकुळ्या, दाढीवाल्या नागरिकाच्या मेंदूतून उठावाची व्यूहनीती निर्माण झाली होती; अंतोनोव यांची दाढी वाढली होती, सदरा मानेवर मळला होता, झोपेच्या अभावी ते तारवटलेले होते; बुटके, पसरट चेहऱ्याचे, सदा हसतमुख सैनिक क्रीलेन्को–त्यांना जोरजोराने हातवारे करत बोलायची सवय होती; आणि तगडे दाढीवाले शांत चेहऱ्याचे खलाशी दीबेन्को. सोविएतांच्या हाती सत्ता देण्यासाठी चाललेल्या या लढ्याचे आणि भविष्यकालीन लढ्याचे हे वीरपुरुष होते.

खालच्या मजल्यावर कारखाना समित्यांच्या कचेरीत बसून सेरातोव सरकारी शस्त्रागाराला आज्ञापत्रे पाठवीत होते–प्रत्येक कारखान्याला एकशे पन्नास रायफली... कारखान्यांचे चाळीस प्रतिनिधी रांगेत वाट पहात उभे होते.

हॉलमध्ये काही छोट्या बोल्शेविक पुढाऱ्यांशी माझ्या गाठभेटी झाल्या. एकाने मला रिवॉल्वर दाखवले. "खेळ सुरू झालाय," तो म्हणाला आणि त्याचा चेहरा फिकट पडला. "आम्ही हालचाल केली अगर न केली तरी दुसऱ्या बाजूला माहीत आहे की, तिनं आम्हाला नष्ट केलं पाहिजे नाही तर स्वतः नष्ट झालं पाहिजे."

पेत्रोग्राद सोविएतची रात्रंदिवस बैठक भरत होती. मी मोठ्या हॉलमध्ये प्रवेश केला. ट्रॉट्स्की आपले भाषण पुरे करीत होते.

ते म्हणाले, "आम्हाला विचारण्यात येत आहे की, मोर्चा काढायचा आमचा इरादा आहे अथवा नाही. या प्रश्नाला मी अगदी स्पष्ट उत्तर देऊ शकतो. पेत्रोग्राद सोविएतला वाटते की, सोविएतांच्या हाती सत्ता पडण्याचा क्षण अखेरीस आलेला आहे. ही सरकारची अदलाबदल अखिल रशियन काँग्रेसमार्फत घडेल. सशस्त्र अभिव्यक्तीची गरज आहे किंवा नाही ते अखिल रशियन काँग्रेसमध्ये ढवळाढवळ करू इच्छिणाऱ्यांच्यावर अवलंबून राहील.

"आम्हाला असे वाटते की, हंगामी मंत्रिमंडळाच्या हाती सोपवलेले आमचे सरकार हे अगदी बापुडवाणे आणि असहाय सरकार आहे आणि इतिहासाच्या एका सपकाऱ्यासरशी कचऱ्याप्रमाणे ते उडून जाताच नव्या खऱ्या लोकनियुक्त सरकारची स्थापना होईल. पण आम्ही संघर्ष टाळतो आहोत, आजही, अगदी आत्ता. आम्हाला अशी आशा आहे की, अखिल रशियन काँग्रेस लोकांचे सुसंघटित स्वातंत्र्य ज्यावर आधारलेले असते अशी सत्ता आणि अधिकार आपल्या हाती घेईल. मात्र अल्पायुष्य उरलेल्या सरकारला जर आपल्या हाती असलेल्या वेळेचा — चोवीस, अठ्ठेचाळीस किंवा बहात्तर तास — वापर करून आमच्यावर हल्ला चढवायचा असेल तर आम्ही प्रतिहल्ले चढवू, गुद्दयाला गुद्दयाने उत्तर देऊ, तलवारीला तोफेने उत्तर देऊ!"

लष्करी क्रांतिकारक समितीवर आपले प्रतिनिधी पाठविण्यास डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांनी मान्यता दिली असल्याचे त्यांनी टाळयांच्या गजरात जाहीर केले.

पहाटे तीन वाजता मी स्मोल्नीमधून बाहेर पडलो तेव्हा माझ्या ध्यानात आले की, दरवाजाच्या प्रत्येक बाजूला एक अशा दोन्ही बाजूला दोन जलदगती मारा करणाऱ्या तोफा चढवून ठेवण्यात आल्या होत्या. गेटांवर आणि नजीकच्या चौकांमध्ये सैनिकांची कडक गस्त चालली होती. बिल शातोव* जिन्यांवरून पळत पळत आले. "आमची चढाई सुरू झाली," ते ओरडले. "'सोल्दात' आणि 'रबोची पूत' ही आमची वर्तमानपत्रं बंद पाडायला केरेन्स्कीनं युंकरांना पाठवलं होतं. पण आमच्या फौजांनी तिथं जाऊन सरकारी सिलं तोडून फेकून दिली आणि आता भांडवलदारांच्या वर्तमानपत्रांच्या कचेऱ्यांचा ताबा घ्यायला आम्ही आमच्या तुकड्या पाठवीत आहोत!" अत्यानंदाच्या भरात त्यांनी माझ्या पाठीवर एक सणसणीत थाप मारली आणि ते आत पळाले...

---

*अमेरिकन कामगार चळवळीतील प्रसिद्ध व्यक्ती. (शातोव व्लादीमिर सेर्गेयेविच: 'जगातील औद्योगिक कामगारां'चे अमेरिकेतील एक संघटक. जून १९१७ मध्ये अमेरिकेहून मायदेशी परतले. १९१७ मध्ये पेत्रोग्रादच्या लष्करी क्रांतिकारक समितीचे सदस्य आणि कारखाना समित्यांच्या केंद्रीय मंडळाच्या अध्यक्षमंडळाचे सभासद. नंतर ते कम्युनिस्ट पक्षात दाखल झाले.) — सं.

६ तारखेला सकाळी माझे सेन्सॉरच्या कचेरीत काम होते. ही कचेरी परराष्ट्र खात्याच्या आवारात होती. लोकांनी "शांत" रहावे अशी सर्वत्र भिंतींवर वेडयासारखी भरमसाट आवाहने केली होती. पल्कोवनिकोव एका पाठोपाठ एक आदेश काढत होते:

"लष्करी विभागाच्या वरिष्ठ अधिकारी मंडळाकडून पुढील हुकूम मिळेपर्यंत सर्व लष्करी युनिटांनी आणि तुकडयांनी आपल्या बराकीं-मध्येच रहावे अशी मी आज्ञा देतो.

"आपल्या वरिष्ठांच्या हुकुमांविना कृती करणाऱ्या सर्व अधि-काऱ्यांवर बंडाबद्दल लष्करी खटले भरण्यात येतील.

"इतर संघटनांच्या आदेशांनुसार वागण्यास सैनिकांना मी सक्त मनाई करीत आहे..."

सकाळच्या वर्तमानपत्रांमधून घोषित झाले होते की, सरकारने 'नोवाया रूस', 'झिवोये स्लोवो', 'रबोची पूत' आणि 'सोल्दात' या वृत्तपत्रांवर बंदी घातली आहे व पेत्रोग्राद सोविएतच्या पुढाऱ्यांना आणि लष्करी क्रांति-कारक समितीच्या सभासदांना अटक करण्याचा हुकूम काढला आहे.

राजवाडयाच्या चौकातून मी चाललो होतो तेव्हा युंकर तोफखान्याच्या अनेक तुकडया खुळ खुळ आवाज करीत दुडक्या चालीने लाल कमानीतून आत आल्या आणि राजवाडयासमोर उभ्या राहिल्या. लष्करी वरिष्ठ अधिकारीवर्गाच्या प्रचंड लाल इमारतीत विलक्षण चलनवलन निर्माण झाले होते, प्रवेशद्वाराशी अनेक चिलखती मोटारी ओळीने उभ्या होत्या व लष्करी अधिकाऱ्यांनी भरलेल्या मोटारींची सतत ये जा चालू होती. सर्कस पाह-ताना एखादा लहान मुलगा जसा उत्तेजित झालेला असतो त्याप्रमाणे सेन्सॉरच्या अधिकाऱ्याची अवस्था झाली होती. तो म्हणाला की, आपला राजिनामा सादर करायला केरेन्स्की नुकतेच प्रजासत्ताकाच्या मंडळात गेले आहेत. मी घाईघाईने मरीईन्स्की प्रासादाकडे गेलो. मी तेथे पोचलो त्या-वेळी केरेन्स्कींच्या आवेशपूर्ण, पण संपूर्णतया असंबद्ध भाषणाची अखेर चालली होती. आपल्या भाषणात त्यांनी आपल्या शत्रूंवर कडाडून हल्ला चढविला होता आणि आत्मसमर्थनाचा पुरेपूर प्रयत्न केला होता.

"राजकीय गुन्ह्याखाली दोषी ठरल्यामुळे फरारी होऊन लपून बसले-ल्या आणि आम्ही ज्यांच्या शोधात आहोत अशा उल्यानोव-लेनिन यांनी

'रबोची पूत'मध्ये ओळीने प्रसिद्ध केलेल्या लेखमालेतील एक अत्यंत वैशिष्टचपूर्ण उतारा मी उद्धृत करतो. हा राजकीय गुन्हेगार कामगारवर्गाला आणि पेत्रोग्रादच्या शिबंदीला आवाहन करीत आहे की, १६-१८ जुलैच्या घटनांची त्यांनी पुनरुक्ती करावी. तसेच तात्काळ सशस्त्र उठावाची गरज आहे असे तो आग्रहपूर्वक प्रतिपादन करीत आहे...

"शिवाय, इतर अनेक सभांमधून दुसऱ्या बोल्शेविक पुढाऱ्यांनी सुद्धा तात्काळ उठावाचे आवाहन केले आहे. पेत्रोग्राद सोविएतचे सध्याचे अध्यक्ष ब्रॉन्स्टीन-ट्रॉट्स्की यांची भाषणे विशेष लक्षात घेण्यासारखी आहेत...

"मला तुमच्या निदर्शनास आणून देणे भाग आहे... की 'रबोची पूत' आणि 'सोल्दात' यांमधील सबंध लेखमालांची अभिव्यक्ती आणि शैली 'नोवाया रूस'मधील लेखांशी पूर्णतया मिळतीजूळती आहे... आम्हाला एका राजकीय पक्षाच्या चळवळीला जेवढे तोंड द्यावे लागत नाही, तेवढे जनतेच्या एका विभागाच्या राजकीय अज्ञानाचा आणि गुन्हेगारी प्रवृत्तींचा दुरुपयोग करणाऱ्यांविरुद्ध द्यावे लागत आहे. ही अशी संघटना आहे की, काय वाट्टेल ती किंमत पडली तरी तिचे एकच उद्दिष्ट आहे व ते म्हणजे रशियात प्रक्षुब्धता निर्माण करायची, संहार आणि लूटमारीचे साम्राज्य प्रस्थापित करायचे; कारण लोकांची आज अशी मानसिक अवस्था आहे की, पेत्रोग्रादमध्ये कोणतीही चळवळ पेटताच त्या पाठोपाठ भयंकर कत्तली घडतील आणि स्वतंत्र रशियाच्या नावाला सदाची काळोखी फासली जाईल.

"खुद्द उल्यानोव-लेनिन यांनी मान्य केले आहे की, रशियातील सामाजिक लोकशाहीवाद्यांच्या आत्यंतिक डाव्या गटाला परिस्थिती कमालीची अनुकूल आहे." (येथे केरेन्स्की यांनी लेनिन यांच्या लेखातील पुढील अवतरण वाचून दाखवले):

> जरा विचार करा!.. मंडळी अत्यंत कठीण परिस्थितीत लीबक्नेख्त यांच्या सारखा **एकच** आणि तो सुद्धा तुरुंगात कितपत पडलेला पुढारी असताना, कोणत्याही वृत्तपत्राशिवाय, सभा-स्वातंत्र्याशिवाय, सोविएतांशिवाय, जनतेचे **सर्व** वर्ग—अगदी गब्बर किसानापर्यंत—पूर्णपणे आंतरराष्ट्रीयवादाच्या विचाराला काटेकोरपणे विरोध करत असताना साम्राज्यवादी मुख्य, मध्यम आणि कनिष्ठ भांडवलदार उत्कृष्टपणे संघटित झालेले असताना देखील जर्मन कॉम्रेडांनी, म्हणजेच जर्मन क्रांतिकारक आंतरराष्ट्रीयवाद्यांनी, खलाशांचा पोशाख चढविले-

ल्या कामगारांनी नौदलात उठाव केला; आणि त्यांना विजयाची खात्री होती – केवळ एक टक्का.

याउलट आमच्याकडे डझनावारी वर्तमानपत्रे आहेत, आम्हाला सभास्वातंत्र्य आहे. सोविएतांमध्ये आमचे **बहुमत** आहे, सबंध जगातील आंतरराष्ट्रीयवादी कामगारवर्गामध्ये आमची परिस्थिती सर्वांत चांगली आहे; अशा परिस्थितीत आपल्या उठावाने आम्ही जर्मन क्रांतिकार-कांना पाठिंबा देण्यास नकार कसा द्यायचा?..

केरेन्स्की पुढे म्हणाले :

"अशा प्रकारे बंडाच्या संघटकांनी निखालसपणे मान्य केले आहे की, रशियामध्ये कोणत्याही राजकीय पक्षाला मुक्त कृती करण्यास अत्यंत योग्य परिस्थिती उपलब्ध आहे, कारण रशियाचा कारभार सध्या हंगामी सरकारतर्फे हाकला जात आहे आणि या सरकारचे नेतृत्व, या पक्षाच्या दृष्टीने 'सत्ता बळकावणारा आणि भांडवलदारवर्गाला विकला गेलेला मंत्री-अध्यक्ष केरेन्स्की याच्याकडे आहे...'

"...उठावाचे संघटक जर्मन कामगारवर्गाच्या मदतीला येत नाहीत, तर जर्मन सत्ताधारी वर्गांना ते मदत करतात आणि विल्हेल्मच्या व त्याच्या मित्रांच्या वज्रमुठींच्या प्रहाराखाली रशियन आघाडीचा बळी देऊ पहात आहेत... या लोकांची उद्दिष्टे काय आहेत याच्याशी हंगामी सरकारला कर्तव्य नाही, ते जाणीवपूर्वक तसे वागताहेत किंवा अजाणतेपणे वागताहेत याच्याशीही काही कर्तव्य नाही; पण तरीही, या व्यासपीठावरून, माझ्या जबाबदारीची पूर्ण जाणीव ठेवून, रशियन राजकीय पक्षाच्या अशा कृती या रशियाशी विद्रोह करणाऱ्या कृती आहेत, असे मी जाहीर करतो!

"...मी न्यायाच्या बाजूने विचार करतो आणि असा ठराव मांडतो की, या प्रकरणी ताबडतोब चौकशी करून आवश्यक त्या अटका व्हाव्यात." (डावीकडून ओरडा). "माझे ऐका!" ते कणखर आवाजात ओरडले. "कुणाच्या जाणीवपूर्वक अगर अजाणता विश्वासघातामुळे राज्य धोक्यात आले आहे अशा क्षणी, रशियाच्या जीवनाशी, अब्रूशी आणि स्वातंत्र्याशी बेइमानी करण्यापेक्षा हंगामी सरकार आणि माझ्यासकट माझे साथीदार मरणाला कवटाळू..."

या क्षणाला केरेन्स्कींच्या हातात एक कागद देण्यात आला.

"सैन्याच्या तुकड्यांमध्ये ते वाटत असलेले जाहीर निवेदन आत्ताच

माझ्या हाती आले आहे. त्यातला मजकूर पुढीलप्रमाणे." ते वाचू लागले :

**"'कामगार आणि सैनिक प्रतिनिधींच्या पेत्रोग्राद सोविएतला धोका निर्माण झाला आहे. आम्ही तात्काळ हुकूम करतो की, लढाई-च्या तयारीने तुकडयांनी एकवटून रहावे आणि पुढील नव्या हुकुमांची वाट पहावी. या हुकुमाच्या पालनात दिरंगाई केल्यास अगर त्याची अंमलबजावणी न केल्यास तो क्रांतीचा विश्वासघात मानला जाईल. लष्करी क्रांतिकारक समिती. अध्यक्षांसाठी, पद्वोय्स्की. चिटणीस, अंतोनोव.'**

"प्रत्यक्षामध्ये, सध्याच्या कायदा आणि सुव्यवस्थेविरुद्ध जनसामान्यांना भडकवण्याचा, घटनात्मक सभेला मोडण्याचा आणि विल्हेल्मच्या फौजांच्या वज्रमुठींखाली युद्ध आघाडींचा चक्काचूर होऊ देण्याचा हा प्रयत्न आहे. मी मुद्दामच "जनसामान्य" असा शब्द वापरला, कारण जाणीवपूर्वक लोकशाही आणि तिची केंद्रीय कार्यकारी समिती, सर्व सेना संघटना, स्वतंत्र रशियाला ज्याचा अभिमान आहे अशा सर्व गोष्टी – महान रशियन लोकशाहीची चांगली जाण, प्रतिष्ठा आणि सदसद्विवेकबुद्धी – या सर्वांचा उपरोक्त प्रवृत्तींना विरोध आहे...

"मी या ठिकाणी विनवणी करायला आलो नाही, तर माझी ठाम श्रद्धा व्यक्त करायला आलो आहे की, या क्षणाला आमच्या नव्या स्वातं-त्र्याचे रक्षण करणाऱ्या हंगामी सरकारला, नव्या रशियन राज्याला अत्यंत उज्ज्वल भवितव्य आहे, ज्यांना सत्याला सामोरे जाण्याचे कधी धाडसच झाले नाही असे लोक सोडून इतर सर्वांचा त्याला एकमताने पाठिंबा लाभेल...

"...राज्यामधील नागरिकांच्या राजकीय हक्कांचा वापर करण्याच्या स्वातंत्र्यावर हंगामी सरकारने कधीही गदा आणलेली नाही.

"पण आता मात्र हंगामी सरकार जाहीर करीत आहे : या क्षणाला रशियन राष्ट्रामधील ज्या गटांनी आणि पक्षांनी रशियन जनतेच्या इच्छे-विरुद्ध जाण्याचे धाडस केले आहे, तसेच जर्मनीला आघाडी खुली करून देण्याची धमकी दिली आहे, त्यांना तात्काळ नष्ट केले पाहिजे!.. पेत्रो-ग्रादच्या जनतेला समजू दे की, एक खंबीर सत्ता तिच्या पाठी उभी आहे आणि कदाचित ज्या लोकांच्या अंतःकरणात अद्याप चांगली जाण,

सदसद्विवेकबुद्धी आणि प्रतिष्ठा शिल्लक उरली आहे त्यांचा विजय होईल . . ."

हे भाषण चालू असताना सभागृहात प्रचंड गोंगाट चालू होता. मंत्री-अध्यक्षमहाशय भाषण संपवून निस्तेज चेहऱ्याने घामाघूम अवस्थेत खाली उतरले आणि आपल्या अधिकाऱ्यांच्या लवाजम्यासकट बाहेर निघून गेले. त्यानंतर डाव्या गटाच्या वक्त्यांनी एका पाठोपाठ उठून उजव्या गटावर आवेशपूर्ण, संतप्त भाषणांच्या फैरी झाडल्या. इतकेच नव्हे तर समाजवादी-क्रांतिकारकांनीही गोत्झ मार्फत सांगितले :

"लोकांच्या असंतोषाचा फायदा उठविण्याचे बोल्शेविकांचे धोरण शुद्ध बाष्कळपणाचे आणि गुन्हेगारी आहे. पण जनतेच्या अनेक मागण्या अद्याप पुऱ्या झालेल्या नाहीत हे तेवढेच खरे आहे . . . शांततेचे, जमिनीबाबतचे आणि सैन्यात लोकशाहीकरण आणण्याचे प्रश्न अशा रीतीने हाताळले पाहिजेत की सरकार या प्रश्नांची उकल ठामपणे आणि अचूक करीत आहे किंवा नाही याबाबत कुणाही सैनिकाच्या, किसानाच्या किंवा कामगाराच्या मनात तिळमात्र संदेह राहू नये.

"आम्हाला आणि मेन्शेविकांना मंत्रिमंडळातील अरिष्टाला वाढविण्याची इच्छा नाही. आमच्या सर्व ताकदीनिशी, आमच्या शरीरातला रक्ताचा शेवटचा थेंब सांडेपर्यंत, हंगामी सरकारचे रक्षण करण्याची आमची तयारी आहे, पण या सर्व जळत्या प्रश्नांवर हंगामी सरकारने अत्यंत स्पष्ट आणि नेमक्या शब्दांमध्ये आपली भूमिका मांडली पाहिजे, जनता या शब्दांची अत्यंत आतुरतेने वाट पाहते आहे . . ."

त्यानंतर मार्तोव संतापून म्हणाले :

"कामगारवर्गाच्या आणि सैन्याच्या महत्त्वाच्या विभागांच्या चळवळीचा हा प्रश्न असताना – ती चळवळ चुकीच्या मार्गाने जात असली तरीही – मंत्री-अध्यक्षमहोदयांनी "जनसामान्य" अशा शब्दाचा वापर करणे म्हणजे यादवी युद्धाला चेतना देण्याचा प्रयत्नच होय." (डाव्यांकडून टाळ्या).

डाव्यांनी मांडलेल्या ठरावावर मतदान झाले. तो ठराव म्हणजे सरकारबद्दल अविश्वासाचा ठराव होता :

"१. गेले काही दिवस ज्याची तयारी चालू आहे त्या सशस्त्र मोर्चाचा उद्देश सरकार उलथून टाकण्याचा आहे, त्यामुळे यादवी युद्धाचा भडका उडण्याचा धोका आहे, गुंडांना आणि प्रतिक्रांतीला अनुकूल परिस्थिती लाभत आहे, काळे शंभर सारख्या प्रतिक्रांतिकारक

शक्तींना एकवटण्यास वाव मिळत आहे. त्यामुळे अपरिहार्यपणे घटनात्मक सभा भरविणे अशक्य होईल, लष्कर पराभूत होईल, क्रांतीचा मृत्यू घडेल, देशाचे आर्थिक जीवन विस्कटून जाईल आणि रशियाचा सर्वनाश घडेल;

२. तातडीच्या उपाययोजना करण्यास विलंब केल्याने, तसेच युद्ध आणि सार्वत्रिक अव्यवस्था यांच्यामुळे वस्तुनिष्ठ परिस्थिती निर्माण झाल्याने, या चळवळीला अनुकूल वातावरण लाभले. यासाठी इतर काहीही करण्यापूर्वी, किसानांच्या भूमी समित्यांच्या हाती जमीन देण्याबाबतचा हुकूमनामा तात्काळ जाहीर करणे आवश्यक आहे; तसेच दोस्त राष्ट्रांनी आपल्या शांतता तहाच्या अटी मांडाव्या व शांततेच्या वाटाघाटी सुरू व्हाव्यात म्हणून परदेशांमध्ये जोरदार मोहीम सुरू करणे आवश्यक आहे;

३. अराजकांच्या हालचालींना आणि गुंडांच्या चळवळींना आळा घालण्यासाठी, या चळवळी ताबडतोब दडपून नष्ट करणे अनिवार्य ठरले आहे. त्यासाठी नगरपालिका आणि क्रांतिकारक लोकशाहीच्या संस्था यांच्या प्रतिनिधींची एक सार्वजनिक सुरक्षा समिती पेत्रोग्रादमध्ये निर्माण करून त्या समितीने हंगामी सरकारशी संपर्क राखून कार्य करावे..."

मेन्शेविक आणि समाजवादी-क्रांतिकारक अशा सर्वांचे या ठरावावर एकमत झाले ही बाब नमूद करण्यासारखी आहे... पण केरेन्स्कींनी जेव्हा हा ठराव वाचला तेव्हा त्यांनी अव्क्सेन्तियेव यांना खुलाशासाठी हेमंत प्रासादावर पाचारण केले. हा ठराव म्हणजे हंगामी सरकारबद्दल अविश्वास प्रकट करणे असा अर्थ असेल तर आपण नवे मंत्रिमंडळ बनवावे अशी त्यांनी अव्क्सेन्तियेवना विनवणी केली. दान, गोत्झ आणि अव्क्सेन्तियेव या तडजोडवाद्यांच्या पुढाऱ्यांनी शेवटची "तडजोड" केली... हा ठराव म्हणजे सरकारवर टीका नाही अशी त्यांनी केरेन्स्कींची समजूत घातली...

मोर्स्काया आणि नेव्स्की रस्त्यांच्या कोपऱ्यावर संगीनधारी सैनिकांच्या तुकड्या सर्व खाजगी मोटारींना अडवत होत्या, आतल्या उतारूंना बाहेर काढत होत्या आणि मोटारींना हेमंत प्रासादाकडे जाण्याचे हुकूम देत होत्या. हा प्रकार बघायला मोठा जमाव जमला होता. हे सैनिक सरकारच्या बाजूचे होते का लष्करी क्रांतिकारक समितीच्या बाजूचे होते याचा कुणालाच

पत्ता नव्हता. वरच्या अंगाला कझान कॅथेड्रलजवळ हाच प्रकार घडत होता आणि मोटारींना नेव्स्की मार्गापर्यंत मागे परतायला सांगण्यात येत होते. पाच सहा रायफलधारी खलाशी हसत खिदळत उत्साहाने आले आणि सैनिकांपैकी दोघांशी गप्पा मारण्यात दंग झाले. त्या खलाशांच्या टोप्यांच्या फितींवर 'आव्रोरा' आणि 'झार्या स्वाबोदी' अशी नांवे होती. बोल्शेविकांच्या बाल्टिक काफल्यातील दोन प्रमुख युद्धनौकांची ही नांवे होती. त्यांच्यातला एक म्हणाला, "क्रॉन्स्ताद्त येत आहे!.." हे म्हणजे जणू १७९२ मध्ये पॅरिसच्या रस्त्यांवर जसे कुणी म्हटले होते: "मार्सेल्स येत आहे!" याचे कारण क्रॉन्स्ताद्तमध्ये पंचवीस हजार खलाशी होते, सारे कट्टर बोल्शेविक होते आणि त्यांच्यापैकी कुणीही मरणाला भीत नव्हते.

'राबोची इ सोल्दात' नुकतेच प्रकाशित झाले होते. त्याच्या पहिल्या पानावर प्रचंड मथळा पसरला होता:

**सैनिकांनो! कामगारांनो! नागरिकांनो!**

जनतेच्या शत्रूंनी काल रात्री आक्रमक पवित्रा घेतला. वरिष्ठ लष्करी गटाची कोर्निलोववादी माणसे उपनगरांमधल्या युंकरांना आणि स्वयंसेवक तुकड्यांना आत आणण्याच्या प्रयत्नात होती. ओरानियेनबाउम युंकरांनी आणि त्सारस्कोये सेलो स्वयंसैनिकांनी बाहेर यायला नकार दिला. पेत्रोग्राद सोविएतविरुद्ध महाभयंकर विश्वासघाताचा कट शिजत आहे... **सोविएतांच्या अखिल रशियन काँग्रेसच्या** प्रारंभाआधीच **तिच्याविरुद्ध** प्रतिक्रांतिकारकांची मोहीम आखली जात आहे; तसेच **घटनात्मक सभेविरुद्ध आणि जनतेविरुद्ध** त्यांची मोहीम आखली जात आहे. पेत्रोग्राद सोविएत क्रांतीचे रक्षण करीत आहे. लष्करी क्रांतिकारक समितीच्या मार्गदर्शनाखाली कटवाल्यांचा हल्ला उधळून लावण्याची तयारी होत आहे. सबंध शिबंदी आणि पेत्रोग्रादचा कामगारवर्ग जनतेच्या शत्रूला अखेरचा वर्मी टोला हाणायला सज्ज आहे.

लष्करी क्रांतिकारक समिती हुकूमनामा काढीत आहे:

१. सर्व तुकड्यांच्या विभागांच्या समित्यांच्या सोविएत कमिस्सारांबरोबर, तसेच सर्व क्रांतिकारक संघटनांच्या **सतत बैठकी चालत राहतील.** कटवाल्यांच्या सर्व योजनांबद्दलची सर्व माहिती त्या आपल्या हाती गोळा करतील.

२. कुणीही सैनिक समितीच्या परवानगीविना आपली डिव्हिजन सोडून जाणार नाही.

३. प्रत्येक लष्करी विभागातर्फे दोन प्रतिनिधी आणि प्रत्येक विभागीय सोविएततर्फे पाच प्रतिनिधी ताबडतोब स्मोल्नीला पाठवावे.

४. कारस्थाने करणाऱ्या लोकांच्या हालचालींबद्दल स्मोल्नीत ताबडतोब खबर द्यावी.

५. पेत्रोग्राद सोविएतच्या सर्व सभासदांना आणि अखिल रशियन काँग्रेसच्या सर्व प्रतिनिधींना स्मोल्नी येथे खास बैठकीसाठी ताबडतोब पाचारण करण्यात येत आहे.

प्रतिक्रांतीने आपला विषारी फणा वर उचलला आहे.

सैनिकांच्या, कामगारांच्या आणि किसानांच्या सर्व विजयांना आणि आशांना मोठा धोका निर्माण झाला आहे. पण शत्रूपेक्षा क्रांतीच्या शक्ती भारी आहेत.

लोकांचे ध्येय भक्कम हाती आहे. कटवाल्यांचा नायनाट करण्यात येईल.

डळमळीतपणा नको किंवा शंका नकोत! ठामपणे, निष्ठेने, शिस्तीने, दृढनिश्चयाने काम करा!

क्रांती चिरायू होवो!

**लष्करी क्रांतिकारक समिती**

स्मोल्नीमध्ये पेत्रोग्राद सोविएतच्या अखंड बैठका चालू होत्या, ते झंझावाताचे केंद्र होते; प्रतिनिधी फरशीवरच झोपत होते आणि पुन्हा उठून चर्चांमध्ये भाग घेत होते. ट्रॉट्स्की, कामेनियेव, वोलोदार्स्की दर दिवशी सहा सहा, आठ आठ, बारा बारा तास बोलत होते...

पहिल्या मजल्यावरच्या १८ क्रमांकाच्या खोलीत मी गेलो. बोल्शेविक प्रतिनिधींची तेथे अंतर्गत बैठक चालू होती. एक कर्कश्य कठोर आवाज सतत दणदणत होता, पण जमावाच्या गर्दीत वक्ता लपला गेला होता: "तडजोडवादी म्हणतात की आम्ही एकाकी पडलो आहोत. त्यांच्याकडे लक्ष देऊ नका. एकदा झंझावाताला आरंभ झाला म्हणजे त्यांना आमच्याबरोबर फरपटत आलंच पाहिजे, नाही तर आपल्या अनुयायांना ते गमावून बसतील..."

बोलता बोलता त्यांनी एक कागद उंचावून दाखवला. "आम्ही त्यांना

आमच्याबरोबर खेचतोय! मेन्शेविकांकडून आणि समाजवादी-क्रांतिकारकांकडून आत्ताच संदेश आलाय! आमच्या कृतीचा ते निषेध करताहेत, पण जर सरकारने आमच्यावर हल्ला चढवला तर कामगारवर्गाच्या ध्येयाला आपण विरोध करणार नाही असे ते म्हणताहेत!" त्यावर हर्षभरित आरोळ्या उमटल्या...

---

रात्र झाली तसा तो मोठा हॉल सैनिकांनी आणि कामगारांनी भरून गेला. एक अतिविशाल काळसर समूह धुराच्या निळसर लोटांमध्ये गजबजत होता. जुन्या केंद्रीय कार्यकारी समितीने अखेरीस नव्या कॉंग्रेसला येणाऱ्या प्रतिनिधींचे स्वागत करण्याचे ठरविले. ही नवी कॉंग्रेस म्हणजे वस्तुतः तिचा स्वतःचा सर्वनाश होता आणि पर्यायाने तिने उभारलेल्या क्रांतिकारक व्यवस्थेचा नाश होता. पण बैठकीत मात्र फक्त केंद्रीय कार्यकारी समितीचे सभासदच मतदान करू शकत होते.

मध्यरात्रीनंतर जेव्हा गोत्झनी सभेचे अध्यक्षपद घेतले आणि दान बोलायला उठून उभे राहिले तेव्हा सर्वत्र नीरव शांतता पसरली. ती शांतता महाभयानक वाटत होती.

"आपण जगतो आहोत ही घडी कमालीच्या दुःखद छायांनी भरलेली आहे," दान म्हणाले. "शत्रू पेत्रोग्रादच्या वेशींपाशी येऊन ठाकला आहे, लोकशाहीच्या शक्ती त्याचा प्रतिकार करण्याच्या तयारीत गुंतल्या आहेत आणि तरीही आम्ही राजधानीच्या रस्त्यांवर रक्तपाताची वाट पाहतो आहोत, आमच्या केवळ एकसंध सरकारलाच नव्हे तर खुद्द क्रांतीला नष्ट करण्याची धास्ती दुष्काळ घालतो आहे...

"जनता विटली आहे–दमली आहे. तिला क्रांतीत स्वारस्य उरलं नाही. बोल्शेविकांनी काही हालचाल केली तर ती क्रांतीची अखेर ठरेल..." (ओरडा, "हे खोटं आहे!") "लूटमार आणि कत्तली करण्यासाठी प्रतिक्रांतिकारक बोल्शेविकांची वाट पाहताहेत... जर कुठला मोर्चा निघाला तर घटनात्मक सभा शिल्लक उरणार नाही..." (ओरडा, "खोटं! धिक्कार असो!")

"लष्करी कारवाईच्या क्षेत्रात पेत्रोग्राद शिबंदी वरिष्ठांच्या आज्ञा पाळणार नाही हे मान्य करणं कदापी शक्य नाही... वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या आणि तुम्ही निवडून दिलेल्या केंद्रीय कार्यकारी समितीच्या आज्ञा तुम्ही

पाळल्या पाहिजेत... सर्व सत्ता सोविएतांच्या हाती – म्हणजे साक्षात् मरण! चोर आणि दरोडेखोर लूटमार आणि जाळपोळ करायला टपून बसलेत. जेव्हा तुमच्यासमोर अशा घोषणा दिल्या जातात की, 'घरांमध्ये घुसा आणि भांडवलदारांचे कपडलत्ते, बूट छिनावून घ्या –'" (एकच कोलाहल. आरोळ्या, "अशी घोषणा मुळीच नाही! खोटं! साफ खोटं!") "ठीक आहे, आरंभ वेगळ्या पद्धतीने असेल , पण अखेर मात्र अशीच होणार!

"कृती करण्याची केंद्रीय कार्यकारी समितीला पूर्ण सत्ता आहे आणि तिचे आज्ञापालन झाले पाहिजे. आम्ही बागनेटांना भीत नाही. केंद्रीय कार्यकारी समिती आपल्या शरीराचा कोट करून क्रांतीचे रक्षण करील..." (आरोळ्या, "ते शरीर केव्हाच मेलंय!")

आरडाओरडा प्रचंड वाढला होता आणि त्यामधून उच्च स्वरातला त्यांचा आवाज ऐकू येत होता. टेबलावर दणादणा मुठी आपटत ते किंचाळले, "असे करायचा जे आग्रह करीत आहेत ते फार मोठा अपराध करीत आहेत!"

आवाज: "तुम्ही सत्ता काबीज करून ती भांडवलदारांच्या हाती दिलीत तेव्हा पूर्वीच तुम्ही घोर अपराध करून बसला आहात!"

अध्यक्षांची घंटा बडवीत गोत्झ ओरडले: "शांत रहा, नाही तर तुम्हाला बाहेर घालवावे लागेल!"

आवाज: "जरा प्रयत्न करून बघा!" (टाळ्या आणि शिट्ट्या.)

"आता शांततेच्या तहाच्या आमच्या धोरणाबाबत." (हशा.) "दुर्दैवाने रशिया इतःपर लढू शकत नाही. शांतता प्रस्थापित केली जाईल, पण कायम स्वरूपाची नव्हे – लोकशाही शांतता नव्हे... रक्तपात टाळण्यासाठी आज आम्ही प्रजासत्ताकाच्या मंडळात ठराव मंजूर केला की, भूमी समित्यांच्या हवाली जमीन देण्यात यावी आणि शांततेच्या वाटाघाटी ताबडतोब सुरू कराव्या..." (हशा आणि आरोळ्या, "खूप उशीर केलात!")

नंतर बोल्शेविकांच्या वतीने बोलायला ट्रॉट्स्की व्यासपीठावर चढून जाऊ लागले तेव्हा टाळ्यांचा प्रचंड कडकडाट सुरू झाला, हर्षभऱ्या आरोळ्यांनी सभागृह दणदणून गेले आणि सारे श्रोते उठून उभे राहिले. ट्रॉट्स्की यांच्या रोड, तीक्ष्ण चेहऱ्यावर तुच्छतादर्शक उपहासाचे भाव उमटले होते.

"दान यांच्या डावपेचांनी सिद्ध केले आहे की, जनसमूह – महान, मठ्ठ, बेफिकीर जनसमूह – पूर्णपणे त्यांच्या बाजूचे आहेत!" (महाप्रचंड

हशा.) अध्यक्षमहाशयांकडे त्यांनी नाटचपूर्ण रीतीने आविर्भाव करून म्हटले, "किसानांना जमीन द्यावी असे आम्ही म्हणत होतो तेव्हा तुम्ही त्याच्या विरुद्ध होता. आम्ही किसानांना सांगितले, त्यांनी तुम्हाला जमीन दिली नाही तर तुम्ही ती हिसकावून घ्या!' आणि किसानांनी आमचा सल्ला मानला. आता तुम्ही ज्याचा पुरस्कार करू लागला आहात ते आम्ही सहा महिन्यांपूर्वीच केलेय.

"सैन्यातली मृत्युदंडाची सजा रद्द करण्याचा केरेन्स्कींचा हुकूम त्यांच्या ध्येयप्रणालीतून निघाला आहे असे मला वाटत नाही. पेत्रोग्राद शिबंदीने त्यांचे हुकूम न जुमानण्याचे ठरविल्याने केरेन्स्कींना असे करणे भाग पडले असावे, असे मला वाटते...

"आज दान यांच्यावर असा आरोप केला जात आहे की, प्रजासत्ताकाच्या मंडळामध्ये त्यांनी केलेल्या भाषणामुळे ते छुपे क्रांतिकारक असल्याचे सिद्ध झाले आहे... एक वेळ अशी येईल की दान म्हणतील, १६ आणि १८ जुलैच्या उठावात क्रांतीच्या सुपुत्रांनी भाग घेतला होता... प्रजासत्ताकाच्या मंडळाने स्वीकारलेल्या, दान यांनी मांडलेल्या ठरावात सैन्यात शिस्त प्रस्थापित करण्याबाबत कुठेच उल्लेख नव्हता, पण त्यांच्या पक्षाच्या प्रचारात मात्र त्या शिस्तीचा आग्रह धरला जात आहे...

"गेल्या सात महिन्यांचा इतिहास दाखवतो आहे की, जनता मेन्शेविकांच्या पाठी राहिली नाही. मेन्शेविकांनी आणि समाजवादी-क्रांतिकारकांनी कॅडेटांवर मात केली आणि जेव्हा त्यांना सत्ता मिळाली तेव्हा त्यांनी ती कॅडेटांच्या हाती दिली...

"दान तुम्हाला सांगतात की, उठाव करण्याचा तुम्हाला हक्क नाही. उठाव हा सर्व क्रांतिवाद्यांचा हक्क आहे! जेव्हा दलित जनता उठाव करते तेव्हा तिचा तो हक्क असतो..."

त्यानंतर लांबट चेहऱ्याचे, तिखट जिभेचे लीबेर उठून बोलायला उभे राहिले तेव्हा श्रोत्यांनी घसे खाकरायला आणि हसायला आरंभ केला.

मार्क्सनी आणि एंगल्सनी म्हटले होते की, जोपर्यंत सत्ता हाती घेण्याची तयारी झालेली नाही तोपर्यंत कामगारवर्गाला सत्ताग्रहण करण्याचा अधिकार नाही. अशा प्रकारच्या भांडवलदारी क्रांतीमध्ये ... जनसमूहांनी सत्ता काबीज करणे याचा अर्थ क्रांतीचा शोकपूर्ण शेवट... ट्रॉट्स्की एक सामाजिक लोकशाहीवादी तत्त्ववेत्ते आहेत आणि आत्ता ते ज्याचा पुरस्कार



सैनिक आणि लाल रक्षकांच्या पहाऱ्यातील स्मोल्नीचे प्रवेशद्वार



स्मोल्नीत लाल रक्षक प्रवेशपत्रिका तपासताना

करताहेत ते त्यांच्या तत्त्वप्रणालीच्या अगदी विरोधी आहे..." (आरोळ्या, "पुरे! पुरे! लीबेर मुर्दाबाद!")

मार्तोव यांच्या भाषणात सतत अडथळे आणण्यात आले: "लोकशाहीच्या हाती सत्तांतर करण्यास आंतरराष्ट्रीयवाद्यांचा विरोध नाही, पण त्यांना बोल्शेविकांची कार्यपद्धती पसंत नाही. सत्ता हाती घेण्याचा हा क्षण नव्हे..."

दान पुन्हा बोलायला उभे राहिले. 'इझ्वेस्तिया'ची कचेरी ताब्यात घ्यायला आणि वृत्तपत्रावर नियंत्रण बसवायला लष्करी क्रांतिकारक समितीने एक कमिस्सार पाठवल्याबद्दल त्यांनी त्वेषाने निषेध केला. त्यासरशी सभागृहात महाप्रचंड गोंधळ माजला. मार्तोव यांनी बोलायचा प्रयत्न केला, पण त्यांचे भाषण ऐकू येईना. सैन्याचे आणि बाल्टिक काफल्याचे प्रतिनिधी सबंध सभागृहभर उभे होते आणि सोविएत आपले सरकार आहे अशा आरोळ्या मारीत होते...

महाभयानक गोंधळ चालू असताना एरलिख* यांनी एक प्रस्ताव मांडला. कामगारांनी आणि सैनिकांनी शांत रहावे, मोर्चा काढायची चेतवणी दिली तरी तिला प्रतिसाद देऊ नये, सार्वजनिक सुरक्षा समिती ताबडतोब स्थापन करण्याची आवश्यकता जाणावी आणि किसानांच्या हाती जमीन सोपविण्याचा हुकूम तात्काळ संमत करून हंगामी सरकारने शांततेच्या वाटाघाटी ताबडतोब सुरू कराव्या अशी मागणी करावी, असे त्यांनी आवाहन केले...

त्यासरशी वोलोदार्स्की ताडकन उठून कठोरपणे ओरडले की, काँग्रेसला आरंभ होण्याच्या पूर्वकाळी, काँग्रेसची कार्ये आपल्या अंगावर ओढवून घेण्याचा केंद्रीय कार्यकारी समितीला काहीही अधिकार नाही. ते म्हणाले की, केंद्रीय कार्यकारी समिती जवळ जवळ मृतवत आहे आणि हा प्रस्ताव म्हणजे तिची क्षीण होत चाललेली सत्ता पुन्हा बळकट करण्याची एक युक्ती आहे...

"आम्ही बोल्शेविक या प्रस्तावावर मतदान करणार नाही!" त्यावर सर्व बोल्शेविकांनी सभात्याग केला आणि ठराव मंजूर करण्यात आला...

पहाटे चारच्या सुमारास बाहेरच्या हॉलमध्ये माझी झोरीनशी गाठ पडली. त्यांच्या खांद्यावर रायफल लटकत होती.

"आम्ही हालचालींना सुरुवात केलीय!" [7] ते शांतपणे म्हणाले. त्यांच्या

---

*एरलिख – एक मेन्शेविक पुढारी. – सं.

चेहऱ्यावर समाधान होते. "उपन्यायमंत्री आणि धर्ममंत्री यांना पकडून आम्ही खालच्या तळघरात ठेवलंय. टेलिफोन एक्स्चेंज ताब्यात घ्यायला एक तुकडी निघालीय, दुसरी तारखाते ताब्यात घ्यायला आणि तिसरी सरकारी बँक काबीज करायला निघालीय. लाल रक्षक बाहेर पडलेत..."

स्मोल्नीच्या पायऱ्यांवर, गारठलेल्या अंधारात, आम्ही प्रथमच लाल रक्षक पाहिले – कामगारांच्या कपड्यातली, संगीनधारी बंदुका घेतलेली, एकमेकांशी भेदरटपणे बोलत दाटीवाटीने उभी असलेली कोवळी मुले होती.

दूर पश्चिमेला निःस्तब्ध छपरांच्या पलिकडे रायफलींचे तुरळक बार ऐकू येत होते. वीबोर्ग भागातील कामगारांनी आणि सैनिकांनी शहराच्या केंद्रातील सोविएत फौजांना येऊन मिळू नये म्हणून नेवा नदीवरील पूल उचलण्याचे युंकरांचे प्रयत्न चालले होते; पण क्रॉन्स्ताद्तचे खलाशी त्या पुलांना परत खाली आणत होते...

आमच्या पाठीशी महाप्रचंड स्मोल्नी दिव्यांनी झगमगत होता, एखाद्या महाकाय मधमाशांच्या पोवळ्यासारखा गजबजत होता...

❧

प्रकरण चौथे

# हंगामी सरकारचा पाडाव

बुधवारी ७ नोव्हेंबरला मी खूप उशीरा उठलो. नेव्स्की रस्त्यावरून चाललो होतो तेव्हा पीटर-पॉलमधली दुपारची तोफ वाजली. त्या दिवशी चावरा गारठा होता. सरकारी बँकेच्या समोर काही संगीनधारी सैनिक बंद गेटांशी उभे होते.

"तुम्ही कोणाच्या बाजूचे?" मी विचारले. "सरकारच्या?"

"सरकार आता उरलं नाही," एकजण हसत उत्तरला. "देव भला आहे!" त्याच्यापासून मला एवढेच समजू शकले...

नेव्स्कीवर ट्रामगाड्या धावत होत्या. पुरुष, स्त्रिया, मुले त्यांना सर्व बाजूंनी लटकली होती. दुकाने उघडी होती आणि आदल्या दिवशीपेक्षा रस्त्यावरच्या जमावांमध्ये कमी अस्वस्थता जाणवत होती. त्या एका रात्रीच्या अवधीत सर्व भिंतींवर उठावाविरुद्ध नव्या आवाहनांचे जणू पीकच फुलले होते – किसानांना, आघाडीवरच्या सैनिकांना, पेत्रोग्रादच्या कामगारांना उद्देशून ती आवाहने लिहिलेली होती. त्यातल्या एकाचा मजकूर होता:

**"पेत्रोग्राद नगरपालिकेच्या दूमाकडून:**

नगरपालिकेची दूमा नागरिकांना कळवीत आहे की, ६ नोव्हेंबर रोजी झालेल्या खास बैठकीत दूमाने सार्वजनिक सुरक्षा समितीची स्थापना केली आहे. तिच्यामध्ये केंद्रीय आणि विभागीय दूमांमधील सदस्यांचा व पुढील क्रांतिकारक लोकशाहीवादी संघटनांच्या प्रतिनिधींचा समावेश आहे: कामगार आणि सैनिक प्रतिनिधींच्या सोविएतांची केंद्रीय कार्यकारी समिती, किसान प्रतिनिधींची अखिल रशियन कार्य-

तिच्यावर लाल झेंडा फडकत होता व लाल रंगात नवी अक्षरे काढली होती : "स. रा. स. दे." (कामगार आणि सैनिक प्रतिनिधींची सोविएत) ; सर्व तोफा सेंट आयझॅकच्या दिशेने रोखल्या होत्या. नोवाया रस्त्याच्या तोंडाशी एक अडथळा उभारण्यात आला होता – पेटचा, पिंपे, पलंगाच्या जुन्या स्प्रिंगा, उलटी पडलेली एक रेल्वेची वाघीण, 'मोइका' घाटाचा कोपरा लाकडाच्या ढिगांनी बंद केला होता. शेजारच्या वखारीतले लाकडाचे छोटे ओंडके घेऊन इमारतीच्या समोर आडोसे उभारले जात होते.

"लढाई जुंपणार काय?" मी विचारले.

"लौकरच. अगदी लौकर," एक सैनिक भेदरट आवाजात उत्तरला. "कॉम्रेड, इथून निघून जा. निष्कारण घायाळ व्हाल. ते त्या बाजूनं येतील," त्याने आरमारी अधिकाऱ्यांच्या इमारतीकडे बोट दाखवीत म्हटले.

"कोण येईल?"

"ते मी तुला सांगू शकत नाही भाऊ," तो उत्तरला आणि थुंकला.

प्रासादाच्या दरवाजासमोर सैनिकांचा आणि खलाशांचा जथा जमला होता. रशियन प्रजासत्ताकाच्या मंडळाची अखेर कशी झाली त्याचे वर्णन एक खलाशी करीत होता. तो म्हणाला, "आम्ही तिथं आत गेलो आणि कॉम्रेडांनी सर्व दारं भरून टाकली. अध्यक्षीय खुर्चीत बसलेल्या प्रतिक्रांतिकारक कोर्निलोववादी यांच्याकडं मी चालत गेलो. 'मंडळ इत:पर संपलं,' मी म्हटले. 'सगळे आपापल्या घरी पळा!'"

तिथे जोरदार हशा झाला. माझ्याजवळचे अनेक वेगवेगळे कागदपत्र दाखवीत मी कसाबसा पत्रकारांच्या सज्जाच्या दाराशी पोचलो. तिथे एका तगड्या हसतमुख खलाशाने मला थांबवले. जेव्हा मी त्याला माझा पास दाखवला तेव्हा तो म्हणाला, "मित्रा, तू प्रत्यक्ष सेंट मायकेल असतास तरी तुला आत जाणं शक्य नाही!" दाराच्या काचेआड एका फ्रेंच पत्रकाराचे वेडेवाकडे मुद्राविक्षेप आणि हातवारे चाललेले मी पाहू शकत होतो. त्याला तिथे अडकवून ठेवले होते.

समोर एक बुटका, भुरक्या मिशांचा, जनरलच्या गणवेषातील माणूस उभा होता आणि त्याच्याभोवती सैनिकांचा गराडा पडला होता. त्या माणसाचा चेहरा संतापाने लालबुंद झाला होता.

"मी जनरल अलेक्सेयेव," तो ओरडला. "तुमचा वरिष्ठ अधिकारी

आणि प्रजासत्ताकाच्या मंडळाचा सभासद या नात्यानं मला आत जाऊ द्या, अशी मी मागणी करतो!"

पहारेकऱ्याने आपले डोके खाजवले, डोळे किलकिले करून अस्वस्थपणे तिरप्या नजरेने पाहिले; नजीक येणाऱ्या एका अधिकाऱ्याला त्याने आपल्याजवळ येण्याची खूण केली. कोण उभे आहे हे लक्षात येताच, त्या अधिकाऱ्याने आपण काय करतो आहोत याचे भान न राहून सलाम ठोकला.

"वाशे विसोकाप्रेवस्खोदितेल्स्त्वो – हुजूर –" तो पूर्वीच्या राजवटीत अडखळत बोलायचा तसा बोलू लागला. "राजवाड्यात जायला सक्त मनाई आहे – मला आत सोडायचा अधिकार नाही – "

एक मोटार तिथे आली आणि आतमध्ये बसलेले गोत्झ मनसोक्त हसत असलेले मी पाहिले. घडत असलेल्या घटनांमुळे त्यांचे जणू मनोरंजन होत होते. त्यानंतर काही मिनिटांनी दुसरी मोटार आली. तिच्यात हंगामी सरकारचे अटक केलेले सदस्य खच्चून भरले होते आणि पुढच्या आसनांवर सशस्त्र सैनिक बसले होते. लष्करी क्रांतिकारक समितीचे सदस्य लात्वियन पेटर्स चौकातून घाईघाईने आले.

"मला वाटलं काल रात्रीच तुम्ही या सगळया मंडळींना पकडलंत," मी त्यांच्याकडे निर्देश करीत म्हटले.

"नाही हो!" फुरंगटलेल्या लहान मुलासारखा चेहरा करीत ते म्हणाले. "आम्ही निश्चय करायच्या आधीच त्या मूर्खांनी या बहुतेकांना सोडून दिलं होतं..."

वझ्नेसेन्स्की प्रोस्पेक्तच्या खालच्या अंगाला खलाशांची भली मोठी रांग उभी होत होती आणि त्यांच्या पलिकडे दूर नजरेच्या टप्प्यापर्यंत संचलन करीत येणारे सैनिक दिसत होते.

आदमिराल्तेयस्कीच्या रस्त्याने आम्ही हेमंत प्रासादाकडे गेलो. राजवाड्याच्या सर्व प्रवेशद्वारांना कडक पहारे बसवले होते आणि पश्चिम टोकाला सशस्त्र सैनिकांची साखळी उभी होती. त्यांच्यापलिकडे अस्वस्थ नागरिकांची गर्दी उसळली होती. राजवाड्याच्या प्रांगणातून लाकडे आणून ती मुख्य दरवाजाशी रचणाऱ्या काही सैनिकांव्यतिरिक्त सारे काही शांत होते.

पहारेकरी सरकारच्या बाजूचे होते का सोविएतच्या बाजूचे होते याचा आम्हाला अंदाज लागत नव्हता. स्मोल्नीहून आम्हाला जी कागदपत्रे मिळाली होती त्यांचा काही तेथे उपयोग झाला नाही. तेव्हा त्या रांगेच्या दुसऱ्या भागात आम्ही खोटी ऐट आणून आमचे अमेरिकन पासपोर्ट दाख-

वीत म्हटले, "सरकारी कामासाठी आलोय!" आणि गर्दीतून वाट काढीत आत गेलो. प्रासादाच्या दाराशी, पितळी बटणे लावलेल्या निळ्या गणवेषातील आणि तांबड्या-सोनेरी कॉलरच्या त्याच जुन्या दरवानांनी अदबीने आमचे कोट व टोप्या काढून घेतल्या व आम्ही वर गेलो. पडदे काढून टाकलेल्या अंधारल्या उदास व्हरांड्यात काही जुने कर्मचारी रेंगाळत होते आणि केरेन्स्कींच्या खोलीसमोर एक तरुण अधिकारी आपल्या मिशा कुरतडीत येरझाऱ्या घालत होता. मंत्री-अध्यक्ष महाशयांची आम्ही मुलाखत घेऊ शकतो का, असे आम्ही त्याला विचारले. त्याने झुकून सलाम केला व खाडकन बुटांच्या टाचा जुळवल्या.

"नाही, मला माफ करा," त्याने फ्रेंचमध्ये उत्तर दिले. "अलेक्सांदर फ्योदरोविच आत्ता खूप कामात आहेत..." त्याने क्षणभर आमच्याकडे रोखून पाहिले. "खरं म्हणजे ते आत नाहीत..."

"कुठं आहेत?"

"ते आघाडीवर[2] गेलेत. तुम्हाला ठाऊक आहे, त्यांच्या मोटारीत पुरेसं पेट्रोल नव्हतं. आम्हाला इंग्लिश हॉस्पिटलमधून मागून आणावं लागलं."

"मंत्री इथं आहेत?"

"कुठल्यातरी एका खोलीत त्यांची बैठक भरलीय. पण नक्की कुठं ते मला माहीत नाही."

"बोल्शेविक येताहेत?"

"अर्थात ते येताहेत. ते नक्की येणारच. ते येत असल्याची बातमी देणाऱ्या टेलिफोनची मी दर मिनिटाला वाट पाहतोय. पण आम्ही तयारीत आहोत. राजवाड्याच्या तोंडाशी आमचे युंकर उभे आहेत. त्या दुसऱ्या दरवाजाच्या बाजूनं."

"आम्ही तिथं जाऊ शकतो?"

"छे: छे: मुळीच नाही. तशी परवानगी नाही." एकदम त्याने सर्वांशी हस्तांदोलन केले आणि तो तिथून निघून गेला. आम्ही त्या मनाई असलेल्या दरवाजाकडे वळलो. हॉलला तात्पुरते पार्टिशन घातले होते व त्या पार्टिशनमध्येच असलेला दरवाजा बाहेरून बंद होता. दुसऱ्या बाजूने त्या प्रचंड पुराण्या राजवाड्याच्या शांत विस्तीर्ण आवारात लोकांच्या बोलण्याचे आणि हसण्याचे आवाज येत होते. एक म्हातारा दरवान धावत आला, "नाही हुजूर, तुम्हाला तिथं जाता येणार नाही."

"दार बंद का आहे?"

"सैनिकांना आत ठेवण्यासाठी," तो उत्तरला. काही मिनिटांनंतर चहा हवा म्हणून मागून तो तेथून गेला. आम्ही दार उघडले.

आतल्या बाजूला दोन सैनिक पहाऱ्यावर उभे होते, पण ते काहीही बोलले नाही. व्हरांड्याच्या टोकाशी एक मुलामेदार नक्षीच्या छताची आणि प्रचंड बिलोरी झुंबरे टांगलेली सुशोभित मोठी खोली होती व तिच्या पलिकडे काळसर लाकडाची भिंतींना तक्तेबंदी केलेल्या अनेक खोल्या होत्या. लाकडी तक्तपोशीच्या दोन्ही बाजूंना मळक्या गाद्या आणि कांबळी हारीने पडली होती व त्यांच्यावर तुरळक सैनिक झोपलेले दिसत होते. सर्वत्र सिगारेटची थोटके, पावाचे तुकडे, कपडे आणि भारी किंमतीच्या फ्रेंच दारूच्या रिकाम्या बाटल्या विखुरल्या होत्या. युंकर विद्यालयांमधले खांद्यावर लाल फिती लावलेले अधिकाधिक सैनिक तंबाखूच्या धुराच्या भरलेल्या आणि अनेक दिवस आंघोळीचा पत्ता नसल्याने शरीरांना येणाऱ्या दुर्गंधाने भरलेल्या त्या शिळपट वातावरणात फिरताना दिसत होते. एकाच्या हातात पांढऱ्या बर्गंडीची बाटली होती, त्याने ती राजवाड्याच्या मद्याच्या कोठारातून पळवली होती हे उघड होते. आम्ही एका पाठोपाठ एक खोल्यांमधून जात असताना ते आमच्याकडे चकित नजरांनी पहात होते. अखेरीस आम्ही अनेक शाही स्वागतकक्षांच्या स्थळी जाऊन पोहोचलो. त्यांच्या लांबलचक आणि धुळीने भरलेल्या खिडक्या चौकाच्या बाजूने उघडत होत्या. भिंतींवर मोठमोठी तैलचित्रे लावलेली होती आणि त्यांना मुलामेदार चौकटी बसवलेल्या होत्या. ऐतिहासिक लढायांची दृश्ये तेथे चितारलेली होती: "१२ ऑक्टोबर १८१२" आणि "६ नोव्हेंबर १८१२" आणि "१६/२८ ऑगस्ट १८१३"... एका चित्राच्या वरच्या उजव्या कोपऱ्याला मोठी चीर पडली होती.

त्या ठिकाणाला एका मोठ्या बराकीची कळा आली होती आणि तेथील तक्तपोशीची व भिंतींची दशा पाहता अनेक आठवडे ही परिस्थिती असावी असा सहज अंदाज बांधता येत होता. खिडक्यांच्या चौकटींच्या खालच्या बाजूस मशिनगन रोखून ठेवल्या होत्या, गाद्यांच्या मध्यभागी रायफलींचे भारे जमवून ठेवले होते.

मी चित्रे पहात असताना माझ्या डाव्या कानाशी एक दारूच्या दर्पाने भरलेला श्वास मला जाणवला आणि अस्खलित फ्रेंचमधला एक दाट स्वर ऐकू आला, "तुम्ही ज्या पद्धतीनं या चित्रांकडं कौतुकानं पाहताय त्या-

वरून तुम्ही परदेशी आहात हे मला कळतंय." तो एक बुटका, जाडा इसम होता. त्याने आपल्या डोक्यावरची टोपी काढली तेव्हा त्याला टक्कल पडत चाललेले मला दिसले.

"तुम्ही अमेरिकन आहात? मला खूप आनंद झाला. मी स्टॅब्स-कॅप्टन व्लादीमिर आर्त्झिबाशेव. बंदा आपल्या सेवेला तयार आहे..." हल्ल्याची वाट पहात असलेल्या सैन्याच्या मोर्चेबंदीमधून चार परकी माणसे, ज्यांच्यात एक स्त्री आहे, खुशाल फिरताहेत याचे त्याला विशेष अघटित असे वाटल्याचे आम्हाला जाणवले नाही. रशियाच्या परिस्थितीबद्दल त्याने तक्रारी सांगायला आरंभ केला.

"या बोल्शेविकांचीच एक पीडा आहे असं नाही," तो म्हणाला. "पण रशियन सैन्याच्या उत्तम परंपरा धुळीला मिळाल्यात. जरा भोवती नजर टाका. अधिकाऱ्यांच्या प्रशिक्षण विद्यालयातले हे सगळे विद्यार्थी आहेत... पण ही सभ्य माणसं कोण म्हणेल? परीक्षा पास होणाऱ्या कुणाही सोम्या-गोम्याला केरेन्स्कीनं अधिकाऱ्यांची विद्यालयं खुली केली. साहजिकच क्रांतीची बाधा झालेली अनेक माणसं त्यांच्यात आहेत..."

बोलणं पुरे न करताच त्याने विषय बदलला. "मला रशियापासून दूर जायची इच्छा आहे. अमेरिकन सैन्यात दाखल व्हायचा माझा इरादा पक्का झालाय... तुमच्या कॉन्सलला सांगून माझी व्यवस्था करता का? मी माझा पत्ता तुम्हाला देईन."

आम्ही नको नको म्हणत असतानाही त्याने एका कागदाच्या चिटोऱ्यावर आपला पत्ता खरडून दिला आणि एकदम त्याला बरे वाटल्याचे दिसले. तो पत्ता अजून माझ्याजवळ आहे – "ओरानियेनबाउमस्काया श्कोला प्रापोरश्चिकोव २, स्तारीय पीटरहॉफ."

वेगवेगळ्या खोल्यांमधून आम्हाला फिरवून सर्व गोष्टी दाखवीत असताना त्याने सांगितले, "आज पहाटेच आम्ही सैन्याची एकूण पाहणी केली. महिलांच्या पलटणीनं सरकारशी एकनिष्ठ रहायचं ठरवलंय."

"राजवाड्यात महिला सैनिक आहेत?"

"होय, त्या मागच्या खोल्यांमध्ये आहेत. जर काही गडबड झालीच तर त्यांना धक्का पोचणार नाही." त्याने निःश्वास टाकला. "ही फार मोठी जोखीम आहे," ती म्हणाला.

थोडा वेळ आम्ही खिडकीशी उभे राहिलो. राजवाड्यासमोरच्या चौकात लांब कोटातल्या युंकरांच्या तीन कंपन्या शस्त्रास्त्रांनी सज्ज होऊन उभ्या

होत्या आणि एक उंचापुरा तडफदार अधिकारी त्यांच्यासमोर मोठ्या आवेशात भाषण ठोकीत होता. मी त्याला ओळखले – हंगामी सरकारचा प्रमुख लष्करी कमिस्सार स्तान्कियेविच. काही मिनिटांनंतर त्यांपैकी दोन कंपन्यांनी खाडकन खांद्यावर बंदुका टाकल्या आणि झपाझप पावले टाकीत चौकामधून लाल कमानीच्या* पलिकडे सुनसान शहरात दिसेनाशा झाल्या.

"टेलिफोन एक्श्चेंज काबीज करायला ते गेलेत," कुणीतरी म्हणाले. आमच्या शेजारी तीन युंकर उभे होते. आमचे संभाषण सुरू झाले. ते म्हणाले की, अगदी खालच्या हुद्द्यापासून चढत ते विद्यालयांमध्ये दाखल झाले होते. त्यांनी आपली नांवे सांगितली – रॉबर्ट ओलेव, अलेक्सेई वासिलेन्को आणि एन्री साक्स. शेवटचा एस्तोनियाचा होता. पण आता त्यांना अधिकारी व्हायची इच्छा नव्हती, कारण अधिकारी कमालीचे अप्रिय बनले होते. खरे म्हणजे काय करायचे तेच त्यांना समजत नव्हते आणि ते कमालीचे दु:खी होते ही अगदी उघड दिसणारी गोष्ट होती.

पण लगेच त्यांनी बढाया मारायला सुरुवात केली. "जर बोल्शेविक आलेच तर कसं लढायचं असतं ते आम्ही त्यांना शिकवू. त्यांची लढायची हिंमत होणार नाही, ते भित्रे आहेत... पण जर त्यांनी आमच्यावर सरशी केलीच, तर प्रत्येकानं आपल्यासाठी एक गोळी राखून ठेवलीय..."

याचवेळी कुठेतरी जवळपास रायफलचे बार वाजले. बाहेर चौकात लोकांची पळापळ सुरू झाली, काहीजण तोंडघशी आपटले, कोपऱ्यांवर उभ्या असलेल्या कोचवानांनी आपल्या घोड्यांना सुसाट पिटाळले. आतही एकच गोंधळ माजला. सैनिक इतस्तत: धावत होते, बंदुका आणि रायफलचे पट्टे उचलून धावताना ओरडत होते, "आले रे आले!" पण काही मिनिटातच पुन्हा सारे स्थिरस्थावर झाले. कोचवान परतले, पालथे पडून राहिलेले लोक उभे राहिले. लाल कमानीतून काही युंकर आत आले. त्यांची पावले तालात पडत नव्हती. त्यातल्या एकाला दोघांनी आधार दिला होता.

आम्ही राजवाड्यातून बाहेर पडलो तेव्हा बराच उशीर झाला होता. चौकातले सर्व पहारेकरी अदृश्य झाले होते. सरकारी इमारतींचे मोठे अर्धवर्तुळ ओसाड भासत होते. रात्रीच्या जेवणासाठी आम्ही 'हॉटेल फ्रान्स'-मध्ये गेलो. ऐन जेवणाच्या मध्यातच आमचा वेटर घाबरल्या चेहऱ्याने आला

---

*वरिष्ठ लष्करी अधिकाऱ्यांच्या इमारतीची कमान. – सं.

आणि आम्हाला विनवून सांगू लागला की इमारतीच्या मागच्या मुख्य भोजन दालनात आम्ही चलावे, कारण कॅफेमधले दिवे ते विझवून टाकणार होते. "तिथं बराच गोळीबार होईल म्हणताहेत," त्याने सांगितले.

आम्ही पुन्हा मोस्कॉया रस्त्यावर आलो तेव्हा बराच अंधार पडला होता. फक्त नेव्स्की रस्त्याच्या कोपऱ्यावर एक दिवा मिणमिणत होता. त्या दिव्याखालीच एक मोठी चिलखती गाडी उभी होती. तिचे इंजिन चालू होते आणि ती तेलकट धूर ओकीत होती. एक छोटा पोरगा त्या गाडीवर चढला होता आणि मशिनगनच्या नळीतून डोकावून पहात होता. भोवताली सैनिक आणि खलाशी उभे होते. ते कशाची तरी वाट पहात होते हे स्पष्ट होते. आम्ही लाल कमानीपर्यंत परत चालत गेलो. तेथे सैनिकांचा एक घोळका जमला होता आणि दिव्यांनी झगमगणाऱ्या हेमंत प्रासादाकडे टक लावून पहात मोठमोठ्या आवाजात बोलत होता.

"छे: छे: कॉम्रेडहो," एकजण म्हणत होता. "आपण त्यांच्यावर गोळ्या कशा झाडणार? महिलांची पलटण तिथं आहे – ते म्हणतील आम्ही रशियन बायकांवर गोळ्या झाडल्या."

आम्ही पुन्हा नेव्स्कीवर गेलो तेव्हा कोपऱ्यावर आणखी एक चिलखती गाडी येऊन उभी राहिली होती. वरच्या टपामधून एका माणसाने डोके बाहेर काढले.

"चला!" तो ओरडला. "हल्ल्याला सुरुवात करू या!"

दुसऱ्या गाडीचा ड्रायव्हर आला आणि इंजिनांच्या घरघरीत आवाज ऐकू जावा म्हणून मोठ्यांदा ओरडला, "समितीनं थांबायला सांगितलंय. त्या लाकडांच्या ढिगामागं त्यांनी तोफखाना दडवलाय..."

इकडे ट्रामगाड्या जात नव्हत्या. रस्त्यांवरून तुरळक माणसे जात होती आणि कुठेही दिवे नव्हते. पण काही अंतरावर आम्हाला ट्रामगाड्या दिसत होत्या, लोकांची गर्दी दिसत होती, दिव्यांनी उजळलेल्या दुकानांची तावदाने दिसत होती, चित्रपटांच्या जाहिरातींच्या दिव्यांची उघडझाप दिसत होती – जीवन नेहमीप्रमाणे चालले होते. मरीईन्स्की थिएटरमधल्या बॅलेची आमच्यापाशी तिकीटे होती (सर्व थिएटरे खुली होती). पण बाहेर त्यापेक्षा अधिक नाट्यमय वातावरण होते.

अंधारामध्ये आम्ही पोलीस पुलावर रचलेल्या लाकडांच्या अडथळ्यांवर अडखळून पडलो. पुढे स्त्रोगानोव प्रासादाच्या समोर काही सैनिक तीन

इंची तोफ मोर्चा लावून उभी करत होते. वेगवेगळ्या गणवेषांमधले लोक उगीचच ये जा करीत होते आणि खूप बडबडत होते...

नेव्स्की रस्त्यावर तर जणू सारे शहरच फिरायला बाहेर पडलेय असे वाटत होते. प्रत्येक कोपऱ्यावर लोकांचे मोठमोठे थवे गरमागरम वाद-विवादात रंगलेले होते. डझनभर संगीनधारी सैनिक रस्त्यांच्या चौकांमध्ये गस्त घालत होते, उंची केसाळ कोटांमधले तांबड्याबुंद चेहऱ्यांचे म्हातारे त्या सैनिकांना रागारागाने मुठी वळवून दाखवत होते, टापटीप पोषाख केलेल्या महिला त्यांच्या नांवाने कडाकडा बोटे मोडत होत्या. ओशाळवाणे हसू चेहऱ्यावर आणून सैनिक त्यांच्याशी वादविवाद करण्याचा लटका प्रयत्न करीत होते. 'ओलेग', 'ऱ्यूरिक', 'स्व्यातोस्लाव' या पहिल्या झारांची नांवे दिलेल्या चिलखती मोटारी रस्त्यावरून ये जा करीत होत्या आणि त्यांच्यावर "र. सो. दे. रा. पा." (रस्सियस्काया सोत्सिअल-देमोक्रातीचेस्काया राबोचाया पार्तिया)* अशी मोठी लाल अक्षरे रंगवली होती. मिखाईलोव्स्की रस्त्यावर एक माणूस काखेत वर्तमानपत्रांचा गठ्ठा घेऊन आला तेव्हा अधीर झालेले लोक त्याच्यावर तुटून पडले, एकेका अंकाला एक रूबल, पाच रूबल, दहा रूबल देऊ करू लागले, जनावरां-सारखी एकमेकांशी झोंबाझोंबी करू लागले. तो 'राबोची इ सोल्दात'चा अंक होता, त्यात कामगारवर्गीय क्रांतीचा विजय झाल्याची घोषणा होती, अद्याप तुरुंगात असलेल्या बोल्शेविकांना मुक्त केल्याची बातमी होती व आघाडीवर आणि पिछाडीवर अशा दोन्ही ठिकाणी पाठिंबा द्यावा असे सैन्याला आवाहन केले होते... ते वर्तमानपत्र म्हणजे मोठ्या टाईपात छापलेले एक सनसनाटी पत्रक होते, त्यात बातमी तशी काहीही नव्हती.

सादोवायाच्या कोपऱ्यावर सुमारे दोन हजार नागरिक जमले होते आणि एका उंच इमारतीच्या छपरावर एक तांबडी ठिणगी चमकत होती आणि विझत होती तिच्याकडे पहात होते.

"पहा!" एक उंचापुरा शेतकरी तिकडे बोट करून म्हणाला. "तो चिथावणीखोर आहे. आता तो लोकांवर गोळ्या उडवील पहा..." पण कुणाला तेथे जाऊन चौकशी करण्याचे सुचले नाही.

आम्ही जेव्हा स्मोल्नीजवळ आलो तेव्हा स्मोल्नीचा भव्य दर्शनी भाग दिव्यांनी झगमगत होता आणि अस्पष्ट अंधारात प्रत्येक रस्त्यावरून त्याच्या-

---

* रशियन सामाजिक-लोकशाहीवादी कामगार पक्ष.

कडे लोकांच्या आकृती घाईघाईने जाताना दिसत होत्या. मोटारी आणि फटफटया येत होत्या व जात होत्या; हत्तीच्या रंगाची एक महाप्रचंड चिलखती गाडी धडधडत मोठ्यांदा भोंगा वाजवीत गेली. तिच्या टपावर दोन लाल झेंडे फडकत होते. थंडीचा कडाका पडला होता आणि बाहेरच्या गेटाशी लाल रक्षकांनी शेकोटी पेटवली होती. आतल्या गेटाशीसुद्धा आगटी पेटलेली होती व त्या उजेडात पहारेकरी हळूहळू आमच्या पासांवरची नांवे वाचत होते आणि आम्हाला आपादमस्तक न्याहाळून पहात होते. दरवाजाच्या दोन्ही बाजूंना उभ्या केलेल्या जलदगती मारा करणाऱ्या चार चार मशिनगनवरची ताडपत्रीची आच्छादने काढून टाकली होती आणि त्यांच्या पाठीमागच्या बाजूस काडतुसांचे पट्टे सापासारखे लोंबत होते. आवारातल्या झाडांखाली काळसर रंगाचा चिलखती गाड्यांचा जथा इंजिनांची घरघर करीत उभा होता. लांबलचक, उघड्याबोडक्या, मंद प्रकाशातली दालने पावलांच्या, हाकांच्या आणि आरोळ्यांच्या आवाजांनी दणदणत होती... वातावरणात एक मोठा जमाव धडधडत खाली आला. त्यात काळी जाकीटे आणि गोल काळ्या केसाळ टोप्या घातलेले कामगार होते, त्यांच्यापैकी अनेकांच्या खांद्यांवर बंदुका लटकत होत्या, मातकट रंगाचे जाडेभरडे कोट आणि भुरकट दबत्या केसाळ टोप्या घातलेले सैनिक होते, त्या गटाच्या मध्यभागी लुनाचार्स्की, कामेनियेव यांच्यासारखा एखाददुसरा पुढारीही होता... सारेजण एकाचवेळी बोलत होते, पुढाऱ्यांचे चेहरे त्रासलेले आणि चिंताक्रांत दिसत होते, त्यांच्या काखोटीला कागदपत्रांनी गच्च भरलेल्या चामडी पिशव्या होत्या. पेत्रोग्राद सोविएतची खास बैठक संपली होती. जलद हालचाल करणाऱ्या लहानखोर चणीच्या, रुंद, ओजस्वी चेहऱ्याच्या आणि डोक्याची बैठक खांद्यांशी लगट करीत असल्याने मान दिसत नसलेल्या कामेनियेवना मी थांबवले. कोणतीही प्रस्तावना न करता त्यांनी नुकत्याच मंजूर केलेल्या ठरावाची फ्रेंच प्रत घाईघाईने वाचली:

"कामगार आणि सैनिक प्रतिनिधींची पेत्रोग्राद सोविएत, पेत्रोग्रादच्या कामगारवर्गाच्या आणि शिबंदीच्या विजयी क्रांतीला सलाम करीत आहे व या उठावामध्ये जनतेने दाखविलेल्या ऐक्यावर, संघटनावर, शिस्तीवर आणि संपूर्ण सहकार्यावर विशेष जोर देत आहे; इतके कमी रक्त क्वचित सांडले आहे आणि असा उठाव क्वचित यशस्वी झाला आहे.

"सोविएत ठामपणे आपली धारणा व्यक्त करीत आहे की, क्रांती कामगार आणि किसानांचे सरकार हे सोविएतांचे सरकार म्हणून निर्माण करील व ते सरकार गरीब शेतकऱ्यांच्या संपूर्ण समूहाच्या वतीने शहरी कामगारवर्गाला खात्रीलायक पाठिंबा देईल, समाजसत्तावादाकडे वाटचाल करील, कारण केवळ याच मार्गाने देशाला दैन्यापासून व युद्धाच्या अभूतपूर्व भयानकतेपासून वाचविणे शक्य आहे.

"सर्व युद्धग्रस्त राष्ट्रांशी न्याय्य आणि लोकशाहीवादी शांतता तहाचा नवे कामगार-किसानांचे सरकार ताबडतोब प्रस्ताव करील.

"मोठी जमीनदारी मालमत्ता ते ताबडतोब आपल्या ताब्यात घेईल आणि जमीन किसानांच्या हाती सोपवील. उत्पादनावर आणि तयार मालाच्या वाटपावर ते कामगारांचे नियंत्रण बसवील. सर्व बँकांवर एक सार्वत्रिक नियंत्रण बसवून त्यांचे सरकारी मक्तेदारीत रूपांतर करील.

"रशियातील कामगारांनी आणि किसानांनी आपल्या सर्व शक्तीनिशी व सर्व निष्ठेनिशी कामगारवर्गीय क्रांतीला पाठिंबा द्यावा, असे कामगार आणि सैनिक प्रतिनिधींचे पेत्रोग्राद सोविएत आवाहन करीत आहे. सोविएत आपला ठाम विश्वास प्रकट करीत आहे की, गरीब किसानांचे मित्र असलेले शहरातील कामगार, समाजसत्तावादाच्या विजयासाठी अपरिहार्य असलेली संपूर्ण क्रांतिकारक सुव्यस्था निर्माण करतील.

"सोविएतची खात्री पटली आहे की, पश्चिम युरोपीय देशांमधील कामगारवर्ग, समाजसत्तावादाचे उद्दिष्ट खऱ्या आणि चिरंतन विजयापर्यंत नेण्यास आम्हाला मदत करील."

"उठाव विजयी झाला असं वाटतं आपल्याला?"

त्यांनी आपले खांदे उडवले. "अजून खूप काही करायचं राहिलं आहे. खूपच... आत्ता कुठं सुरुवात होतेय..."

जिन्याच्या सपाटीवर माझी ट्रेड युनियनांचे उपाध्यक्ष रिआझानोव यांच्याशी गाठ पडली. त्यांचा चेहरा काळवंडला होता आणि आपली भुरकट दाढी ते कुरतडत होते. "हा शुद्ध वेडेपणा आहे! वेडेपणा!" ते ओरडले. "युरोपचा कामगारवर्ग मुळीच हालचाल करायचा नाही! सबंध रशिया—"

त्यांनी विक्षिप्तपणे हात झटकला आणि ते तरातरा जिना उतरून निघून गेले.

रिआझानोव आणि कामेनियेव या दोघांनीही उठावाला विरोध केला होता व त्याबद्दल त्यांना लेनिन यांच्या तिखट जिभेचे फटकारे अनुभवावे लागले होते.

ती फार महत्त्वाची बैठक होती. लष्करी क्रांतिकारक समितीच्या वतीने ट्रॉट्स्की यांनी घोषणा केली की, हंगामी सरकार इतःपर अस्तित्वात राहिले नव्हते.

ते म्हणाले होते, "लोकांना फसवणं हे भांडवलदारी सरकारांचं वैशिष्टय आहे. आम्ही, कामगारांच्या, सैनिकांच्या, किसानांच्या प्रतिनिधींची सोविएतं, इतिहासातला एक अभूतपूर्व प्रयोग करून पाहणार आहोत; आम्ही अशा एका सत्तेचा शोध लावणार आहोत की, जिचे उद्दिष्ट दुसरे तिसरे काही नसून केवळ सैनिकांच्या, कामगारांच्या आणि किसानांच्या गरजांचे समाधान करणं हे असेल."

लेनिन व्यासपिठावर उपस्थित झाले तेव्हा त्यांचे टाळयांच्या प्रचंड कडकडाटात स्वागत झाले. त्यांनी जागतिक सामाजिक क्रांतीचा उद्घोष केला... मग झिनोवियेव यांनी कणखरपणे म्हटले, "आज आम्ही आंतर-राष्ट्रीय कामगारवर्गाचं ऋण चुकतं केलं आहे, युद्धाला जबरदस्त दणका दिला आहे आणि सर्व साम्राज्यवाद्यांवर, विशेषतः विल्हेल्मसारख्या कसा-बावर वज्राघात केला आहे."

मग ट्रॉट्स्कींनी सांगितले की, उठावाचा विजय झाल्याच्या वार्ता तारा करून युद्धआघाडीवर कळवल्या आहेत, पण त्यांना उत्तर मात्र मिळालेले नव्हते. पेत्रोग्रादवर फौजा चालून येत आहेत असे बोलले जात होते आणि त्यांना सत्य सांगण्यासाठी प्रतिनिधीमंडळ पाठवण्याची आवश्यकता होती.

आरोळया उमटल्या – "सोविएतांच्या अखिल रशियन काँग्रेसची इच्छा तुम्ही गृहीत धरत आहात!"

ट्रॉट्स्की थंडपणे म्हणाले, "सोविएतांच्या अखिल रशियन काँग्रेसची इच्छा पेत्रोग्रादच्या कामगारांच्या आणि सैनिकांच्या उठावानं गृहीत धरलेली आहे!"

दाराशी गलका करणाऱ्या जमावाला बाजूला सारीत आम्ही सभेच्या मोठ्या हॉलमध्ये येऊन दाखल झालो. पांढऱ्या झुंबरांच्या खाली, खुर्च्यांच्या

रांगांवर, रांगाच्या दोन्ही बाजूंनी, प्रत्येक खिडकीच्या खालच्या चौकटीवर आणि व्यासपीठाच्या कडेलासुद्धा सर्व रशियातील कामगारांचे आणि सैनिकांचे प्रतिनिधी ठेचाठेच खच्चून बसले होते व अध्यक्षांची घंटी कधी वाजते याची आतुर स्तब्धतेने किंवा विलक्षण उत्साहाने वाट पहात होते. त्या हॉलमध्ये आंघोळ न केलेल्या मानवी शरीरांच्या घुसमटणाऱ्या उष्णतेविना इतर कोणतीही उष्णता नव्हती. सिगरेटच्या धुराचा दूषित निळसर लोट जमावातून वर उमटत होता आणि दाटलेल्या वातावरणात ओंठगून रहात होता. मधून मधून अधिकाऱ्यांपैकी कुणीतरी उठून व्यासपीठावर जात होते आणि धूम्रपान करू नये अशी कॉम्रेड मंडळींना विनंती करीत होते. मग धूम्रपान करणाऱ्यांसकट सर्वांचा एकच ओरडा उठायचा: "कॉम्रेडहो, धूम्रपान करू नका!" आणि लोक तसेच सिगरेटी ओढत रहायचे. ओबुखोव कारखान्यातील अराजकवादी प्रतिनिधी पेत्रोव्स्की यांनी आपल्याशेजारी मला बसायला जागा करून दिली. त्यांची दाढी वाढली होती, कपडे घाण झाले होते आणि लष्करी क्रांतिकारक समितीवर तीन रात्री अजिबात न झोपता काम केल्यामुळे त्यांच्या झोकांड्या जात होत्या.

व्यासपीठावर जुन्या केंद्रीय कार्यकारी समितीचे पुढारी बसले होते, खळबळणाऱ्या सोविएतांवर वर्चस्व गाजवण्याची त्यांची ही अखेरची वेळ होती, सोविएतांच्या पहिल्या दिवसांपासून त्यांनी सत्ता गाजवली होती आणि तीच सोविएते आता त्यांच्याविरुद्ध उठली होती. रशियन क्रांतीच्या पहिल्या कालखंडाची ती अखेर होती व या कालखंडात क्रांतीला अत्यंत सावधानपणे ठरीव मार्गांनी नेण्याचा या लोकांनी प्रयत्न केला होता... त्यांच्यातले तीन महाथोर तिथे नव्हते: केरेन्स्की खेडेगावांमधून, शहरांमधून धावत पळत युद्ध आघाडीकडे चालले होते, पण हा सारा प्रदेश उठावाने हादरत होता; वृद्ध गरुड छेइद्जे उद्धटपणे राजसंन्यास घेऊन आपल्या जॉर्जियाच्या पहाडीत निघून गेले होते आणि तिथे त्यांना क्षयाची बाधा झाली होती; आणि प्राणघातक आजाराने विद्ध झालेले महामनी त्सेरेतेली आपल्या तशाही अवस्थेत परत येऊन हरलेल्या उद्दिष्टासाठी आपल्या सुंदर वक्तव्याचा महापूर गाडणार होते. गोत्झ, दान, लीबेर. बग्दानोव, ब्रोइदो, फिलिपोव्स्की तिथे बसले होते—चेहरे फिके पडलेले, नजरा भकास बनलेल्या आणि संतापलेले. त्यांच्या खाली अखिल रशियन सोविएतांची दुसरी काँग्रेस उकळून खळमळत होती आणि त्यांच्या वर लष्करी क्रांतिकारक समिती तेजस्वी तडफेने काम करीत होती, उठावाची सारी सूत्रे तिच्या हाती होती आणि

तिचा आघात दूरवर पोहोचत होता... रात्रीचे १० वाजून ४० मिनिटे झाली होती.

सौम्य चेहऱ्याचे, टक्कल पडलेले, ढगळ लष्करी सर्जनच्या वेषातील दान घंटी वाजवीत होते. एकदम सर्वत्र शांतता पसरली, फक्त दरवाजाशी तक्रार करणाऱ्या आणि भांडणाऱ्या लोकांच्या आवाजानेच तेवढा शांततेचा भंग होत होता...

"आमच्या हाती सत्ता आली आहे," त्यांनी खिन्न आवाजात बोलायला आरंभ केला, एक क्षणभर ते थांबले आणि नंतर खालच्या सुरात बोलू लागले. "कॉम्रेडहो! सोविएतांची काँग्रेस अशा विलक्षण परिस्थितीत आणि अशा महत्त्वाच्या क्षणी भरते आहे की, केंद्रीय कार्यकारी समिती आपल्या-समोर राजकीय भाषण अनावश्यक का समजते ते तुम्हाला समजेल. मी केंद्रीय कार्यकारी समितीच्या अध्यक्षमंडळाचा सभासद आहे याची तुम्ही आठवण केलीत तर हे तुम्हाला अधिक स्पष्टपणे समजेल आणि आत्ता या क्षणाला आमचे पक्षातील सहकारी, तिकडे हेमंत प्रासादात तोफांच्या भडिमाराखाली भाजून निघत आहेत, केंद्रीय कार्यकारी समितीने त्यांना नेमून दिलेले कर्तव्य पार पाडताना आत्मसमर्पण करीत आहेत." (प्रचंड गोंधळ.) "कामगार आणि सैनिक प्रतिनिधींच्या सोविएतांच्या दुसऱ्या काँग्रेसच्या पहिल्या बैठकीचे उद्घाटन झाल्याचे मी जाहीर करतो!"

गोंधळात आणि पळापळीतच अध्यक्षमंडळाची निवड झाली. अवानेसोव यांनी जाहीर केले की, बोल्शेविक, डावे समाजवादी-क्रांतिकारक आणि मेन्शे-विक-आंतरराष्ट्रीयवादी यांच्यामध्ये झालेल्या समझोत्यानुसार प्रतिनिधींच्या प्रमाणावर अध्यक्षमंडळाची निवड करण्याचे ठरले होते. अनेक मेन्शेविक ताडकन उभे राहून निषेध नोंदवू लागले. एक दाढीवाला सैनिक त्यांना उद्देशून ओरडला, "आमचं बहुमत नव्हतं तेव्हा आम्हा बोल्शेविकांचं तुम्ही काय केलंत त्याची जरा आठवण करा!" निवडणुकीचा निकाल: १४ बोल्शे-विक, ७ समाजवादी-क्रांतिकारक, ३ मेन्शेविक आणि २ आंतरराष्ट्रीयवादी (गोर्कींच्या गटाचा). उजव्या आणि केंद्रवादी समाजवादी-क्रांतिकारकांच्या वतीने हेन्देलमान म्हणाले की, अध्यक्षमंडळात सहभागी होण्याची त्यांची इच्छा नाही; मेन्शेविकांच्या तर्फे खिंचुक तसेच म्हणाले; आणि मेन्शेविक-आंतरराष्ट्रीयवादी म्हणाले की, विशिष्ट गोष्टींची शहानिश होईपर्यंत ते सुद्धा अध्यक्षमंडळात सामील होऊ शकत नाहीत. तुरळक टाळ्या वाजल्या आणि शिट्ट्या ऐकू आल्या. एक आवाज उमटला, "पक्षद्रोह्यांनो, स्वतःला

समाजवादी म्हणवून घेता!" युक्रेनच्या प्रतिनिधींच्या एका सदस्याला अध्यक्ष-मंडळात त्यांच्या मागणीवरून एक जागा देण्यात आली. मग जुनी केंद्रीय कार्यकारी समिती खाली उतरली आणि त्यांच्या जागी ट्रॉट्स्की, कामेनियेव, लुनाचार्स्की, मादाम कल्लोनताय, नोगिन ही मंडळी विराजमान झाली... सबंध सभागृह उठून उभे राहिले आणि टाळ्यांचा गगनभेदी कडकडाट झाला. अवघ्या चार महिन्यांपूर्वी हेच बोल्शेविक म्हणजे तिरस्काराला आणि अवहेलनेला पात्र झालेला एक छोटा संप्रदाय* होता; पण आता त्यांनी एवढी उंच भरारी मारली होती की, उठावाच्या लाटेवर आरूढ झालेल्या महान रशियाचे कर्णधारपद, हे सर्वोच्च स्थान, त्यांच्याकडे आले होते.

कामेनियेव म्हणाले, दिवसाच्या कार्यक्रमाचा पहिला मुद्दा होता सत्तेचे संघटन; दुसरा युद्ध आणि शांतता व तिसरा घटनात्मक सभा. लोझोव्स्की उठून उभे राहिले आणि त्यांनी घोषित केले की, सर्व गटांच्या ब्यूरोच्या मतैक्यानुसार, पेत्रोग्राद सोविएतचा अहवाल ऐकून त्याच्यावर चर्चा करण्याचा ठराव करण्यात आला होता, त्यानंतर केंद्रीय कार्यकारी समितीच्या सदस्यांना आणि पक्षांच्या प्रतिनिधींना बोलायला द्यावयाचे आणि अखेरीस दिवसाच्या कार्यक्रमाकडे जायचे.

पण अचानक एक नवा आवाज लोकांच्या कोलाहलाला मागे सारून ऐकू आला. हा आवाज सातत्याने येत होता, अस्वस्थ करणारा होता – तोफांची धडाडधूम जाणवत होती. लोकांनी अस्वस्थपणे अंधारल्या खिडक्यांकडे पाहिले. त्यांना एकप्रकारचा उन्माद चढल्यासारखा झाला. मार्तोव यांनी बोलण्याची परवानगी मागितली आणि बसक्या आवाजात ते म्हणाले, "कॉम्रेड्हो! यादवी युद्ध सुरू होतंय! शांततामय तडजोडीनं अरिष्ट मिटवणं हा पहिला प्रश्न आहे. तत्त्वतः आणि राजकीय दृष्टिकोनातून, यादवी युद्ध टाळण्याच्या साधनांबाबत आपण तातडीने चर्चा केली पाहिजे. आपल्या बांधवांना रस्त्यांमध्ये गोळ्या घातल्या जात आहेत! या क्षणाला, सोविएतांची काँग्रेस सुरू होण्यापूर्वी, एका क्रांतिकारक पक्षानं रचलेल्या लष्करी कटाच्या साह्यानं सत्तेचा प्रश्न सोडवला जात आहे –" एक क्षणभर त्यांचा आवाज गोंगाटाच्या वर पोचेना. "सर्व क्रांतिकारक पक्षांनी वस्तुस्थितीला दाद दिलं पाहिजे! काँग्रेससमोर पहिला प्रश्न हा सत्तेचा प्रश्न आहे आणि हा

---

*पान ३९ वरील संपादकीय टीप पहा.

प्रश्न शस्त्रांच्या बळावर आधीच रस्त्यांवर सोडवला जातोय! आपण अशी सत्ता निर्माण केली पाहिजे, जिला सबंध लोकशाहीची मान्यता मिळेल. क्रांतिकारक लोकशाहीचा आवाज सर्वश्रेष्ठ ठरला पाहिजे असं जर काँग्रेसला वाटत असेल, तर उद्भवणाऱ्या यादवी युद्धासमोर हात जोडून स्वस्थ बसून तिनं चालणार नाही, कारण या यादवीमधून महाभयानक प्रतिक्रांती घडण्याची शक्यता आहे. संयुक्त लोकशाही सत्ता स्थापन करण्यातच शांततामय फलनिष्पत्तीची शक्यता आहे... इतर समाजवादी पक्षांबरोबर आणि संघटनांबरोबर वाटाघाटी करण्यासाठी आपण एक प्रतिनिधीमंडळ निवडले पाहिजे..."

तोफांच्या धडाक्याचा घुसमटता लयबद्ध आवाज खिडक्यांमधून ऐकू येत होता आणि प्रतिनिधी एकमेकांवर किंचाळत होते... अशा प्रकारे अंधारामध्ये, तोफखान्याच्या धडधडाटात, तिरस्काराच्या, भीतीच्या आणि बेदरकार साहसाच्या भावनांच्या कल्लोळात, नव्या रशियाचा जन्म होत होता.

डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांनी आणि संयुक्त सामाजिक-लोकशाहीवाद्यांनी मार्तोव यांच्या प्रस्तावाला पाठिंबा दिला. तो मंजूर करण्यात आला. एका सैनिकाने जाहीर केले की, अखिल रशियन किसान सोविएतांनी आपले प्रतिनिधी काँग्रेसला पाठवण्यास नकार दिला आहे; त्याने सुचवले की, औपचारिक निमंत्रण घेऊन एका समितीला पाठवावे. "काही प्रतिनिधी हजर आहेत," तो म्हणाला. "त्यांना मताधिकार द्यावा असा मी ठराव मांडतो." त्याचा प्रस्ताव मान्य झाला.

कप्तानाची फीत खांद्यावर लावलेल्या खराश यांनी मोठ्या आवेशाने बोलण्याची परवानगी मागितली. "या काँग्रेसचं नियंत्रण करणाऱ्या राजकीय भोंदूंनी" ते ओरडून म्हणाले, "आम्हाला सांगितलं की, आम्ही सत्तेच्या प्रश्नाचा निर्णय लावणार होतो—आणि त्याचा निर्णय आमच्या पाठीशी, काँग्रेस सुरू होण्यापूर्वी लावला जात आहे! हेमंत प्रासादावर प्रहार होत आहेत आणि या अशा प्रहारांद्वारं, ज्या राजकीय पक्षानं हे साहस करण्याचा धोका पत्करला आहे त्याच्या शवपेटिकेवर खिळे ठोकले जात आहेत!" एकच गलका माजला. त्यांच्यानंतर गार्रा* बोलायला उठले. "आम्ही इथं शांततेसंबंधी वाटाघाटी करतोय आणि तिथं रस्त्यांवर लढाई चाललीय... जे काही घडतंय त्यात सहभागी व्हायला समाजवादी-क्रांति-

---

*'प्रावदा'नुसार हे शब्द खराश यांचे आहेत.—सं.

कारक आणि मेन्शेविक ठाम नकार देत आहेत आणि सत्ता काबीज करण्याच्या या प्रयत्नाला प्रतिकार करावा असं सर्व सार्वजनिक शक्तींना आवाहन करीत आहेत..." १२ व्या सेनादलाचे आणि त्रुदोविकांचे प्रतिनिधी कूचिन म्हणाले: "फक्त माहिती देण्यापुरतं मला इथं पाठवण्यात आलं आहे आणि मी ताबडतोब परत युद्धआघाडीवर जाणार आहे. तिथं सर्व सेना समित्यांचं असं मत आहे की, घटनात्मक सभेच्या अधिवेशनाला अवघे तीन आठवडे उरले असता सोविएतांनी सत्ता आपल्या हाती घेणं म्हणजे सेनेच्या पाठीत खंजीर खुपसण्यासारखं आहे आणि लोकांचा घोर अपराध करणं आहे!" मध्येच ओरडा झाला: "खोटं आहे! तुम्ही खोटं बोलता!.." पुन्हा त्यांचे बोलणे ऐकू येऊ लागले, "या पेत्रोग्रादमधल्या साहसाची अखेर करू या! देशाला आणि क्रांतीला वाचवण्यासाठी सर्व प्रतिनिधींनी या हॉलबाहेर पडावं असं मी आवाहन करतो!" कानठळ्या बसवणाऱ्या ओरड्याच्या आवाजात ते आपल्या कडेच्या खुर्चीकडे बसायला व्यासपीठावरून खाली उतरले तेव्हा धमक्या देत लोकांनी त्यांना घेरण्याचा प्रयत्न केला... त्यानंतर लांब भुरी दाढीवाले खिनचुक* नांवाचे अधिकारी सौम्य आणि समजूतदार आवाजात बोलू लागले: "युद्धआघाडीवरच्या प्रतिनिधींच्या वतीनं मी बोलतो. या काँग्रेसमध्ये सैन्याचं प्रतिनिधित्व पुरेसं नाही, शिवाय यावेळी, घटनात्मक सभेच्या अधिवेशनाला अवघे तीन आठवडे राहिले असता सोविएतांची काँग्रेस भरणं आवश्यक होतं असं सैन्याला वाटत नाही–"एव्हाना ओरडा आणि पाय आपटणे कमालीचे वाढले होते. "सोविएतांच्या काँग्रेसला पुरेसे आवश्यक अधिकार आहेत असं सैन्याला वाटत नाही–" त्यासरशी सबंध हॉलमध्ये सैनिक भराभरा उठून उभे राहू लागले.

"तुम्ही कुणाच्या बाजूनं बोलताहात? तुम्ही कुणाचे प्रतिनिधी?" ते ओरडले.

"पाचव्या सेनेच्या सोविएतची मध्यवर्ती कार्यकारी समिती, दुसरी एफ्-रेजिमेंट, पहिली एन्-रेजिमेंट, तिसरी-रायफल्स... यांच्याकडून..."

"तुमची निवड केव्हा झाली? तुम्ही अधिकाऱ्यांचे प्रतिनिधी आहात,

---

*जॉन रीड यांनी खिनचुक यांच्या तोंडचे भाषण म्हणून जे उद्धृत केले आहे ते इतर वृत्तपत्रांनी कूचिन यांच्या भाषणाचा पुढील भाग म्हणून छापले होते.–सं.

सैनिकांचे नव्हेत! सैनिकांचं यावर काय म्हणणं आहे?" हेटाळणीचे सूर उमटले व शिटया वाजल्या.

"जे काही घडलं आणि जे काही घडत आहे त्याची जबाबदारी आमचा युद्धआघाडीवरचा गट नाकारत आहे. क्रांतीच्या मुक्तीसाठी सर्व आत्मजाणीव असलेल्या क्रांतिकारक शक्तींनी एकवटणं आवश्यक आहे असं आमचं मत आहे! युद्धआघाडीचा गट काँग्रेस सोडून जाईल... लढण्याची जागा रस्त्यांवर आहे!"

निषेधाच्या जोरदार आरोळ्या उठल्या. "तुम्ही वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या वतीनं बोलताय – सैन्याच्या नव्हे!"

"सर्व सुजाण सैनिकांनी ही काँग्रेस सोडून निघावं असं मी आवाहन करतो!"

"कोर्निलोववादी! प्रतिक्रांतिकारक! प्रक्षोभक!" अशी शेलकी विशेषणे त्यांच्या दिशेने भिरकावण्यात आली.

त्यानंतर मेन्शेविकांच्या वतीने खिनचुक यांनी जाहीर केले की, समाजाच्या सर्व थरांमध्ये ज्याला पाठिंबा मिळेल असे नवे मंत्रिमंडळ बनविण्यासाठी हंगामी सरकारबरोबर वाटाघाटी सुरू करणे एवढी एकच शांततामय उपाययोजनेची शक्यता होती. त्यांना त्यानंतर अनेक मिनिटेपर्यंत पुढे बोलणे अशक्य ठरले. अक्षरशः ओरडेपर्यंत आवाज ताणून त्यांनी मेन्शेविकांची एक घोषणा वाचली:

"इतर गटांशी आणि पक्षांशी सल्लामसलत न करता बोल्शेविकांनी पेत्रोग्राद सोविएतच्या मदतीने लष्करी कट केला असल्याने, काँग्रेसमध्ये राहणे आम्हाला अशक्य ठरले आहे, म्हणून आम्ही बाहेर पडत आहोत आणि इतर गटांनीही आमच्या पाठोपाठ बाहेर पडावे व परिस्थितीची चर्चा करण्यासाठी एकत्र भेटावे असे आवाहन करीत आहोत!"

"पळपुटे!"

लोक जोरात ओरडले. त्यानंतर समाजवादी-क्रांतिकारकांच्या वतीने हेन्देलमान बोलत होते तेव्हा त्यांना वारंवार अडथळे करण्यात येत होते व हेमंत प्रासादावर चाललेल्या तोफांच्या भडिमाराविरुद्ध निषेध करणारे त्यांचे भाषण अधूनमधून ऐकू येत होते... "अशा प्रकारच्या अंदाधुंदीला आमचा विरोध आहे..."

ते व्यासपीठावरून खाली उतरतात न उतरतात तोच एक तरुण,

रोड चेहऱ्याचा सैनिक ताडकन उडी मारून वर चढला. त्याचे डोळे विलक्षण चकाकत होते. त्याने मोठ्या नाट्यपूर्ण रीतीने हात वर केला :

"कॉम्रेडहो!" तो ओरडला आणि एकदम शांतता पसरली. "माझं आडनांव पेटेरसोन – दुसऱ्या लात्वियन रायफल्सच्या वतीनं मी बोलतोय. सेना समित्यांच्या दोन प्रतिनिधींची निवेदनं आपण ऐकलीत; ही निवेदनं करणारे जर सैन्याचे प्रतिनिधी असते तर त्यांच्या बोलण्याला काही किंमत असती –" प्रचंड टाळ्यांचा कडकडाट. "पण ते सैनिकांचे प्रतिनिधी नाहीत!" वळलेल्या मुठी हलवीत तो म्हणाला. "महान सोविएतच्या आणि सेना समितीच्या फेरनिवडणुका घ्याव्यात म्हणून बाराव्या सेनेचा कधीपासूनचा आग्रह चाललाय, पण तुमच्या केंद्रीय कार्यकारी समितीप्रमाणंच आमच्या समितीनंही सप्टेंबरच्या अखेरीपर्यंत जनतेच्या प्रतिनिधींची बैठक बोलावण्याचं नाकारलं, म्हणून दरम्यान प्रतिगामी लोकांना आपल्या खोट्या प्रतिनिधींची काँग्रेससाठी निवड करणं शक्य झालं असतं. मी आत्ता तुम्हाला सांगतो, लात्वियाच्या सैनिकांनी अनेक वेळेला म्हटलंय, 'अधिक ठराव नकोत! अधिक बडबड नको! आम्हाला कृती हवी – सत्ता आमच्या हाती हवी!' या ढोंगी प्रतिनिधींना खुशाल काँग्रेस सोडून जाऊ दे! सेना त्यांच्या पाठीशी नाही!"

सबंध हॉलमध्ये अभिनंदनपर आरोळ्यांचा आवाज निनादत राहिला. अधिवेशनाच्या पहिल्या काही क्षणांमध्ये, एकामागून एक घडणाऱ्या घटनांनी स्तंभित झाल्याने, तोफांच्या आवाजांनी बिचकल्याने, प्रतिनिधींना थोडे घुटमळल्यासारखे झाले होते. जवळ जवळ एक तासभर त्या व्यासपीठावरून त्यांच्यावर घणाचे घाव बसत होते, त्या घावांनी ते एकत्र सांधले जात होते, पण त्यांना चेचले जात होते. मग ते एकाकी उभे होते? रशिया त्यांच्याविरुद्ध उठत होता? सैन्य पेत्रोग्रादवर चाल करून येत आहे हे खरे होते? मग या चकचकीत डोळ्याच्या सैनिकाने भाषण केले आणि सत्य काय आहे याची प्रतिनिधींना एकदम जाणीव झाली... **हा सैनिकांचा आवाज होता** – गणवेषातले लक्षावधी उसळणारे कामगार आणि किसान ही त्यांच्यासारखीच माणसे होती, त्यांचे विचार आणि भावना सारख्याच होत्या...

आणखी काही सैनिक बोलले... मग ग्झेलशाख यांनी युद्धआघाडीवरच्या प्रतिनिधींच्या वतीने जाहीर केले की, या प्रतिनिधींनी अगदी थोड्या बहुमताच्या जोरावर काँग्रेसचा त्याग करण्याचा निर्णय घेतला होता, कारण

गटांनुसार प्रतिनिधित्व न देता राजकीय पक्षांनुसार द्यावे असे मत असल्याने **बोल्शेविक सदस्यांनी त्या मतदानात भागसुद्धा घेतला नव्हता.** ते म्हणाले, "आघाडीवरचे शेकडो प्रतिनिधी सैनिकांच्या मतदानाशिवायच निवडले गेलेत, कारण सेना समित्या इत:पर सर्वसामान्यांच्या प्रतिनिधी राहिलेल्या नाहीत..." लुक्यानोव ओरडून म्हणाले की, खराश आणि खिनचुकसारखे अधिकारी या काँग्रेसमध्ये सैनिकांचे प्रतिनिधित्व करू शकत नाहीत – फक्त सेनाधिकाऱ्यांचे प्रतिनिधित्व करू शकतात. "खंदकामध्ये खरेखुरे जीवन घालविणाऱ्यांची मनापासून इच्छा आहे की, सत्ता सोविएतांच्या हाती देण्यात यावी आणि त्यांच्या त्यापासून खूप अपेक्षा आहेत! .." वातावरणाचा रोख बदलत चालला होता.

त्यानंतर ज्यू सामाजिक-लोकशाहीवाद्यांची संस्था बुंद हिच्या वतीने अब्रामोविच बोलायला उठले. चष्म्याच्या जाड काचांमधून त्यांचे डोळे रागाने खदिरांगारासारखे चमकत होते.*

"पेत्रोग्रादमध्ये आत्ता* जे काही चालले आहे ती अगदी भीषण दुर्घटना आहे! मेन्शेविक आणि समाजवादी-क्रांतिकारक यांच्या घोषणेशी बुंद गट सहमत होत आहे आणि तो काँग्रेसचा त्याग करील!" त्यांनी आपला आवाज उंचावला आणि हातही उंचावला. "रशियन कामगारवर्गाबाबत आमचे जे कर्तव्य आहे ते आम्हाला इथं स्वस्थ बसू देत नाही आणि या अपराधांना आम्ही जबाबदार राहू शकत नाही. हेमंत प्रासादावरचा भडिमार थांबत नसल्यानं, मेन्शेविक आणि समाजवादी-क्रांतिकारकांबरोबर, तसेच किसान सोविएतांच्या कार्यकारी समितीबरोबर नगरपालिकेच्या दूमानं ठरवलं आहे की, हंगामी सरकारबरोबर आपणही नष्ट होऊन जायचं. म्हणून आम्हीही त्यांच्याबरोबर जात आहोत! नि:शस्त्र अवस्थेत आम्ही आमच्या छात्या दहशतवाद्यांच्या मशिनगनांसमोर उघड्या करू... या काँग्रेसच्या सर्व प्रतिनिधींना आम्ही आमच्याबरोबर बोलवत आहोत –" उरलेले भाषण ऐकूच केले नाही, कारण पन्नास प्रतिनिधी उठून गर्दीतून वाट काढीत बाहेर जाऊ लागले तेव्हा सभागृहात शिट्ट्यांचे, धमक्यांचे आणि शिव्यागाळीचे प्रचंड वादळ उठले.

कामेनियेव यांनी घंटी बडवून दटावले, "आपापल्या जागी बसून रहा

---

*अब्रामोविच आणि एरलिख यांच्या भाषणांना उद्धृत करताना जॉन रीड यांनी बहुधा नांवाची गडबड केली आहे. – सं.

आणि आम्ही आपले काम करू!" ट्रॉट्स्की संतापाने थरथरत उभे राहिले. त्यांची मुद्रा कठोर दिसत होती. आपल्या गहनगंभीर आवाजात अत्यंत थंड्या तिरस्काराने ते म्हणाले, "या तथाकथित समाजवादी तडजोडवाद्यांना, या भित्र्या मेन्शेविकांना, समाजवादी-क्रांतिकारकांना, बुंदवाल्यांना खुशाल जाऊ दे! त्यांना एवढे वाळीत टाकलेले आहे की इतिहासाच्या पालापाचोळ्यात ते केव्हाच उडून जातील!"

बोल्शेविकांच्या वतीने रिआझानोव यांनी निवेदन केले की, नगर दूमाच्या विनंतीवरून, लष्करी क्रांतिकारक समितीनं हेमंत प्रासादावर वाटाघाटींसाठी एक प्रतिनिधीमंडळ पाठवले आहे. "अशा प्रकारे रक्तपात टाळण्यासाठी आम्ही शक्य ते सर्व काही केलंय..."

आम्ही तेथून घाईने निघालो. फक्त जाता जाता क्षणभर लष्करी क्रांतिकारक समितीच्या कचेरीच्या खोलीत डोकावलो. तिथे तुफान वेगाने काम चालले होते, धापा टाकणारे निरोप्ये येत होते आणि जात होते, शहराच्या सर्व कोनाकोपऱ्यांत कमिस्सारांना सर्व अधिकार देऊन पाठवण्यात येत होते, टेलिफोनोग्राफांची अखंड खटखट चालू होती. दार उघडले गेले आणि शिळपट हवेचा व सिगरेटच्या धुराचा झोत एकदम बाहेर आला. एका आडोसा लावलेल्या दिव्याखाली नकाशा पसरलेला होता व त्यावर काही पिंजारलेल्या केसांचे लोक झुकून बोलत असलेले आमच्या दृष्टीस पडले... फिकट सोनेरी झुलुपांच्या हसतमुख तरुण कॉम्रेड जोसेफोव-दुखविन्स्कीने आमचे पास तयार करून दिले.

आम्ही त्या थंडगार रात्रीच्या वातावरणात बाहेर आलो तेव्हा स्मोल्नीचे संपूर्ण पुढचे आवार म्हणजे येणाऱ्या आणि जाणाऱ्या मोटारींचा एक प्रचंड तळ बनला होता. तेथील मोटारींच्या वर्दळीच्या आवाजातूनही दूरवरचा तोफांचा धडधडाट मंद सुरात ऐकू येत होता. एक खूप मोठी ट्रक उभी होती आणि तिच्या इंजिनाच्या घरघराटबरोबर तिचे सर्वांग थरथरत होते. काही लोक तिच्यामध्ये गठ्ठे फेकत होते आणि ज्यांच्याजवळ बंदुका होत्या ते लोक ते पकडत होते.

"तुम्ही कुठं निघालात?" मी ओरडून विचारले.

"शहरात — सगळीकडं — सर्व ठिकाणी!" एका बुटक्या कामगाराने हसत उत्तर दिले व मोठ्या उत्साहाने हातवारे केले.

आम्ही आमचे पास दाखवले. "चला आमच्याबरोबर!" त्यांनी बोलावले. "पण तिथं कदाचित गोळीबार होईल" — आम्ही ट्रकमध्ये चढलो;

खाडकन क्लच सोडताच एक मोठा हिसका घेऊन ट्रक पुढे झेपावली आणि जे मागून चढत होते त्यांच्यावर आम्ही कोसळलो; आतल्या आणि बाहेरच्या गेटांजवळच्या शेकोटचा व त्यांच्या उजेडात बसलेले रायफलधारी सैनिकांचे लालबुंद चेहरे झरंकन डोळ्यांसमोरून गेले; आणि आम्ही तुफान वेगात झोकांडचा खात सूवोरोव्स्की प्रॉस्पेक्तवरून निघालो... एका माणसाने एका गठ्ठ्यावरचे वेष्टन फाडले आणि ओंजळभर कागदांची चळत हवेत फेकायला आरंभ केला. आम्ही त्याचे अनुकरण केले. त्या गडद अंधारातून रस्त्यावरून तुफान वेगाने सुसाटत जात असताना आमच्यामागे फडफडत उडणाऱ्या पांढऱ्या कागदांचा एक पट्टा उमटत होता. अपरात्री रस्त्यावरून तुरळकपणे जाणारा पादचारी त्या कागदांना उचलून पहायला थांबत होता. चौकांमध्ये शेकोटचांजवळ उभे असलेले गस्तवाले हात वर करून ते कागद पकडायला धावत होते. काही वेळा सशस्त्र लोक आमच्यापुढे अंधारात उभे असलेले दिसायचे आणि "थांब!" म्हणून शस्त्रे उगारून ओरडायचे, पण आमचा ड्रायव्हर काहीतरी आम्हाला न समजणारे शब्द ओरडायचा आणि आम्ही तसेच सुसाट धडधडत पुढे जायचे. मी त्या कागदाची एक प्रत उचलली आणि रस्त्यावरच्या मिणमिणत्या दिव्याच्या उजेडात वाचले:

**रशियातील नागरिकांनो!**

"हंगामी सरकारला सत्ताभ्रष्ट करण्यात आले आहे. पेत्रोग्राद कामगारांच्या आणि शिबंदीच्या मूर्धन्स्थानी असलेल्या, कामगार आणि सैनिक प्रतिनिधींच्या पेत्रोग्राद सोविएतचे एक अंग असलेल्या, लष्करी क्रांतिकारक समितीच्या हाती राज्याची सत्ता देण्यात आली आहे.

"लोकशाहीवादी तत्त्वावर ताबडतोब शांतता तहाची बोलणी करणे, जमिनीवरचे जमीनदारांचे हक्क रद्द करणे, उत्पादनावर कामगारांचे नियंत्रण प्रस्थापित करणे व सोविएत सरकारची निर्मिती करणे ह्या उद्दिष्टासाठी जनता लढत होती व हे उद्दिष्ट सुरक्षितपणे साध्य झाले आहे.

"कामगार, सैनिक आणि किसान यांची क्रांती चिरायू होवो!

**लष्करी क्रांतिकारक समिती.**
**कामगार आणि सैनिक**
**प्रतिनिधींची पेत्रोग्राद सोविएत."**

माझ्या शेजारी बसलेला एक तिरप्या डोळ्यांचा, मंगोल धाटणीच्या चेहऱ्याचा, बकरीच्या कातड्याचे बिनबाह्याचे जाकीट घातलेला माणूस एकदम म्हणाला: "सांभाळून! इथं प्रक्षोभक नेहमी खिडक्यांमधून गोळीबार करतात! . ." आम्ही झ्नामेन्स्की चौकात वळलो. तिथे संपूर्ण अंधार होता आणि तो निर्मनुष्य होता. त्रुबेत्स्कोयच्या रानवट पुतळ्याला* वळसा घालून विस्तृत नेव्स्की रस्त्यावर आलो. ट्रकमध्ये तीन लोक रायफली रोखून रस्त्याच्या दुतर्फा खिडक्या न्याहाळत होते. आमच्या मागे रस्त्याला जणू जाग आली होती. लोक सैरावैरा धावत होते, आडोशाला लपत होते. आता तोफांचा आवाज ऐकू येत नव्हता आणि जसजसे आम्ही हेमंत प्रासादाच्या नजीक पोहोचत होतो, तसे रस्ते अधिक शांत आणि अधिक निर्जन बनलेले दिसत होते. नगर दूमाची इमारत दिव्यांनी झगमगली होती. तिच्या पलिकडे लोकांचा एक भला मोठा जमाव उभा होता आणि खलाशांची एक रांग आम्हाला थांबण्याचा इशारा देत होती. आमच्या ट्रकचा वेग मंदावला आणि आम्ही खाली उतरलो.

समोरचे दृश्य चकित करणारे होते. येकातेरीनिन्स्की कालव्याच्या कोपऱ्याशी, एका झगझगीत दिव्याखाली, हत्यारबंद खलाशांची एक साखळी नेव्स्की रस्त्यावर उभी होती आणि चार चारांच्या रांगेने येणाऱ्या लोकांच्या जमावाला तिने रस्ता अडवला होता. त्या जमावात सुमारे तीन-चारशे लोक होते, लांब कोटातली माणसे होते, उत्तम पोषाखातल्या स्त्रिया होत्या, अधिकारी होते. सर्व प्रकारचे आणि सर्व थरातले लोक होते. त्यांच्यातील काँग्रेसमधले काही प्रतिनिधी आम्ही ओळखले. मेन्शेविक आणि समाजवादी-क्रांतिकारकांच्या पुढाऱ्यांचा त्यात समावेश होता; किसानांच्या सोविएतांचे गडपातळ, लाल दाढीवाले अध्यक्ष अव्क्सेन्तियेव; केरेन्स्कींचे प्रवक्ता सरोकिन, खिनचूक, अब्रामोविच; त्या सर्वांच्या अग्रभागी पेत्रोग्रादचे महापौर, पांढरी दाढीवाले वयोवृद्ध श्रायडर होते व त्याच सकाळी अटक होऊन सुटका झालेले हंगामी सरकारचे पुरवठा मंत्री प्रकोपोविच होते. 'रशियन डेली न्यूज'चे** वार्ताहर माल्किन माझ्या नजरेला पडले. "हेमंत प्रासादात मरायला चाललोय," ते मजेत ओरडून म्हणाले. मिरवणूक जागच्या जागी थांबली होती, पण तिच्या अग्रभागी मोठमोठ्याने वादविवाद चाललेले ऐकू

---

*झार तिसऱ्या अलेक्सांदरच्या स्मारकाचा हा संदर्भ आहे. —सं.

**१९१७ मध्ये पेत्रोग्रादमधून प्रसिद्ध होणारे इंग्रजी वृत्तपत्र. —सं.

येत होते. त्या खलाशांचा मुख्य भासणाऱ्या एका धिप्पाड खलाशावर श्रायडर आणि प्रकोपोविच बेंबीच्या देठापासून ओरडत होते.

"आम्हाला पुढं जायची परवानगी द्या!" ते ओरडत होते. "हे कॉम्रेड सोविएतांच्या काँग्रेसमधून आलेत पहा! त्यांची कार्डं पहा! आम्ही हेमंत प्रासादाकडं चाललो आहोत! .."

तो खलाशी गोंधळल्याचे उघडपणे दिसत होते. आपल्या भल्या मोठ्या पंजाने त्याने स्वतःचे डोके करकरा खाजवले आणि कपाळाला आठ्या घालीत तो म्हणाला: "हेमंत प्रासादाकडं कुणालाही जाऊ द्यायचं नाही, असा मला समितीचा हुकूम आहे," तो गुरगुरला. "पण तरीही, स्मोल्नीला टेलिफोन लावायला मी एका कॉम्रेडला पाठवतो..."

"आम्हाला पलिकडं जाऊ द्या अशी आम्ही ठाम मागणी करतो! आम्ही निःशस्त्र आहोत! तुम्ही परवानगी द्या अथवा न द्या, आम्ही पुढं जाणार!" भावनातिरेकाने म्हातारे श्रायडर ओरडले.

"पण मला हुकूम आहे—" खलाशाने चिडून पुनरुच्चार केला.

"पाहिजे तर आमच्यावर गोळ्या झाडा! आम्ही पुढं जाणार! चला पुढं!" सगळीकडून आवाज उमटले. "रशियनांवर आणि कॉम्रेडांवर गोळ्या झाडण्याची तुमची हिंमत असली, तर आम्ही मरायला तयार आहोत. तुमच्या बंदुकांसमोर आम्ही आमच्या छात्या उघड्या करतो!"

"नाही नाही!" तो खलाशी ठामपणे म्हणाला, "मी तुम्हाला पुढं जायला परवानगी देऊ शकत नाही."

"आम्ही पुढं गेलो तर तुम्ही काय कराल? गोळ्या झाडाल?"

"नाही, ज्यांच्याजवळ बंदुका नाहीत त्यांच्यावर मी गोळ्या झाडणार नाही. निःशस्त्र रशियन जनतेवर आम्ही गोळ्या झाडत नाही..."

"आम्ही पुढं जाणार! काय कराल तुम्ही?"

"आम्ही काही तरी करू," खलाशी उत्तरला. पण तो गोंधळात पडल्याचे स्पष्ट दिसत होते. "आम्ही तुम्हाला पुढं जाऊ देणार नाही. आम्ही काहीतरी करू..."

"काय कराल तुम्ही? काय कराल?"

आणखी एक चिडलेला खलाशी तिथे येऊन म्हणाला, "आम्ही तुमची चांगली कणीक तिंबून काढू!" पुढे तो दमदारपणे ओरडून म्हणाला, "आणि वेळ पडली तर गोळ्यासुद्धा घालू. आता आपापल्या घरी चालते व्हा आणि आम्हाला थोडी शांतता लाभू द्या!"

त्यासरशी जमावात एकच गोंधळ माजला आणि संतापाची तीव्र लाट पसरली. प्रकोपोविच कुठल्याशा एका खोक्यावर उभे राहिले आणि हातातली छत्री हलवीत त्यांनी भाषण ठोकले :

"कॉम्रेडहो आणि नागरिकांनो !" ते म्हणाले. "आमच्याविरुद्ध बळाचा वापर केला जात आहे ! या अडाण्यांचे हात आम्ही आमच्या निर्दोष रक्तानं माखू देणार नाही ! या स्विचमनांकडून ("स्विचमच" म्हणजे त्यांना काय म्हणायचे होते ते मला कधीही समजलेले नाही) रस्त्यात गोळया खाऊन मरणं हे आमच्या प्रतिष्ठेला काळिमा आणणारं आहे. आपण दूमाकडं परत जाऊ या आणि देशाला व क्रांतीला वाचवण्याचे उत्तम उपाय कोणते याची चर्चा करू या !"

त्यानंतर ही मिरवणूक अत्यंत गंभीर शांततेने मागे फिरली आणि चार चार लोकांच्या रांगांनी नेव्स्कीवरून परत गेली. या प्रसंगी रक्षकांचे ध्यान दुसरीकडे आहेसे पाहून आम्ही हळूच सटकलो आणि हेमंत प्रासादाच्या दि-शेने निघालो.

इथे मात्र ठार अंधार होता आणि जिवावर उदार झालेल्या सैनिकांच्या व लाल रक्षकांच्या गस्तींशिवाय दुसरी कोणतीही हालचाल दिसत नव्हती. कझान कॅथेड्रलच्या समोर भर रस्त्यात एक तीन इंची तोफ पडली होती व घरांच्या छपरांवरून शेवटचा गोळा डागल्यानंतर बाजूला कलंडली होती. प्रत्येक दरवाजात उभे राहून सैनिक एकमेकांशी बोलत होते आणि पोलीस पुलाच्या दिशेने रोखून पहात होते. मला एकाचा आवाज ऐकू आला : "आपण चूक केली असण्याची शक्यता आहे..." प्रत्येक कोपऱ्यावर रस्त्या-वरून येणा-जाणाऱ्यांना गस्तवाले हटकत होते – आणि या गस्तवाल्यांची रचना मोठी स्वारस्यपूर्ण केली होती ; नेहमीच्या फौजी सैनिकांचा म्होरक्या हा हटकून एक लाल रक्षक होता... गोळीबार थांबला होता.

आम्ही मोर्स्काया रस्त्यावर आलो न आलो तोच कुणीतरी ओरडले : "युंकरांनी निरोप पाठवलाय की, आपण त्यांच्याकडं जाऊन त्यांना बाहेर काढून आणावं अशी त्यांची इच्छा आहे !" हुकमांचे आवाज ऐकू येऊ लागले आणि त्या दाट अंधारात एका मोठ्या जथ्याची आकृती पुढे हलताना आम्हाला दिसली. पावलांच्या आवाजाशिवाय आणि शस्त्रास्त्रांच्या किणकिणा-टाशिवाय दुसरा कोणताही आवाज ऐकू येत नव्हता. आम्ही पहिल्या रांगे-तल्या शिपायांबरोबर चालू लागलो.

एखाद्या काळया नदीप्रमाणे आम्ही सारा रस्ता व्यापून चाललो होतो.

कोणतीही गाणी न गाता किंवा आरोळ्या न ठोकता आम्ही लाल कमानीतून आत घुसलो. माझ्या पुढचा माणूस दबत्या आवाजात म्हणाला: "कॉम्रेडहो, सावधान! त्यांच्यावर विश्वास ठेवू नका! ते नक्की गोळीबार करतील!.." उघडद्यावरच्या जागेत आम्ही पळायला आरंभ केला व खाली वाकून धावत धावत अलेक्सांदर स्तंभाच्या चबुतऱ्याशी दाटीवाटीने जमलो.

"तुमच्यापैकी किती जणांना त्यांनी ठार मारलं?" मी विचारले.

"मला ठाऊक नाही. सुमारे दहा..."

काही मिनिटेपर्यंत तेथे दबून बसल्यानंतर शेकडो लोकांची ती सेना विश्वासल्यासारखी झाली आणि कोणत्याही हुकूमाविना अचानक तिने पुन्हा पुढे धावायला आरंभ केला. एव्हाना हेमंत प्रासादाच्या गवाक्षांमधून येणाऱ्या प्रकाशकिरणांच्या उजेडात मी पाहू शकत होतो की, धावणाऱ्या लोकात पहिले दोनशे किंवा तीनशे लाल रक्षक होते. त्यांच्यात सैनिक अगदी तुरळते होते. लाकडांचे अडथळे आम्ही ओलांडले आणि दुसऱ्या बाजूला युंकरांनी टाकून दिलेल्या रायफलींच्या ढिगांवर आम्ही अडखळलो तेव्हा विजयोन्मादाची गर्जना उमटली. मुख्य गेटाचे दोन्ही दरवाजे सताड उघडे होते आणि प्रकाशाचा लोट बाहेर येत होता. समोरच्या लाकडाच्या प्रचंड अडथळ्यापलिकडून हू की चू आवाज येत नव्हता.

उत्साहाने धावणाऱ्या माणसांच्या लाटेबरोबर आम्ही उजव्या अंगाच्या प्रवेशद्वारातून आत वाहवत गेलो. तिथून पुढे राजवाड्याच्या पूर्व भागातले एक खूप मोठे महिरपीदार तळघर होते आणि त्यातून अनेक व्हरांडे व जिने फुटले होते. तिथे अनेक मोठमोठी बंद खोकी पडली होती. लाल रक्षक आणि सैनिक मोठ्या त्वेषाने त्यांच्यावर तुटून पडले व बंदुकीच्या दस्त्यांनी ती खोकी फोडून त्यांनी गालिचे, पडदे, चादरी, चिनी मातीच्या बशा, काचसामान इत्यादी वस्तू बाहेर काढल्या. एक माणूस आपल्या खांद्यावर ब्राँझचे एक घड्याळ घेऊन मोठ्या ऐटीत मिरवत गेला; दुसऱ्या एकाला शहामृगाच्या पिसांचा झुपका मिळाला तो त्याने आपल्या टोपीत तुरा म्हणून खोवला. लुटालुटीला नुकता आरंभ होत होता तोच कुणीतरी ओरडले, "कॉम्रेडहो! कशालाही हात लावू नका! काहीही घेऊ नका! ही जनतेची मालमत्ता आहे!" ताबडतोब वीस आवाज एका पाठोपाठ एक उमटले: "थांबा! सर्व वस्तू जागच्या जागी परत ठेवा! काहीही घेऊ नका! मालमत्ता आहे!" लुटालूट करणाऱ्यांचा अनेक हातांनी तात्काळ बंदोबस्त केला. ज्यांच्या हाती वेलबुट्टीदार भरजरी वस्त्रे किंवा पडदे होते, त्यांच्या-

कडून ते हिसकावून परत घेण्यात आले. दोन लोकांनी ब्राँझचे घड्याळ परत आणले. घाईघाईने त्या सर्व वस्तू खोक्यांमध्ये पुन्हा कशाबशा कोंबण्यात आल्या आणि काही सैनिक आपण होऊन पहाऱ्यावर उभे राहिले. व्हरांड्यामधून आणि वर जिन्यांमधून दूरपर्यंत आरोळ्यांचा आवाज मंद मंद होत जात होता, "क्रांतिकारक शिस्त! जनतेची मालमत्ता..."

आम्ही मागे वळून डाव्या अंगाला पश्चिमी बाजूला गेलो. तिथेही सुव्यवस्था स्थापन करण्यात येत होती. "राजवाड्यातून बाहेर निघा!" आतल्या दरवाजातून मुंडके बाहेर काढीत लाल रक्षक खेकसले. "कॉम्रेडहो, आपण चोर आणि लुटारू नाही हे दाखवून देऊ या. जोपर्यंत आम्ही पहारे-चौक्या बसविल्या नाहीत तोपर्यंत कमिस्सार सोडून सारेजण राजवाड्याच्या बाहेर पडा! .."

दोन लाल रक्षक, एक सैनिक आणि एक अधिकारी हातात पिस्तुले घेऊन उभे होते. त्यांच्या मागे दुसरा एक सैनिक हातात पेन व कागद घेऊन टेबलाशी बसला होता. "सगळे बाहेर चला! बाहेर निघा!" अशा आरोळ्या दूरवर आणि आसपास ऐकू येत होत्या. एकमेकांना धक्के देत, तक्रारी करीत, वादविवाद घालीत सैनिक भराभरा दरवाजाबाहेर पडू लागले. प्रत्येक माणूस बाहेर येताच, स्वयंस्फूर्तीने स्थापन केलेली एक समिती, त्याचा ताबा घेत होती व त्याचे खिसे आणि कोट चाचपून पहात होती. उघड उघडपणे त्याच्या मालकीच्या नसलेल्या वस्तू त्याच्याकडून काढून घेण्यात येत, टेबलाशी बसलेला माणूस त्याची नोंद करी आणि त्या वस्तू शेजारच्या छोट्या खोलीत नेऊन ठेवण्यात येत. अनेक चित्रविचित्र वस्तू अशा रीतीने जप्त करण्यात आल्या: छोटे पुतळे, शाईदाने, शाही चिन्हे विणलेले पलंगपोस, मेणबत्त्या, एक छोटे तलचित्र, मेजावरचे टिपकागद, सोनेरी मुठीच्या तलवारी, साबणाच्या वड्या, हरतऱ्हेचे कपडे, कांबळी. एका लाल रक्षकाजवळ तीन रायफली होत्या, त्यातल्या दोन त्याने युंकरांपासून घेतलेल्या होत्या; एकाजवळ लिखित दस्तऐवजांनी ठासून भरलेले चार पोर्टफोलिओ होते. गुन्हेगार एक तर चिडून वस्तू परत करत होते किंवा लहान मुलांसारख्या सबबी सांगत होते. समितीचे सभासद एकाच वेळी बोलत होते आणि समजावून सांगत होते की, जनतेच्या हितकर्त्यांनी चोरी करणे कमीपणाचे होते; अनेकवेळा असे घडत होते की, ज्यांच्याजवळ वस्तू पकडल्या होत्या, तेच लोक नंतर मागे फिरून इतर कॉम्रेडांची तपासणी करण्यात मदत करीत होते.[2]

तीन किंवा चाराच्या गटांनी युंकर बाहेर आले. समितीचे लोक त्यांच्यावर अतिउत्साहाने तुटून पडले आणि त्यांची तपासणी करताना मधून मधून शेरे मारीत होते, "चिथावणीखोर लेकाचे! कोर्निलोवचे पाठराखे! प्रतिक्रांतिकारक! जनतेचे खुनी!" मात्र कोणत्याही प्रकारचो हिंसा करण्यात आली नाही तरी युंकरांचे भीतीने धाबे दणाणलेले होते. त्यांचे खिसेही छोटचा छोटचा लुटींनी भरलेले होते. त्या सर्व वस्तू लेखनिक काळजीपूर्वक नोंदवत होता आणि नंतर छोटचा खोलीत त्या वस्तूंना नेऊन ठेवण्यात येत होते... युंकरांना निःशस्त्र केले होते. "आता पुन्हा जनतेविरुद्ध कधी शस्त्र उगाराल?" चारी बाजूंनी त्यांना ओरडून विचारण्यात येत होते.

"नाही," एका पाठोपाठ एक युंकर उत्तरत होता. त्यानंतर त्यांना मोकळे सोडून देण्यात येत होते.

आम्ही आत जाऊ शकतो का, असे आम्ही विचारले. समितीचे लोक दोलायमान होते, पण एका तगडचा लाल रक्षकाने ठामपणे नकार दिला. "आपण आहात कोण?", त्याने विचारले. "तुम्ही सर्वजण केरेन्स्कीच्या पक्षाचे कशावरून नसाल?" (आम्ही पाचजण होतो, त्यात दोन महिला होत्या.)

"कॉम्रेडहो, वाट द्या!" जमावाला बाजूला हटवीत एक सैनिक आणि एक लाल रक्षक दाराशी आले. इतर रक्षक संगीनधारी होते. त्यांच्या पाठोपाठ नागरी पोषाखातील अर्धा डझन माणसे एका रांगेन चालत आली — हंगामी सरकारचे सदस्य. त्यांच्यात पहिले किश्किन होते. त्यांचा चेहरा ओढलेला व फिकट दिसत होता; नंतर फरशीवर नजर लावलेले पण चिडलेले रूटेनबर्ग; त्यानंतर आजूबाजूला तीक्ष्ण नजरेने पहात येणारे तेरेश्चेन्को; त्यांनी आमच्याकडे थंड नजरेने टक लावून पाहिले... ते सर्व मुकाटचाने गेले. विजयी उठावखोरांनी त्यांना पहायला गर्दी केली, पण रागाचे उद्‌गार मात्र तुरळक ऐकू आले. नंतर आम्हाला समजले की तिकडे रस्त्यावर लोक त्यांना ठार मारायला टपून बसले होते व काही गोळ्याही झाडण्यात आल्या, पण खलाशांनी त्यांना सुरक्षितपणे पीटर-पॉल किल्ल्यात नेले...

दरम्यान कुणाकडूनही अडवले न जाता आम्ही राजवाडचात गेलो. अद्याप आत बरीच वर्दळ चालू होती, त्या मोठचा वास्तूच्या नव्याने आढळलेल्या भागांचा कसून शोध चालला होता, अस्तित्वात न राहिलेल्या युंकरांच्या लपलेल्या शिबंदीची शोधाशोध चालू होती. आम्ही वरच्या मजल्यांवर



लेफ्टनंट श्मिड्ट यांचे नांव दिलेल्या चिलखती गाडीवर पुतिलोव कारखान्यातील लाल रक्षक, ऑक्टोबर १९१७



'नोवी लेग्नेर' कारखान्यातील लाल रक्षक, वीबोर्ग विभाग, पेत्रोग्राद

गेलो आणि एका पाठोपाठ एक दालने पार करू लागलो. राजवाड्याच्या या भागात नेवा नदीच्या बाजूने आलेल्या तुकड्यांनीही प्रवेश केला होता. त्या मोठ्या शाही दालनांमधील चित्रांना, पुतळ्यांना, पडद्यांना, उंची उबदार पांघरुणांना अजिबात धक्का लावलेला नव्हता; पण कचेऱ्यांच्या खोल्यांमधले मात्र प्रत्येक मेज आणि कपाट धुवून काढण्यात आले होते, सर्वत्र कागदांची पखरण झाली होती; राहत्या खोल्यांमधले पलंग उघडे-बोडके केले होते, कपड्यांची कपाटे सताड उघडी पडली होती. कपडे ही सर्वात मोठी मौल्यवान लूट होती आणि कामकरी जनतेला कपड्यांची नितांत आवश्यकता होती. फर्निचर साठवून ठेवलेल्या एका खोलीत आम्ही गेलो तेव्हा दोन सैनिक खुर्च्यांवरची मौल्यवान स्पॅनिश कातडी आवरणे फाडून काढण्यात गुंतले होते. बूटांसाठी त्या कातड्याची त्यांना गरज होती असा त्यांनी खुलासा केला...

निळ्या, तांबड्या आणि सोनेरी गणवेषातील राजवाड्यातील जुने नोकर घाबरलेल्या अवस्थेत उभे होते आणि जुन्या सवयीने म्हणत होते— "हुजूर, आपणाला तिकडं जाता येणार नाही! तिकडं मनाई आहे—" अखेरीस आम्ही सोनेरी आणि गर्द हिरव्या मॅल्काईटच्या दालनात पोचलो. किनखापी पडदे टांगलेल्या या दालनात हंगामी सरकारचे मंत्री रात्रंदिवस बैठकीत गुंतलेले होते व इथेच दरवानांनी त्यांचा विश्वासघात करून त्यांना लाल रक्षकांच्या ताब्यात दिले. त्यांना अटका झाल्यानंतर ते तिथून निघून गेले त्यावेळी लांबलचक मेजावर पडलेले लोकरी गरम कापडाचे आच्छादन तसेच होते. प्रत्येक मोकळ्या खुर्चीसमोर दौत-टाक आणि कागद होते; त्या कागदांवर कारवायांच्या योजनांचे आरंभ खरडलेले होते, घोषणांचे आणि जाहीरनाम्यांचे कच्चे मसुदे होते. त्यांपैकी बहुतेक मसुदे खोडलेले होते, कारण त्यांचे वैय्यर्थ स्पष्ट होऊन चुकले होते आणि उरलेल्या आच्छादनावर विमनस्कपणे चितारलेल्या भूमितीमधील आकृत्या होत्या; एका पाठोपाठ एक असे वेगवेगळे मंत्रीमहाशय जेव्हा आपल्या मनोराज्यांच्या योजना मांडीत होते, तेव्हा कुणा सभासदांनी विमनस्क, निराश मन:स्थितीत त्या आकृत्या चितारल्या होत्या. कोनोवालोव यांच्या हस्ताक्षरात चितारलेला एक कागद उचलून मी वाचला: "हंगामी सरकार सर्व वर्गांना आवाहन करीत आहे की, त्यांनी हंगामी सरकारला पाठिंबा द्यावा—"

एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की, हेमंत प्रासादाला वेढा पडला होता त्यावेळी सुद्धा सरकारचे युद्धआघाडीशी आणि रशियातील इतर प्रांतां-

शी सतत दळणवळण होते. त्या दिवशी सकाळीच बोल्शेविकांनी युद्ध खात्याची इमारत ताब्यात घेतली होती, पण वरच्या माळयावरची लष्करी तारखात्याची कचेरी त्यांना ठाऊक नव्हती, तसेच हेमंत प्रासादाशी खाजगी टेलिफोनचे असलेले दळणवळण माहीत नव्हते. त्या पोटमाळयावरच्या छोट्या खोलीत बसून एक तरुण अधिकारी सबंध दिवसभर अख्ख्या रशियामध्ये आवाहनांचा आणि घोषणांचा तारयंत्राद्वारे पाऊस पाडत होता; राजवाड्याचा पाडाव झाल्याचे जेव्हा त्याला समजले तेव्हा त्याने डोक्यावर टोपी चढवली आणि अत्यंत शांतपणे तो इमारतीबाहेर पडला...

आम्ही घडामोडींचे निरीक्षण करण्यात एवढे रमलो होतो की, आमच्या भोवतालच्या सैनिकांचा आणि लाल रक्षकांचा आमच्याकडे पाहण्याचा दृष्टिकोन बदलला आहे याची जाणीवच झाली नाही. आम्ही जसजसे एका दालनातून पुढच्या दालनात जात होते तसतसा एक छोटा गट आमच्या पाठोपाठ येत होता. अखेरीस ज्या चित्रसज्जामध्ये आम्ही युंकरांबरोबर एक दुपार घालवली होती त्या दालनात जाऊन पोहोचलो तेव्हा सुमारे शंभर लोक आमच्या मागोमाग आले. एक धिप्पाड सैनिक आमची वाट अडवून उभा राहिला. शंकेने आणि रागाने त्याचा चेहरा निळाकाळा झाला होता.

"कोण आहात तुम्ही?" तो गुरकावला. "इथं काय करताहात?" इतर लोक हळूहळू आमच्या भोवती गोळा झाले. आमच्याकडे रोखल्या नजरांनी पहात उद्‌गार काढू लागले "चिथावणीखोर!" कुणीतरी बोलल्याचे मी ऐकले. "लुटारू!" मी चटकन आमच्याजवळचे लष्करी क्रांतिकारक समितीने दिलेले पास दाखवले. सैनिकाने सावधपणे ते हातात घेतले, उलटसुलट पाहिले आणि मूढपणे त्यांच्याकडे नजर टाकली. तो निरक्षर होता हे स्पष्ट दिसत होते. त्याने ते परत केले आणि तो फरशीवर रागाने थंकला. "कागद!" संतापाने तो म्हणाला. या दरम्यान भोवतालचे लोक हळूहळू आमच्याभोवतालचा वेढा आवळत चालले होते. पायी चालणाऱ्या गुराख्याभोवती उन्मत्त झालेल्या गुरांनी रिंगण धरावे तसे! त्या जमावामागे हताश मुद्रेने उभे राहिलेल्या एका अधिकाऱ्याकडे माझी नजर गेली आणि मी त्याला हाक मारली. लोकांना बाजूला सारीत तो आमच्या दिशेने येऊ लागला.

"मी कमिस्सार आहे," तो मला म्हणाला. "आपण कोण आहात? काय भानगड आहे?" बाकीचे वाट पहात गप्प बसून राहिले. मी कागदपत्र पुढे केले. "तुम्ही परदेशी आहात?" त्याने चटकन फ्रेंचमध्ये विचारले.

"फार धोक्याची बाब आहे..." मग आमचे कागदपत्र हातात उंच धरून लोकांकडे वळून तो ओरडून म्हणाला, "कॉम्रेडहो! हे आपले परदेशातले कॉम्रेड आहेत – अमेरिकेहून आलेले. कामगारवर्गीय सेनेच्या शौर्याबद्दल आणि क्रांतिकारक शिस्तीबद्दल आपल्या देशबांधवांना सांगता यावं म्हणून ते मुद्दाम इथं आलेत!"

"हे तुम्हाला कसं समजलं?" तो धिप्पाड सैनिक म्हणाला. "मी खात्रीपूर्वक तुम्हाला सांगतो की ही माणसं चिथावणीखोर आहेत! कामगारवर्गाच्या सैन्याची क्रांतिकारक शिस्त बघायला ते आलेत असं म्हणतात, पण ते सबंध राजवाडाभर मोकाट फिरताहेत. कशावरून त्यांचे खिसे लुटींची भरलेले नसतील?"

"बरोबर!" इतर फिस्कारले आणि आणखी पुढे रेटू लागले.

"कॉम्रेडहो! माझं ऐका!" आता त्या अधिकाऱ्याच्या कपाळावर घामाचे थेंब चमकू लागले होते. "लष्करी क्रांतिकारक समितीचा मी कमिसार आहे. माझ्यावर तुमचा विश्वास आहे ना? तर मग मी तुम्हाला सांगतो की, माझ्या पासावर ज्यांनी सह्या केल्यात त्यांच्याच सह्या या लोकांच्या पासांवर आहेत!"

त्याने आम्हाला राजवाड्यामधून बाहेर नेले व नेवाच्या किनाऱ्याच्या बाजूला उघडणाऱ्या दाराजवळ आम्ही पोचलो. तेथे खिसे तपासणारी ती समिती उभी होतीच...

"तुम्ही अगदी थोडक्यात बचावलात," आपल्या चेहऱ्यावरचा घाम पुसीत तो अधिकारी वारंवार पुटपुटत होता.

"महिलांच्या पलटणीचं काय झालं?" मी विचारले.

"कोण – त्या बायका!" तो हसला. "त्या साऱ्याजणी एका मागच्या खोलीत लपून बसल्या होत्या. त्यांचं काय करायचं हे ठरवता ठरवता आमच्या नाकी नऊ आले. त्यांच्यापैकी अनेकींना उन्मादवायू चढला. अखेरीस आम्ही त्यांना फिन्लंड स्टेशनापर्यंत चालवत नेलं आणि लेवाशेवोला जाणाऱ्या आगगाडीत त्यांना बसवलं. तिथंच त्यांची छावणी आहे..."[3]

आम्ही बाहेर गारठलेल्या रात्रीत आलो. वातावरण दबले, घाबरलेले होते, अज्ञात सेनांच्या हालचालींचे पुसटते आवाज येत होते, गस्तींच्या शिपायांच्या आरोळ्या भेदून जात होत्या. नदीपलिकडे अस्पष्ट दिसणाऱ्या पीटर-पॉलच्या अजस्र छायेकडून एक घोगरी आरोळी आली... खाली पाऊलवाटेवर राजवाड्याच्या कंगोऱ्यांच्या गिलाव्याचा चुना विखुरला होता.

'आव्रोरा' युद्धनौकेवरच्या दोन तोफगोळ्यांचा तेथे मार बसला होता; तोफांच्या भडिमारात राजवाड्याचे फक्त एवढेच नुकसान झाले होते...*

आता पहाटेचे तीन वाजून गेले होते. नेव्स्की रस्त्यावरचे सर्व दिवे पुन्हा पेटले होते, तोफ दिसत नव्हती आणि शेकोट्यांभोवती बसकण मारून बसलेले सैनिक व लाल रक्षक, एवढीच काय ती लढाईची खूण शिल्लक उरली होती. शहर शांत होते – कदाचित त्याच्या इतिहासात ते एवढे शांत कधीच नसेल; त्या रात्री एकही वाटमारी झाली नाही, एकही चोरी झाली नाही.

पण नगर दूमाची इमारत मात्र दिव्यांनी झगमगत होती. आम्ही सज्जावाल्या अलेक्सांदर हॉलमध्ये गेलो. तिथे मोठ्या, सोनेरी चौकटी-तल्या, लाल कपड्यांनी झाकलेल्या शाही तसबिरी लटकत होत्या. व्यास-पीठाभोवती सुमारे शंभर लोक गोळा झाले होते आणि स्कोबेलियेव बोलत होते. त्यांनी आग्रहाने प्रतिपादन केले की, सार्वजनिक सुरक्षा समितीचा विस्तार करावा, म्हणजे सर्व बोल्शेविकविरोधी कटांना एका प्रचंड संघटनेत एकत्र आणता येईल व तिला देशाचे आणि क्रांतीचे रक्षण करणारी समिती, असे नांव द्यावे. आम्ही तेथे पहात उभे असताना ही रक्षक समिती स्थापन झाली. हीच समिती पुढच्या आठवड्यात बोल्शेविकांची अत्यंत प्रभावी शत्रू बनणार होती, कधी आपल्या गनिमी नांवाने वावरणार होती, तर कधी केवळ सार्वजनिक सुरक्षा समिती या बिगर-गनिमी नांवाने काम करणार होती...

दान, गोत्झ, अव्क्सेन्तियेव तेथे होते, काही बंडखोर सोविएत प्रति-निधी होते, किसान सोविएतांच्या कार्यकारी समितीचे सदस्य, म्हातारे प्रकोपोविच आणि प्रजासत्ताकाच्या मंडळाचे सभासदसुद्धा – ज्यात विनावेर आणि इतर कॅडेटांचा समावेश होता – तेथे होते. लीबेर यांनी आवेशाने म्हटले की, सोविएतांची कॉंग्रेस ही मुळी कायदेशीर कॉंग्रेसच नव्हती व जुनी

---

*'आव्रोरा' च्या तोफगोळ्यांचा हा संदर्भ चुकीचा आहे. ७ नोव्हेंबर १९१७ रोजी रात्री ९.४५ ला 'आव्रोरा' युद्धनौकेने एक रिकामी तोफगोळा उडवला. हेमंत प्रासादावर हल्ला चढविण्याचा तो संकेत होता. जॉन रीड यांनी उल्लेख केलेले नुकसान पीटर-पॉल गढीमधून केलेल्या तोफांच्या भडि-माराने झाले होते. – सं.

केंद्रीय कार्यकारी समिती अद्याप अधिकारावर होती... देशाला उद्देशून एका आवाहनाचा मसुदा करण्यात आला.

आम्ही एका बग्गीला बोलावले. "कुठं?" त्याने विचारले. पण आम्ही जेव्हा "स्मोल्नी" म्हणालो तेव्हा त्या बग्गीवाल्याने मान हलवली. "नाही!" तो म्हणाला, "तिथं सैतान आहेत..." खूप पायपीट केल्यानंतर अखेर आम्हाला एक बग्गीवाला मिळाला – त्याने आमच्याकडून तीस रूबल घेतले व दोन मोहल्ले अलिकडेच सोडले.

स्मोल्नीच्या खिडक्यांमध्ये अजून प्रकाश दिसत होता, मोटारींची ये-जा चालू होती आणि अद्याप पेटणाऱ्या शेकोटयांभोवती एकमेकांना चिकटून बसलेले पहारेकरी प्रत्येकाला ताजी खबर विचारीत होते. व्हरांडयांमध्ये लगबग करणाऱ्या माणसांची दाटी होती, त्यांच्या डोळ्यांभोवती काळी वर्तुळे पडली होती. काही समिती-कचेऱ्यांमध्ये लोक खालीच झोपले होते, त्यांच्या बंदुका शेजारी पडल्या होत्या. काही प्रतिनिधींनी सभात्याग केलेला होता तरी सभागृह लोकांनी खच्चून भरले होते, रोरावणाऱ्या सागरासारखे उसळत होते. आम्ही आत गेलो तेव्हा कामेनियेव अटक झालेल्या मंत्र्यांच्या नांवांची यादी वाचत होते. तेरेश्चेन्को यांच्या नांवाचा उच्चार झाला तेव्हा टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला, समाधानाच्या आरोळ्या उमटल्या, लोकांमध्ये हशा पिकला; रूटेनबर्ग यांच्या नांवाला तेवढा प्रतिसाद मिळाला नाही; पण पाल्चिन्स्की यांचे नांव घेताच शिट्टया, संतापयुक्त आरोळ्या, आनंदाचे चीत्कार यांचे जणू तुफान उसळले... चुद्नोव्स्की यांची हेमंत प्रासादाचे कमिस्सार म्हणून निवड झाल्याचे जाहीर करण्यात आले.

आता एकाएकी एक नाटयमय अडथळा निर्माण झाला. संतापाने वेडा-वाकडा चेहरा झालेल्या एका धिप्पाड दाढीवाल्या शेतकऱ्याने व्यासपीठावर चढून आपल्या मुठी अध्यक्षीय मंडळाच्या मेजावर दणादणा आपटल्या.

"हेमंत प्रासादात अटक केलेल्या समाजवादी मंत्र्यांची ताबडतोब सुटका करावी अशी आम्ही समाजवादी-क्रांतिकारक आग्रहपूर्वक मागणी करतो! कॉम्रेडहो! झारच्या जुलूमशाहीविरुद्ध लढताना ज्यांनी आपले प्राण आणि स्वातंत्र्य धोक्यात घातले, त्या चार कॉम्रेडांना स्वातंत्र्याचे ऐतिहासिक थडगे म्हणून ओळखण्यात येणाऱ्या पीटर-पॉल किल्ल्यात डांबून टाकण्यात आले आहे हे तुम्हाला माहीत आहे?"

त्या गोंधळात तो जोरजोराने मुठी आपटत होता आणि बेंबीच्या देठा-

पासून ओरडत होता. दुसरा एक प्रतिनिधी वर चढून त्याच्या शेजारी उभा राहिला आणि त्याने अध्यक्षमंडळाकडे बोट करून विचारले:

"बोल्शेविकांचे गुप्त पोलिस जनतेच्या पुढाऱ्यांचा छळ करीत असताना क्रांतिकारक जनतेचे प्रतिनिधी इथं स्वस्थ बसणार आहेत का?"

लोकांना शांत राहण्याच्या खुणा करीत ट्रॉट्स्की म्हणाले, "हे "कॉम्रेड" त्या साहसवादी केरेन्स्कीबरोबर हातमिळवणी करून सोविएतांना चिरडून टाकण्याचा कट करताना पकडले गेले आहेत. त्यांच्याशी नरमाईनं वागायचं काही कारण आहे का? १६ आणि १८ जुलै नंतर त्यांनी आमच्याशी फारशी चांगली वागणूक ठेवलेली नाही!" अत्यंत विजयी स्वरात ते ओरडले, "आता अबारोन्त्सी आणि कमकुवत मनाचे लोक निघून गेलेत आणि क्रांतीचं रक्षण करण्याचं, तिचं जतन करण्याचं संपूर्ण कार्य आमच्या खांद्यांवर येऊन पडलंय. आता एकच विशेषत्वानं करण्याची जरूरी आहे – काम – काम – आणि काम! शरण जाण्यापेक्षा मरण पत्करण्याचं आम्ही ठरवलंय! .."

त्यांच्यानंतर त्सारस्कोये सेलोहून आलेला एक कमिस्सार बोलायला उभा राहिला. तो धापा टाकीत होता आणि घोडदौड करून येताना सबंध चिखलाने माखला होता. "त्सारस्कोये सेलोची शिबंदी पेत्रोग्रादच्या वेशींपाशी डोळ्यात तेल घालून उभी आहे आणि सोविएतांचं आणि लष्करी क्रांतिकारक समितीचं रक्षण करायला सज्ज आहे!" आनंदप्रदर्शक जोरदार आरोळ्या. "आघाडीवरून पाठवलेली सायकल-तुकडी त्सारस्कोये सेलोमध्ये आलीय आणि सैनिक आता आमच्या बाजूनं आहेत; सत्ता सोविएतांच्या हाती असावी, किसानांच्या ताब्यात ताबडतोब जमिनी दिल्या पाहिजेत आणि कामगारांचं उद्योगधंद्यांवर नियंत्रण बसलं पाहिजे, हे त्यांना मान्य आहे. त्सारस्कोये इथं मुक्काम करून असलेली सायकलस्वारांची पाचवी बटालियन आमची आहे..."

त्यानंतर तिसऱ्या सायकल बटालियनचा प्रतिनिधी बोलायला उठला. तीन दिवसांपूर्वीच नैऋत्य आघाडीवरून सायकल-तुकडीला "पेत्रोग्रादच्या रक्षणाला" जाण्याचा हुकूम कसा देण्यात आला होता, त्याचे त्याने वर्णन केले तेव्हा श्रोते उन्मना अवस्थेत पोचले होते. पण त्या सायकल-तुकडीला या हुकुमामागे काहीतरी काळेबेरे असल्याचा संशय आला; पेरेदोल्सक स्टेशनाजवळ त्यांना त्सारस्कोयेच्या पाचव्या बटालियनचे प्रतिनिधी भेटले. त्यांची संयुक्त बैठक झाली तेव्हा असे आढळून आले की, "आपल्या बांध-

वांचं रक्त सांडायला, किंवा भांडवलदार-जमीनदारांच्या सरकारला पाठिंबा द्यायला सायकल-तुकडीतला एकही सैनिक तयार नाही!"

मेन्शेविक-आंतरराष्ट्रीयवाद्यांतर्फे कापेलिन्स्की यांनी ठराव मांडला की, यादवी युद्धावर शांततावादी उपाय शोधून काढण्यासाठी एका खास समितीची नेमणूक करावी. "त्यावर कोणताही शांततावादी उपाय नाही!" जमाव ओरडला. "विजय हाच एकमेव उपाय!" सर्वांचे मत उघड उघड विरोधी पडले आणि टवाळीचे टोमणे खात मेन्शेविक-आंतरराष्ट्रीयवाद्यांनी काँग्रेसचा त्याग केला. आता कोणतीही घबराटीची किंवा भीतीची भावना राहिली नव्हती... जाणाऱ्या मेन्शेविकांना उद्देशून कामेनियेव व्यासपीठावरून ओरडले, "मेन्शेविक-आंतरराष्ट्रीयवाद्यांनी 'शांततावादी उपाया'च्या प्रश्नावर 'आणीबाणी' निर्माण केली, पण ज्या गटांना काँग्रेस सोडून जायची इच्छा होती त्यांच्या बाजूनं या लोकांनी नेहमी सभा स्थगित करण्याच्या ठरावांना मतं दिलीत." कामेनियेव अखेरीस म्हणाले, "काँग्रेसचा त्याग करण्याचा बेत या फितुरांनी आधीपासूनच रचला होता हे स्पष्ट झाले आहे!"

या गटांच्या सभात्यागाकडे दुर्लक्ष करण्याचे सभेने ठरवले आणि सबंध रशियातील कामगारांना, सैनिकांना व किसानांना उद्देशून आवाहन तयार करण्याचे काम पुढे चालू केले:

**"कामगार, सैनिक आणि किसानहो!**

कामगार आणि सैनिक प्रतिनिधींच्या सोविएतांच्या दुसऱ्या अखिल रशिया काँग्रेसचे उद्घाटन झाले आहे. तिच्यात बहुसंख्य सोविएते सामील आहेत. किसानांचे प्रतिनिधीही मोठ्या संख्येने हजर आहेत... बहुसंख्य कामगार, सैनिक आणि किसान यांच्या इच्छेनुसार, पेत्रोग्रादच्या कामगार आणि शिबंदीच्या विजयी उठावावर आधारून, काँग्रेस सत्ताग्रहण करीत आहे.

हंगामी सरकार पदभ्रष्ट केले आहे. हंगामी सरकारच्या बहुतेक सभासदांना अटक करण्यात आली आहे.

सर्व राष्ट्रांशी ताबडतोब लोकशाहीवादी शांतता प्रस्थापित करण्याचा आणि सर्व आघाड्यांवर तात्काळ शस्त्रसंधी करण्याचा प्रस्ताव सोविएत सत्ता त्वरेने सादर करील. जमीनदारांची, राजघराण्याची आणि मठांची जमीन विनामोबदला भूमी-समित्यांच्या हवाली करण्याची, सैनिकांच्या हक्कांचे रक्षण करून सैन्यात संपूर्ण लोकशाहीकरण अंमलात आणण्याची, उत्पादनावर कामगारांचे नियंत्रण प्रस्थापित करण्याची, योग्य तारखेला घटना-

त्मक सभेचे अधिवेशन बोलावण्याची, शहरांना पावाचा पुरवठा करण्यासाठी व खेड्यांना अत्यावश्यक गरजेच्या वस्तूंचा पुरवठा करण्यासाठी उपाययोजना करण्याची आणि रशियामध्ये राहणाऱ्या सर्व राष्ट्रजमातींना स्वतंत्र अस्तित्वाच्या खऱ्या हक्काचा लाभ करून देण्याची, सोविएत सत्ता हमी देईल.

काँग्रेस ठराव करीत आहे: सर्व स्थानिक सत्ता कामगारांच्या, सैनिकांच्या आणि किसानांच्या प्रतिनिधींच्या सोविएतांच्या हाती देण्यात येईल व त्यांनी क्रांतिकारक सुव्यवस्था स्थापन केली पाहिजे.

खंदकातील सैनिकांना काँग्रेस आवाहन करीत आहे की, त्यांनी सावध आणि खंबीर रहावे. सर्व राष्ट्रांना थेटपणे प्रस्ताव मांडून लोकशाही तत्त्वावर शांतता तह नवे सरकार घडवून आणीपर्यंत, साम्राज्यवादाच्या सर्व हल्ल्यांना तोंड देऊन क्रांतीचे संरक्षण कसे करावयाचे याची क्रांतिकारक सेनेला माहिती आहे, अशी सोविएतांच्या काँग्रेसला खात्री आहे. मालमत्ताधारी वर्गांच्या संपत्तीला ताब्यात घेण्याचे व त्यांच्यावर कर बसविण्याचे ठाम धोरण अंमलात आणून त्याद्वारे क्रांतिकारक सेनेला आवश्यक असणाऱ्या सर्व गरजा पूर्ण भागविण्यासाठी आणि सैनिकांच्या कुटुंबांच्या कल्याणात सुधारणा करण्यासाठी नवे सरकार सर्व आवश्यक उपाययोजना करील.

केरेन्स्की, क़ालेदिन आणि इतर कोर्निलोववादी फौजा घेऊन पेत्रोग्रादवर चालून येण्याचे बेत करीत आहेत. केरेन्स्की यांच्याकडून फसवल्या गेलेल्या अनेक रेजिमेंट उठावखोर जनतेच्या बाजूने येऊन मिळाल्या आहेत.

**सैनिकांनो! कोर्निलोववादी केरेन्स्कीला कडवा प्रतिकार करा! सावध रहा!**

**रेलकामगारांनो! पेत्रोग्रादविरुद्ध केरेन्स्कीने पाठवलेल्या सर्व फौजी-आगगाड्या थांबवा!**

**सैनिकांनो, कामगारांनो, कचेरी कर्मचाऱ्यांनो! क्रांतीचे आणि लोकशाहीवादी शांततेचे भवितव्य तुमच्या हाती आहे!**

**क्रांती चिरायू होवो!**

**कामगार आणि सैनिक प्रतिनिधींच्या**
**सोविएतांची अखिल-रशियन काँग्रेस.**
**किसान सोविएतांचे प्रतिनिधी.***

---

*किसानांच्या एका प्रतिनिधीने मागणी केल्यानंतर, "किसान सोविएतांचे प्रतिनिधी" अशी सही समाविष्ट करण्यात आली.–सं.

अतिश्रमांनी दमल्यामुळे लटपटत व्यासपीठावर चढणारे क्रीलेन्को हातात तारेचा कागद घेऊन उभे राहिले तेव्हा बरोब्बर पहाटेची ५ वाजून १७ मिनिटे झाली होती.

"कॉम्रेडहो, उत्तरेच्या आघाडीवरून! बारावी सेना सोविएतांच्या काँग्रेसला शुभेच्छा पाठवीत आहे व जाहीर करीत आहे की, तिने आपली लष्करी क्रांतिकारक समिती स्थापन केली असून उत्तर आघाडीची सूत्रे आपल्या हाती घेतली आहेत!.." एकच गोंधळ माजला, लोक आनंदातिकाने रडू लागले, एकमेकांना मिठ्या मारू लागले. "जनरल चेरेमिसोव यांनी समितीला मान्यता दिली आहे – हंगामी सरकारच्या कमिस्सार वोयतिन्स्कींनी राजिनामा दिला!"

अशा प्रकारे लेनिन यांनी आणि पेत्रोग्रादच्या कामगारांनी उठावाचा निर्णय घेतला, पेत्रोग्राद सोविएतने हंगामी सरकारला उलथून टाकले व सत्तांतर घडवून त्याची जबाबदारी सोविएतांच्या काँग्रेसवर टाकली. आता सबंध महान रशिया जिंकायचा होता – आणि मग जग! रशिया अनुकरण करून उठाव करील का? आणि जग – ते काय करील? जनता प्रत्युत्तर देऊन उठाव करील का? एक लाल जागतिक लाट उसळेल काय?

सकाळचे सहा वाजले होते तरी बाहेर अद्याप अंधार होता आणि सपाटून गारठा पडला होता. निःस्तब्ध रस्त्यांवर फिकटसा प्रकाश हलकेच पाझरत होता, सैनिकांच्या शेकोटचा त्याच्यामुळे फिक्या पडत चालल्या होत्या, रशियावर एका महाभयानक भुरकट पहाटेची छाया पडत होती.

प्रकरण पाचवे

# जोरदार मुसंडी

गुरुवार तारीख ८ नोव्हेंबर. हा दिवस शहरात उजाडला तो मुळी जबरदस्त चैतन्य आणि गोंधळ घेऊन. झंझावाताच्या जोरदार लाटांमध्ये सारे राष्ट्र घुसळून निघत होते. वर वर पाहता सारे काही शांत होते. लक्षावधी माणसे नेहमीच्याच वेळी झोपी गेली होती, लौकर उठली होती आणि कामावर गेली होती. पेत्रोग्रादमध्ये ट्रामगाड्या पळत होत्या, दुकाने आणि रेस्तराँ उघडी होती, थिएटरे चालू होती, चित्रांच्या प्रदर्शनांच्या जाहिराती फडकल्या होत्या... सर्वसामान्य जीवनातील नित्याच्या सर्व गोष्टी – अगदी युद्धकाळातही त्याच त्या नेहमीच्या दिनचर्या – चालू होत्या. सामाजिक जीवनामध्ये जो जोम आहे त्यासारखे आश्चर्यकारक दुसरे काही नाही – अत्यंत दुर्धर प्रसंगांमध्येही ते टिकून राहते, खाणेपिणे व लेणे करते, स्वतःचे मनोरंजनही करून घेते...

केरेन्स्कींबद्दल अफवांचे पेव फुटले होते. त्यांनी आघाडी उभारली आहे व राजधानीवर प्रचंड सैन्यासह ते चालून येत आहेत असे बोलले जात होते. प्स्कोव येथे त्यांनी दिलेला आदेश 'वोल्या नरोदा'ने प्रसिद्ध केला होता :

> "बोल्शेविकांच्या पिसाट प्रयत्नाने निर्माण झालेल्या अव्यवस्थेमुळे देशाला संकटाच्या अगदी एका टोकाला नेऊन सोडले आहे आणि पितृभूमी ज्या भयानक कसोटीमधून जात आहे तिच्यावर मात करण्यासाठी आपल्या सर्व शक्तीनिशी आणि धैर्यानिशी प्रयत्न करण्याची, आपल्यापैकी प्रत्येकाच्या निष्ठेची नितांत गरज आहे.

"नवे सरकार स्थापन झाल्याची घोषणा होईपर्यंत – जर असे सरकार स्थापन झालेच तर – प्रत्येकाने आपल्या कामाच्या जागी राहून घायाळ रशियाबाबतचे आपले कर्तव्य चोखपणे बजावले पाहिजे. सध्याच्या सेनेच्या संघटनांमध्ये किंचितही ढवळाढवळ केल्यास शत्रूला आघाडी मोकळी मिळून कधीही भरून न येणारी अपरिमित हानी होण्याची शक्यता आहे, हे पक्के लक्षात ठेवले पाहिजे. म्हणून नव्या धक्क्यांपासून सैन्याला पूर्णपणे सुरक्षित ठेवून व सुव्यवस्था राखून, तसेच अधिकारी व त्यांचे कनिष्ठ यांच्यामध्ये संपूर्ण विश्वासाची भावना राखून, कोणत्याही परिस्थितीत फौजांचे नीतीधैर्य टिकवून धरणे अपरिहार्य आहे. देशाच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने मी हुकूम देत आहे की, जोपर्यंत प्रजासत्ताकाचे हंगामी सरकार आपली इच्छा जाहीर करीत नाही तोपर्यंत सर्व प्रमुखांनी आणि कमिस्सारांनी आपापल्या पदांवर रहावे, ज्याप्रमाणे मीही अद्याप सर्वोच्च सेनापतीचे पद सांभाळून आहे..."

याला उत्तरादाखल म्हणून सर्व भिंतींवर पुढील पोस्टर चिकटवलेले होते :

**"सोविएतांच्या अखिल रशियन काँग्रेसकडून**

"लष्करी क्रांतिकारक समितीने कोनोवालोव, किश्किन, तेरेश्चेन्को, मालियान्तोविच, निकितिन या माजी मंत्र्यांना व इतरांना अटक केली आहे. केरेन्स्की पळून गेलेत. केरेन्स्कींना ताबडतोब अटक करून त्यांची पेत्रोग्रादला रवानगी करण्याबाबत शक्य त्या सर्व उपाययोजना करण्याचे सर्व सेना संघटनांना हुकूम दिले आहेत. केरेन्स्कींना कोणत्याही प्रकारची मदत केल्यास तो राज्यसत्तेविरुद्धचा घोर अपराध मानण्यात येऊन त्याबद्दल कडक शासन केले जाईल."

सर्व अडथळे नाहीसे झाल्यामुळे लष्करी क्रांतिकारक समितीकडून हुकुमांचा, आवाहनांचा, जाहीरनाम्यांचा वर्षाव होत होता; समितीच्या अखंड भिरभिरणाऱ्या कार्यचक्रामधून उडणाऱ्या जणू त्या ठिणग्याच होत्या...[1] कोर्निलोव यांना पेत्रोग्रादमध्ये आणण्याचा हुकूम देण्यात आला. हंगामी सरकारने अटक केलेल्या किसान भूमी समित्यांच्या सदस्यांना मुक्त करण्यात आले. सैन्यामधील मृत्युदंडाची शिक्षा रद्द करण्यात आली. सरकारी कर्मचा-

त्यांनी आपली कामे पुढे चालू ठेवावीत असा आदेश देण्यात आला व त्यांनी नकार दिल्यास त्यांना कडक शासन करण्यात येईल अशी धमकी घालण्यात आली. सर्व प्रकारच्या लूटमारीला, गोंधळाला आणि सट्टेबाजीला मनाई करण्यात आली व हा आज्ञाभंग करणाऱ्यास मृत्यूची सजा ठोठावण्यात आली. वेगवेगळ्या खात्यांवर तात्पुरते कमिस्सार नेमण्यात आले: परराष्ट्र खाते — उरित्स्की आणि ट्रॉट्स्की; गृह आणि न्याय खाते — रीकोव; मजूर — श्ल्याप्निकोव; अर्थ — मेन्झिन्स्की; समाजकल्याण — मादाम कल्लोन्ताय; व्यापार, रस्ते आणि दळणवळण — रिआझानोव; नाविक — खलाशी कोर्बीर; टपाल आणि तार — स्पीरो; थिएटर — मुराविओव; सरकारी मुद्रणालय — देर्बीशेव; पेत्रोग्राद शहरासाठी — लेफ्टनंट नेस्तेरोव; उत्तर आघाडीसाठी — पोझेर्न.*

सेनेला लष्करी क्रांतिकारक समित्या स्थापन करण्याचे आवाहन करण्यात आले. रेलकर्मचाऱ्यांनी सुव्यवस्था राखावी व शहरांना आणि आघाडीला खाद्यपदार्थांचा पुरवठा करण्यात दिरंगाई करू नये, असे आवाहन करण्यात आले. त्या बदल्यात त्यांना रस्ते आणि दळणवळण खात्यात प्रतिनिधित्व देण्याचे आश्वासन देण्यात आले.

> “कझाक बंधूंनो! (एका घोषणेत म्हटले होते.) तुम्हाला पेत्रोग्रादवर चाल करून यायला त्यांनी सांगितलेय. राजधानीमधल्या क्रांतिकारक कामगारांविरुद्ध आणि सैनिकांविरुद्ध तुम्हाला ते बळजबरीने लढायला लावीत आहेत.
>
> “आपले समान शत्रू असलेल्या जमीनदारांच्या आणि भांडवलदारांच्या एकाही शब्दावर विश्वास ठेवू नका.
>
> “आमच्या काँग्रेसमध्ये रशियातील सर्व संघटित कामगार व सैनिकांचे आणि सुजाण किसानांचे प्रतिनिधी आहेत. श्रमजीवी कझाकांनी आपल्यात सामील व्हावे अशी काँग्रेसची इच्छा आहे. काळ्या टोळीचे

---

*प्रस्तुत ठिकाणी दिलेल्या तात्पुरत्या कमिस्सारांच्या नेमणुका संपूर्ण बरोबर नाहीत: परराष्ट्र खात्यावर फक्त उरित्स्की यांचीच नेमणूक केलेली होती; नाविक खाते नाविक लष्करी क्रांतिकारक समितीकडे सोपवले होते व ही समिती सोविएतांच्या अखिल रशियन काँग्रेसमध्ये सर्व काफल्यांच्या प्रतिनिधींमधून निवडलेली होती. — सं.

सेनापती, जमीनदारांचे आणि क्रूरकर्मा निकोलायचे हस्तक, आमचे शत्रू आहेत...

"कझाकांची जमीन जप्त करण्याची सोविएतांची इच्छा आहे, असे ते तुम्हाला सांगतात. हे खोटे आहे. फक्त मोठ्या कझाक जनीनदारांकडून क्रांती जमीन काढून घेईल आणि जनतेला ती वाटून टाकील.

"कझाक प्रतिनिधींची सोविएते स्थापन करा! कामगार आणि सैनिक प्रतिनिधींच्या सोविएतांबरोबर सामील व्हा!

"काळ्या टोळीच्या लोकांना दाखवून द्या की तुम्ही जनतेचा विश्वासघात करणारे नव्हेत, सबंध क्रांतिकारक रशियाच्या शिव्याशापांचे धनी व्हायची तुमची इच्छा नाही!..

"कझाक बंधूंनो, जनतेच्या शत्रूंच्या आज्ञांचे पालन करू नका...

"आमच्याशी वाटाघाटी करण्यासाठी तुमच्या प्रतिनिधींना पेत्रोग्रादला पाठवा...

"पेत्रोग्राद शिबंदीमधल्या कझाकांनी आपली प्रतिष्ठा राखून जनतेच्या शत्रूंच्या आशा धुळीला मिळवल्या...

"कझाक बंधूंनो! सोविएतांची अखिल रशिया काँग्रेस तुम्हाला बांधिलकीच्या भावनेने मदतीचा हात पुढे करीत आहे.

सर्व रशियातील सैनिकांशी, कामगारांशी आणि किसानांशी कझाकांचे बंधुत्व चिरायू होवो! *

दुसऱ्या बाजूला प्रचाराचे नुसते झंझावात उठले होते, अनेक घोषणांची भित्तीपत्रके चिकटवलेली होती, हस्तपत्रिका सर्वत्र विखुरल्या होत्या, वृत्तपत्रे आरडाओरडा करीत होती व अनिष्ट घडणार अशी भाकिते करीत होती. सर्व शस्त्रे आता सोविएतांच्या हाती गेल्यानंतर वृत्तपत्रीय पातळीवर लढाई सुरू झाली.

पहिल्याप्रथम, देशाच्या आणि क्रांतीच्या रक्षणासाठी स्थापन झालेल्या समितीतर्फे रशियात आणि युरोपात एक आवाहन प्रसारीत करण्यात आले:

---

*या आवाहनावर कामगार आणि सैनिक प्रतिनिधींच्या अखिल रशिया काँग्रेसची सही होती.—सं.

**“ रशियन प्रजासत्ताकातील नागरिकांनो !**

“ क्रांतिकारी जनतेच्या इच्छेला डावलून, ७ नोव्हेंबर रोजी पेत्रोग्रादच्या बोल्शेविकांनी कपटाने हंगामी सरकारच्या एका भागाला अटक करून प्रजासत्ताकाच्या मंडळाला विसर्जित केले व बेकायदेशीररीत्या आपली सत्ता जाहीर केली.

“ क्रांतिकारक रशियाला या क्षणी बाहेरून आत्यंतिक धोका असताना सरकारविरुद्ध केलेले हे हिंसक कृत्य म्हणजे पितृभूमीविरुद्ध केलेला महाघोर अपराध होय.

“ बोल्शेविकांच्या उठावाने राष्ट्रीय संरक्षणाच्या उद्दिष्टाला वर्मी टोला बसला आहे आणि आत्यंतिक इच्छित शांततेचा क्षण अपरंपार दूर घालविला गेला आहे.

“ बोल्शेविकांनी सुरू केलेल्या यादवी युद्धामुळे देश अराजकाच्या व प्रतिक्रांतीच्या खाईत लोटला जाण्याचा धोका निर्माण झाला आहे आणि प्रजासत्ताकीय राजवटीवर शिक्कामोर्तब करून लोकांच्या हाती जमिनी कायमच्या सोपवू इच्छिणाऱ्या घटनात्मक सभेला बंद पाडण्याचा धोका निर्माण केला आहे.

“ एकमेव वैध सरकारी सत्तेचे सातत्य राखून, देशाच्या व क्रांतीच्या रक्षक समितीतर्फे नवे हंगामी सरकार स्थापन करण्यात पुढाकार घेतला जात आहे ; हे नवे हंगामी सरकार लोकशाही शक्तींवर आधारले असल्याने देशाचा कारभार घटनात्मक सभेतर्फे हाकील आणि देशाचे अराजकापासून व प्रतिक्रांतीपासून रक्षण करील.

“ नागरिकांनो, रक्षक समिती तुम्हाला इशारा देत आहे :

**हिंसावादी सत्तेला मान्यता देऊ नका !**

**त्यांच्या आज्ञा पाळू नका !**

**देशाच्या आणि क्रांतीच्या रक्षणासाठी उठा !**

**रक्षक समितीला पाठिंबा द्या !**

सह्या : रशियन प्रजासत्ताकाचे मंडळ, पेत्रोग्रादची नगरपालिकेची दूमा, केंद्रीय कार्यकारी समिती ( पहिली काँग्रेस ), किसान सोविएतांची कार्यकारी समिती आणि खुद्द काँग्रेसमधला आघाडी गट, समाजवादी-क्रांतिकारकांचे गट, मेन्शेविक, जन-समाजवादी, संयुक्त सामाजिक-लोकशाहीवादी आणि ‘ येदिन्स्त्वो ’ गट.”

त्याचप्रमाणे समाजवादी-क्रांतिकारक पक्षाची, मेन्शेविक-अबारोन्त्सींची, पुन्हा किसान सोविएतांची भित्तीपत्रके लागली होती; मध्यवर्ती सेना समितीची, त्सेंत्रोफ्लोतची भित्तीपत्रके झळकत होती...

"...दुष्काळ पेत्रोग्रादला चिरडून टाकील! (ती ओरडा करीत). जर्मन सेना आमच्या स्वातंत्र्याला पायदळी तुडवील. जर आम्ही सगळे – सुजाण कामगार, सैनिक, नागरिक – एकत्र झालो नाही तर काळे शंभर गटाचे गुंड सबंध रशियाभर पसरतील...

"बोल्शेविकांच्या आश्वासनांवर विश्वास ठेवू नका! ताबडतोबीच्या शांततेचे आश्वासन – ही थाप आहे! पाव देण्याचे आश्वासन – एक बंडल आहे! जमीन देण्याचे आश्वासन – ही एक परीकथा आहे!.."

ती सारी पत्रके अशा प्रकारची होती.

"कॉम्रेडहो!.. तुम्हाला अत्यंत नीचपणे आणि निष्ठुरतेने फसवण्यात आलेय! एकटच्या बोल्शेविकांनी सत्ता बळकावलीय... सोविएतमधल्या इतर समाजवादी पक्षांपासून त्यांनी आपला कट लपवून ठेवला...

"तुम्हाला स्वातंत्र्याचे आणि जमिनीचे आश्वासन मिळालेय, पण बोल्शेविकांनी निर्माण केलेल्या अराजकामधून प्रतिक्रांतीचा फायदा होईल आणि तुम्हाला जमिनीपासून व स्वातंत्र्यापासून वंचित केले जाईल..."

वृत्तपत्रेही अशीच भडकलेली होती:

"कामगारवर्गाचा विश्वासघात करणाऱ्या या लोकांचा बुरखा फाडून काढणे" ('देलो नरोदा' म्हणाले). "हे आमचे कर्तव्य आहे. आमच्या सर्व शक्तींना एकत्रित करून क्रांतीच्या उद्दिष्टासाठी त्यांना दक्ष ठेवणे हे आमचे कर्तव्य आहे!"

जुन्या केंद्रीय कार्यकारी समितीच्या वतीने अखेरच्या वेळी बोलताना 'इज्वेस्तिया'ने भयानक सूड घेण्याची धमकी दिली:

"...सोविएतांच्या काँग्रेसबाबत बोलायचे तर आम्ही ठामपणे म्हणतो की, सोविएतांची काँग्रेस झालीच नाही! ती बोल्शेविक गटाची केवळ खाजगी परिषद होती असे आम्ही ठासून सांगतो! आणि अशा परिस्थितीत, केंद्रीय कार्यकारी समितीचे अधिकार रद्द करण्याचा त्यांना काहीही हक्क नाही..."

'नोवाया झीझ्न'ने प्रतिपादन केले की, सर्व समाजवादी पक्षांना एकत्र आणून एक नवे सरकार स्थापन करण्यात यावे; समाजवादी-क्रांतिकारकांनी आणि मेन्शेविकांनी काँग्रेसचा त्याग केल्याबद्दल त्याने कडक टीका केली आणि निर्देशित केले की बोल्शेविक उठावाने एक गोष्ट अत्यंत स्पष्टपणे सिद्ध केली आहे: भांडवलदारवर्गाबरोबर युती करण्याच्या सर्व कल्पना इत:पर फोल ठरल्या आहेत.

लेनिन यांचे 'प्रावदा' जुलैमध्ये बंद केल्यानंतर 'राबोची पूत' नांवाने ते प्रसिद्ध होऊ लागले. तेच आता पुन्हा 'प्रावदा' नांवाने अस्तित्वात आले. त्याने आपल्या पुनरागमनाची विजयोन्मादाने ललकारी दिली:

"कामगार, सैनिक, किसानहो! मार्चमध्ये तुम्ही उमरावांच्या कंपूची जुलुमी राजवट नष्ट केलीत. काल तुम्ही भांडवलदारांच्या टोळक्याची जुलुमी राजवट नष्ट केलीत...

"पेत्रोग्रादला येणाऱ्या मार्गांचे रक्षण करणे हे पहिले कार्य आहे.

"दुसरे कार्य आहे पेत्रोग्रादमधील प्रतिक्रांतिकारक प्रवृत्तीच्या घटकांना निश्चितरीत्या नि:शस्त्र करणे.

"तिसरे कार्य आहे क्रांतिकारक सत्ता निश्चितपणे संघटित करणे आणि जनतेच्या कार्यक्रमाला अंमलात आणण्याची हमी निर्माण करणे..."

कॅडेटांची आणि सर्वसामान्यपणे भांडवलदारांची प्रकाशित होणारी तुरळक वृत्तपत्रे या एकूण प्रकाराबाबत तटस्थ, उपहासात्मक दृष्टिकोन घेऊन वागत होती व "तरी आम्ही तुम्हाला सांगितले होते" अशा सुरात इतर पक्षांना संतापाने बजावून सांगत होती. प्रभावी कॅडेट नगरपालिकेच्या दूमाभोवती आणि रक्षण समितीच्या आसपास घुटमळताना दिसत होते. या व्यतिरिक्त भांडवलदारवर्ग अगदी चूपचाप बसून संधीची वाट पहात होते—

आणि ही वेळ त्यांच्या दृष्टीने फारशी दूर नव्हती. बोल्शेविक तीन दिवसांपेक्षा अधिक काळ सत्तेवर राहतील असे कुणालाच वाटले नव्हते – फक्त कदाचित लेनिन, ट्रॉट्स्की, पेत्रोग्रादचे कामगार आणि अगदी साधे सैनिक यांचा अपवाद वगळता...

"त्या दिवशी दुपारी, उंच छताच्या, ॲंफीथिएटरच्या रचनेसारख्या निकोलाय सभागृहात दूमाची अखंड बैठक चाललेली मी पाहिली; तिथले वातावरण वादळी होते आणि सर्व विरोधी शक्ती तेथे एकवटल्या होत्या. पांढऱ्या-शुभ्र केसांचे आणि दाढीचे, भव्य व्यक्तिमत्वाचे वयोवृद्ध महापौर श्रायडर आपल्या आदल्या रात्रीच्या स्मोल्नी भेटीचा वृत्तांत सांगत होते. नगरपालिकेच्या स्वयंशासनाच्या वतीने त्यांनी त्यावेळी निषेध नोंदवला होता. त्यांनी ट्रॉट्स्कींना सांगितले होते, "समानतेच्या तत्त्वावर, थेट आणि गुप्त मतदानपद्धतीने निवडलेली दूमा ही नगरात अस्तित्वात राहिलेली एकमेव वैध शासनसंस्था असल्याने, ती नव्या सत्तेला मान्यता देणार नाही." त्यावर ट्रॉट्स्कींनी उत्तर दिले होते, "त्यासाठी घटनात्मक उपाय आहे. दूमा विसर्जित करून तिची फेरनिवडणूक करता येईल..." या कथनासरशी सभागृहात संतापाच्या आरोळ्या उमटल्या.

"जर बागनेटाच्या जोरावर अधिकार चालविणाऱ्या सरकारला कुणी मानत असेल," दूमाला उद्देशून ते वृद्ध महाशय पुढे बोलू लागले, "तर असे सरकार आमच्यापाशी आहे; पण लोकांनी बहुमताने मान्यता दिलेले सरकार हे खरे वैध सरकार होय असे मी मानतो, अल्पमतवाल्यांनी सत्ता बळकावून उभे केलेले सरकार आम्ही मानत नाही!" यावर बोल्शेविक गटातल्या सर्वांनी जोरजोराने टाळ्या वाजवल्या. या नव्या खळबळजनक वातावरणात महापौरांनी जाहीर केले की, अनेक खात्यांमध्ये कमिस्सारांच्या नेमणुकी करून बोल्शेविकांनी आधीन नगरपालिकेच्या स्वायत्ततेचा भंग करायला सुरुवात केली आहे.

बोल्शेविक वक्ता आपले भाषण सर्वांना ऐकू जावे म्हणून मोठ्यांदा ओरडून बोलू लागला. त्याने सांगितले की, सोविएतांच्या काँग्रेसचा निर्णय याचा अर्थ बोल्शेविकांच्या कृतीला सबंध रशियाचा पाठिंबा आहे. "तुम्ही!" तो ओरडून म्हणाला. "तुम्ही पेत्रोग्रादच्या जनतेचे खरे प्रतिनिधी नाहीत!" यासरशी लोक किंचाळले "अपमान! अपमान!" वृद्ध महापौरांनी अत्यंत प्रतिष्ठितपणे वक्त्याला समज दिली की, कमालीच्या स्वतंत्र जनमताद्वारे दूमाची निवड झालेली आहे. त्यावर वक्ता उत्तरला "होय. पण ते फार

फार पूर्वी – केंद्रीय कार्यकारी समितीप्रमाणे – सेना समितीप्रमाणे." "नवी सोविएतांची कॉंग्रेस झालेलीच नाही!" ते त्याच्या अंगावर ओरडले.

"प्रतिक्रांतीच्या या घरट्यात इतःपर रहायला बोल्शेविक गट नकार देत आहे –" प्रचंड ओरडा. "– आणि दूमाची फेरनिवडणूक व्हावी अशी आम्ही मागणी करतो..." बोल्शेविक जेव्हा सभागृहातून बाहेर पडले तेव्हा त्यांच्यावर आरोळ्यांचा वर्षाव झाला, "जर्मन हस्तक! विश्वासघातकी मुर्दाबाद!"

त्यानंतर शिनगारिओव नांवाच्या कॅडेटने मागणी केली की, लष्करी क्रांतिकारक समितीचे कमिस्सार म्हणून काम करण्यास नगरपालिकेच्या ज्या अधिकाऱ्यांनी मान्यता दिली आहे, त्यांना पदच्युत करण्यात यावे आणि अपराधी ठरविण्यात यावे. श्रायडर पुन्हा उठून उभे राहिले व त्यांनी ठराव मांडला की, दूमा विसर्जित करण्याच्या बोल्शेविकांच्या धमकीचा खुद्द दूमा निषेध करीत आहे व जनतेची वैध प्रतिनिधी या नात्याने आपले अधिकार-पद सोडण्यास ती नकार देईल.

बाहेरच्या बाजूस, रक्षण समितीच्या सभेसाठी अलेक्सांदर हॉलमध्ये प्रचंड गर्दी जमली होती. तेथे पुन्हा स्कोबेलियेव बोलत होते. ते म्हणाले, "आजपर्यंत कधीही क्रांतीचे भवितव्य एवढ्या तीव्रतेने धोक्यात आले नव्हते, आजपर्यंत कधीही रशियन राज्याच्या अस्तित्वाच्या प्रश्नावर एवढी अस्व-स्थता माजली नव्हती, रशिया जगणार का मरणार हा प्रश्न आजपर्यंत कधीही इतिहासाने इतक्या कठोरपणे आणि ठामपणे पुढे टाकला नव्हता! क्रांतीचे रक्षण करण्याची महान घटका येऊन ठेपली आहे आणि त्याची जाणीव असल्याने आम्ही क्रांतिकारक लोकशाहीच्या जिवंत शक्तींची निकट एकजूट घडवीत आहोत व त्यांच्या संघटित इच्छाशक्तीमुळे देशाच्या आणि क्रांती-च्या रक्षणासाठी एका केंद्राची स्थापना एव्हाना झालेली आहे..." अशाच प्रकारचे आणखी बरेच सांगण्यात आले. "आम्ही पदभ्रष्ट होण्यापेक्षा मरणा-ला लौकर कवटाळू!.."

टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटात जाहीर करण्यात आले की, रेलकामगा-रांची युनियन रक्षण समितीत सामील झाली होती. काही क्षणांनंतर टपाल आणि तार खात्याचे कर्मचारी आत आले; त्यानंतर काही मेन्शेविक-आंतर-राष्ट्रीयवाद्यांनी टाळ्यांच्या कडकडाटात हॉलमध्ये प्रवेश केला. रेलकर्मचारी म्हणाले की, बोल्शेविकांना ते मानत नाहीत आणि लोहमार्गांची सर्व यंत्रणा त्यांनी आपल्या हाती घेतली होती व कुणा सत्ता बळकावू लोकांच्या हाती

ती सोपविण्यास त्यांनी नकार दिला होता. तारवाल्यांच्या प्रतिनिधीने सांगित-ले की, कचेरीत जोपर्यंत बोल्शेविक कमिस्सार होता तोपर्यंत तारयंत्रांवर काम करण्यास यंत्रचालकांनी साफ नकार दिला. स्मोल्नीमध्ये पोस्टमन पत्रे वाटणार नव्हते किंवा तिथले टपाल स्वीकारणार नव्हते... स्मोल्नीच्या सर्व टेलिफोन तारा तोडून टाकण्यात आल्या होत्या. परराष्ट्र खात्याकडे गुप्त तहांचे कागदपत्र मागायला उरित्स्की कसे गेले होते आणि नेरातोव* यांनी त्यांची कशी जिरवली याचा वृत्तांत मोठ्या चवीने सांगण्यात आला. सर्व सरकारी कर्मचारी काम बंद पाडीत होते...

ही एक प्रकारची लढाई होती – रशियन पद्धतीची मुद्दाम योजलेली लढाई; संप आणि घातपातांद्वारे लढण्यात येणारी लढाई. आम्ही तेथे बसलो होतो तेव्हा अध्यक्षमहाशयांनी नांवांची आणि नेमून दिलेल्या काम-गिऱ्यांची यादी वाचली; अमुक अमुकाने मंत्रालयांच्या चकरा मारायच्या होत्या; दुसऱ्याने बँकांना भेटी द्यायच्या होत्या; दहा किंवा बारा लोकांनी बराकींमध्ये कार्य करून सैनिकांना तटस्थ राहण्याबद्दल त्यांचे मन वळवायचे होते; "रशियन सैनिकांनो, आपल्या बांधवांचं रक्त सांडू नका!" अशी सैनिकांना त्यांनी आवाहने करायची होती; एक समिती केरेन्स्की यांच्याशी सल्लामसलत करायला जाणार होती; इतर काहींना इतर प्रांतिक शहरां-मध्ये धाडण्यात आले, तिथे त्यांनी रक्षण समितीच्या शाखा स्थापन करायच्या होत्या व बोल्शेविकविरोधी घटकांना एकत्रित जमवायचे होते.

जमाव कमालीचा उत्तेजित झाला होता. "हे बोल्शेविक प्रज्ञावंतांवर हुकूमशाही गाजवू पाहतील? आम्ही त्यांना चांगला हिसका दाखवू!.." ही सभा आणि सोविएतांची कॉंग्रेस ही अगदी परस्परविरोधी दोन टोके होती. तिथे फाटक्या कपड्यातले सैनिक, मळके कामगार, किसान यांचे प्रचंड समुदाय – अस्तित्वासाठी चाललेल्या पाशवी संघर्षात वाकलेली आणि भाजून निघालेली गरीब माणसे; आणि इथे अव्क्सेन्तियेव, दान, लीबेर यांच्या-सारखे मेन्शेविक व समाजवादी-क्रांतिकारक पुढारी, स्कोबेलियेवसारखे, ...सारखे माजी समाजवादी मंत्री, चरबीदार शात्स्कीसारख्या, तुकतुकीत ...सारख्या कॅडेटांबरोबर वावरत होते; पत्रकार, विद्यार्थी, सर्व प्रकार-च्या छावण्यांमधील प्रज्ञावंत यांच्याशी त्यांची घसट होती. दूमामधील ही

---

*नेरातोव – हंगामी सरकारचे उप-परराष्ट्रमंत्री, झारशाहीतील माजी ...॰ – सं.

गर्दी चांगलेचुंगले खाणाऱ्या आणि उत्तम ल्यायणाऱ्या लोकांची होती ; त्या सर्वांमध्ये मला तीनपेक्षा अधिक कामगारवर्गीय दिसले नाही...

बातमी आली कोर्निलोवच्या विश्वासू तेखिन्त्सींनी * बीखोव येथे त्याच्या पहारेकऱ्यांची खांडोळी केली होती व तो निसटला होता. कालेदिन उत्तरेकडे चाल करून जात होता... मॉस्को सोविएतने लष्करी क्रांतिकारक समिती स्थापन केली होती व शस्त्रागाराचा ताबा मिळवून कामगारांना सशस्त्र करता यावे या हेतूने शहराच्या कमांडंटशी बोलणी लावली होती

या वास्तव घडामोडींबरोबरच अनेक अफवा, विपर्यास आणि धादांत असत्ये यांचा एकच गोंधळ उडवून देण्यात आलेला होता. उदाहरणार्थ, पूर्वी मिल्युकोव यांचा व नंतर तेरेश्चेन्को यांचा खाजगी चिटणीस असलेल्या एका तरुण, बुद्धिमान कॅडेटने आम्हाला जरा बाजूला घेतले आणि हेमंत प्रासाद कसा घेण्यात आला त्याचा वृत्तात सांगितला.

"बोल्शेविकांचं नेतृत्व जर्मन आणि ऑस्ट्रियन अधिकाऱ्यांकडं होतं," त्याने ठामपणे सांगितले.

"असं?" आम्ही नम्रपणे म्हणालो. "तुम्हाला कसं समजलं?"

"माझा एक मित्र तिथं होता. त्यानं त्यांना पाहिलं."

"ते जर्मन अधिकारी होते हे तो कसं सांगू शकला?"

"कारण त्यांनी जर्मन गणवेष घातले होते!"

अशा शेकडो भाकडकथा प्रसारीत होत होत्या आणि बोल्शेविकविरोधी वृत्तपत्रांमधून त्या अत्यंत गंभीरतापूर्वक छापल्या जात होत्या एवढेच नव्हे, तर नेहमी सत्याची चाड बाळगण्याबद्दल प्रसिद्ध असलेल्या समाजवादी-क्रांतिकारक आणि मेन्शेविक यांच्यासारख्या अत्यंत अतर्क्य लोकांकडून त्यांच्यावर विश्वास ठेवला जात होता...

पण याहूनही बोल्शेविकांच्या हिंसेच्या आणि दहशतवादाच्या कहाण्या फार गंभीर होत्या. उदाहरणार्थ, असे म्हटले जात होते व छापण्यात आले होते की, लाल रक्षकांनी हेमंत प्रासाद केवळ संपूर्ण लुटलाच नव्हता तर, युंकरांना नि:शस्त्र केल्यानंतर त्यांनी त्यांची कत्तल केली होती आणि काही मंत्र्यांचे धडधडीत खून पाडले होते ; आणि महिला सैनिकांपैकी बहुतेकींवर बलात्कार झाले होते आणि झालेल्या यातनांमुळे अनेकींनी आत्महत्या केल्या होत्या... दूमामधल्या जमावाने या सर्व गोष्टींवर अगदी पूर्ण विश्वास ठेवला

---

*'टीपा आणि खुलासे' पहा.

होता. याहूनही भयकर म्हणजे अनेकदा नांवांच्या यादीसह प्रसिद्ध होणाऱ्या या महाभयानक वार्ता ज्या युंकरांचे आणि महिला सैनिकांचे आई-बाप वाचत असत. त्यांची रात्र पडायच्या सुमाराला दूमावर झुंबड उडत असे...

अशा प्रकारचे एक खासे उदाहरण म्हणजे राजपुत्र तुमानोव याच्या बाबतीतले; अनेक वर्तमानपत्रांमधून छापून आले की, त्याचे शव मोयका कालव्यात तरंगताना आढळून आले. काही तासांनंतर या घटनेचा राजपुत्राच्या कुटुंबीयांकडून इन्कार करण्यात आला व राजपुत्र अटकेत असल्याचे त्यांनी सांगितले. तेव्हा ते शव जनरल देनिसोव यांचे होते असे वृत्तपत्रांनी जाहीर केले. पण जनरलही जिवंत होते. आम्ही चौकशी केल्यानंतर असे समजले की, प्रत्यक्षात कुठलेच शव तरंगताना कुणालाही आढळले नव्हते...

आम्ही दूमाच्या इमारतीमधून बाहेर पडलो तेव्हा पुढच्या दाराशी नेव्स्की मार्ग अडवणाऱ्या एका प्रचंड जमावामध्ये दोन बालवीर हस्तपत्रके वाटत होते[२]. तो जमाव पूर्णतया व्यापाऱ्यांचा, दुकानदारांचा आणि कारकूनांचा होता. एका पत्रकात म्हटले होते:

"नगरपालिकेच्या दूमातर्फे

८ नोव्हेंबर रोजी झालेल्या बैठकीत, एकूण दिवसातील घडामोडींचा विचार करून नगरपालिकेची दूमा हुकूमनामा काढीत आहे. खाजगी मालकीची घरे अबाधित राहतील असे ती जाहीर करीत आहे. निवासस्थान समितीमार्फत ती पेत्रोग्राद नगरातील जनतेला आवाहन करीत आहे की, खाजगी घरांमध्ये कुणी बळजबरीने घुसण्याचे प्रयत्न केल्यास त्यांचा ठामपणे प्रतिकार करावा व तरीही ते न थांबल्यास नागरिकांनी आत्मरक्षणासाठी बेलाशक शस्त्रांचा वापर करावा."

मिखेइलनीच्या वरच्या कोपऱ्याला पाच-सहा लाल रक्षकांनी आणि दोन खलाशांनी एका वृत्तपत्रविक्रेत्याला घेरले होते व त्याच्याजवळ असलेल्या मेन्शेविकांच्या 'राबोचाया गझेता'च्या ('कामगारांचे वृत्तपत्र') प्रती त्याने त्यांच्या ताब्यात देऊन टाकाव्या अशी मागणी करीत होते. एका खलाशाने त्याच्या स्टँडवरचे अंक फाडले तेव्हा हाताच्या मुठी वळवून तो विक्रेता संतापाने त्यांच्या अंगावर ओरडला. संतापलेल्या लोकांचा जमाव त्यांच्याभोवती गोळा होऊ लागला आणि गस्तवाल्यांना शिवीगाळ करू लागला.

एक बुटका कामगार मात्र लोकांना आणि त्या विक्रेत्याला पुनःपुन्हा नेटाने समजावून सांगत होता : "त्या वर्तमानपत्रात केरेन्स्कीची घोषणा छापलीय. तिच्यात म्हटलंय, आम्ही रशियन लोकांना ठार मारलं. अशामुळं रक्तपात होईल ..."

स्मोल्नीत कमालीचा तणाव निर्माण झाला होता. असा तणाव पूर्वी कधीही तेथे झाला नसावा. तीच माणसे अंधाऱ्या व्हरांड्यांमधून धावत होती, रायफलधारी कामगारांच्या तुकड्या, शिगोशीग भरलेले पोर्टफोलिओ बगलेत धरून वादविवाद करणारे, समजावून सांगणारे, आपल्या मित्रांच्या आणि लेफ्टनंटांच्या गराड्यातून लगबगीने अस्वस्थपणे जाताना आज्ञा देणारे पुढारी. या माणसांना कशाची शुद्ध राहिली नव्हती, क्षणभरही पापणी न मिटता अखंड काम करणाऱ्यांचे ते मूर्तिमंत चालते-बोलते प्रतीक होते, त्यांच्या दाढ्या वाढल्या होत्या, कपडे व शरीरे आंघोळीविना घाण बनली होती, त्यांचे निद्राविहीन डोळे भगभगत होते—आपल्या उत्साहाच्या इंजिनांना बेफाम गतीने सोडून ठाम उद्दिष्टासाठी ही माणसे भरधाव चालली होती. त्यांना खूप खूप कार्य करायचे होते! खूपच! सरकारची स्थापना करायची होती, शहराची व्यवस्था राखायची होती, शिबंदीला निष्ठावंत ठेवायचे होते, दूमाशी आणि रक्षण समितीशी सामना करायचा होता, जर्मनांना दूर ठेवायचे होते, केरेन्स्कीबरोबर लढाईची तयारी करायची होती, काय घडले त्याचा वृत्तांत प्रांतांना पाठवायचा होता, अर्खांगेल्स्कपासून व्लादीवस्तोकपर्यंत प्रचार करायचा होता... सरकारी आणि नगरपालिकेचे कर्मचारी त्यांच्या कमिस्सारांच्या आज्ञा पाळत नव्हते, टपाल आणि तार खाते दळणवळण चालू ठेवायला त्यांना नकार देत होते, आगगाड्या जलद सोडण्याच्या त्यांच्या आवाहनांकडे रेलकर्मचारी निष्ठुरपणे दुर्लक्ष करीत होते, केरेन्स्की चाल करून येत होते, शिबंदीवर संपूर्ण विश्वास टाकणे शक्य नव्हते, कझाक बाहेर पडायची वाट पहात होते... त्यांच्याविरुद्ध केवळ सुसंघटित भांडवलदारवर्गच नव्हता, तर इतर सर्व समाजवादी पक्ष त्यांच्याविरुद्ध होते, फक्त डावे समाजवादी-क्रांतिकारक, थोडे मेन्शेविक-आंतरराष्ट्रीयवादी आणि 'नोवाया झीझ्न'वादी त्यांच्या बाजूने होते, पण त्यांचीही निष्ठा डळमळती होती. हे खरे होते की, त्यांच्या बाजूने कामगार आणि सैनिक समूह होते—किसानांची संख्या ज्ञात नव्हती—पण सरतेशेवटी बोल्शेविक हा प्रशिक्षित आणि सुशिक्षित लोकांचा अभाव असलेला एक राजकीय गट होता...

पुढच्या पायऱ्यांवरून रिआझानोव वर येत होते. आपण व्यापार खा-त्याचे कमिस्सार असलो तरी त्यातले काहीही आपल्याला कळत नाही, असे थोडेसे घाबरलेल्या पण गंमतीच्या सुरात ते सांगत होते. वरच्या मजल्या-वरच्या एका कॅफेत एका कोपऱ्यात एक गृहस्थ एकटेच बसले होते. त्यांच्या डोक्यावर बकऱ्याच्या कातड्याची टोपी होती आणि अंगात जे कपडे होते—त्या कपड्यांनिशी ते "झोपले होते" असे मी म्हणणार होतो, पण अर्थातच ते झोपले नव्हते—आणि गालांवर तीन दिवसांची दाढी वाढलेली होती. एका मळक्या कागदी पाकिटावर ते अस्वस्थपणे आकडेमोड करीत होते व दरम्यान पेन्सिल चावीत होते. हे होते अर्थखात्याचे कमिस्सार मेन्झिन्स्की आणि यापूर्वीची त्यांची पात्रता व अनुभव म्हणजे एकेकाळी ते फ्रेंच बँकेत कारकून होते... आणि लष्करी क्रांतिकारक समितीच्या कचेरीतून खाली हॉलकडे जवळ जवळ पळत निघालेले व पळताना कागदांच्या कपट्यांवर खरडत जाणारे हे चार—हे होते रशियाच्या चार कोपऱ्यांना पाठवण्यात आलेले कमिस्सार. घडत असलेल्या घटनांचा वृत्तांत सांगायला, आपली बाजू पटवून द्यायला आणि लढायला हाती येतील ती विधाने किंवा शस्त्रे घेऊन...

एक वाजता काँग्रेसची बैठक सुरू व्हायची होती आणि बैठकीचा प्रचंड हॉल त्यापूर्वी केव्हाच भरून गेला होता, पण सात वाजले तरी अद्याप अध्यक्ष-मंडळाचा पत्ता नव्हता... बोल्शेविक आणि डावे समाजवादी-क्रांतिकारक आपापल्या खोल्यांमध्ये चर्चांमध्ये गुंतले होते. सबंध दुपारभर लेनिन आणि ट्रॉट्स्की यांनी तडजोड करण्याविरुद्ध लढा दिला होता. संयुक्त अखिल-समाजवादी सरकार स्थापन करावे अशा प्रकारच्या ठरावाला मान्यता देण्यास असंख्य बोल्शेविक जवळ जवळ तयार झाले होते. "आम्ही तग धरू शक-णार नाही!" ते ओरडत होते. "आमच्या विरोधी खूपच काही आहे. आमच्याजवळ माणसं नाहीत. आम्ही एकाकी पडू आणि साराच डोलारा कोसळेल!".. कामेनियेव, रिआझानोव आणि इतर लोकांचे असे म्हणणे होते.

पण ट्रॉट्स्कीसह लेनिन पहाडासारखे भक्कम उभे राहिले. "तडजोड-वाल्यांना आमचा कार्यक्रम मान्य करू दे आणि ते आत येऊ शकतात! आम्ही तसूभरही मागे हटणार नाही. आमच्याप्रमाणे करण्याची हिंमत ज्या कॉम्रेडांमध्ये नाही आणि धैर्य नाही, त्यांनी खुशाल इतर भित्र्यांबरोबर आणि समन्वयवाद्यांबरोबर निघून जावे! कामगार आणि सैनिकांच्या पाठिंब्यावर आम्ही पुढे जाऊ."

सात वाजून पाच मिनिटांनी डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांकडून निरोप आला की, लष्करी क्रांतिकारक समितीत राहण्याचा त्यांनी निर्णय घेतला आहे.

"बघा!" लेनिन म्हणाले. "ते आमच्या पाठीमागं येताहेत!"

त्यानंतर थोड्या वेळाने, मोठ्या हॉलमधील पत्रकारांच्या मेजाशी आम्ही बसलो होतो तेव्हा, भांडवलदारी वर्तमानपत्रांसाठी लिहिणाऱ्या एका अराजकवाद्याने मला सुचवले की, आम्ही जाऊन अध्यक्षमंडळाचे काय झाले याचा ठावठिकाणा काढावा. केंद्रीय कार्यकारी समिती कचेरीत कुणीच नव्हते, किंवा पेत्रोग्राद सोविएतच्या ब्यूरोमध्येही कुणी नव्हते. त्या अफाट स्मोल्नीमध्ये एका खोलीतून दुसऱ्या खोलीत असे आम्ही फिरत चाललो होतो. काँग्रेसची नियामक संस्था कुठे शोधायची याबद्दल कुणालाही यत्किंचितही कल्पना असल्याचे दिसत नव्हते. आम्ही शोध करीत असताना माझा सहकारी त्याच्या पूर्वीच्या क्रांतिकारक कार्याचे, फ्रान्समधील त्याच्या प्रदीर्घ आणि सुखद अज्ञातवासाचे वर्णन करीत होता... त्याने हळूच मला विश्वासात घेऊन सांगितले की, हे बोल्शेविक अतिसामान्य, उद्धट, अडाणी लोक आहेत, त्यांना सौंदर्यवादी अक्कल मुळीच नाही. तो रशियन प्रज्ञावंतवर्गाचा खराखरा नमुना होता... अखेरीस आम्ही १७ क्रमांकाच्या खोलीपाशी, लष्करी क्रांतिकारक समितीच्या कचेरीपाशी आलो आणि खोलीच्या दरवाज्यासमोर थांबलो. तेथे आमच्यापुढे अखंडपणे लोकांची वर्दळ चालू होती. दरवाजा उघडला आणि एक बैठ्या अंगाचा, चपट्या चेहऱ्याचा हुद्द्याच्या फिती न लावलेला गणवेषधारी माणूस धाडकन बाहेर आला तो स्मित करतोय असे वाटत होते – पण एक मिनिटभरानंतर त्याला पाहणाऱ्याच्या लक्षात येत होते की, आत्यंतिक श्रमांनी त्या व्यक्तीच्या चेहऱ्यावर ते कायम-स्मित उमटले होते. ते क्रीलेन्को होते.

माझ्या झकपकीत वेषातल्या, सुसंस्कृत दिसणाऱ्या तरुण मित्राने आनंददर्शक चीत्कार काढला व तो पुढे आला.

"निकोलाय वासिलियेविच!" आपला हात पुढे करीत तो म्हणाला. "कॉम्रेड, तुम्ही मला ओळखलं नाही? आपण तुरुंगात बरोबरच होतो."

क्रीलेन्कोनी मन एकाग्र करून आणि डोळे किलकिले करून एकटक रोखून पहात आठवायचा प्रयत्न केला. "अर्थात," प्रेमळ नजरेने त्या तरुणाला नखशिखांत न्याहाळीत अखेरीस ते म्हणाले. "तू एस् – नमस्कार!" त्यांनी एकमेकांची चुंबने घेतली. "या गोंधळात तुम्ही इथं काय करताय?" क्रीलेन्कोनी सभोवार हात फिरवीत विचारले.

"काही नाही, नुसता पाहतोय... तुम्ही यशस्वी झालेले दिसताय!"

"होय," काहीशा ठामपणे क्रीलेन्को उत्तरले. "कामगारवर्गाची क्रांती जबरदस्त यशस्वी झालीय,,. ते हसले. "कदाचित – कदाचित तरीही आपण पुन्हा तुरुंगात भेटू!"

आम्ही पुन्हा व्हरांड्यामधून जाऊ लागली तेव्हा माझ्या मित्राने खुलासा केला. "मी क्रापोत्किन यांचा अनुयायी आहे. आमच्या दृष्टीनं क्रांती कमालीची अयशस्वी ठरलीय; तिनं जनतेमध्ये देशभक्ती जागृत केली नाही. अर्थात त्यावरून एवढंच सिद्ध होतं की, जनता अद्याप क्रांतीसाठी सज्ज नाही..."

---

लेनिन यांच्यासह – महान लेनिन यांच्यासह – अध्यक्षमंडळाने हॉलमध्ये प्रवेश केल्याचे टाळयांच्या महाप्रचंड कडकडाटावरून जाहीर झाले तेव्हा ८ वाजून ४० मिनिटे झाली होती. लेनिन यांची आकृती बुटकी, आडव्या ांडाची होती, त्यांच्या खांद्यांवर त्यांचे डोके मोठे वाटत होते, त्यांना ट्क्कल पडले होते व कपाळाचा उंचवटा पुढे आलेला होता. डोळे बारीक, नगके नाक, रुंद पसरलेला जबडा आणि भक्कम जिवणी; यावेळी त्यांनी ाढी-मिशा साफ केलेल्या होत्या, पण त्यांची पूर्वाश्रमीची आणि पुढे अत्यंत प्रसिद्ध झालेली दाढी एव्हाना उगवू लागली होती. त्यांचे कपडे अगदी गबाळे होते व पँट त्यांना खूप लांब होत होती. जमावाचे दैवत व्हायला त्यांच्यापाशी मुळीच प्रभावी व्यक्तिमत्व नव्हते, तरीही त्यांच्यावर जनतेने ेवढे प्रेम केले आणि त्यांच्याबद्दल तिच्या मनात जेवढा आदर होता, तसले भाग्य इतिहासात फारच थोड्या पुढाऱ्यांच्या वाटयाला आले असावे. ते ... विलक्षण जन-पुढारी होते; केवळ बुद्धिमत्तेच्या जोरावर पुढारी बनले ...; रंगविहीन, खंबीर, तडजोडविहीन, अलिप्त आणि आकर्षक स्वभाव-...त्र्याचा अभाव असलेले – पण अत्यंत गहन विचार साध्या भाषेत मां-...याची, ठाम परिस्थितीचे विश्लेषण करण्याची ताकद असलेले. आणि ...बरोबर आत्यंतिक बौद्धिक धारिष्टयाचा मिलाफ झालेला होता.

लष्करी क्रांतिकारक समितीच्या कारवायांचा अहवाल कामेनियेव वाचत ...; सैन्यामध्ये मृत्युदंडाची शिक्षा रद्द केली होती, प्रचार करण्याच्या ...त्र हक्काची पुनःस्थापना, राजकीय अपराधांसाठी अटक केलेल्या अधि-...यांची व सैनिकांची सुटका, केरेन्स्कींना अटक करण्याच्या व खाजगी ...गांमधील खाद्यपदार्थांच्या साठयांना जप्त करण्याच्या आज्ञा... टाळयां-... प्रचंड कडकडाट.

पुन्हा एकदा बुंदचे प्रतिनिधी. बोल्शेविकांच्या बिनतडजोडवादी वृत्तीने क्रांती चिरडून नष्ट होईल; म्हणून इत:पर काँग्रेसमध्ये बसण्यास बुंद प्रतिनिधींनी नकार दिला पाहिजे.

श्रोत्यांमधून आरोळ्या, "आम्हाला वाटलं तुम्ही काल रात्रीच गेलात! असे किती वेळा तुम्ही सभात्याग करणार आहात?"

त्यानंतर मेन्शेविक-आंतरराष्ट्रीयवाद्यांचा प्रतिनिधी. आरोळ्या "अरेच्चा! तुम्ही अजून इथंच?" वक्त्याने खुलासा केला की, मेन्शेविक-आंतरराष्ट्रीयवाद्यांच्या केवळ एका भागाने काँग्रेसचा त्याग केला होता; बाकीचे राहणार होते –

"सोविएतांच्या हाती सत्ता सोपवणं क्रांतीच्या दृष्टीनं धोक्याचं आणि कदाचित प्राणांतिकही आहे असं आम्हाला वाटतं" – अडथळे – "पण काँग्रेसमध्ये राहणं आणि सत्तांतराला विरोधी मत देणं हे आम्ही आमचं कर्तव्य मानतो!"

इतर वक्ते त्यानंतर बोलले, पण त्यांचा खास असा क्रम दिसला नाही. दॉन खोऱ्यातल्या कोळसा-खाण कामगारांच्या प्रतिनिधीने काँग्रेसला आवाहन केले की, कालेदिनविरुद्ध उपाययोजना कराव्यात, कारण राजधानीचा कोळशाचा आणि खाद्यपदार्थांचा पुरवठा तो तोडून टाकण्याची शक्यता होती. अनेक सैनिक नुकतेच आघाड्यांवरून आले होते आणि आपल्या तुकड्यांकडून उत्साहाने भरलेल्या शुभेच्छा त्यांनी सांगाती आणल्या होत्या...

आता लेनिन बोलायला उभे राहिले तेव्हा अनेक मिनिटेपर्यंत टाळ्यांचा अखंड कडकडाट होत राहिला. लोकांच्या टाळ्या संपेपर्यंत वाट पहात, वक्त्याच्या समोरील वाचनाच्या स्टँडची कडा हाती धरून, समोरच्या गर्दीवरून आपले लुकलुकते छोटे डोळे फिरवीत ते उभे होते. टाळ्या जेव्हा संपल्या तेव्हा ते फक्त एवढेच म्हणाले,

"आम्ही आता समाजसत्तावादी व्यवस्थेची उभारणी करण्याच्या कार्याला आरंभ करू!"

पुन्हा एकदा त्या जनसंमर्दामधून पसंतीचा हुंकार उमटला.

"पहिली गोष्ट आहे शांतता प्रस्थापित करण्यासाठी व्यवहार्य उपाययोजना अंमलात आणणं... सर्व युद्धमान राष्ट्रांमधील जनतेपुढं आम्ही सोविएत अटींवर शांततेचा तह करू – विलीनीकरण नाही, नुकसानभरपाई नाही आणि जनतेला स्वयंनिर्णयाचा हक्क राहील. त्याचबरोबर, आम्ही वचन दिल्यानुसार, सर्व गुप्त करार आम्ही प्रकाशित करू आणि ते रद्द

करू... युद्ध आणि शांततेचा प्रश्न इतका स्पष्ट आहे की त्यावर अधिक प्रस्तावना न करता, सर्व युद्धमान राष्ट्रांमधील जनतेला उद्देशून केलेल्या जाहीर निवेदनाचा मसुदा मी आता वाचून दाखवतो..."

ते बोलत होते तेव्हा त्यांचा रुंद जबडा अधिक रुंदावला होता व ते हसत आहेत असे वाटत होते; त्यांचा आवाज घोगरा होता – मात्र कानाला अप्रिय वाटत नव्हता, पण वर्षानुवर्षांच्या बोलण्यामुळे तसा झाला असावा असे वाटत होते – आणि त्यांचे बोलणे इतके एकसुरी होते की, अनंत काळ-पर्यंत ते बोलू शकत राहतील असे वाटत होते... एखाद्या मुद्द्यावर भर देताना ते किंचित पुढे झुकत. बाकी हातवारे काही नाहीत. आणि त्यांच्या-पुढे हजार लोकांचे भाबडे चेहरे माना वर उचलून एकतानतेने व नितांत श्रद्धेने त्यांचे बोलणे ऐकत होते.

**"सर्व युद्धमान राष्ट्रांमधील जनतेला आणि सरकारांना उद्देशून जाहीर निवेदन**

६ आणि ७ नोव्हेंबरच्या क्रांतीमधून निर्माण झालेले व कामगार, सैनिक आणि किसान प्रतिनिधींच्या सोविएतांवर आधारलेले कामगार-किसानांचे सरकार सर्व युद्धमान राष्ट्रांमधील जनतेपुढे आणि तिच्या सरकारांपुढे प्रस्ताव मांडत आहे की, न्याय्य आणि लोकशाहीवादी शांतता तहासाठी त्यांनी ताबडतोब वाटाघाटी सुरू कराव्या.

न्याय्य आणि लोकशाहीवादी शांततेचा सरकारला अभिप्रेत असलेला अर्थ, म्हणजे युद्धाने दमूनभागून गेलेल्या आणि कफल्लक बनलेल्या बहुसंख्य कामगारांना व कष्टकरी वर्गांना हवी असलेली शांतता – झारची राजसत्ता उलथून टाकल्यानंतर अत्यंत ठामपणे रशियन कामगार आणि किसान सतत मागत असलेली शांतता – खालसाकरणांशिवाय (म्हणजे परकी प्रदेशावर आक्रमण न करता, इतर राष्ट्रजमातींचे बळजबरीने खालसाकरण न करता), नुकसानभरपाईशिवाय त्वरित शांतता तह.

रशियाचे सरकार सर्व युद्धग्रस्त लोकांना आवाहन करत आहे की, सर्व देशांच्या लोकांच्या आणि सर्व राष्ट्रजमातींच्या अधिकृत सत्ताधारी सभागृहांनी अशा तहाच्या सर्व अटींवर निश्चित स्वरूपाचे शिक्कामोर्तब करण्यापूर्वी, अशा प्रकारच्या तहाच्या वाटाघाटींसाठी निर्णायक

पावले टाकून आपण ताबडतोब शांतता तह करायला उत्सुक आहोत हे दाखवून, विनाविलंब शांतता प्राप्त करून घ्यावी.

परकी प्रदेशाचे खालसाकरण किंवा त्याच्यावर स्वारी याबाबत सरकारला असे अभिप्रेत आहे की, सर्वसाधारण लोकशाहीवादी हक्कांची व विशेषत: कामगारवर्गाच्या हक्कांची जपणूक व्हावी; म्हणजे एखाद्या बलिष्ठ आणि मोठ्या राज्याने एखाद्या छोट्या किंवा दुबळ्या राष्ट्र-जमातीला तिच्या इच्छेविरुद्ध, तिने स्वत:हून स्पष्ट मान्यता दिल्याविना अगर इच्छा दाखविल्याविना आपल्यात खालसा करून घेऊ नये; मग अशा कोणत्याही क्षणाला बळजबरीने केलेले खालसाकरण असो, खालसा झालेल्या राष्ट्राची किंवा दुसऱ्या सीमांच्या बाहेर ताब्यात धरलेल्या राष्ट्राची संस्कृतीची पातळी कोणतीही असो, ते राष्ट्र युरोपात असो किंवा समुद्रांपलिकडे दूर असो, ते खालसाकरण रद्द समजले पाहिजे.

जर एखादे राष्ट्र दुसऱ्या राज्याच्या अधिकारात बळजबरीने ठेवलेले असेल, त्या राष्ट्राने इच्छा व्यक्त करूनही (मग ती अभिव्यक्ती वर्तमानपत्रांद्वारे असो, लोकांच्या सभांद्वारे असो, राजकीय पक्षांचे ठराव असोत, किंवा राष्ट्रीय दडपणुकीविरुद्धच्या दंगली आणि अराजकांद्वारे असो), जर त्या राष्ट्राला स्वतंत्र मतदानाद्वारे निर्णय घेण्याचा हक्क दिला नाही – त्या राष्ट्राला खालसा करणाऱ्या, किंवा त्या राष्ट्राला खालसा करू पाहणाऱ्या किंवा एकूण त्या राष्ट्रापेक्षा अधिक बलवान असलेल्या देशाच्या फौजा तिथून पूर्णपणे निघून गेल्यावरही जर कोणताही दबाव न ठेवता स्वतंत्र मतदानाद्वारे त्याला आपल्या राष्ट्रीय आणि राजकीय संघटनाचा प्रकार निश्चित करण्याचा निर्णय घेऊ दिला नाही – तर ते आक्रमण आणि करारभंग मानण्यात यावा.

बलिष्ठ आणि श्रीमंत देशांना आपापसात दुबळ्या आणि जित राष्ट्रजमातींची वाटणी करून घ्यायला मदत व्हावी म्हणून हे युद्ध चालू ठेवणे, हा मानवजातीविरुद्धचा सर्वात महाभयंकर अपराध आहे, असे सरकारचे मत आहे; आणि अपवादरहित सर्व राष्ट्रजमातींना सारख्याच लाभदायक असणाऱ्या उपरोक्त अटींवर युद्ध समाप्त करण्याच्या शांतता तहावर ताबडतोब सही करण्याचा निर्णय हे सरकार मन:पूर्वक जाहीर करीत आहे.

याचबरोबर सरकार असेही जाहीर करीत आहे की, शांतता तहा-

च्या उपरोक्त अटी ते अंतिम स्वरूपात सादर करीत नाही. दुसऱ्या शब्दात सांगायचे तर शांतता तहाबाबत दुसऱ्या अटींचा विचार करण्याचीही त्याची तयारी आहे. फक्त एवढेच आग्रहपूर्ण सांगणे आहे की, कोणत्याही युद्धमान राष्ट्राने या अटी तात्काळ सादर कराव्या, त्यांमध्ये स्पष्टता असावी, कोणताही गुळमुळीतपणा अगर कोणतीही संदिग्धता असू नये.

गुप्त राजनीतीचा सरकार त्याग करीत आहे व सबंध देशासमोर ठामपणे जाहीर करीत आहे की, सर्व वाटाघाटी उघडपणे जनतेच्या जाणीवे केल्या जातील आणि मार्चपासून ७ नोव्हेंबर १९१७ पर्यंत जमीनदारांच्या व भांडवलदारांच्या सरकारने मान्य केलेले किंवा प्रत्यक्षात केलेले सर्व गुप्त करार ताबडतोब जाहीरपणे प्रसिद्ध करण्यात येतील. या गुप्त करारांमधील कलमे पाहता बव्हंश असे आढळून आले आहे की, रशियन भांडवलदारांचा आणि जमीनदारांचा फायदा करून देण्याच्या आणि त्यांना खास सवलती मिळवून देण्याच्या उद्दिष्टाने, रशियन साम्राज्यवाद्यांनी केलेली खालसाकरणे कायम राखण्याच्या अथवा त्यांचा विस्तार करण्याच्या दृष्टीने, हे करार करण्यात आलेले होते. म्हणून सरकार हे सर्व करार ताबडतोब व कोणत्याही चर्चेविना रद्द करीत आहे.

सर्व सरकारांना आणि सर्व लोकांना शांततेच्या जाहीर वाटाघाटींमध्ये भाग घेण्याचे आवाहन करीत असताना, प्रस्तुत सरकार जाहीर करीत आहे की, अशा वाटाघाटी तारांद्वारे, टपालाद्वारे, किंवा भिन्न देशांच्या प्रतिनिधींच्या वाटाघाटींद्वारे, किंवा या प्रतिनिधींची एक परिषद भरवून करण्यास ते तयार आहे. वाटाघाटी सुकर व्हाव्यात म्हणून तटस्थ देशांमध्ये सरकार आपल्या अधिकृत प्रतिनिधींची योजना करीत आहे.

सर्व युद्धमान देशांमधील सर्व सरकारांपुढे आणि सर्व लोकांपुढे सरकार ठराव मांडत आहे की, त्यांनी ताबडतोब शस्त्रसंधी करावा; त्याचवेळी असे सुचवीत आहे की, हा शस्त्रसंधी किमान तीन महिनेपर्यंत टिकला पाहिजे; त्यामुळे युद्धात खेचल्या गेलेल्या किंवा जबरीने भाग घ्याव्या लागलेल्या अशा सर्व राष्ट्रांच्या आणि राष्ट्रजमातींच्या प्रतिनिधींना आवश्यक त्या वाटाघाटी समाप्त करणे शक्य होईल एवढेच नव्हे, तर शांततेच्या तहाच्या अटींचा ठामपणे स्वीकार करण्याच्या

उद्दिष्टाने सर्व देशांच्या जनतेच्या अधिकृत प्रतिनिधींच्या सभा बोलावणेही शक्य होईल.

सर्व युद्धमान राष्ट्रांच्या सरकारांना आणि लोकांना उद्देशून हा प्रस्ताव मांडत असताना, रशियाचे कामगार-किसानांचे हंगामी सरकार त्याच पद्धतीने, आणि विशेषतः मानवजातीच्या उद्दिष्टाला सर्वांत जास्त वाहून घेतलेल्या तीन राष्ट्रांच्या सुजाण कामगारांना व सध्याच्या युद्धात भाग घेणाऱ्या तीन सर्वांत महत्त्वाच्या राष्ट्रांना – इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी – उद्देशूनही हा प्रस्ताव मांडत आहे. या देशांतील कामगारांनी प्रगती आणि समाजवादाची इंग्लंडमधील आदर्शमय चार्टिस्ट चळवळींनी फ्रान्सच्या कामगारवर्गाने घडवून आणलेल्या आणि जागतिक-ऐतिहासिक महत्त्व प्राप्त झालेल्या अनेक क्रांत्याची आणि शेवटी जर्मनीमधील अपवादात्मक कायद्याविरुद्धच्या वीरश्रीपूर्ण लढ्याची व जगातील सर्व कामगारांच्या दृष्टीने आदर्श ठरणाऱ्या जर्मनीच्या प्रचंड कामगारवर्गाची संघटना निर्माण करणाऱ्या प्रदीर्घ, खंबीर आणि शिस्तमय कार्याची प्रचंड सेवा बजावली आहे. ही उत्तम उदाहरणे, ही इतिहासातली स्मृतिचिन्हे, आम्हाला खात्री देतात की, युद्धाच्या संकटांपासून आणि त्याच्या दुष्परिणामांपासून मानवजातीला मुक्त करण्याची या देशांमधल्या कामगारांवर सोपवलेली कामगिरी ते जाणून घेतील; तसेच आपल्या निर्णायक, जोमदार आणि सातत्यशील कार्यांद्वारे आम्हाला मदत करून शांतता तह यशस्वीरीत्या घडवून आणण्यास हे कामगार आम्हाला मदत करतील; त्याचप्रमाणे दलित कामकरी जनतेची सर्व प्रकारच्या गुलामगिरीतून आणि सर्व प्रकारच्या शोषणातून मुक्तता करण्यास मदत करतील."

टाळ्यांचा गगनभेदी कडकडाट जेव्हा विरला तेव्हा लेनिन पुन्हा बोलू लागले :

"या जाहीर निवेदनाला मंजुरी द्यावी असा प्रस्ताव आम्ही काँग्रेसपुढे मांडतो. आम्ही युद्धमान राष्ट्रांच्या जनतेबरोबरच त्यांच्या सरकारांना उद्देशूनही हे जाहीर निवेदन करीत आहोत, कारण युद्धमान राष्ट्रांमधील केवळ **जनतेलाच** उद्देशून हे निवेदन केल्यास शांतता तह घडण्यास विलंब होण्याची शक्यता आहे. शस्त्रसंधीच्या काळात तयार केलेल्या शांतता तहाच्या अटींना

घटनात्मक सभा मंजुरी देईल. तीन महिन्यांचा शस्त्रसंधी निश्चित करण्यात आमची ही इच्छा आहे की, या रक्तपाती सर्वनाशानंतर लोकांना जास्तीत जास्त विश्रांती मिळावी आणि आपले प्रतिनिधी निवडायला त्यांना भरपूर वेळ मिळावा. या शांतता तहाच्या प्रस्तावाला साम्राज्यवादी सरकारांकडून कडाडून विरोध होईल — याबाबतीत आम्हाला कोणतीही वेडी आशा वाटत नाही. पण आम्हाला आशा वाटते की, सर्व युद्धमान राष्ट्रांमध्ये लौकरच क्रांतीचा उद्रेक घडून येईल; म्हणूनच आम्ही स्वतःहून विशेषत्वाने फ्रान्स, इंग्लंड आणि जर्मनीमधल्या कामगारांना आवाहन केले आहे...

"६ आणि ७ नोव्हेंबरच्या क्रांतीने," लेनिन आपल्या भाषणाचा समारोप करताना म्हणाले, "सामाजिक क्रांतीच्या युगाची नांदी घडवली आहे... शांतता आणि समाजसत्तावाद यांच्या नांवाने श्रमजीवी चळवळ जिंकील आणि आपल्या भवितव्याला परिपूर्ण करील..."

या सर्व गोष्टीत असे काहीतरी विलक्षण साधे आणि प्रभावी होते की, माणसांची अंतःकरणे त्यामुळे गलबलून निकाली. जेव्हा लेनिन बोलत तेव्हा लोकांचा त्यांच्यावर का विश्वास असे हे समजण्यासारखे होते...

तेथल्या तेथे हात वर करून जमावाने असा निर्णय घेतला की एखाद्या ठरावावर फक्त राजकीय गटांच्या प्रतिनिधींनाच बोलायला परवानगी देण्यात यावी आणि वक्त्यांना फक्त पंधरा मिनिटांचा अवधी देण्यात यावा.

प्रथम डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांच्या वतीने कारेलीन बोलले. "जाहीर निवेदनाच्या मजकुरात दुरुस्त्या सुचवायला आमच्या गटाला संधीच देण्यात आली नाही; हा बोल्शेविकांचा खाजगी दस्तऐवज आहे. पण तरीही आम्ही त्याच्या बाजूने मत देऊ, कारण त्यातील भावनेशी आम्ही सहमत आहोत..."

सामाजिक-लोकशाही-आंतरराष्ट्रीयवाद्यांच्या वतीने क्रामारोव बोलायला उठले. उंचच उंच, खाली झुकलेले खांदे आणि लघुदृष्टीदोष असलेले. आगामी काळात विरोधी पक्षाचे विदूषक म्हणून त्यांची ख्याती व्हायची होती. ते म्हणाले की, सर्व समाजवादी पक्षांचे मिळून बनलेल्या सरकारलाच केवळ अशी महत्त्वाची कारवाई करण्याचा अधिकार असू शकतो. जर समाजवाद्यांचे संमिश्र सरकार बनले, तर त्यांचा गट सबंध कार्यक्रमाला पाठिंबा देईल; जर नाही तर फक्त अंशतः कार्यक्रमाला पाठिंबा देईल. जाहीर निवेदनाबाबत बोलायचे तर त्यातील मुख्य मुद्द्यांशी आंतरराष्ट्रीयवादी संपूर्ण सहमत होते...

त्यानंतर वाढत्या उत्साही वातावरणात एका पाठोपाठ एकेका गटाचे वक्ते बोलू लागले ; युक्रेनी सामाजिक-लोकशाही, पाठिंबा ; लिथुआनियाचा सामाजिक-लोकशाही, पाठिंबा ; जन-समाजवादी, पाठिंबा ; पोलिश सामाजिक-लोकशाही, पाठिंबा ; पोलिश समाजवादी, पाठिंबा – परंतु समाजवादी संमिश्र सरकारला अधिक प्राधान्य ; लात्वियाचा सामाजिक-लोकशाही, पाठिंबा... या लोकांमध्ये जणू एक ज्योत पेटली होती. एकजण "आगामी जागतिक क्रांतीबद्दल" बोलला आणि म्हणाला, "आम्ही तिचे अग्रदूत आहोत"; दुसरा म्हणाला, "बांधिलकीचं नवं युग सुरू होतंय आणि सर्व माणसांचं मिळून एक मोठं कुटुंब होईल..." एकाने व्यक्तिगतरीत्या बोलायची परवानगी मागितली. तो म्हणाला, "इथं फार मोठी विसंगती जाणवतेय. प्रथम तुम्ही खालसाकरणाशिवाय आणि नुकसानभरपाईशिवाय शांतता तहाचा ठराव मांडता आणि नंतर तुम्ही म्हणता की, शांततेच्या सर्व ठरावांचा तुम्ही विचार कराल. विचार करणं म्हणजेच मान्य करणं..."

लेनिन चटकन उठून उभे राहिले. "आम्हाला न्याय्य शांतता हवीय, पण क्रांतिकारक युद्धाला आम्ही भीत नाही... कदाचित साम्राज्यवादी सरकारे आमच्या आवाहनाला उत्तर देणार नाहीत – पण ज्याला नकार देणे सोपे जाईल असा निर्वाणीचा इशारा आम्ही देणार नाही... जर जर्मन कामगारवर्गाला जाणीव झाली की, शांततेच्या सर्व ठरावांचा विचार करण्याची आमची तयारी आहे, तर कदाचित भरला घडा उतू जायला तो शेवटचा थेंब पुरेसा असेल – जर्मनीमध्ये क्रांती घडेल...

"शांततेच्या तहाच्या सर्व अटींचा विचार करण्यास आम्ही मान्यता देतो, पण त्याचा अर्थ असा नव्हे की आम्ही त्या ग्राह्य मानू. आमच्या काही अटींसाठी आम्ही अखेरपर्यंत लढत राहू – पण कदाचित काही इतर अटींसाठी लढत राहणे आम्हाला अशक्य वाटेल... सर्वात महत्त्वाचे म्हणजे आम्हाला युद्ध संपवायचे आहे..."

जाहीर निवेदनाला ज्यांचा पाठिंबा आहे त्या सर्वांनी आपापली कार्डे हातात उंच धरावी असे कामेनियेव म्हणाले तेव्हा बरोब्बर १० वाजून ३५ मिनिटे झाली होती. एका प्रतिनिधीने विरोधी मत प्रकट करण्यासाठी हात वर उचलायचे धाडस केले, पण त्याच्या भोवतालच्यांनी एवढा जोरदार ओरडा केला, की त्याचा हात पटकन खाली गेला... एकमताने जाहीर निवेदन मंजूर झाले.

एकाएकी त्या सभागृहातले आम्ही सारे उठून उभे राहिलो आणि अत्यंत

मंद सुरात एकमुखाने 'इंटरनॅशनल' गाऊ लागलो. करड्या रंगाच्या विस्कटल्या केसांचा एक म्हातारा सैनिक लहान मुलासारखा ओक्साबोक्शी रडत होता. अलेक्सान्द्र कल्लोन्ताय यांनी चटकन आपल्या अश्रूंना आवरले. त्या सभागृहातून उमटणारा तो घनगंभीर आवाज खिडक्या-दारांना पार करून नि:स्तब्ध आकाशापर्यंत जाऊन भिडला. "युद्ध संपलं! युद्ध संपलं!" एक उजळल्या चेहऱ्याचा कामगार माझ्याशेजारी ओरडत होता. गीत संपले तेव्हा काही क्षण आम्ही एका चमत्कारिक नि:स्तब्धतेत काढले आणि मग कुणीतरी मागच्या बाजूने ओरडले, "कॉम्रेडहो! स्वातंत्र्यासाठी ज्यांनी आपले प्राण वेचले त्यांचं स्मरण करू या!" तेव्हा आम्ही शवयात्रेचे शोकगीत गायला आरंभ केला. अत्यंत मंद, शोकरसाने भरलेले, तरीही विजयी सुरावट असलेले ते अस्सल रशियन गीत अंत:करण हेलावून टाकणारे होते. काही झाले तरी 'इंटरनॅशनल' हे परक्या सुरावटीतले होते. पण शवयात्रेचे शोकगीत त्या लक्षावधी जनतेच्या अंत:करणातून उमटलेले होते, जिचे प्रतिनिधी या सभागृहात बसून आपल्या अंधुक स्वप्नांमधून नवा रशिया आकाराला आणू पहात होते – कदाचित त्याहून आणखी काही अधिक करू इच्छित होते...

प्राणांतिक झुंजीत तुम्ही धारातीर्थी पडलात.
जनतेच्या स्वातंत्र्यासाठी, जनतेच्या प्रतिष्ठेसाठी...
आपली आयुष्यं तुम्ही वेचलीत, सर्व प्रेयसाचा त्याग केलात,
महाभयाण कारावास भोगलेत, श्रृंखला खळखळवीत हद्दपारीवर गेलात...
श्रृंखलांच्या बंधनांना वागवताना तुम्ही ब्र काढला नाहीत,
कारण आपल्या पीडित बांधवांना तुम्ही दुर्लक्षू शकत नव्हता,
तलवारीपेक्षा न्याय बलवान असा तुमचा विश्वास होता...
तुमचे समर्पित जीवन कारणी लागण्याची वेळ लौकरच येईल.
ती वेळ जवळ आलीय; जुलुमाचा जेव्हा पाडाव होईल,
जनता उठून उभी राहील, महान आणि स्वतंत्र!
अखेरचा दंडवत, बांधवांनो, तुम्ही उदात्त मार्ग पत्करलात,
मरणाला आणि यातनांना कवटाळायला सिद्ध झालेली नवी सेना
तुमच्या पाठोपाठ येतेय...
अखेरचा दंडवत, बांधवांनो, तुम्ही उदात्त मार्ग पत्करलात,
स्वातंत्र्यासाठी, जनतेच्या सुखासाठी लढण्याची,
श्रमण्याची तुमच्या समाधीशी आम्ही शपथ घेतो...

मार्चमधले हुतात्मे यासाठी त्या थंडगार बांधिलकीच्या थडग्यात मंगळ मैदानावर पडले; यासाठीच हजारो आणि लक्षावधी कारावासात, हद्द-पारीत, सैबेरियातल्या खाणींमध्ये मरणाला सामोरे गेले. क्रांती जशी येईल असे त्यांना वाटले होते तशी ती नाही आली, किंवा प्रज्ञावंतांची जशी इच्छा होती तशीही ती आली नाही; ती आली आहे—पण धसमुसळी बनून, सर्व सूत्रांच्या ठिकऱ्या उडवून, भावनावशतेला तिटकारून; खरीखुरी...

लेनिन जमिनीबाबतचे आज्ञापत्र वाचत होते:

"(१) जमिनीची सर्व खाजगी मालकी नुकसानभरपाई न देता ताबडतोब रद्द करण्यात आली आहे.

(२) घटनात्मक सभेची बैठक भरेपर्यंत सर्व जमीनदारांच्या स्थावर मालमत्ता, तसेच शाही मालकीच्या, मठांच्या, प्रार्थनामंदिरांच्या जमिनी व तेथील गुरेढोरे आणि टिपण केलेली मालमत्ता, इमारती आणि अंगभूत मालकीच्या वस्तू नगरवस्तीच्या भूमी समित्यांच्या व किसान प्रतिनिधींच्या विभागीय सोविएतांच्या ताब्यात राहतील.

(३) जप्त केलेली मालमत्ता इतःपर सर्व जनतेच्या मालकीची आहे व तिचे कोणतेही नुकसान केल्यास तो गंभीर अपराध मानला जाईल आणि क्रांतिकारक न्यायसभांतर्फे अपराध्यांना कडक शासन केले जाईल. जमीनदारांच्या मालमत्ता ताब्यात घेताना, जमिनींच्या तुकड्यांच्या क्षेत्रफळांची मोजणी करताना, त्यातील कोणत्या जमिनी जप्त करण्यायोग्य आहेत हे ठरवताना, जप्त केलेल्या संपूर्ण मालमत्तेची यादी तयार करताना अत्यंत काटेकोर सुव्यवस्था रहावी आणि जमिनींवरील शेतीच्या अवजारांसकट तेथील सर्व इमारती, हत्यारे, गुरे, उत्पादन साठे इत्यादी जनतेच्या हाती सोपवताना त्यांना अत्यंत काटेकोर क्रांतिकारक संरक्षण मिळावे म्हणून किसान प्रतिनिधींची विभागीय सोविएते आवश्यक त्या सर्व उपाययोजना करतील.

(४) महान जमीनविषयक सुधारांना घटनात्मक सभेच्या ठरावाद्वारे अंतिम संमती मिळेपर्यंत, 'किसान प्रतिनिधींच्या अखिल रशिया सोविएतच्या इझ्वेस्तिया'च्या संपादक मंडळाने २४२ स्थानिक किसान आदेशांच्या आधारावर आखलेल्या आणि उल्लेखित 'इझ्वेस्तिया'च्या ८८ व्या अंकात (पेत्रोग्राद, क्र. ८८, १९ ऑगस्ट १९१७) प्रकाशित

झालेल्या पुढील किसान आदेशांचा[3] मार्गदर्शनपर उपयोग करून सुधार अंमलात आणावेत.

(५) किसानांच्या आणि सैन्यात नोकरी करणाऱ्या कझाकांच्या जमिनी जप्त केल्या जाणार नाहीत.

लेनिन यांनी खुलासा केला, "माजी मंत्री चेर्नोव यांनी 'एक चौकट उभारण्याची' गोष्ट केली होती आणि वरून सुधार अंमलात आणण्याचा प्रयत्न केला होता तो हा प्रकल्प नव्हे. अगदी खालपासून, प्रत्यक्ष स्थळावर, जमिनीची विभागणी करण्याच्या प्रश्नांचा निर्णय करण्यात येईल. स्थळानुसार, प्रत्येक किसानाला मिळणाऱ्या जमिनीच्या प्रमाणात फरक असेल...

"हंगामी सरकारमध्ये जमीनदारांनी भूमी समित्यांच्या आज्ञा साफ धुडकावून लावल्या होत्या; या समित्यांची कल्पना ल्वोव यांनी मांडली होती, शिन्गारिओव यांनी या समित्या प्रत्यक्ष अस्तित्वात आणल्या होत्या आणि केरेन्स्कींनी त्यांच्या कारभाराला आरंभ केला होता!"

चर्चा सुरू होण्यापूर्वी, गर्दीमधून वाट काढीत, खुर्च्यांच्या बाजूने जबरदस्तीने घुसत एक माणूस व्यासपीठावर चढला. हे किसान सोविएतांच्या कार्यकारी समितीचे सदस्य प्यानिख होते. त्यांचा स्वतःवरचा ताबा सुटलेला स्पष्ट दिसत होता.

"आमच्या कॉम्रेडना, सलाझ्किन आणि मास्लोव या मंत्र्यांना अटक केल्याबद्दल, किसान प्रतिनिधींच्या अखिल रशिया सोविएतची कार्यकारी समिती आपला निषेध व्यक्त करीत आहे!" समोरच्या जमावाकडे जोराने हात फेकीत ते ओरडले. "त्यांची ताबडतोब सुटका करावी अशी आम्ही मागणी करतो! आत्ता त्यांना पीटर-पॉल किल्ल्यात ठेवलंय. आम्हाला ताबडतोब कृती पाहिजे! एकही क्षणाचा उशीर करून चालणार नाही!"

त्यांच्या पाठोपाठ विस्कटलेल्या दाढीचा आणि जळजळत्या डोळ्यांचा एक सैनिक येऊन उभा राहिला. "तुम्ही इथं बसता आणि किसानांना जमीन देण्याच्या गोष्टी बोलता; पण किसानांनी निवडलेल्या प्रतिनिधींविरुद्ध जुलुमशहांसारखे आणि बळजबरीने सत्ता गाजवणाऱ्यांसारखे वागताहात! मी तुम्हाला बजावून सांगतो –" आपली मूठ उंचावून तो ओरडला, "त्यांच्या केसाला जरी धक्का लागला तरी तुमच्याविरुद्ध ताबडतोब बंड पुकारलं जाईल!" जमावामध्ये एकच गोंधळ माजला.

नंतर ट्रॉट्स्की बोलायला उभे राहिले. ते शांत दिसत होते, पण त्यां-

च्या चेहऱ्यावर तिरस्कार पुरेपूर उमटला होता, आपल्या सत्तेची त्यांना जाणीव असल्याचे दिसत होते. लोकांनी त्यांचे जोरदार स्वागत केले. ते बोलू लागले. "काल लष्करी क्रांतिकारक समितीनं तत्त्वतः ठरवलं की मास्लोव, सलाझ्किन, ग्वोझ्द्योव आणि मालियान्तोविच या समाजवादी-क्रांतिकारक आणि मेन्शेविक मंत्र्यांना सोडून देण्यात यावं. अद्याप ते पीटर-पॉल किल्ल्यात असण्याचं कारण आम्हाला खूप कामं करायची राहिली आहेत... तरीही, कोर्निलोव प्रकरणी केरेन्स्कींच्या विश्वासघातकी कार-वायांमध्ये त्यांचा कितपत सहभाग होता याची आम्ही पूर्ण चौकशी करी-पर्यंत, त्यांना त्यांच्या घरांमध्ये स्थानबद्ध करून ठेवले जाईल!"

"इथं जे काही चाललेलं आम्ही पाहतोय तसं कुठल्याही क्रांतीत कधीही घडलेलं नाही!" प्यानिख ओरडले.

"तुमची चूक होतेय," ट्रॉट्स्की उत्तरले. "अशा गोष्टी या क्रांतीत-सुद्धा दिसून आलेल्या आहेत. जुलैच्या दिवसात आमच्या शेकडो कॉम्रेडना अटका झाल्या होत्या... *डॉक्टरांच्या हुकुमानुसार जेव्हा कॉम्रेड कल्लोन्ताय यांना तुरुंगातून मुक्त करण्यात आलं तेव्हा अव्क्सेन्तियेवनी त्यांच्या घराच्या दाराशी झारच्या गुप्त पोलिसांमधल्या दोन माजी हस्तकांना ठेवलं!" ते किसान प्रतिनिधी रागारागाने पुटपुटत व्यासपीठावरून खाली उतरले तेव्हा जमावाने त्यांची हुर्येवडी उडवली.

डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांचा प्रतिनिधी जमीनविषयक आज्ञापत्रावर बोलला. तत्त्वतः सहमत असला तरी त्यांचा गट त्या प्रश्नावर चर्चा होई-पर्यंत मत देऊ शकत नव्हता. किसान सोविएतांचे मत जाणून घ्यायला हवे होते.

मेन्शेविक-आंतरराष्ट्रीयवाद्यांनीही पक्षांतर्गत बैठकीचा आग्रह धरला.

नंतर किसानांच्या अराजक गटाचे, कमालवाद्यांचे पुढारी म्हणाले: "असा कायदा पहिल्याच दिवशी, कोणतेही चर्वितचर्वण न करता अंमलात आणणाऱ्या राजकीय पक्षाचा आपण आदर केला पाहिजे!"

एक अस्सल शेतकरी बोलायला उभा राहिला; लांब केस; गुडघ्यापर्यंतचे बूट आणि मेंढकातडी कोट. त्याने सभागृहाच्या चारी बाजूंना वाकून अभि-वादन केले. "कॉम्रेडहो आणि नागरिकांनो, तुमचं भलं होवो," तो म्हणाला. "बाहेरच्या बाजूला काही कॅडेट फिरताहेत. तुम्ही आमच्या समाज-वादी किसानांना अटक केलीत–मग त्यांना का पकडत नाही?"

उत्तेजित झालेल्या किसानांना वादविवाद सुरू करायला हा इशारा

होता. आदल्या रात्री सैनिकांची जशी चर्चा घडली होती, नेमका तसाच प्रकार घडला. जमिनी कसणारे खरेखुरे श्रमजीवी हे होते...

"आम्ही ज्यांना किसानांचे रक्षणकर्ते समजलो होते ते आमच्या कार्यकारी समितीचे सभासद, अव्क्सेन्तियेव आणि इतर मंडळी – ते लेकाचेही कॅडेट निघाले! त्यांना पकडा! पकडा त्यांना!"

दुसरा एकजण – "कोण हे प्यानिख, हे अव्क्सेन्तियेव? ते मुळी किसानच नाहीत! ते नुसत्या आपल्या शेपट्या हलवतात!"

आपल्या खऱ्याखुऱ्या किसान भाईबंदांना ओळखून जमावाने कडकडून टाळ्या वाजवल्या.

डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांनी अर्धा तास विश्रांतीचा ठराव मांडला. प्रतिनिधी जसे बाहेर जायला निघाले तसे लेनिन आपल्या जागेवर उठून उभे राहिले.

"कॉम्रेडहो, आपण वेळ दवडून चालणार नाही! रशियाच्या दृष्टीनं ही सर्वांत महत्त्वाची बातमी उद्या सकाळच्या वर्तमानपत्रात आलीच पाहिजे. उशीर चालणार नाही!"

आणि गरमागरम चर्चांच्या, वादविवादाच्या, पावलांच्या फरपटण्याच्या कोलाहलातून लष्करी क्रांतिकारक समितीच्या एका दूताचे उच्च स्वरातील ओरडणे ऐकू येत होते: "१७ नंबरच्या खोलीत पंधरा प्रचारकांची गरज आहे! ताबडतोब युद्ध आघाडीवर जाण्यासाठी!.."

जवळ जवळ अडीच तासांनी पांगापांग झालेले प्रतिनिधी परत एकत्रित आले, अध्यक्षमंडळ व्यासपीठावर स्थानापन्न झाले व लष्करी क्रांतिकारक समितीशी आपण एकनिष्ठ असल्याचे सांगणाऱ्या एकापाठीमागून एक तुकड्यांनी पाठवलेल्या तारांच्या वाचनाने बैठकीस परत आरंभ झाला.

हळूहळू बैठकीला रंग भरला. मॅसिडोनियाच्या आघाडीवरच्या रशियन फौजांच्या एका प्रतिनिधीने अत्यंत कडवटपणे तेथील परिस्थिती कथन केली. तो म्हणाला, "आमच्या शत्रूपेक्षा आमच्या 'मित्रांकडून' आमचं अधिक नुकसान होतं." घाईगडबडीने नुकत्याच आलेल्या दहाव्या आणि बाराव्या सेनांच्या प्रतिनिधींनी सांगितले, "आम्ही सर्व ताकदीनिशी तुम्हाला पाठिंबा देत आहोत!" एका किसान-सैनिकाने "देशद्रोही समाजवादी मास्लोव आणि सलाझ्किन" यांची सुटका केल्याबद्दल निषेध व्यक्त केला; किसान सोविएतांच्या कार्यकारी समितीला सरसकट अटक करायला पाहिजे असे मत त्याने व्यक्त केले. आता ही खरी क्रांतिकारक भाषा सुरू झाली होती...

पर्शियामधील रशियन सैन्याच्या प्रतिनिधीने सांगितले की, सर्व सत्ता सोविएतांच्या हाती, अशी मागणी करण्याचा त्याला आदेश मिळाला आहे... एक युक्रेनी अधिकारी आपल्या मायबोलीत म्हणाला: "या अरिष्टात कुठलाही राष्ट्रवाद नाही... सर्व भूमींवरील कामगारवर्गीय अधिसत्ता झिंदाबाद!" उच्च आणि तप्त विचारांचा असा प्रचंड ओघ वाहू लागला होता की, रशिया इत:पर कधी मुका बनेल असे वाटत नव्हते!

कामेनियेव यांनी म्हटले की, बोल्शेविकविरोधी शक्ती सर्वत्र अव्यवस्था माजवायचा प्रयत्न करीत आहेत. रशियातील सर्व सोविएतांना उद्देशून काँग्रेसने केलेले आवाहन त्यांनी वाचून दाखवले:

> "कामगार आणि सैनिक प्रतिनिधींच्या सोविएतांची अखिल रशियन काँग्रेस स्थानिक सोविएतांना आवाहन करीत आहे की सर्व प्रकारच्या प्रतिक्रांतिकारक, यहुदीविरोधी कृतींविरुद्ध आणि सर्व प्रकारच्या **दंग्याधोप्यांविरुद्ध** त्यांनी ताबडतोब जोमदार उपाययोजना कराव्यात. कामगारांच्या, किसानांच्या आणि सैनिकांच्या क्रांतीचा मान राखायचा असेल तर कोणत्याही **दंग्याधोप्याला** सहन केले जाऊ नये.
>
> "पेत्रोग्रादच्या लाल रक्षकांनी, क्रांतिकारक शिबंदीने आणि खलाशांनी राजधानीत चोख सुव्यवस्था राखली आहे.
>
> "कामगारांनो, सैनिकांनो आणि किसानांनो, तुम्ही सर्वत्र पेत्रोग्रादच्या कामगार आणि सैनिकांच्या उदाहरणाचा कित्ता गिरवला पाहिजे.
>
> "कॉम्रेड सैनिक आणि कझाकांनो, खऱ्या क्रांतिकारक सुव्यवस्थेची हमी देण्याची जबाबदारी आपल्यावर पडली आहे. सबंध क्रांतिकारक रशियाचे आणि अख्ख्या जगाचे डोळे आपल्यावर खिळले आहेत..."

दोन वाजता जमीनविषयक आज्ञापत्राचा ठराव मताला टाकण्यात आला आणि अवघ्या एका विरोधी मताने तो मंजूर झाला तेव्हा किसान प्रतिनिधी आनंदातिशयाने बेहोष झाले...

अशा रीतीने बोल्शेविकांनी विरोधाला न जुमानता, घुटमळत न राहता, विरोधकांवर मात करून पुढे मुसंडी मारली — रशियातल्या एवढ्या या लोकांकडेच कृतीचा निश्चित कार्यक्रम होता, तर बाकीचे तब्बल आठ महिने नुसते बोलत राहिले.

आता एक रोड, फाटक्या कपड्यातला, भाषणचतुर सैनिक बोलायला

उठला. सैन्यातून पळून गेलेल्यांना खेड्यामधील जमीनवाटपांपासून वंचित करण्याऱ्या आदेशाचा* त्याने निषेध केला. आरंभी त्याची टिंगल उडविण्यात आली, पण अखेरीस त्याच्या साध्या, हृदयस्पर्शी भाषणाने सर्वत्र शांतता पसरली. "दुर्दैवी सैनिकाला त्याच्या मर्जीविरुद्ध खंदकांच्या खाईत लोटून घ्यावं लागलं," तो ओरडला, "तुम्हीच आपल्या शांततेच्या आज्ञापत्रात त्याच रणकंदनाचा अर्थशून्य आणि महाभयानक म्हणून उल्लेख केला आहे. तेव्हा शांततेच्या आणि स्वातंत्र्याच्या आशेनं त्यानं क्रांतीचं स्वागत केलं. पण कुठली शांतता? केरेन्स्कीच्या सरकारनं त्याला पुन्हा गॅलिशियात कत्तल करायला आणि कत्तल करवून घ्यायला पाठवलं; त्यानं शांतता मिळावी म्हणून विनवण्या केल्या तेव्हा तेरेश्चेन्कोनी नुसत्या हसण्यावारी त्याला उडवून लावलं... स्वातंत्र्य? केरेन्स्कीच्या अमदानीत त्याच्या समित्या बंद पाडण्यात आल्या, त्याला वर्तमानपत्रं वाचायला मिळेनाशी झाली, त्याच्या पक्षाच्या वक्त्यांना तुरुंगात डांबण्यात आलं... त्याच्या घरच्या गावात, जमीनदार त्याच्या भूमी समित्यांना धुडकावून लावत होते, त्याच्या साथींना कारावा-सात धाडत होते... पेत्रोग्रादमध्ये, जर्मनांच्या बरोबर हातमिळवणी करून भांडवलदारवर्ग सैन्याला पाठवण्यात येणाऱ्या खाद्यपदार्थांच्या, कपड्यांच्या आणि दारूगोळ्याच्या पुरवठ्यात घातपात करीत होता... हा सैनिक बुटां-विना होता, कपड्यांविना होता... कुणी त्याला सैन्यातून पळून जायला लावलं? तुम्ही उलथून टाकलेल्या त्या केरेन्स्कीच्या सरकारनं!" त्याचे भाषण संपले तेव्हा टाळ्यांचा गजर झाला.

पण दुसऱ्या सैनिकाने रागारागाने त्याचे म्हणणे खोडून काढले: "सैन्या-तून पळून जाण्यासारखं नीच कृत्य लपवायला केरेन्स्कीच्या सरकारचा पडदा वापरून चालणार नाही! पळपुटे हे नालायक आहेत, ते घरी पळून गेले आणि आपल्या साथीदारांना खंदकात एकाकी मरायला टाकून गेले! प्रत्येक पळपुटा हा देशद्रोही आहे आणि त्याला शासन केलंच पाहिजे..." आरो-ळ्या, ओरडा – "बस्स करा! शांत रहा!" ही बाब सरकारकडे निर्णया-साठी सोपवावी, असा प्रस्ताव कामेनियेव यांनी घाईघाईने मांडला[4].

पहाटे अडीच वाजता कमालीची तीव्र निःस्तब्धता पसरली. सरकारच्या स्थापनेविषयीचे आज्ञापत्र कामेनियेव वाचत होते:

---

*जमीनविषयक आज्ञापत्राबरोबरच काँग्रेसने मंजूर केलेल्या आदेशाचा येथे संदर्भ आहे. – सं.

"घटनात्मक सभेचे अधिवेशन भरेपर्यंत कामगार आणि किसान यांचे एक हंगामी सरकार स्थापन करण्यात आले आहे व त्याला जन-कमिस्सार मंडळ[5] म्हणून नांव देण्यात येईल.

"राज्यकारभाराच्या भिन्न शाखांचे शासन आयोगांकडे सोपविण्यात येईल व त्यांची रचना अशा रीतीने नियंत्रित करण्यात येईल की, कामकरी स्त्री-पुरुष, खलाशी, सैनिक, किसान व कचेरीतील कारकून कर्मचारी यांच्या जन-संघटनांशी त्यांचा घनिष्ट संयोग घडवून काँग्रेसचा कार्यक्रम पार पाडण्याची हमी निर्माण होईल. या आयोगांच्या अध्यक्षांचे मिळून बनलेल्या एक कॉलेजियममध्ये, म्हणजेच जन-कमिस्सारांच्या मंडळाच्या हाती सरकारी अधिकार राहतील.

जन-कमिस्सारांच्या कार्यावर नियंत्रण ठेवण्याचा आणि त्यांच्या जागी दुसऱ्यांना नेमण्याचा हक्क कामगार, किसान आणि सैनिक प्रतिनिधींच्या सोविएतांच्या अखिल रशियन काँग्रेसच्या आणि तिच्या मध्यवर्ती कार्यकारी समितीच्या हाती राहील."

अजूनही निःस्तब्धता होती; पुढे जशी त्यांनी कमिस्सारांच्या नांवांची यादी वाचायला सुरुवात केली तसा प्रत्येक नांवानंतर टाळ्यांचा कडकडाट सुरू झाला व लेनिन आणि ट्रॉट्स्की यांच्यावेळी तर विशेषत्वाने टाळ्यांचा गजर होत राहिला.

"...मंडळाचे अध्यक्ष – व्लादीमिर उल्यानोव (लेनिन);
गृह – रीकोव;
शेती – मिल्यूतिन;
मजूर – श्ल्याप्निकोव;
लष्करी आणि नाविक बाबी – अव्सेयेन्को (अन्तोनोव), क्रीलेन्को व दीबेन्को यांची समिती;
व्यापार आणि उद्योग – नोगीन;
जन-शिक्षण – लुनाचार्स्की;
अर्थ – स्क्वोर्त्सोव (स्तेपानोव);
परराष्ट्र – ब्रोन्स्तीन (ट्रॉट्स्की);
न्याय – अप्पोकोव (लोमोव);
पुरवठा – तेओदोरोविच;

टपाल आणि तार – अविलोव (ग्लेबोव);
राष्ट्रजमातींचे अध्यक्ष – द्जुगाश्विली (स्तालिन);
रेल – मागाहून जाहीर करण्यात येईल."

दालनाच्या कोपऱ्यांमध्ये बागनेटे दिसत होती, प्रतिनिधींमधून बागनेटांची टोके चमकताना दिसत होती; लष्करी क्रांतिकारक समिती प्रत्येकाला शस्त्रसज्ज करीत होती, केरेन्स्कींविरुद्धच्या निर्णायक लढाईसाठी बोल्शेविकवाद शस्त्रसज्ज होत होता, त्या लढाईच्या तुताऱ्यांचे आवाज नैऋत्येकडून वहात येणाऱ्या वाऱ्यांबरोबर येत होते... दरम्यान कुणीही घरी गेले नाही; उलट शेकड्यांनी नवे आत हॉलमध्ये येत राहिले. तासन् तास उभे राहिलेल्या, न दमता सतत उत्कटतेने भाषणे ऐकत असलेल्या, कडव्या चेहऱ्याच्या सैनिकांनी आणि कामगारांनी तो भव्य हॉल भरून गेला होता. वातावरणात सिगरेटचा धूर कोंदला होता, मानवी निःश्वासांचा, जाड्याभरड्या कपड्यांचा आणि घामाचा दर्प दाटला होता.

'नोवाया झीझ्न'मध्ये काम करणारे अविलोव सामाजिक-लोकशाही-आंतरराष्ट्रीयवाद्यांच्या व मेन्शेविक ऊर्वरित मेन्शेविक-आंतरराष्ट्रीयवाद्यांच्या वतीने बोलत होते; तरण्याबांड, बुद्धिमान चेहऱ्याचे, रुबाबदार लांब कोटातील अविलोव त्या वातावरणात परके भासत होते.

"आपण कुठं चाललो आहोत हा प्रश्न स्वतःलाच विचारला पाहिजे... संमिश्र सरकार ज्या सहजतेनं कोलमडलं त्याचं कारण लोकशाहीच्या डाव्या गटाचं सामर्थ्य नसून, जनतेला शांतता आणि भाकरी देण्यास सरकार अक्षम ठरलं हे आहे. आणि डावा गट जोपर्यंत हे प्रश्न सोडवीत नाही तोपर्यंत तो सत्ता टिकवून धरू शकणार नाही...

"तो जनतेला भाकरी देऊ शकेल? धान्य दुर्लभ झालंय. बहुसंख्य किसान तुमच्याबरोबर राहणार नाहीत, कारण त्यांना गरज असलेली यंत्रं तुम्ही पुरवू शकत नाही. इंधन आणि इतर मूलभूत गरजांच्या गोष्टी पैदा करणं जवळ जवळ अशक्यप्राय आहे...

"शांतता प्रस्थापित करणं तर त्याहूनही अवघड आहे. दोस्त राष्ट्रांनी स्कोबेलियेवबरोबर बोलणी करण्यास नकार दिला. तुमच्याकडून शांतता परिषदेचा प्रस्ताव ती कधीही मान्य करणार नाहीत. तुम्हाला लंडन, पॅरिस किंवा बर्लिनमध्ये मान्यता मिळणार नाही...

"दोस्त राष्ट्रांमधील कामगारवर्गाकडून प्रभावी मदतीची अपेक्षा तुम्ही

करू शकत नाही, कारण बहुतेक देशांमध्ये हा कामगारवर्ग क्रांतिकारक लढ्या-पासून अजून खूप दूर आहे; आठवण करा, दोस्तांचे लोकशाही पक्ष स्टॉक-होम परिषद बोलावण्यातसुद्धा अपयशी ठरले. जर्मन सामाजिक-लोकशाही-वाद्यांबाबत बोलायचं तर स्टॉकहोम परिषदेतले आमचे एक प्रतिनिधी कॉम्रेड गोल्डेनबर्ग यांच्याशी आत्ताच माझं संभाषण झालं; अतिरेकी डाव्यांच्या प्रतिनिधींनी त्यांना सांगितलं की, युद्धाच्या दरम्यान जर्मनीत क्रांती अशक्य आहे..." आता त्यांच्या भाषणाला जोरदार आणि वारंवार अडथळे होऊ लागले, पण तरीही अविलोव बोलतच राहिले.

"रशियन सैन्याचा जर्मनांकडून पाडाव झाला आणि रशियाचा बळी देऊन ऑस्ट्रो-जर्मन युती व फ्रेंच-ब्रिटिश युती यांच्यामध्ये शांतता तह झाला, किंवा जर्मनीबरोबर स्वतंत्ररीत्या तह झाला तर रशिया अपरिहार्यपणे एका-की पडेल.

"मला आत्ताच समजलं की दोस्तांचे राजदूत इथून निघून जाण्याची तयारी करीत आहेत आणि रशियातील सर्व शहरांमध्ये देशाच्या व क्रांतीच्या रक्षणासाठी समित्या स्थापन होत आहेत...

"या प्रचंड अडचणींवर मात करणं कुणाही एका पक्षाला शक्य होणार नाही. केवळ खरीखुरी बहुसंख्य जनता — जी समाजवादी संमिश्र सरकारला पाठिंबा देते — क्रांती पूर्ण करू शकेल..."

त्यानंतर त्यांनी दोन्ही गटांचा ठराव वाचला:

> "क्रांतीने मिळवलेल्या विजयांचे रक्षण करणे आवश्यक आहे हे लक्षात घेऊन, कामगारांच्या, सैनिकांच्या, किसानांच्या प्रतिनिधींचे मिळून संघटित केलेल्या, क्रांतिकारक लोकशाहीवर आधारीत सोविएतांचे सरकार स्थापन करणे त्वरित अपरिहार्य आहे; तसेच लौकरात लौकर शांतता प्रस्थापित करणे, कृषि समित्यांच्या हाती जमिनी सोपविणे, औद्योगिक उत्पादनावर नियंत्रण संघटित करणे आणि नियोजित तार-खेला घटनात्मक सभेची बैठक बोलावणे हे या सरकारचे काम आहे ही बाब लक्षात घेऊन, काँग्रेसमध्ये भाग घेणाऱ्या लोकशाहीवादी गटांमध्ये एकवाक्यता घडल्यावर असे सरकार स्थापन करण्यासाठी एका हंगामी कार्यकारी समितीची काँग्रेस नेमणूक करीत आहे."

जमावामध्ये विजयी क्रांतिकारक उत्साहाला जरी उधाण आले होते तरी अविलोव यांच्या शांत, संयमशील युक्तिवादाने लोक हादरले. त्यांच्या

भाषणाच्या अखेरीस तर आरोळ्या आणि चीत्कार विरून गेले होते व त्यांनी भाषण संपवले तेव्हा काही टाळ्याही पडल्या.

त्यांच्या पाठोपाठ कारेलिन बोलायला आले. तेही तरुण, निर्भय होते आणि त्यांच्या तळमळीबद्दल कुणालाही संदेह नव्हता. ते डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांतर्फे बोलत होते; हा मारीया स्पिरिदोनोवाचा पक्ष होता, हा केवळ एकच पक्ष बोल्शेविकांचे अनुयायित्व करत होता आणि क्रांतिकारक किसानांचे* प्रतिनिधित्व करत होता.

"जन-कमिस्सारांच्या मंडळात प्रवेश करण्यास आमच्या पक्षाने नकार दिला आहे, कारण काँग्रेस सोडून गेलेल्या क्रांतिकारक सेनेच्या एका भागापासून कायमचे अलग होण्याची आमची इच्छा नाही, अशा वेगळे होण्याने बोल्शेविक आणि लोकशाहीचे इतर गट यांच्यामधील मध्यस्थांचे काम करणे आम्हाला अशक्य ठरेल... आणि या क्षणाला आमचे ते मुख्य काम आहे. समाजवादी संमिश्र सरकारविना इतर कुठल्याही सरकारला आम्ही पाठिंबा देऊ शकत नाही...

"शिवाय, बोल्शेविकांच्या जुलमी वागणुकीचा आम्ही निषेध करतो. आमच्या कमिस्सारांना त्यांच्या पदांवरून हाकलून देण्यात आले. आमच्या एकमेव मुखपत्राला, 'झ्नाम्या त्रुद' ला (श्रमाची ध्वजा) प्रकाशित करण्यास काल बंदी करण्यात आली...

"तुमच्याविरुद्ध लढण्यासाठी मध्यवर्ती दूमा देशाचे आणि क्रांतीचे रक्षण करणारी प्रभावी समिती बनवीत आहे. आधीच तुम्ही एकाकी आहात आणि दुसऱ्या कोणत्याही लोकशाहीवादी गटाचा तुमच्या सरकारला पाठिंबा नाही..."

आता ट्रॉट्स्की व्यासपीठावर आत्मविश्वासाने आणि अधिकारभावनेने उभे होते. त्यांच्या ओठांवर छद्मी भाव दिसत होता. त्यांच्या आवाजात भिंगरीसारखी लय होती आणि त्यांचे भाषण ऐकण्यासाठी जमाव त्यांच्या दिशेने खेचला जाता होता.

"आमचा पक्ष एकाकी पडण्याचा धोका आहे याबद्दलचे हे विचार नवे नाहीत. उठावाच्या आधीही आमच्या अपरिहार्य दारुण पराभवाचे भाकित करण्यात आले होते. प्रत्येकजण आमच्या विरुद्ध होता; फक्त डाव्या समाज-

---

* क्रांतिकारक किसानांचा केवळ एक भागच डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांचे अनुयायित्व करीत होते.—सं.

वादी-क्रांतिकारकांचा एक गट आमच्याबरोबर लष्करी क्रांतिकारक समितीत होता. जवळ जवळ अजिबात रक्तपात न करता सरकार उलथून टाकणे आम्हाला कसे शक्य झाले?... आम्ही एकाकी नव्हतो याचा ती वस्तु-स्थिती म्हणजे सबळ पुरावा आहे. प्रत्यक्षात हंगामी सरकार एकाकी होते; आमच्याविरुद्ध मोहीमा करणारे लोकशाहीवादी पक्ष एकाकी होते, एकाकी आहेत, कामगारवर्गापासून कायमचे अलग पडलेत!

"संयोगाच्या आवश्यकतेची भाषा ते बोलताहेत. एकच संयोग शक्य आहे – कामगार, सैनिक आणि अत्यंत गरीब शेतकरी यांच्याशी; आणि असा संयोग घडवण्याचे श्रेय आमच्या पक्षाने मिळवलेय... अविलोव यांना कोणता संयोग अभिप्रेत आहे? जनतेशी द्रोह करणाऱ्या सरकारला ज्यांनी पाठिंबा दिला त्यांच्याशी संयोग? संयोगाने नेहमीच सामर्थ्य वाढते असे नाही. उदाहरणादाखल सांगायचे तर, दान आणि अव्क्सेन्तियेव आमच्यात असते तर आम्ही उठाव संघटित करू शकलो असतो?" श्रोत्यांमध्ये जोरदार हशा झाला.

"अव्क्सेन्तियेवनी थोडीशी भाकरी दिली. अबारोन्त्सींबरोबर संयोग करून त्याहून जास्त भाकरी मिळाली असती? किसान आणि अव्क्सेन्तियेव – ज्यांनी भूमी समित्यांना अटक करण्याचे हुकूम दिले होते – यांच्यामध्ये आम्ही किसानांना निवडले! आमची क्रांती ही इतिहासात अभिजात क्रांती म्हणून राहील...

"इतर लोकशाही पक्षांबरोबर समझोता आम्ही केला नाही, असा ते आमच्यावर आरोप करतात. पण हा दोष आमचा आहे का? किंवा कारे-लिन यांनी म्हटल्याप्रमाणे, "गैरसमजुतीवर" आम्ही ठपका ठेवायचा का? नाही कॉम्रेडहो. क्रांतीच्या ऐन उधाणात एक पक्ष, अजूनही दारूगोळ्याच्या स्फोटांच्या धुरात गुदमरलेला पक्ष, येऊन म्हणतो "ही पहा सत्ता – तिला घ्या!" आणि ज्यांच्यापुढे ही सत्ता देऊ केली ते शत्रूला जाऊन मिळतात, ही गैरसमजूत नाही... ही निष्ठुर लढाईची घोषणा आहे. आणि ही लढाई आम्ही जाहीर केली नाही...

"आम्ही जर "एकाकी" राहिलो तर आमचे शांतता प्रस्थापित कर-ण्याचे प्रयत्न फसतील, अशी अविलोव धमकी घालतात. मी पुन्हा एकवार बोलतो, स्कोबेलियेव किंवा अगदी तेरेश्चेन्को यांच्याबरोबर संयोग करून शांतता प्रस्थापित करायला आम्हाला कशी काय मदत होणार? आमचा बळी देऊन शांतता तह करावा लागण्याचा धोका आहे, असे सांगून आम्हाला

घाबरवण्याचा अविलोव प्रयत्न करताहेत. आणि मी त्यांना उत्तर देतो की, कोणत्याही परिस्थितीत, जर युरोपवर साम्राज्यवादी भांडवलदारवर्गाचे वर्चस्व चालू राहिले, तर क्रांतिकारक रशियाचा पराभव अटळ आहे...

"दोनच पर्याय संभवतात; एक तर रशियन क्रांती युरोपमध्ये क्रांतिकारक चळवळ निर्माण करील, किंवा युरोपीय सत्ता रशियन क्रांतीचा नाश करतील!"

लोकांनी प्रचंड उत्साहाने टाळ्या पिटून त्यांच्या भाषणाचे स्वागत केले. लोकांच्या मनात या भाषणाने विचारांची एक ज्वाला प्रज्वलित केली की, त्यांनी हे साहस केले होते. मानवजातीच्या कल्याणासाठी हाती कंकण बांधले होते. त्या क्षणापासून उठावखोर जनतेच्या सर्व कृतींमध्ये काहीतरी जाणीवेची आणि ठामपणाची भावना वास करू लागली व ही भावना सदैव राहिली.

पण दुसऱ्या बाजूनेही लढाईचा रंग जमू लागला होता. कामेनियेव यांनी रेलकामगारांच्या युनियनच्या एका प्रतिनिधीला बोलण्याची परवानगी दिली. राकट चेहऱ्याच्या त्या बुटक्या माणसाचा दृष्टिकोन कट्टर द्वेषाचा होता. त्याने जणू एक बाँबगोळा फेकला.

"रशियातील सर्वात बलिष्ठ संघटनेच्या वतीनं मी बोलण्याचा हक्क बजावतो आणि तुम्हाला सांगतो: सरकारच्या स्थापनेविषयी युनियनचा निर्णय काय आहे ते सांगण्याची कामगिरी विक्झेलने* माझ्यावर सोपवलीय. रशियातील सर्व लोकशाही पक्षांपासून अलग राहण्याचा बोल्शेविकांनी आग्रह धरला, तर मध्यवर्ती समिती बोल्शेविकांना पाठिंबा देण्यास साफ नकार देत आहे!" सबंध हॉलमध्ये अफाट गोंधळ माजला.

"१९०५ मध्ये आणि कोर्निलोव प्रकरणाच्या दिवसात, रेलकामगार हे क्रांतीचे सर्वोत्तम रक्षक होते. पण तुम्ही आम्हाला तुमच्या काँग्रेसला आमंत्रण दिलं नाहीत" – आरोळ्या – "जुन्या केंद्रीय कार्यकारी समितीने तुम्हाला बोलावलं नव्हतं!" पण वक्त्याने तिकडे लक्ष दिले नाही. "या काँग्रेसला वैध मानायला आम्ही तयार नाही; मेन्शेविक आणि समाजवादी-क्रांतिकारक निघून गेल्यापासून कायदेशीर कोरम राहिलेला नाही... जुन्या केंद्रीय कार्यकारी समितीला युनियन पाठिंबा देत आहे आणि

---

*विक्झेल – रेलकामगार आणि कर्मचारी यांच्या युनियनची अखिल रशिया कार्यकारी समिती. – सं.

जाहीर करत आहे की, नवी समिती निवडण्याचा कॉंग्रेसला अधिकार नाही...

"सत्ता ही समाजवादी आणि क्रांतिकारक सत्ता असली पाहिजे, सबंध क्रांतिकारक लोकशाहीच्या अधिकारी संस्थांना जबाबदार असली पाहिजे. अशी सत्ता स्थापन होईपर्यंत, रेलकामगारांची युनियन ज्याप्रमाणे प्रतिक्रांतिकारक फौजांची पेत्रोग्रादपर्यंत वाहतूक करायला नकार देत आहे त्याचप्रमाणे, विक्झेलच्या संमतीशिवाय कोणत्याही आज्ञेचे पालन करायला मनाई करीत आहे. रशियातील सर्व लोहमार्गांचा संपूर्ण कारभार विक्झेल आपल्या हाती घेत आहे."

त्याच्या भाषणाच्या अखेरीस त्याचा आवाज ऐकू येणे कठीण झाले होते, कारण संतप्त जमावाने त्याच्यावर शिव्यांचा भडिमार चालवला होता. पण हा टोला जबरदस्त होता – अध्यक्षमंडळाच्या चिंतातुर मुद्रांवरून त्याची गंभीरता जाणवत होती. तरीही कामेनियेव यांनी केवळ एवढेच उत्तर दिले की कॉंग्रेसच्या वैधतेबद्दल कोणताही संदेह बाळगण्याचे कारण नाही; जुन्या केंद्रीय कार्यकारी समितीने प्रस्थापित केलेल्या कोरमच्या संख्येहूनही उपस्थित कोरम अधिक आहे – मेन्शेविक आणि समाजवादी-क्रांतिकारक सोडून गेले तरी...

त्यानंतर सरकारच्या स्थापनेबाबत मतदान झाले आणि जनकमिस्सार मंडळ प्रचंड बहुमताने अधिकारावर आले.

नव्या केंद्रीय कार्यकारी समितीच्या निवडणुकीला, रशियन प्रजासत्ताकाच्या नव्या संसदेच्या निवडीला, जेमतेम पंधरा मिनिटे लागली. ट्रॉट्स्कींनी तिची रचना जाहीर केली: एकूण १०० पैकी ७० बोल्शेविक... किसानांसाठी आणि बाहेर निघून गेलेल्या गटांसाठी काही जागा राखून ठेवण्यात येणार होत्या. "आमच्या कार्यक्रमाचा स्वीकार करणाऱ्या सर्व पक्षांचं आणि गटांचं, आम्ही आमच्या सरकारमध्ये स्वागत करतो," ट्रॉट्स्कींनी समारोपात म्हटले.

आणि रशियातल्या चारी कोपऱ्यांहून आलेल्या सदस्यांना त्वरेने आपापल्या घरी जाता यावे व घडलेल्या महान घडामोडींचा वृत्तांत आपापल्या लोकांना सांगता यावा म्हणून सोविएतांची दुसरी अखिल रशिया कॉंग्रेस विसर्जित करण्यात आली...

झोपलेल्या ट्रामच्या कंडक्टरांना आणि चालकांना आम्ही जागे केले तेव्हा सकाळचे जवळ जवळ सात वाजले होते. सोविएतच्या प्रतिनिधींना

आपापल्या घरी पोचविण्यासाठी या ट्रामगाड्या ट्राम-कामगार युनियनतर्फे स्मोल्नीबाहेर उभ्या ठेवल्या गेल्या होत्या. आदल्या रात्रीपेक्षा त्या गर्दीने भरलेल्या ट्राममध्ये कमी आनंदी उत्साह होता असे मला वाटले. अनेकजण चिंताक्रांत दिसत होते. कदाचित ते स्वतःशी म्हणत असावेत. "आता आम्ही मालक आहोत, आमच्या इच्छेला आता आम्ही कसं वळण देऊ?"

आमच्या घराशी अंधारात सशस्त्र गस्तवाल्या नागरिकांनी आम्हाला थोपवले आणि आमची कसून झडती घेतली. दूमाची घोषणा काम करू लागली होती...

आम्ही घरात आल्याची चाहूल लागताच घरमालकीण अंगाभोवती एक गुलाबी रेशमी चादर गुंडाळून धडपडत आली.

"घर-समितीनं पुन्हा सांगितलंय की, इतर लोकांबरोबर तुम्हीही तुमच्या पाळीला पहाऱ्याचं काम करा," ती म्हणाली.

"पहारा करायचं कारण काय?"

"बायकांचं आणि मुलांचं रक्षण करायला!"

"कुणापासून?"

"चोरट्यांपासून आणि खुन्यांपासून".

"पण समजा, लष्करी क्रांतिकारक समितीकडून एखादा कमिस्सार शस्त्रांचा तपास करायला आला तर?"

"अहो ते दरोडेखोर नेमकं असंच सांगतील, कमिस्सार आहोत म्हणून... शिवाय त्यांच्यात फरक काय आहे?"

मी अगदी गंभीरपूर्वक ठाम सांगितले की, अमेरिकन नागरिकांनी शस्त्रे बाळगू नयेत अशी कॉन्सलची आज्ञा आहे – विशेषतः रशियन प्रज्ञावंतांचा शेजार असताना...

प्रकरण सहावे

# रक्षण समिती

शुक्रवार, ९ नोव्हेंबर...

"नोवोचेर्कास्क, ८ नोव्हेंबर.

बोल्शेविकांचे बंड आणि हंगामी सरकारला पदभ्रष्ट करून पेत्रोग्रादमधील सत्ता काबीज करण्याचा त्यांचा प्रयत्न लक्षात घेता कझाक सरकार जाहीर करीत आहे की, या कृती गुन्हेगारी स्वरूपाच्या आणि पूर्णतः अग्राह्य आहेत असे ते समजते. त्या अनुषंगाने, संमिश्र सरकार असलेल्या हंगामी सरकारला कझाक आपला पूर्ण पाठिंबा देतील. या परिस्थितीमुळे, आणि हंगामी सरकार परत सत्तेवर येईपर्यंत व रशियात पुन्हा सुव्यवस्था स्थापन होईपर्यंत, ७ नोव्हेंबरपासून, दॉन प्रदेशातील सर्व सत्ता माझ्या हाती घेत आहे.

सही : अतामान **कालेदिन**,
कझाक फौजांच्या सरकारचा अध्यक्ष"

मंत्री-अध्यक्ष केरेन्स्की यांनी गत्चिना येथून काढलेला हुकूम :

"मी, हंगामी सरकारचा मंत्री-अध्यक्ष आणि रशियन प्रजासत्ताकाच्या सर्व सेनादलांचा सरसेनापती जाहीर करतो की, पितृभूमीशी निष्ठावंत राहिलेल्या सर्व आघाडीवरच्या तुकड्यांचे प्रमुखपद मी आज आपल्या हाती घेत आहे.

"देशाशी आणि क्रांतीशी द्रोह करणाऱ्यांच्या आवाहनाला चुकीने किंवा मूर्खपणाने प्रतिसाद देणाऱ्या पेत्रोग्रादच्या लष्करी विभागातील

सर्व शिपायांनी विनाविलंब आपल्या कामावर हजर व्हावे, असा मी हुकूम देतो.

"सर्व रेजिमेंट, बटालियना आणि स्क्वाड्रनांमधून हा हुकूम वाचला जाईल.

सही : हंगामी सरकारचे
मंत्री-अध्यक्ष आणि सरसेनापती
**केरेन्स्की.**"

उत्तर आघाडीवरच्या सेनापतीला केरेन्स्की यांनी पाठवलेली तार :

"निष्ठावंत रेजिमेंटनी गात्चिना शहर रक्तपाताविना घेतले.

"क्रॉन्स्ताद्तच्या खलाशांच्या तुकड्यांनी आणि सेम्योनोव्स्की व इझ्माइलोव्स्की रेजिमेंटांच्या सैनिकांनी प्रतिकार न करता शस्त्रे खाली ठेवली आणि सरकारी फौजांमध्ये ते सामील झाले.

"कामगिरी नेमून दिलेल्या सर्व तुकड्यांनी लौकरात लौकर कूच करावे अशी मी आज्ञा करतो.

"लष्करी क्रांतिकारक समितीने आपल्या फौजांना माघार घ्यायला सांगितली आहे..."

नैऋत्येला सुमारे तीस किलोमीटरवरचे गात्चिना रात्रीच्या सुमारास पडले. उपरीनिर्दिष्ट दोन रेजिमेंटांचे सैनिक — खलाशी नव्हेत — शेजारच्या प्रदेशात कप्तानाविना हिंडत असताना खरोखरीच कझाकांनी त्यांना घेरले होते व त्यांनी शस्त्रे खाली ठेवली होती; पण सरकारी फौजांमध्ये ते सामील झाले होते हे खरे नव्हते. आत्ता या क्षणाला, त्यांच्यापैकी अनेकजण, खिन्नमनस्क आणि शरमिंद्या अवस्थेत स्मोल्नी येथे आले होते व घडल्या प्रकाराचा खुलासा करीत होते. कझाक एवढ्या नजीक येऊन ठेपले असतील याची त्यांना मुळी कल्पनाच नव्हती... त्यांनी कझाकांशी वादविवाद करायचाही प्रयत्न केला होता...

क्रांतिकारक आघाडीवर बराच मोठा गोंधळ माजला होता हे उघड होते. दक्षिणेकडील सर्व छोट्या शहरांमधील शिबंदींमधून नैराश्यापायी, घाबरटपणापायी दोन किंवा तीन गटांमध्ये फूट पडली होती : वरिष्ठ सेनाधिकारी केरेन्स्कींच्या बाजूचे होते कारण त्यांना अद्याप दुसरी तेवढी जब-

रदस्त व्यक्ती आढळत नव्हती, बहुसंख्य सर्वसामान्य शिपाई सोविएतांच्या बाजूचे होते आणि बाकीचे दुर्दैवाने लळतलोंबत राहिले होते.

लष्करी क्रांतिकारक समितीने घाईगडबडीने पेत्रोग्रादच्या संरक्षण मोर्चांचे नेतृत्व सैन्यातले एक महत्त्वाकांक्षी कप्तान मुराव्योव * यांच्याकडे सोपवले; याच मुराव्योवनी उन्हाळयात आहुती पलटणी संघटित केल्या होत्या आणि एकदा असे ऐकण्यात आले होते की, सरकारला त्यांनी सल्ला दिला होता: "बोल्शेविकांशी ते फार नरमाईने वागत आहे; त्यांना साफ करून टाकलं पाहिजे." हा लष्करी प्रवृत्तीचा, सत्ता आणि धाडस प्रिय असलेला माणूस होता; कदाचित त्यांच्या आवडी प्रामाणिक होत्या.

सकाळी मी खाली आलो तेव्हा माझ्या दाराशी लष्करी क्रांतिकारक समितीच्या दोन नव्या आज्ञा चिकटवलेल्या होत्या; सर्व दुकाने नेहमीप्रमाणे उघडावीत आणि सर्व रिकाम्या खोल्या आणि गाळे समितीच्या उपयोगासाठी देण्यात यावेत, असे त्या आज्ञांमध्ये म्हटले होते.

आतापर्यंत छत्तीस तास, प्रांतिक रशियापासून आणि बाहेरच्या जगापासून बोल्शेविकांचा संपर्क तुटलेला होता. रेलकामगारांनी आणि तारखात्याच्या लोकांनी त्यांचे संदेश पाठवायला नकार दिला होता, पोस्टमन लोक त्यांचे टपाल हाताळत नव्हते. फक्त त्सारस्कोये सेलो येथील सरकारी रेडिओ दर अर्ध्या तासाने बातमीपत्रे आणि जाहीरनामे आकाशाच्या चारी कोपऱ्यांमध्ये प्रसारीत करत होता. स्मोल्नीचे कमिस्सार नगर दूमाच्या कमिस्सारांबरोबर वेगवान आगगाड्यांमधून अर्ध्या जगभर स्पर्धा करीत धावत होते; आणि प्रचारसाहित्याने ठासून भरलेली दोन विमाने आघाडीकडे पसार झाली होती.

पण उठावाच्या लाटा सबंध रशियाभर ज्या वेगाने पसरत चालल्या होत्या, त्याच्याशी कुठल्याही मानवी प्रचार-संस्थेला स्पर्धा करणे शक्य नव्हते. हेल्सिंगफोर्स सोविएतने पाठिंब्याचे ठराव मंजूर केले; कीव्हच्या बोल्शेविकांनी शस्त्रागार आणि तारघर काबीज केले होते, पण तिथे कझाकांच्या काँग्रेससाठी आलेल्या प्रतिनिधींनी बोल्शेविकांना लौकरच हाकून दिले; कझानमध्ये लष्करी क्रांतिकारक समितीने स्थानिक शिबंदीच्या अधिकाऱ्यांना आणि हंगामी सरकारच्या कमिस्सारला अटक केली; सैबेरियातील क्रास्नोयार्स्क येथून बातमी आली की, नगरपालिकेच्या संस्था

* मुराव्योव लेफ्टनंट-कर्नल होते. — सं.

सोविएतांच्या ताब्यात आल्या होत्या ; मॉस्कोमध्ये एका बाजूला चर्मकारांचा मोठा संप चालल्याने व दुसऱ्या बाजूला सार्वत्रिक टाळेबंदीचा धोका निर्माण झाल्यामुळे वातावरण तंग झाले होते, तिथल्या सोविएतांनी पेत्रोग्रादच्या बोल्शेविकांच्या कारवाईला प्रचंड बहुमताने पाठिंबा व्यक्त केला... एव्हाना लष्करी क्रांतिकारक समिती कामाला लागली होती.

सर्वत्र असेच घडत होते. सामान्य सैनिक आणि औद्योगिक कामगार अफाट बहुसंख्येने सोविएतांना पाठिंबा देत होते ; अधिकारी, युंकर आणि मध्यमवर्गीय सर्वसाधारणपणे सरकारच्या बाजूचे असत – जसे भांडवलदारी कॅडेट आणि "नेमस्त" समाजवादी पक्ष होते. या सर्व शहरांमधून, देशाच्या आणि क्रांतीच्या रक्षणासाठी समित्या निर्माण झाल्या होत्या, यादवी युद्धासाठी शस्त्रसज्ज बनत होत्या...

अफाट रशिया संपूर्ण विघटनाच्या मार्गावर होता. १९०५ मध्येच ही प्रक्रिया सुरू झाली होती ; मार्च क्रांतीने केवळ तिला वेग देऊन एका नव्या व्यवस्थेच्या भावी आगमनाची चाहूल दिली होती, पण जुन्या राजवटीच्या पोकळ वाशांना धरून ठेवून त्या नव्या व्यवस्थेचा अंत केला होता. आता मात्र फुंकरीने धूर उडवून लावावा त्याप्रमाणे बोल्शेविकांनी एका रात्रीत त्या जुन्या डोलाऱ्याला उडवून लावले होते. इत:पर जुना रशिया राहिला नव्हता ; आद्य उष्णतेमध्ये मानवी समाज विरघळून रसरूपाने वाहू लागला होता आणि धगधगत्या ज्वालासागरातून कठोर, दयाहीन वर्गलढा उदयाला येत होता – आणि नव्या ग्रहांवरचे पातळ पापुद्रे हळू हळू निवत चालले होते...

पेत्रोग्रादमध्ये सोळा मंत्रालये संपावर होती आणि त्यांचे नेतृत्व मजूर व पुरवठा मंत्रालयांकडे होते – ही दोनच मंत्रालये तेवढी ऑगस्टमधल्या अखिल समाजवादी* सरकारने निर्माण केलेली होती.

जर कुणी माणसे एकाकी राहिली असतील तर त्या उदास, गारठल्या सकाळी "मूठभर बोल्शेविक" एकाकी उभे होते आणि सारी वादळे त्यांच्याभोवती घोंघावत होती[1]. अगदी प्राणावर बेतलेले पाहून लष्करी क्रांतिकारक समितीने स्वरक्षणासाठी उलटा प्रहार केला.

---

* मेन्शेविक आणि समाजवादी-क्रांतिकारकांचे मिळून बनलेले. – सं.

११*

"De l'audace, encore de l'audace, et toujours de l'audace!"* पहाटे पाच वाजता लाल रक्षक नगर शासनाच्या मुद्रणालयात घुसले, दूमाच्या आवाहन-निषेधाच्या हजारो प्रती त्यांनी जप्त केल्या आणि नगरपालिकेचे अधिकृत मुखपत्र – 'वेस्त्निक गरद्स्कोगो सामाउप्रावलेनिया' (नगर स्वयंशासनाचे वार्तापत्र) – बंद पाडले. सर्व भांडवलदारी वृत्तपत्रे छापली जात असता यंत्रांवरून उतरवण्यात आली. त्यात जुन्या केंद्रीय कार्यकारी समितीचे नियतकालिक 'गोलोस सोल्दाता'चाही समावेश होता. पण तरीही त्यांनी नांव बदलून 'सोल्दात्स्की गोलोस' नांवाने लाख प्रती छापल्या. संतापून गर्जत त्याने म्हटले होते :

> "रात्रीच्या वेळी विश्वासघाताने प्रहार करून ज्या लोकांनी वर्तमानपत्रे बंद पाडली आहेत, ते देशाला दीर्घ काळ अज्ञानात ठेवू शकणार नाहीत. देशाला सत्य समजून चुकेलच! श्रीमान बोल्शेविकांनो, तुमचे खरे रूप त्यांना समजेल! आम्ही बघून घेऊ! .."

माध्यान्हीनंतर थोड्या वेळाने आम्ही नेव्स्की रस्त्यावरून खाली आलो तेव्हा दूमाच्या इमारतीसमोरचा सबंध रस्ता लोकांच्या गर्दीने भरला होता. इतस्ततः लाल रक्षक आणि खलाशी संगीनधारी रायफलींसकट उभे होते व प्रत्येकाभोवती शंभर शंभर स्त्री-पुरुषांचा गराडा पडलेला होता. त्यात कारकून, विद्यार्थी, दुकानदार, कारकून यांचा समावेश होता व हातांच्या मुठी वळून ते शिव्यागाळ करीत होते, धमक्या घालत होते. पायऱ्यांवर बालवीर आणि अधिकारी उभे होते व 'सोल्दात्स्की गोलोस'च्या प्रती वाटत होते. पायऱ्यांच्या पायथ्याला एक रिवॉल्वरधारी व दंडाला लाल फीत बांधलेला कामगार विरोधी लोकांच्या घोळक्यात संतापाने आणि भेदरून थरथरत उभा होता व वर्तमानपत्रे आपल्या ताब्यात द्या अशी मागणी करीत होता... मला वाटते इतिहासात असा प्रसंग कधीही घडला नसेल. एका बाजूला मूठभर कामगार आणि सामान्य सैनिक हाती शस्त्रे

---

*"धीर धरा, अधिक धीर धरा आणि नेहमी धीर धरा!" २ सप्टेंबर १७९२ रोजी फ्रेंच विधी मंडळात युद्धाच्या धोक्याबाबत आणि प्रतिक्रांतिकारक प्रुसो-ऑस्ट्रिया युतीच्या आक्रमणापासून क्रांतीचे रक्षण करण्याच्या आवश्यकतेबाबत भाषण करताना दान्ताँ यांचे सुप्रसिद्ध उद्‍गार. – सं.

घेऊन विजयी उठावाचे प्रतिनिधित्व करीत होते – आणि स्थिती अगदी पूर्णतः दयनीय होती ; दुसऱ्या बाजूला बेभान लोकांचा जमाव होता व दुपारच्या वेळी फिफ्थ ॲव्हेन्यूवर * फूटपाथवर उभे राहून "देशद्रोही ! चिथावणीखोर ! अप्रिचनिकी !" ** असे ओरडणाऱ्या, शिव्यागाळ करणाऱ्यांप्रमाणे लोक त्यांच्यात होते.

दरवाजावर विद्यार्थ्यांचा आणि अधिकाऱ्यांचा पहारा होता. त्यांच्या दंडांवर पांढऱ्या फिती बांधलेल्या होत्या व त्या फितींवर लाल रंगात अक्षरे होती, 'सार्वजनिक सुरक्षा समितीची मिलिशिया ;' सुमारे अर्धा डझन चालवीर धावपळ करीत होते. वरच्या मजल्यावर पुरता गोंगाट माजला होता. कप्तान गोम्बेर्ग जिन्यावरून खाली उतरत होते. "ते दूमा विसर्जित करणार आहेत," ते म्हणाले. "बोल्शेविक कमिस्सार महापौरांबरोबर आत्ता बसलेत..." आम्ही वर पोचलो तेव्हा रिआझानोव घाईघाईने बाहेर आले. दूमाने जन-कमिस्सारांच्या मंडळाला मान्यता द्यावी अशी मागणी करायला ते आले होते व महापौरांनी त्यांना साफ नकार दिला होता.

कचेऱ्यांमध्ये मोठमोठ्याने बडबड करणारी, लगबगीने जाणारी-येणारी, ओरडणारी, हातवारे करणारी अशी लोकांची प्रचंड गर्दी जमली होती – त्या गर्दीत सरकारी अधिकारी, प्रज्ञावंत, पत्रकार, विदेशी वार्ताहर, फ्रेंच आणि ब्रिटिश अधिकारी यांचा भरणा होता... नगर अभियंता त्यांच्याकडे इशारा करून विजयी सुरात म्हणाले, "परदेशी वकिलातींनी फक्त दूमालाच सत्ताधारी म्हणून आता मान्यता दिलीय. या बोल्शेविक खुन्यांचा आणि दरोडेखोरांचा फार थोडा अवधी राहिलाय. सबंध रशिया आमच्याभोवती गोळा होतोय..."

अलेक्सांदर हॉलमध्ये रक्षक समितीची एक विराट सभा भरली होती. अध्यक्षस्थानी फिलिपोव्स्की होते व पून्हा स्कोबेलियेव बोलत होते. समितीला येऊन मिळालेल्या संघटनांची नांवे ते जसजशी उच्चारत होते तसतसा टाळ्यांचा कडकडाट वाढत चालला होता : किसान सोविएतांची कार्यकारी समिती, जुनी केंद्रीय कार्यकारी समिती, मध्यवर्ती सेना समिती, त्सेन्त्रोफ्लोत, सोविएतांच्या कॉंग्रेसमधले मेन्शेविक, समाजवादी-क्रांतिकारक आणि आघाडी गटांचे प्रतिनिधी ; मेन्शेविक, समाजवादी-क्रांतिकारक,

---

* न्यूयॉर्कमधील श्रीमंत वस्तीतला रस्ता. – सं.

** १७ व्या शतकातल्या महाभयंकर इवानचे रानटी अंगरक्षक. – सं.

जन-समाजवादी पक्षांच्या मध्यवर्ती समित्या, 'येदिन्स्त्वो' गट, किसानांची युनियन, सहकारी संस्था, झेम्स्त्वो, नगरपालिका, टपाल आणि तार खात्यांच्या युनियना विक्झेल, रशियन प्रजासत्ताकाचे मंडळ, संघाचा संघ *, व्यापारी आणि कारखानदार यांची संघटना...

"...सोविएतांची सत्ता ही लोकशाहीवादी सत्ता नाही तर हुकूमशाही आहे – आणि ही कामगारवर्गाची हुकूमशाही नाही तर, कामगारवर्गा-**विरुद्धची** आहे. क्रांतिकारी उत्साह ज्यांना जाणवलाय किंवा कसा जाणवून घ्यायचा याची ज्यांना माहिती आहे त्यांनी आता क्रांतीच्या रक्षणा-साठी तयार झालं पाहिजे...

"निरुपद्रवी, बेजबाबदार भाषणबाजांचा समाचार घेणं ही आजची समस्या नाही तर, प्रतिक्रांतीविरुद्धही लढण्याची आहे... सध्याच्या घडामोडींचा फायदा करून घेण्याच्या दृष्टीनं इतर प्रांतांमधले काही सेनापती वेगळ्या इराद्यांनी पेत्रोग्रादकडं चालून येत आहेत, या अफवा खऱ्या असतील तर आपण लोकशाहीवादी सरकारचा भक्कम पाया प्रस्थापित केला पाहिजे याचा हा आणखी एक पुरावा होय. अन्यथा, डाव्यांबरोबरच्या कटकटीं-नंतर उजव्यांबरोबरच्या कटकटी सुरू व्हायच्या...

"'गोलोस सोल्दाता' विकत घेणाऱ्या नागरिकांना आणि 'राबोचाया गझेता' विकणाऱ्या पोरांना रस्त्यांत अटका झाल्यानंतर पेत्रोग्रादची शिबंदी तिकडे कानाडोळा करू शकत नाही...

"ठरावांची वेळ संपून गेलीय... ज्यांचा इत:पर क्रांतीमध्ये विश्वास नाही त्यांनी बाजूला व्हावं... संयुक्त लोकशाहीवादी सत्ता प्रस्थापित करण्या-साठी आम्हाला पुन्हा एकदा क्रांतीच्या प्रतिष्ठेची स्थापना केली पाहिजे...

"अशी प्रतिज्ञा करू या की एक तर क्रांतीचं रक्षण होईल किंवा आम्ही नष्ट होऊ!.."

हॉलमध्ये सर्वजण उठून टाळ्या वाजवत उभे राहिले. त्यांचे डोळे चमकत होते. एकही कामगार त्या ठिकाणी दृष्टीपथात येत नव्हता...

नंतर वाईनश्टेईन बोलू लागले:

"जोपर्यंत रक्षण समितीला पाठिंबा देण्यासाठी लोकमत भक्कम गोळा होत नाही तोपर्यंत आम्हाला शांत राहिले पाहिजे आणि कृती करून

---

*पहा – 'टीपा आणि खुलासे'.

चालणार नाही – मग त्यानंतर आपण संर॰ क्ष द्वित्रा सोडून कृती करू शकतो ! . ."

विक्झेल प्रतिनिधीने जाहीर केले की, नवे सरकार स्थापन करण्यात आची संघटना पुढाकार घेत होती व तिचे प्रतिनिधी त्या क्षणाला स्मोल्नी-बरोबर त्यासंबंधात वाटाघाटी करीत होते... त्या पाठोपाठ गरमागरम चर्चा झडली: नव्या सरकारमध्ये बोल्शेविकांना प्रवेश देण्यात येणार होता का? त्यांना प्रवेश द्यावा अशी मार्तोव यांनी तरफदारी केली; ते म्हणाले, काही झाले तरी बोल्शेविक एका महत्त्वाच्या राजकीय पक्षाचे प्रतिनिधित्व करताहेत. यावर जोरदार मतभेद झाले; उजव्या गटाचे मेन्शेविक आणि समाजवादी-क्रांतिकारक, तसेच जनसमाजवादी, सहकारी संस्था व भांडवल-दारी घटक या मताच्या कट्टर विरोधी होते...

"त्यांनी रशियाचा विश्वासघात केलाय," एक वक्ता म्हणाला. "त्यांनी यादवी युद्ध सुरू केलंय आणि जर्मनांना युद्धआघाडी मोकळी करून दिलीय. दयामाया न ठेवता बोल्शेविकांना चिरडून टाकलं पाहिजे..."

बोल्शेविक आणि कॅडेट अशा दोघांनाही नव्या सरकारमधून वगळावे, असे स्कोबेलियेव यांचे मत होते.

रशियाच्या लोकशाहीवर त्सेरेतेली आणि इतर "तडजोडवाद्यांनी" त्याग लादला त्या रात्री, लोकशाहीवाद्यांच्या परिषदेतून बोल्शेविकांबरोबरच सभात्याग करणाऱ्या एका तरुण समाजवादी-क्रांतिकारक पक्षीयाबरोबर मी संभाषण सुरू केले.

"तुम्ही इथं कसे?" मी त्याला विचारले.

त्याच्या डोळ्यातून क्रोधाच्या ठिणग्या उडाल्या. "होय!" तो ओर-डला. "बुधवारी रात्री मी माझ्या पक्षाबरोबर काँग्रेस सोडली. नीच लोकांच्या जुलुमाला सहन करण्यासाठी मी माझ्या आयुष्यातली विसाहून अधिक वर्षं वाया घालवलेली नाहीत. त्यांच्या वागण्याच्या तऱ्हा असह्य आहेत. त्यांनी अजून किसानांची शक्ती लक्षात घेतलेली नाही... जेव्हा किसान कृतीला आरंभ करतील तेव्हा त्यांचा खुर्दा उडायला काही मिनिटं-सुद्धा लागणार नाहीत."

"पण किसान कृती करतील? जमीनविषयक आज्ञापत्रानं किसानांचा प्रश्न सोडवला नाही? त्यांना आणखी काय पाहिजे?"

"हं! जमीनविषयक आज्ञापत्र!" तो चिडून उद्‌गारला. ते जमीन-विषयक आज्ञापत्र म्हणजे काय आहे तुम्हाला माहीत आहे? ते आमचे

आज्ञापत्र आहे—तो सहीसही समाजवादी-क्रांतिकारकांचा कार्यक्रम आहे! किसानांच्या सर्व इच्छा लक्षात घेऊन, त्यांचं अत्यंत काळजीपूर्वक एकत्रीकरण करून, माझ्या पक्षानं आखलेलं ते धोरण होतं. हा सरळ सरळ जुलूम आहे..."

"पण जर हे तुमचं धोरण आहे तर त्याला तुम्ही आक्षेप कशाला घेता? जर त्या किसानांच्या इच्छा आहेत, तर त्यांना ते कशाला विरोध करतील?"

"तुम्हाला काही समजत नाही! ही सगळी बनवाबनवी आहे हे किसानांच्या ताबडतोब लक्षात येणार नाही असं वाटतं तुम्हाला? या चोरांनी समाजवादी-क्रांतिकारकांचा कार्यक्रम पळवला हे किसानांना समजायचं नाही?"

कालेदिन उत्तरेकडे चालून येत आहेत ते खरे आहे का, असे मी विचारले.

त्याने होकारार्थी मान डोलावली व आसुरी समाधानाने आपले हात चोळले. "आता बघा या बोल्शेविकांनी काय करून ठेवलं. त्यांनी आमच्याविरुद्ध प्रतिक्रांतीला उठवलं! क्रांतीला बरबाद केलं! क्रांतीला गमावलं!"

"पण तुम्ही क्रांतीचं रक्षण करणार नाही?"

"अर्थात आम्ही तिचं संरक्षण करू—रक्ताचा शेवटचा थेंब शरीरात असेपर्यंत. पण तरीही कोणत्याही प्रकारे आम्ही बोल्शेविकांशी सहकार्य करणार नाही..."

"पण जर कालेदिन पेत्रोग्रादवर चालून आला आणि बोल्शेविक शहराच्या रक्षणाला उभे ठाकले तर त्यांना तुम्ही साथ करणार नाही?"

"अर्थातच नाही. आम्हीही शहराचं रक्षण करू, पण आम्ही बोल्शेविकांना मदत करणार नाही. कालेदिन हा क्रांतीचा शत्रू आहे, पण बोल्शेविकसुद्धा तेवढेच क्रांतीचे शत्रू आहेत."

"कोण तुम्हाला परवडतो—कालेदिन का बोल्शेविक?"

"हा चर्चा करण्याजोगा प्रश्न नाही!" तो चिडून म्हणाला. "मी तुम्हाला सांगितलं, क्रांती खलास झालीय. आणि त्याला जबाबदार बोल्शेविक आहेत. जाऊ दे—आपण अशा गोष्टी कशाला बोला? केरेन्स्की येताहेत... परवा आम्ही आक्रमक पवित्रा घेऊ... नवं सरकार स्थापन करण्यासाठी स्मोल्नीनं एव्हाना प्रतिनिधी पाठवून आम्हाला बोलावणं केलंय.

पण आम्ही त्यांचा आता खरपूस समाचार घेऊ—ते अगदी पूर्णतया नपुंसक आहेत... आम्ही त्यांच्याशी सहकार्य करणार नाही..."

बाहेर गोळीबाराचा आवाज झाला. आम्ही खिडक्यांपाशी धावत गेलो. जमावाच्या कुचकट टोमण्यांनी सहनशीलता सुटलेल्या एका लाल रक्षकाने अखेरीस जमावावर रायफल झाडली होती व एका तरुणीला दंडात जखम झाली होती. उत्तेजित जमावाने घेरलेल्या एका बग्गीत तिला उचलून ठेवत असलेले आम्ही पाहिले. लोकांच्या ओरडयाचा आवाज आमच्यापर्यंत येऊन पोचत होता. आम्ही पहात होतो तेवढयात अचानक एक चिलखती मोटारगाडी मिखाईलोव्स्की रस्त्याच्या कोपऱ्याला येऊन उभी राहिली. तिच्यावरच्या तोफांच्या इकडे-तिकडे हालचाली झाल्या. ताबडतोब नेहमी पेत्रोग्रादचा जमाव जसा पळापळ करू लागतो तशी पळापळ सुरू झाली, लोक रस्त्यात आडवे पडून स्तब्ध झाले, गटारांमध्ये खच्चून गर्दी झाली, टेलिफोनच्या खांबांमागे अनेक दडून बसले. गाडी धडधडत दूमाच्या पायऱ्यांपाशी येऊन थांबली, टप उघडून एका माणसाचे मुंडके बाहेर डोकावले आणि त्याने 'सोल्दात्स्की गोलोस' ताब्यात द्यावे अशी मागणी केली. बालवीरांनी त्याला वेडावून दाखवले आणि ते इमारतीच्या आत पळाले. एका क्षणानंतर गाडीने अनिश्चितपणे एक गिरकी घेतली आणि नेव्स्कीच्या मार्गाने ती निघून गेली. दरम्यान काही शेकडा स्त्री-पुरुष उठून उभे राहिले होते व कपडयांवरची धूळ झटकू लागले होते...

आतमध्ये काखोटीला 'सोल्दात्स्की गोलोस'चे भारे घेतलेल्या लोकांची प्रचंड धावपळ चालली होती व अंक लपवून ठेवण्यासाठी ते जागा शोधत होते.

हातात एक कागद फडकावीत एक पत्रकार धावत खोलीत आला.

"क्रास्नोव यांची ही घोषणा आहे!" तो ओरडला. प्रत्येकाने त्याच्याभोवती गर्दी केली. "लौकर छापा—लौकर छापा, आणि बराकींकडं पाठवा!"

"सरसेनापतींच्या आज्ञेनुसार मला पेत्रोग्रादभोवती एकवटलेल्या फौजांचा अधिपती नेमण्यात आले आहे.

"नागरिकांनो, सैनिकांनो, दॉनच्या, कुबानच्या बैकलपलिकडच्या, अमूरच्या, येनिसेईच्या शूर कझाकांनो, तुमच्या प्रतिज्ञेशी प्रामाणिक राहिलेल्या सर्व लोकांनो, मी तुम्हाला आवाहन करतो आहे;

आपल्या कझाकाच्या प्रतिज्ञेशी जागायची शपथ घेतलेल्या तुम्हा लोकांना मी आवाहन करतो आहे — पेत्रोग्रादचे अराजकापासून, दुष्काळापासून, जुलमापासून रक्षण करा आणि विल्हेल्मच्या सोन्याला विकत गेलेल्या मूठभर लोकांनी रशियाला त्याच्या ताब्यात देण्याचा जो काळोखी फासणारा प्रयत्न चालवलाय, त्यापासून रशियाचे रक्षण करा. मार्चच्या महान दिवसांमध्ये ज्या हंगामी सरकारशी निष्ठावंत राहण्याची तुम्ही शपथ घेतली होती ते सरकार उलथून टाकण्यात आलेले नाही; त्याच्या बैठका ज्या इमारतीत होत तेथून त्याला हिंसेच्या बळावर घालवून देण्यात आले आहे. तरीही, आपल्या कर्तव्याशी प्रामाणिक असणाऱ्या आघाडीवरच्या सेनांच्या मदतीने, सर्व कझाकांना आपल्या आधिपत्याखाली एकवटणाऱ्या कझाक मंडळाच्या मदतीने — ज्या मंडळात कझाक सैनिकांमध्ये वसणाऱ्या नीतीधैर्याचा अंतर्भाव असल्याने ते समर्थ बनले आहे आणि रशियन जनतेच्या इच्छेनुसार जे वागत आहे — त्या सरकारने आपल्या देशाची सेवा करण्याची शपथ घेतली आहे; ज्याप्रमाणे आमच्या पूर्वजांनी शपथ घेतली होती व स्वीडिश, पोलिश आणि लिथुआनियामधील लोकांच्या आक्रमणाच्या धोक्यापासून १६१२ साली दॉनच्या कझाकांनी मॉस्कोला मुक्त केले होते. [तुमचे सरकार अद्याप अस्तित्वात आहे...]*

"कर्तव्यपरायण सेना या गुन्हेगारांना तिरस्करणीय मानून त्यांच्याकडे संतापाने पहात आहे. त्यांच्या लुटारूपणाच्या आणि पुंडाईच्या कारवाया, त्यांचे अपराध, रशियाबाबतची त्यांची जर्मन छापाची मनोवृत्ती — घायाळ झालाय पण अजून शरण आलेला नाही — अशा गोष्टींमुळे ते सबंध जनतेपासून अलग पडलेत.

"नागरिकांनो, सैनिकांनो, पेत्रोग्राद शिबंदीमधल्या शूर कझाकांनो; तुमचे प्रतिनिधी माझ्याकडे पाठवा म्हणजे कोण देशद्रोही आहेत आणि कोण नाहीत ते मला समजेल व निष्कारण निष्पाप रक्तपात टाळणे शक्य होईल."

त्याच वेळेला गटागटांमधून निरोप फिरला की, इमारतीला लाल रक्षकांचा वेढा पडला होता. दंडाभोवती लाल फीत बांधलेला एक अधि-

---

*कंसामधील शब्द वृत्तपत्रीय वार्तांमध्ये नाहीत. — सं.

ारी आत आला आणि त्याने महापौरांना भेटण्याची मागणी केली. काही मिनिटांनंतर तो निघून गेला आणि म्हातारे श्रायडर आपल्या कचेरीतून बाहेर आले. त्यांचा चेहरा आलटून पालटून लालबुंद आणि पांढराफिकट ात होता.

"दूमाची बैठक बोलवा!" ते ओरडले. "ताबडतोब!"

"काय झालं?"

"मला माहीत नाही – आम्हाला अटक करणार आहेत – दूमा विसर्जित करणार आहेत – दाराशी सभासदांना अटक करणार आहेत –" उत्तेजित ागात सर्वत्र उद्‌गार ऐकू येत होते.

निकोलाय हॉलमध्ये उभे रहायलासुद्धा जागा उरली नव्हती. महापौ- ांनी जाहीर केले की, सर्व दरवाजांशी फौजा उभ्या करण्यात आल्या असून सर्व येण्या-जाण्याला बंदी घालण्यात आली आहे, कमिस्सारने अटक ण्याची व नगरपालिकेची दूमा विसर्जित करण्याची धमकी घातली आहे. ावर सदस्यांच्या, एवढेच नव्हे तर प्रेक्षकांच्या सज्जातूनही भावनावेगाने ाःप्रोत भरलेल्या भाषणांचा महापूर लोटला. स्वतंत्रपणे निवडलेले नगर ासन **कोणत्याही सत्तेला** विसर्जित करण्याचा अधिकार **नव्हता;** जुलुमी, िथावणीखोर जर्मन हस्तकांना कधीही मान्यता देऊ नये; आम्हाला िसर्जित करण्याची भाषा करताहेत, खुशाल प्रयत्न करून पाहोत – आम- ा मुडद्यांवरूनच आत येऊन त्यांना सभागृहाचा ताबा घेता येईल; जुन्या ाळच्या रोमन सेनेटरांप्रमाणे आम्ही दिमाखाने इथे उभे राहून गॉथांची ा पाहतो आहोत...

ठराव – रशियातील सर्व दूमांना आणि झेम्स्त्वोंना तारेने कळवण्यात ा... ठराव – महापौरांना किंवा दूमाच्या अध्यक्षांना लष्करी क्रांतिकारक ामितीशी किंवा तथाकथित जन-कमिस्सार मंडळाशी कोणत्याही तऱ्हेच्या ाटाघाटी करून करार करणे अशक्य आहे. ठराव – आपल्या निवडून दिले- ा नगर शासनाच्या रक्षणासाठी उभे रहा, असे पेत्रोग्रादच्या नागरिकांना ार आवाहन करणे. ठराव – अखंड बैठक चालू ठेवणे...

दरम्यान एक सभासद माहिती घेऊन आला की, त्याने स्मोल्नीला ोन केला होता व लष्करी क्रांतिकारक समितीने सांगितले की, दूमाला ा घालण्याचा हुकूम कुणीही दिलेला नाही व शिपायांना मागे घेण्यात ...

आम्ही खालच्या मजल्यावर गेलो तर विलक्षण अस्वस्थ मनःस्थितीतले रिआझानोव धाडकन पुढच्या दारामधून आत आले.

"तुम्ही दूमा विसर्जित करणार आहात काय?" मी विचारले.

"बापरे, नाही!" ते उत्तरले. "हा पूर्ण गैरसमज आहे... सकाळी मी महापौरांना सांगितलं की, दूमाला त्रास देण्यात येणार नाही..."

बाहेर नेव्स्की मार्गावर, गडद होत जाणाऱ्या संध्याच्छायांमध्ये, खांद्यावर रायफली लटकावलेल्या सायकलस्वारांची ही दुहेरी रांग येत होती. ते थांबले, त्यांच्याभोवती लोकांची गर्दी जमली आणि त्यांच्यावर प्रश्नांची सरबत्ती उडाली.

"तुम्ही कोण आहात? कुठून आलात?" तोंडात सिगार धरलेल्या एका लठ्ठ माणसाने विचारले.

"बारावी सेना. आघाडीवरून आलो. त्या भिकार भांडवलदारांविरुद्ध सोविएतांना पाठिंबा द्यायला आलोय!"

"अच्छा!" संतापलेल्या आरोळ्या उमटल्या. "हे बोल्शेविकांचे पित्ते आहेत! बोल्शेविक कझाक!"

कातडी कोटातला एक बुटका अधिकारी पायऱ्यांवरून धावत खाली आला. "शिबंदी उलटतेय!" तो माझ्या कानात पुटपुटला. "बोल्शेविकांच्या अखेरीला आरंभ झालाय. बाजू उलटलेली तुम्हाला पहायचीय? चला माझ्याबरोबर!" मिखाईलोव्स्की रस्त्याकडे तो दुडक्या चालीने निघाला व आम्ही त्याच्या पाठोपाठ जाऊ लागलो.

"कोणती रेजिमेंट उलटलीय?"

चिलखती गाड्या... ही खरोखरच चिंतेची बाब होती. सर्व परिस्थिती चिलखती गाड्यांमधल्या सैनिकांच्या हाती होती; ज्यांचे चिलखती गाड्यांवर नियंत्रण त्यांचे शहरावर नियंत्रण होते. "रक्षक समितीचे आणि दूमाचे कमिस्सार त्यांच्याशी वाटाघाटी करताहेत. निर्णयासाठी सभा चालू आहे..."

"कसल्या निर्णयासाठी? कोणत्या बाजूनं ते लढतील ते ठरवायला?"

"छेः छेः! तसं करून चालणार नाही. ते बोल्शेविकांविरुद्ध कधीही लढणार नाहीत. ते तटस्थ राहण्याचं ठरवतील — आणि मग युंकर आणि कझाक — "

मिखाईलोव्स्की अश्वारोहण विद्यालयाच्या मोठ्या इमारतीचे दरवाजे सताड उघडे होते. दोन पहारेकऱ्यांनी आम्हाला अडवायचा प्रयत्न केला, पण त्यांच्या संतापलेल्या उद्‌गारांकडे दुर्लक्ष करून आम्ही तसेच बेधडक

आत घुसलो. आतमध्ये प्रचंड हॉलच्या उंच छपराजवळ एकच बत्ती मिणमिण पेटत होती व त्या हॉलचे चौकोनी उंच स्तंभ आणि गवाक्षांच्या रांगा अंधारात अदृश्य झाल्या होत्या. भोवताली महाकाय चिलखती गाड्यांच्या काळसर आकृती उभ्या असलेल्या दिसत होत्या. दिव्याच्या खाली मध्यभागी एक गाडी उभी होती आणि भोवताली सुमारे दोन हजार करड्या गणवेषातले सैनिक जमले होते. पण त्या शाही इमारतीच्या अफाट विस्तारात त्यांचे अस्तित्व जणू हरवल्यासारखे वाटत होते. सुमारे डझनभर माणसे — अधिकारी, सैनिक समित्यांचे अध्यक्ष आणि वक्ते — गाडीच्या टपावर जमले होते आणि मधल्या बुरुजावर उभे राहून एक सैनिक बोलत होता. ते गेल्या उन्हाळ्यात भरलेल्या बोल्शेविकांच्या चिलखती तुकड्यांच्या अखिल रशियन काँग्रेसचे अध्यक्ष खान्जोनोव होते. सुरेख सडपातळ बांध्याचे व लेफ्टनंटच्या फिती खांद्यावर लावलेले कातडी घोटातील खान्जोनोव आपल्या प्रभावी वक्तृत्वाद्वारे तटस्थतेचे समर्थन करीत होते.

ते म्हणाले, "रशियनांनी आपल्या रशियन बांधवांना ठार मारणं ही महाभयानक गोष्ट आहे. झारविरुद्ध खांद्याला खांदा लावून उभ्या राहिलेल्या आणि इतिहासात नमूद होतील असे परकी शत्रूंविरुद्धच्या लढायांमध्ये विजय मिळविलेल्या सैनिकांमध्ये यादवी युद्ध होऊन चालणार नाही! या राजकीय पक्षांच्या भांडणांमध्ये आम्हा सैनिकांना काय रस आहे? हंगामी सरकार लोकशाहीवादी होतं असं मी म्हणणार नाही; आम्हाला भांडवलदारांबरोबर सहयोग करायचा नाही, मुळीच नाही. पण आम्हाला संयुक्त लोकशाहीवादी सरकार असणं आवश्यक आहे, नाही तर रशिया संपला! आम्हाला आवश्यक असं सरकार आलं तर यादवी युद्धाची आणि भावानं भावाला ठार मारण्याची गरजच भासणार नाही!"

त्यांचे बोलणे पटण्यासारखे वाटले — त्या प्रचंड हॉलमध्ये टाळ्यांचे आणि आवाजांचे प्रतिध्वनी उमटत राहिले.

एक सैनिक चढून उभा राहिला. त्याचा चेहरा फिकुटलेला आणि आखडलेला दिसत होता. "कॉम्रेडहो!" तो ओरडला, "मी रूमानियाच्या आघाडीवरून तातडीनं तुम्हा सर्वांना सांगायला आलोय: शांतता प्रस्थापित झाली पाहिजे! ताबडतोब! जो कुणी आम्हाला शांतता लाभू देईल, मग ते बोल्शेविक असोत वा हे नवे सरकार असो, आम्ही त्यांच्या पाठोपाठ जाऊ. शांतता हवी! आघाडीवर लढण्याची आता आमच्यात ताकद राहिली नाही. जर्मनांशी आम्ही लढू शकत नाही किंवा रशियनांशीही लढू शकत

नाही –" एवढे बोलून त्याने खाली उडी मारली. त्या उसळत्या जमावामधून वेदना प्रकट करणारा एक गोंधळवजा ध्वनी उमटला आणि पुढच्या वक्त्याने, एका मेन्शेविक-अबारोनेत्सने सांगायचा प्रयत्न केला की, दोस्त राष्ट्रे विजयी होईपर्यंत युद्ध चालू राहिले पाहिजे, तेव्हा त्या जमावाच्या संतापाला कडाडून वाचा फुटली.

"तू केरेन्स्कीसारखं बोलतोयस!" एक भरडा आवाज ओरडला.

त्यानंतर दूमाच्या एका प्रतिनिधीने तटस्थतेचे समर्थन केले. त्याचे बोलणेही जमावाने अस्वस्थ उद्‌गार काढीत, त्याला आपल्यापैकी एक न मानता, कसेबसे ऐकले. समजावून घेण्याचा, निर्णय घेण्याचा एवढा आटोकाट प्रयत्न करणारी माणसे मी आजवर कधीही पाहिलेली नाहीत. ती कधीही जागची हलली नाहीत, वक्त्याकडे कमालीच्या एकाग्रतेने पहात ऐकत राहिली, मनातील विचारांमुळे त्यांच्या भुवया आकुंचन पावत होत्या, त्यांच्या कपाळांवर घाम थबथबला होता; त्या धिप्पाड माणसांचे डोळे निष्पाप बालकांसारखे निरागस होते आणि त्यांच्या मुद्रा जुन्या काळच्या बलाढ्य लढवय्यांसारख्या होत्या...

आता त्यांच्याचपैकी एक माणूस, एक बोल्शेविक आवेशाने, तिरस्काराने बोलत होता. त्यांना तोही आवडला नाही. त्यांची मन:स्थिती वेगळी होती. त्या क्षणाला त्यांचे मन नेहमीच्या विचारांपासून वरच्या पातळीला उचलले गेले होते; ते रशियाच्या, समाजसत्तावादाच्या, जगाच्या दृष्टिकोनातून विचार करत होते, जणू क्रांतीचे जीवन-मरण त्यांच्यावर अवलंबून होते...

एका पाठोपाठ एक वक्ता बोलत होता; तीव्र ताणाच्या शांततेत युक्तिवाद लढवीत होता, भाषणानंतर संमतीच्या किंवा संतापाच्या आरोळ्या उमटत होत्या: आपण बाहेर पडायचं किंवा नाही? खान्जोनोव परत बोलायला उभे राहिले. त्यांचे बोलणे आर्जवी होते, सहानुभूती निर्माण करणारे होते. पण त्यांनी कितीही शांततेच्या गप्पा मारल्या तरी ते एक अधिकारी, एक अबारोनेत्स नव्हते का? मग एक वासिलीअस्त्रोवचा कामगार आला, पण त्याला त्यांनी टोमणे हाणले, "अरे कामगारा, तू काय आम्हाला शांतता मिळवून देणार?" आमच्या शेजारी काही लोकांनी, त्यांच्यात बहुतेक अधिकारी होते, तटस्थतेच्या पुरस्कर्त्यांना पाठिंबा देण्यासाठी एक कंपू बनवला. ते ओरडत राहिले, "खान्जोनोव! खान्जोनोव!" आणि जेव्हा बोल्शेविक वक्ता बोलायचा प्रयत्न करी तेव्हा शिट्या वाजवून त्याला अडथळा करीत.

एकाएकी समितीवाले आणि मोटारीच्या टपावरील अधिकारी यांच्यात कसलातरी कडाक्याचा वाद पेटला व जोरजोराने हातवारे सुरू झाले. काय भानगड उपस्थित झाली ते श्रोत्यांना समजेना आणि जमावात एकच गोंधळ माजला. एका अधिकाऱ्याने धरून ठेवलेल्या एका सैनिकाने हिसडा मारून स्वतःला सोडवून घेतले आणि आपला हात उंचावून तो ओरडला :

"कॉम्रेडहो! कॉम्रेड क्रीलेन्को इथं आहेत आणि त्यांना आपल्याला काही सांगायचंय!" टाळ्यांचा कडकडाट झाला, शिट्या फुंकल्या गेल्या, आरोळ्या उमटल्या "बोला! बोला! त्यांचा धिक्कार असो!" या परस्परविरोधी घोषणांच्या गोंधळात लष्करविषयक घडामोडींचे जन-कमिस्सार मोटारीच्या एका बाजूला चढले, पुढून आणि मागून काही हात त्यांना आधार देत होते, तर खालून आणि वरून काहीजण त्यांना ढकलून द्यायला पहात होते. ते क्षणभर उभे राहिले, नंतर रेडिएटरपर्यंत चालत गेले आणि कमरेवर हात धरून स्मितवदनाने त्यांनी सभोवार पाहिले. त्यांची मूर्ती बुटकी होती, पाय लहानखोर होते, डोक्यावर टोपी नव्हती आणि गणवेषावर कोणत्याही हुद्द्याची फीत नव्हती.

माझ्याजवळच्या कंपूने जोरजोराने ओरडायला सुरुवात केली, "खान्जो-नोव! आम्हाला खान्जोनोव पाहिजेत! या वक्त्याचा धिक्कार असो! चूप रहा! देशद्रोही मुर्दाबाद!" सबंध हॉलमध्ये खळबळ माजली व प्रचंड ओरडा सुरू झाला. त्यानंतर एखादा हिमखंड तुटून कोसळतो त्याप्रमाणे मल्यामोठ्या काळ्या भुवयांचे काही धिप्पाड सैनिक इतरांना बाजूला सारीत आमच्या दिशेने झेपावत आले.

"कोण आमची सभा उधळतंय?" ते ओरडले. "कोण इथं शिट्ट्या वाजवतंय?" तो कंपू एकदम चारी दिशांना पसार झाला—तो पुन्हा काही एकत्र जमला नाही...

"कॉम्रेड सैनिकहो!" अतिश्रमांनी बसक्या झालेल्या आवाजात क्रीलेन्को बोलू लागले. "मी तुमच्याशी नीट बोलू शकत नाही; मला माफ करा; पण गेल्या चार रात्री मला झोप नाही...

"मी सैनिक आहे हे तुम्हाला मी सांगण्याची गरज नाही. मला शांतता हवी आहे हे मी तुम्हाला सांगण्याची गरज नाही. मला एवढंच सांगितलं पाहिजे की, कामगारांच्या आणि सैनिकांच्या क्रांतीत यशस्वी झालेल्या बोल्शेविक पक्षानं, तुमच्या मदतीनं आणि रक्तपिपासू भांडवलदारांची सत्ता धुडकावून देणाऱ्या इतर सर्व शूर कॉम्रेडांच्या मदतीनं यशस्वी झालेल्या

बोल्शेविक पक्षानं, अखिल जनतेला शांतता मिळवून देण्याचं आश्वासन दिलं होतं आणि ते आश्वासन पूर्ण करण्यात आलंय – आजच!" टाळ्यांचा विराट कडकडाट.

"तटस्थ रहा असं तुम्हाला सांगण्यात आलं – **कधीही** तटस्थ **नसलेले** युंकर आणि आहुती पलटणी रस्त्यात आमच्यावर गोळ्या झाडत असताना आणि केरेन्स्कींना किंवा इतर कुठल्या टोळीला पेत्रोग्रादमध्ये आणत असताना तटस्थ रहायचं? कालेदिन दॉनपासून चाल करून येतोय. केरेन्स्की आघाडीकडून चालून येताहेत. ऑगस्टमधील प्रयत्नाची पुनरावृत्ती करायला कोर्निलोव तेखिन्त्सी गोळा करताहेत. यादवी युद्ध थांबवा असं तुम्हाला आत्ता आवाहन करणारे हे सर्व मेन्शेविक आणि समाजवादी-क्रांतिकारक – त्यांनी यादवी युद्धाविना आतापर्यंत स्वतःची सत्ता टिकवून धरली काय? गेल्या जुलैपासून ते यादवी युद्ध चालू आहे आणि आता ते जशी भांडवलदारांची बाजू घेताहेत, तशीच त्यांनी सतत भांडवलदारांची कड घेतली नाही काय?"

"तुम्ही जर दृढनिश्चय केला असेल तर मी कसा तुमची मनं वळवणार? प्रश्न अगदी सरळ आहे. एका बाजूला केरेन्स्की, कालेदिन, कोर्निलोव, मेन्शेविक, समाजवादी-क्रांतिकारक, कॅडेट, दूमा अधिकारी... ते आम्हाला सांगतात की त्यांची उद्दिष्टे चांगली आहेत. दुसऱ्या बाजूला कामगार, सैनिक, खलाशी आणि अगदी दरिद्री शेतकरी. सरकार तुमच्या हातात आहे. तुम्ही मालक आहात. महान रशिया तुमचा आहे. तुम्ही त्याला परत देऊन टाकणार काय?"

क्रीलेन्को थकून गेले होते व मोठ्या मुष्किलीने दोन पायांवर उभे होते. परंतु जसजसे ते बोलत होते तसतसा त्यांच्या बोलण्यात शब्दांमागे लपलेला प्रगाढ प्रामाणिकपणा उघड होत होता. भाषणाच्या अखेरीस तर त्यांचे पाय लटपटले. शेकडो हात त्यांना आधार द्यायला पुढे सरसावले. त्यांच्या भाषणावर उमटलेला जयध्वनी त्या मोठ्या हॉलच्या कोपऱ्या कोपऱ्यामधून प्रतिध्वनित होत राहिला.

खान्जोनोवनी पुन्हा बोलायचा प्रयत्न केला. पण लोकांनी ओरडा सुरू केला, "मते घ्या! मते घ्या!" अखेरीस हार जाऊन त्यांनी ठराव वाचून दाखवला: चिलखती तुकडी आपला प्रतिनिधी लष्करी क्रांतिकारक समितीमधून मागे घेत आहे आणि सध्याच्या यादवी युद्धामध्ये आपली तटस्थता जाहीर करीत आहे.



न्स्कीच्या फौजांविरुद्ध लढण्यासाठी निघालेल्या दीबेन्को यांच्या नेतृत्वाखालील
खलाशांची तुकडी



मॉस्कोतील झामोस्क्वोरेचीये विभागातील नोव्हेंबरमधील लढाईत ट्रामचा चिलखती गाडीसारखा वापर करण्यात आला

या ठरावाला अनुकूल असलेल्यांनी उजव्या बाजूस जावे; विरोध करणाऱ्यांनी डावीकडे. एक क्षण अनिश्चितीचा गेला, नि:स्तब्ध आतुरता पसरली आणि मग जमाव वेगावेगाने, एकमेकांवर धडपडत डावीकडे सरकू लागला; त्या मंद प्रकाशात, चिखलभरल्या फरशीवरून शेकडो धिप्पाड सैनिकांचा समूह सरकत होता... आमच्या शेजारी सुमारे पन्नास लोक एकाकी राहिले. त्यांनी हट्टाने ठरावाला अनुकूल मत दिले. आणि विजयी आरोळयांनी डोक्यावरचे छप्पर कोसळेल असे वातावरण निर्माण झाले असताना ते मागे वळले आणि झपाट्याने इमारतीबाहेर निघून गेले — आणि त्यांच्यापैकी काही तर क्रांतीबाहेर...

कल्पना करा, अशा संघर्षाची शहरातल्या प्रत्येक बराकीत, विभागात, सबंध आघाडीवर, सबंध रशियात पुनरावृत्ती होत होती. कल्पना करा, असे निद्राविहीन शेकडो क्रीलेन्को तुकड्यांमागून तुकड्यांना भेटत होते, धावपळ करीत होते, युक्तिवाद करीत होते, धमकावत होते, विनवीत होते. आणि कल्पना करा की, पुन्हा हेच सर्व प्रत्येक मजूर युनियनच्या स्थानिक शाखेत, कारखान्यांत, खेड्यांत, दूर दूर गेलेल्या रशियन नौदला-च्या युद्धनौकांच्या काफल्यांमध्ये; जरा विचार करा, लक्षावधी रशियन माणसे अफाट देशभर वक्त्यांकडे एकाग्र नजरांनी पहात आहेत; कामगार, किसान, सैनिक, खलाशी सर्व काही समजावून घेण्याचा आटोकाट प्रयत्न करताहेत आणि खूप तीव्रतेने विचार करून निवड करू पहात आहेत — आणि अखेरीस एकमताने निर्णय घेत आहेत. रशियन क्रांती ही अशी होती...

---

स्मोल्नीमध्ये जन-कमिस्सारांचे नवे मंडळ काही गप्प बसून नव्हते. पहिले आज्ञापत्र एव्हाना छापखान्यात मशिनवर चढले होते, त्या रात्री शहरातल्या रस्त्यांमधून त्याच्या हजारो प्रती वाटायच्या होत्या, दक्षिणेकडे आणि पूर्वेकडे जाणाऱ्या प्रत्येक आगगाडीतून त्याची मोठमोठी बंडले पाठ-वावयाची होती:

"कामगार आणि सैनिक प्रतिनिधींच्या सोविएतांच्या अखिल-रशियन काँग्रेसने किसान प्रतिनिधींच्या सहभागाने निवडलेले जन-कमिस्सारांचे मंडळ, रशियन प्रजासत्ताकाच्या सरकारच्या वतीने आज्ञा-पत्र काढत आहे:

१. घटनात्मक सभेच्या निवडणुका नियोजित तारखेला – १२ नोव्हेंबरला – घेतल्या जातील.

२. सर्व निवडणूक आयोगांनी, स्थानिक स्वराज्य संस्थांनी, कामगारांच्या, सैनिकांच्या आणि किसानांच्या प्रतिनिधींच्या सोविएतांनी व आघाडीवरील सैनिक संघटनांनी नियोजित तारखेला स्वतंत्रपणे आणि सुरळीतपणे निवडणुक पार पाडण्याच्या दृष्टीने सर्वतऱ्हेचे प्रयत्न करावेत."

नगरपालिकेच्या इमारतीत दूमाची सभा ऐन धूमधडाक्यात चालू होती. आम्ही सभागृहात शिरलो तेव्हा प्रजासत्ताक मंडळाचा एक सभासद बोलत होता. त्याने सांगितले की, आपण विसर्जित झालो असे मंडळ मानीत नाही, पण नवी बैठकीची जागा मिळवीपर्यंत त्याला आपली कार्ये चालू ठेवणे केवळ अशक्य आहे. दरम्यान त्याच्या श्रेष्ठी-समितीने एकजात रक्षक समितीत सामील होण्याचा निर्णय घेतलाय... जाता जाता सांगायचे तर रशियन प्रजासत्ताकाच्या मंडळाचा हा इतिहासातला शेवटचा उल्लेख ठरला...

त्यानंतर वेगवेगळ्या मंत्रालयांच्या प्रतिनिधींची परंपरागत वक्त्यांची माळ बोलली; विक्झेलचे, टपाल आणि तार खात्याच्या युनियनचे वक्ते बोलले आणि सत्ता बळकावणाऱ्या बोल्शेविकांबरोबर काम न करण्याचा निर्धार त्यांनी शंभराव्यांदा बोलून दाखवला. हेमंत प्रासादात झंझावात कोसळले तेव्हा हजर असलेल्या एका युंकरने आपल्या व आपल्या साथीदारांच्या शौर्याची कथा मारे भडक रंगात रंगवून सांगितली आणि लाल रक्षकांची अशोभनीय वर्तणूक तिखटमीठ लावून वर्णन केली. अर्थातच सर्व उपस्थित श्रोत्यांनी त्याच्या कथनावर बेधडक विश्वास ठेवला. कुणीतरी समाजवादी-क्रांतिकारकांच्या 'नरोद' वर्तमानपत्रात छापलेला वृत्तांत मोठ्याने वाचून दाखवला; हेमंत प्रासादात पाचशे दशलक्ष रूबलचे नुकसान करण्यात आले आहे असे त्यात म्हटले होते व तेथील लुटीचे आणि नासधुशीचे मोठे तपशीलवार वर्णन केलेले होते.

टेलिफोनवर मिळणाऱ्या बातम्या घेऊन वारंवार संदेशवाहक येत होते. चार समाजवादी मंत्र्यांची तुरुंगातून सुटका झाली होती. क्रीलेन्को पीटर-पॉल किल्ल्यात ॲडमिरल वेर्देरेव्स्की यांना सांगायला गेले होते की, नौदल खाते रिकामे पडलेले होते व त्यांना विनंती करणार होते की, रशियाखातर, जन-कमिस्सारांच्या मंडळाच्या अख्त्यारीखाली त्यांनी त्या

म्यात्याचा ताबा घ्यावा; आणि त्या मुरब्बी दर्यावर्दी माणसाने मान्यता दिली होती... गात्चिनाहून उत्तरेकडून केरेन्स्की चालून येत होते, बोल्शेविक ठाणबंद फौजा त्यांच्यासमोर माघार घेत होत्या. खाद्यपदार्थांच्या पुरवठा प्रश्नाला तोंड देण्यासाठी नगर दूमाच्या अधिकारमर्यादा वाढविणारे आणखी एक आज्ञापत्र स्मोल्नीमधून प्रसृत करण्यात आले होते.

उद्धटपणाच्या या शेवटच्या कृत्याने सभागृहाचा पारा भलताच वर चढला. त्या सत्तालोलुप, जुलमी लेनिनच्या कमिस्सारांनी नगरपालिकेचे गॅरेज ताब्यात घेतले होते, नगरपालिकेच्या गुदामांमध्ये प्रवेश केला होता, पुरवठा समितीच्या कामात आणि खाद्यपदार्थांच्या वाटपात ढवळाढवळ करीत होते; आणि स्वतंत्र, स्वाधीन, स्वायत्त नगर शासनाच्या अधिकारमर्यादा आता तो ठरवतोय! एका सभासदाने मुठी वळवून ठराव मांडला की, जर बोल्शेविकांनी पुरवठा समित्यांच्या कामात ढवळाढवळ करण्याचे थांबवलेच केले तर शहराचा खाद्यपुरवठा तोडून टाकण्यात यावा... खास पुरवठा समितीच्या दुसऱ्या एका प्रतिनिधीने सांगितले की, अन्नपरिस्थिती अत्यंत गंभीर बनली होती आणि धान्य घेऊन येणाऱ्या आगगाड्या जलद पाठवा असा निरोप देऊन दूत पाठवावेत अशी त्याने मागणी केली.

देदोनेन्को यांनी नाट्यपूर्ण रीतीने घोषणा केली की, शिबंदी द्विधा मनःस्थितीत आहे. सेम्योनोव्स्की रेजिमेंटने समाजवादी-क्रांतिकारक पक्षाच्या आज्ञा मानण्याचा निर्णय एव्हाना घेऊन टाकला होता; नेवावरील टॉर्पेडो बोटींवरचे लोकही द्विधा मनःस्थितीत होते. प्रचारकार्य पुढे रेटण्यासाठी सात सभासदांची तात्काळ नेमणूक करण्यात आली...

नंतर वयोवृद्ध महापौर व्यासपीठावर बोलायला उभे राहिले: "कॉम्रेडो आणि नागरिकांनो! मला आत्ताच समजलं की, पीटर-पॉलमधले कैदी धोक्यात आहेत. पावलोव्स्क विद्यालयातल्या चौदा युंकरांना नागवं करण्यात आलं आणि बोल्शेविक रक्षकांनी त्यांचा छळ केला. त्यातला एकजण वेडा झालाय. मंत्र्यांना जिवंत जाळायची ते धमकी देताहेत! संतापाची आणि धास्तीची तेथे एक वावटळच उसळली. करड्या रंगाच्या पोषाखातली एका लठ्ठ ठेंगण्या बाईने जेव्हा बोलायची परवानगी मागितली आणि आपल्या कणखर, भिंगरीबाज आवाजात वरच्या पट्टीत बोलायला आरंभ केला तेव्हा वातावरणाने अधिकच उग्र रूप धारण केले. ही बाई म्हणजे डाव्या क्रांतिकारक आणि दूमाच्या बोल्शेविक सदस्या वेरा स्लूत्स्काया होत्या.

"हे धादांत खोटं आहे, हा चिथावण्याचा प्रयत्न आहे!" त्यांच्यावर

निंदा-नालस्तीचा प्रचंड वर्षाव होत असतानाही किंचितही विचलित न होता त्या बोलत राहिल्या. "मृत्युदंडाची शिक्षा रद्द करणारं कामगार-किसानांचं सरकार अशी कृत्यं होऊ देणार नाही. या प्रकरणाचा ताबडतोब छडा लावण्यात यावा अशी आम्ही मागणी करतो; जर त्यात सत्यांश असला तर सरकार त्यावर कडक उपाययोजना करील!"

सर्व पक्षांच्या सभासदांचा मिळून एक आयोग ताबडतोब मुक्रर करण्यात आला व महापौरांसकट त्याला पीटर-पॉलमध्ये चौकशी करण्यासाठी पाठवण्यात आले. आम्ही त्यांच्या पाठोपाठ बाहेर जायला निघालो त्यावेळी केरेन्स्कींची भेट घेण्यासाठी व जेव्हा ते राजधानीत प्रवेश करतील तेव्हा रक्तपात टाळण्याचा प्रयत्न करण्यासाठी दुसऱ्या एका आयोगाची दूमा नेमणूक करीत होती...

किल्ल्याच्या दरवाजाशी पहारेकऱ्यांना चकवून आम्ही आत घुसलो आणि झारांची थडगी असलेल्या चर्चच्या बाजूच्या रस्त्याने तुरळक विजेच्या दिव्यांच्या अंधुक मिणमिणत्या प्रकाशात पुढे निघालो तेव्हा मध्यरात्र झाली होती. त्या चर्चच्या निमुळत्या सोनेरी कळसांच्या आणि घंटांच्या खाली दररोज माध्यान्हीला 'परमेश्वर झारचे रक्षण करो?* सूर महिनोन् महिने वाजत होते... ती जागा निर्मनुष्य होती; बहुतेक खिडक्यांमध्ये प्रकाशसुद्धा दिसत नव्हता. अधूनमधून आम्ही अंधारात एखाद्या धिप्पाड आकृतीवर आदळत होतो व आमच्या प्रश्नांना ती "मला माहीत नाही" हे ठरीव उत्तर द्यायची.

डाव्या बाजूला खालच्या अंगाला त्रुबेत्स्कोई बुरूजाची अंधुक आकृती दिसत होती. झारच्या काळात या जिवंत थडग्यात स्वातंत्र्याच्या अनेक हुतात्म्यांनी आपले प्राण किंवा विचार गमावले होते, इथेच पुढे हंगामी सरकारने झारच्या मंत्र्यांना कैदेत ठेवले होते व आता बोल्शेविकांनी हंगामी सरकारच्या मंत्र्यांना याच स्थळी बंदिवान करून ठेवले होते.

मैत्रीच्या भावनेने मदत करणाऱ्या एका खलाशाने टांकसाळीनजीकच्या एका छोटया घरातली कमांडंटची कचेरी दाखवली. वाफाळणारा समोवार असलेल्या एका ऊबदार, धुराने भरलेल्या खोलीत अर्धा डझन लाल रक्षक, सैनिक आणि खलाशी गोलाकार बसले होते. त्यांनी अत्यंत प्रेमाने आमचे स्वागत करून आम्हाला चहा देऊ केला. कमांडंट तेथे नव्हता; नगर

---

*एक चूक: पीटर-पॉलच्या घंटा 'तुझी थोरवी महान' वाजवीत.—सं.

Коммиссаръ
Главнаго Управленія до-
мовъ заключенія
"6" Ноя. 1917 г.
№ 241
Петроградъ Смольный
Институтъ, комн. № 56.-

ПРОПУСКЪ

Представителю Американскихъ Соціалистическихъ газетъ ДЖОНУ РИДУ, во всѣ мѣста заключенія гг. Петрограда и Кронштата, для общаго ознакомленія положенія заключенныхъ и широкаго общественнаго освѣдомленія въ цѣляхъ прекращенія газетн[ой] травли противъ демократіи.-



[Глав]ный Комиссаръ
Секретарь

जॉन रीड यांना सर्व कारागृहांना मुक्तपणे भेट देता यावी म्हणून दिलेली प्रवेशपत्रिका

...हून आलेल्या व सर्व युंकरांचे खून पाडण्यात आले आहेत असे ठामपणे ...णाऱ्या घातपात्यांच्या आयोगाबरोबर तो फिरत होता. त्यांना या ...टीची मोठी मजा वाटत होती असे दिसले. खोलीच्या एका कोपऱ्यात ... आणि भारी केसाळ कोटातला एक टकल्या, व्यसनाधीन दिसणारा ... माणूस आपल्या मिशा चावीत बसला होता व चहूबाजूंनी कोंडलेल्या ...गाऱ्ह्या भोवती पहात होता. त्याला नुकतीच अटक करण्यात आली ...ी. कुणीतरी त्याच्याकडे एक तुच्छ कटाक्ष टाकून म्हणाले की तो मंत्री ... असाच कुणीतरी होता... पण तो बुटका माणूस ते काही ऐकत ...ा असे दिसत होते; त्या खोलीतली माणसे त्याला कुठल्याही प्रकारे ...वत नव्हती तरीही तो भेदरल्याचे स्पष्टपणे दिसत होते.

मी त्याच्याजवळ जाऊन फ्रेंचमध्ये बोललो. "काऊंट तल्स्तोय," ... झुकून तो म्हणाला. "मला का अटक केलीय तेच समजत नाही. ... ...ईत्स्की पुलावरून माझ्या घरी चाललो होतो तर यांच्यापैकी दो-...-या माणसांपैकी दोघांनी – मला पकडलं. वरिष्ठ सेनाधिकाऱ्यांशी ... हंगामी सरकारचा मी कमिस्सार होतो, पण कुठल्याही अर्थानं ... नव्हतो..."

"त्याला जाऊ द्या," एक खलाशी म्हणाला. "तो निरुपद्रवी आहे..."

"मुळीच नाही." ज्या खलाशाने त्याला धरून आणले होते तो उत्तरला. "आपण कमांडंटना विचारलं पाहिजे."

"हूं! कमांडंट!" खलाशाने वेडावून दाखवले. "कशासाठी तुम्ही क्रांती केलीत? अधिकाऱ्यांच्या आज्ञा पाळायला?"

पाव्लोव्स्की रेजिमेंटचा एक अधिकारी आम्हाला उठावाचा आरंभ कसा झाला ते सांगत होता. "६ तारखेच्या रात्री रेजिमेंट वरिष्ठ सेनाधिकाऱ्यांच्या स्थळी पहाऱ्यावर होती. माझे काही साथी आणि मी पहारा देत होतो; वरिष्ठ सेनाधिकाऱ्यांची जिथं बैठक चालू होती त्या खोलीच्या खिडक्यांच्या पडद्यांमागं इवान पावलोविच आणि आणखी एकजण – त्याचं नांव मला आठवत नाही – लपले आणि त्यांनी अनेक गोष्टी ऐकल्या. उदाहरणादाखल सांगायचं तर, गात्चिनाचे युंकर रात्रीच्या वेळी पेत्रोग्रादला आणण्याचा हुकूम त्यांनी ऐकला, सकाळच्या वेळी कूच करायला सज्ज रहायचा कझाकांना दिलेला हुकूम ऐकला... पहाटेपूर्वी शहरातल्या मोक्याच्या जागा काबीज करण्यात येणार होत्या. मग पूल मोकळे करण्याचीही त्यांची योजना होती. पण जेव्हा त्यांनी स्मोल्नीला गराडा घालण्याची भाषा सुरू केली तेव्हा मात्र इवान पावलोविचना गप्प राहवेना. त्या क्षणाला बरीच ये-जा चालू होती. उरलेलं संभाषण ऐकायला आपल्या सहकाऱ्याला तिथंच ठेवून ते तेथून बाहेर सटकले आणि पहारेकऱ्यांच्या खोलीकडे आले.

"काहीतरी शिजतंय याची मला आधीच शंका आली होती. अधिकाऱ्यांनी गच्च भरलेल्या मोटारी सतत येत होत्या आणि सर्व मंत्री तिथं होते. आपण काय ऐकलं ते इवान पावलोविचनी मला सांगितलं. पहाटेचे अडीच वाजले होते. रेजिमेंटच्या समितीचा चिटणीस तिथं होते, म्हणून आम्ही त्यांना सारी हकिकत सांगितली आणि काय करावं अशी विचारणा केली.

"'येणाऱ्या आणि जाणाऱ्या प्रत्येकाला अटक करा!' चिटणीस म्हणाले. तेव्हा आम्ही तसं करायला सुरुवात केली. एका तासात आमच्या ताब्यात काही अधिकारी आणि दोन मंत्री सापडले, त्यांची तडक स्मोल्नीकडं रवानगी केली. पण लष्करी क्रांतिकारक समितीची तयारी नव्हती; काय करायचे ते त्यांना माहीत नव्हतं; लौकरच तिथून हुकूम आला की, सगळ्यांना सोडून द्या आणि कुणालाही अटक करू नका. तेव्हा आम्ही

धावतपळत स्मोल्नी गाठलं आणि मला वाटतं जेव्हा तासभर त्यांच्याशी बडबड करून सारी परिस्थिती समजावून सांगितली तेव्हा त्यांना अखेरीस पटलं की, लढाई चालू झाली होती. आम्ही वरिष्ठ सेनाधिकाऱ्यांच्या कचेरीत परतलो तेव्हा पाच वाजले होते आणि एव्हाना त्यांच्यापैकी बहुतेक-जण गेले होते. पण काही थोडे आमच्या तावडीत सापडले आणि सबंध शिबंदीनं कूच केलं होतं..."

उठावाच्या महान दिनी आपल्या विभागात काय घडले याची इत्थंभूत हकिकत वासिलीओस्त्रोवच्या एका लाल रक्षकाने सांगितली. "आमच्या तिथं मशिनगन वगैरे नव्हत्या," तो हसत म्हणाला. "स्मोल्नीहून आम्हाला त्या मिळूही शकल्या नाही. वॉर्ड दूमाच्या केंद्रीय ब्यूरोचे सदस्य कॉम्रेड झालकिन्द यांना अचानक आठवण झाली की, जर्मनांपासून काबीज केलेली एक मशिनगन ब्यूरोच्या सभागृहात पडून राहिलेली होती. तेव्हा ते, मी आणि आणखी एक कॉम्रेड तिथं गेलो. मेन्शेविकांची आणि समाजवादी-क्रांतिकारकांची तिथं सभा चालली होती. आम्ही दार उघडून सरळ आत गेलो – बारा किंवा पंधराजण टेबलाभोवती गोल बसले होते आणि आम्ही तिघंच. जेव्हा त्यांनी आम्हाला पाहिलं तेव्हा ते बोलायचे थांबले आणि आमच्याकडं टक लावून पहात राहिले. आम्ही थेट खोलीच्या दुसऱ्या टो-काला चालत गेलो, मशिनगन सुटी करून घेतली; कॉम्रेड झालकिन्दनी एक भाग उचलला, मी दुसरा उचलला, आम्ही ते भाग खांद्यांवर टाकले आणि बाहेर निघून आलो – तिथल्या एकाही माणसानं ब्र काढला नाही!"

"हेमंत प्रासाद कसा काबीज केला तुम्हाला माहीत आहे?" तिसऱ्या एकाने, खलाशाने, विचारले. "अकरा वाजायच्या सुमाराला आम्हाला आढळून आलं की, नेवाच्या बाजूला युंकर राहिले नव्हते. तेव्हा आम्ही दारं फोडली आणि वेगवेगळ्या जिन्यांवरून एक एक करीत किंवा छोटचा छोटचा गटांनी आत घुसलो. आम्ही जेव्हा जिन्यांच्या वरच्या टोकाला पोचलो तेव्हा युंकरांनी आम्हाला पकडलं आणि आमच्या बंदुका काढून घेतल्या. तरीही आमची माणसं हळू हळू येतच राहिली. अखेरीस आमची संख्या मोठी झाली. मग आम्ही उलट तुटून पडलो आणि युंकरांच्या बंदुका काढून घेतल्या..."

तेवढचात कमांडंटने आमच्या खोलीत प्रवेश केला. हसतमुख चेहऱ्याचा तो एक तरुण नॉन-कमिशन्ड अधिकारी होता, त्याचा एक हात दुखावल्याने गळयात अडकवलेला होता व निद्रेच्या अभावी त्याच्या डोळयांभोवती दाट

वर्तुळे उमटली होती. त्याची नजर प्रथम कैद्यावर पडली व कैद्याने तात्काळ खुलासा करायला सुरुवात केली.

"मला माहीत आहे," कमांडंटने काऊंट तल्स्तोयना मध्येच अडवले. "बुधवारी दुपारी वरिष्ठ सेनाधिकाऱ्यांना आमच्या ताब्यात द्यायला नकार देणाऱ्या समितीमध्ये तुम्ही होता. असो! नागरिकहो, तुमची आम्हाला गरज नाही. दिलगीर आहोत—" त्याने दार उघडले आणि हातानेच काऊंट तल्स्तोय यांना निघून जाण्याचा इशारा केला. तिथल्या अनेकांनी, विशेषतः लाल रक्षकांनी, निषेध व्यक्त केला आणि तो खलाशी विजयी सुरात उद्गारला, "पहा! मी म्हटलं नव्हतं?"

आता कमांडंटशी दोघा सैनिकांनी बोलणे सुरू केले. किल्ल्यातल्या शिबंदीने आपला निषेध प्रगट करण्यासाठी त्या दोघांची एक समिती बनवून पाठवली होती. ते म्हणाले की, तिथे एका माणसाला पुरेसे खायला मिळत नसताना कैद्यांना आणि पहारेकऱ्यांना सारखेच अन्न मिळत आहे. "प्रति-क्रांतिकारकांना एवढी चांगली वागणूक द्यायचं कारणच काय?"

"कॉम्रेडहो, आपण क्रांतिकारक आहोत, दरोडेखोर नव्हे," कमांडंट उत्तरला. तो आमच्याकडे वळला. आम्ही खुलासा केला की, युंकरांचा छळ केला जात आहे आणि मंत्र्यांचे जीव धोक्यात आहेत, अशा अफवा पसरत आहेत. आम्ही कैद्यांना भेटू शकतो काय, म्हणजे जगापुढं सिद्ध करता येईल—?

"नाही," तो तरुण सैनिक चिडून म्हणाला. "मी पुन्हा कैद्यांना त्रास देणार नाही. आत्ताच मला त्यांना उठवावं लागलं होतं—आम्ही त्यांची कत्तल करणार अशी त्यांची खात्री होती... पण बहुतेक युंकरांना सोडून दिलंय आणि बाकीच्यांना उद्या सोडून देतील." तो चटकन बाजूला वळला.

"मग आम्ही दूमाच्या आयोगाशी बोलू शकतो का?"

स्वतःसाठी पेल्यात चहा ओतणाऱ्या त्या कमांडंटने संमतीदर्शक मान डोलावली. "ते अजून बाहेरच्या हॉलमध्ये आहेत," बेफिकीर सुरात त्याने म्हटले.

खरोखरच दाराबाहेर, तेलाच्या दिव्याच्या क्षीण उजेडात ते महापौरां-भोवती कडे करून उभे होते व जोरजोराने बोलत होते.

"महापौर महाशय," मी म्हणालो, "आम्ही अमेरिकन वार्ताहर आहोत. तुमच्या चौकशीत तुम्हाला काय आढळलं त्याचा अधिकृत निकाल आम्हाला सांगाल काय?"

ते आमच्याकडे वळले. त्यांच्या चेहऱ्यावर तीच वयोवृद्ध प्रतिष्ठा विलसत होती.

"बातम्यांमध्ये सत्य नाही," ते सावकाशपणे म्हणाले. मंत्र्यांना जेव्हा या ठिकाणी आणण्यात आलं तेव्हा जे काही प्रसंग घडले ते सोडता, त्यांना अतिशय चांगली वागणूक देण्यात आली. युंकरांपैकी कुणालाही किंचितही इजा झालेली नाही..."

नेव्स्की रस्त्यावरून, मध्यरात्रीनंतरच्या मोकळ्या अंधारात, सैनिकांची अखंड रांग शांतपणे चालली होती – केरेन्स्कीविरुद्ध लढायला. मागच्या अंधुक रस्त्यांवर मोटारींची दिवे न लावता ये-जा चालू होती; आणि किसान सोविएतचे मुख्य ठाणे असलेल्या फॉन्तान्का ६ येथे, नेव्स्कीवरच्या एका प्रचंड इमारतीमधील एका विशिष्ट गाळ्यामध्ये, आणि इंजिनियेर्नी झामोकमध्ये (अभियंता महाविद्यालय) जोरदार हालचाली चालू होत्या; दूमाची इमारत प्रकाशात झगमगत होती...

स्मोल्नीमध्ये लष्करी क्रांतिकारक समिती एखाद्या प्रचंड ज्वालेसारखी धगधगत होती, अतिताण पडलेल्या जनित्रासारखी धडधडत होती...

### प्रकरण सातवे

# क्रांतिकारक आघाडी

शनिवार, १० नोव्हेंबर...

"नागरिकहो !

"लष्करी क्रांतिकारक समिती जाहीर करीत आहे की कोणत्याही प्रकारे क्रांतिकारक सुव्यवस्थेचा भंग केलेला ती सहन करणार नाही...

"चोरी, लूटमार, खुनी हल्ले आणि कत्तलीचे प्रयत्न, यांबद्दल कडक शासन केले जाईल...

"पॅरिस कम्यूनच्या उदाहरणाला अनुसरून, कुठल्याही लुटारूचा किंवा अव्यवस्था माजवणाऱ्याचा समिती दयामाया न ठेवता निकाल लावील..."

शहर शांत होते. एकही वाटमारी नव्हती, साधी चोरीसुद्धा घडली नव्हती, दारुड्यांची मारामारीदेखील झाली नव्हती. रात्रीच्या वेळी निवांत रस्त्यांवरून सशस्त्र गस्तवाले फिरत होते आणि कोपऱ्या कोपऱ्यांवर छोट्या शेकोट्यांभोवती बसून सैनिक आणि लाल रक्षक हसत व गाणी म्हणत होते. दिवसाच्या वेळी रस्त्याकडेच्या पादचारी मार्गांवर लोकांची वारेमाप गर्दी जमत होती आणि विद्यार्थी व सैनिक, व्यापारी लोक आणि कामगार, यांच्यामध्ये अखंड चाललेल्या वादविवादांना ऐकत होती.

नागरिक रस्त्यात एकमेकांना थांबवून बोलत.

"कझाक येताहेत?"

"नाही..."

"ताजी बातमी काय?"

"मला काहीच ठाऊक नाही. केरेन्स्की कुठं आहे?"

"कुणी म्हणतात की पेत्रोग्रादपासून फक्त आठ वेर्स्ता* दूर आहे... बोल्शेविक 'आव्रोरा' युद्धनौकेवर पळाले ही बातमी खरी आहे काय?"

"म्हणतात बुवा असं..."

फक्त भिंतींना वाचा फुटली होती आणि काही वृत्तपत्रे निघत होती; धिक्कार, आवाहने, आज्ञापत्रे...

किसान सोविएतांच्या कार्यकारी समितीचा उन्मादवायूने भरलेला जाहीरनामा एका भल्यामोठ्या पोस्टरवर फडकत होता:

> "...ते (बोल्शेविक) बोलायचे धाडस करतात की त्यांना किसान प्रतिनिधींच्या सोविएतांचा पाठिंबा आहे आणि किसान प्रतिनिधींच्या सोविएतांच्या वतीने ते बोलत आहेत...
>
> "रशियातल्या सबंध कामगारवर्गाला समजू दे की हे धादांत खोटे आहे आणि किसान प्रतिनिधींच्या अखिल रशिया सोविएतांच्या कार्यकारी समितीच्या रूपाने सर्व कामकरी किसान अत्यंत संतापपूर्वक पुढील विधानाचे खंडन करीत आहेत की, या कामगारवर्गाच्या इच्छेविरुद्ध करण्यात आलेल्या गुन्हेगारी उल्लंघनात किसानवर्गाचा सहभाग होता..."

समाजवादी-क्रांतिकारक पक्षाच्या सैनिक विभागाने म्हटले होते:

> "बोल्शेविकांचा वेडा प्रयत्न कोसळून पडायच्या मार्गावर आहे. शिबंदीत फाटाफूट झाली आहे... मंत्रालये संपावर आहेत आणि पाव दुर्मिळ होत चाललाय. काही थोडे बोल्शेविक सोडल्यास सर्व गटांनी काँग्रेसचा त्याग केला. बोल्शेविक एकाकी पडलेत...
>
> "आम्ही सर्व शहाण्या घटकांना आवाहन करतो की, देशाच्या आणि क्रांतीच्या रक्षणासाठी स्थापन झालेल्या समितीमध्ये त्यांनी एकत्र यावे आणि मध्यवर्ती समितीच्या पहिल्या हाकेला ओ देता येईल अशा रीतीने आपली सज्जता करावी..."

प्रजासत्ताकाच्या मंडळाने एका हस्त-पत्रकात आपल्या तक्रारी मांडल्या होत्या:

---

* वेर्स्ता म्हणजे जवळ जवळ किलोमीटर.

"बागनेटांच्या धाकासमोर नमून प्रजासत्ताक मंडळाला ७ नोव्हें-बरला अलग होणे, आपल्या बैठकांमध्ये तात्पुरता खंड पाडणे भाग पडले आहे.

"सत्ता बळकावणाऱ्यांनी ओठांवर "स्वातंत्र्य आणि समाजसत्ता-वादा"चा मंत्र ठेवून प्रत्यक्षात मात्र एकतंत्री जुलमी राजवट प्रस्थापित केली आहे. त्यांनी हंगामी सरकारच्या सदस्यांना अटक केली आहे, वर्तमानपत्रे बंद पाडलीत, छापखाने ताब्यात घेतलेत...

"या सत्तेला लोकांचा आणि क्रांतीचा शत्रू मानले पाहिजे; तिच्याशी लढाई करून तिला खाली खेचली पाहिजे...

"प्रजासत्ताक मंडळ आपले कार्य पुन्हा सुरू करीपर्यंत, रशियन प्रजासत्ताकाच्या नागरिकांना आवाहन करीत आहे की... बोल्शेवि-कांना उलथून टाकण्याच्या व देशाचा कारभार घटनात्मक विधान-सभेद्वारे चालविणाऱ्या सरकारची निर्मिती करण्याच्या प्रयत्नात असलेल्या देशाच्या आणि क्रांतीच्या रक्षक समितीच्या स्थानिक शाखांमध्ये त्यांनी सामील होऊन एकवटावे."

'देलो नरोदा' म्हणाले होते:

"क्रांती म्हणजे **अखिल** जनतेचा उठाव... पण इथं आमच्या-पाशी काय आहे? श्री. लेनिन, श्री. ट्रॉट्स्की आणि त्यांच्या मंड-ळींच्या "दुसऱ्या क्रांतीला" मान्यता कुणी दिली? त्यांनी फसवलेल्या कामगार, सैनिक आणि खलाशांच्या छोटया गटांनीच, **इतर कुणीही नाही**..."

आणि 'नरोद्नोये स्लोवो' (जनतेचा शब्द – जन-समाजवादी) म्हणाले होते:

"कामगारांचे आणि किसानांचे सरकार? हे केवळ भिकाऱ्याचे मनोरथ आहेत; रशियात किंवा आपल्या दोस्तांच्या देशांमध्ये, असे कुणीही या "सरकारला" मान्यता देणार नाही – किंवा अगदी शत्रू-राष्ट्रेही त्याला मान्यता देणार नाहीत..."

भांडवलदारांची वृत्तपत्रे तात्पुरती अदृश्य झाली होती...

आता रशियन सोविएत प्रजासत्ताकाची संसद बनलेल्या नव्या केंद्रीय कार्यकारी समितीच्या पहिल्या बैठकीचा वृत्तांत 'प्रावदा'मध्ये आला होता. शेती खात्याचे कमिस्सार, मिल्यूतिन यांनी म्हटले होते की, किसानांच्या कार्यकारी समितीने १३ डिसेंबरला अखिल रशिया किसान काँग्रेस बोलावली होती.

"पण आम्ही थांबू शकत नाही," ते म्हणाले होते. "आम्हाला किसानांचा पाठिंबा मिळाला पाहिजे. मी प्रस्ताव मांडतो की, आपण किसानांची काँग्रेस बोलवावी व हे काम ताबडतोब करावे..." डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांनी संमती दिली. रशियामधील किसानांना उद्देशून एक आवाहन घाईघाईने तयार करण्यात आले आणि ही योजना पार पाडण्यासाठी पाचजणांची एक समिती निवडण्यात आली.

जमिनीचे वाटप करण्याच्या तपशीलवार योजनांचा प्रश्न आणि कामगारांचे उद्योगधंद्यांवर नियंत्रण प्रस्थापित करण्याचा प्रश्न, संबंधित तज्ज्ञांकडून अहवाल सादर होईपर्यंत पुढे ढकलण्यात आले.

तीन आज्ञापत्रांचे[1] वाचन करण्यात आले आणि त्यांना मान्यता देण्यात आली: पहिले होते लेनिन यांनी तयार केलेले 'वृत्तपत्रांविषयीचे सर्वसाधारण नियम'; जी वृत्तपत्रे नव्या सरकारविरुद्ध प्रतिकार करण्याची आणि सरकारची अवज्ञा करण्याची चिथावणी देतील, गुन्हेगारी कृत्यांना चिथावणी देतील किंवा मुद्दाम विपर्यस्त बातम्या देतील, अशा सर्व वृत्तपत्रांना बंदी करण्याचा तो हुकूम होता. दुसरे आज्ञापत्र होते घरभाड्याला मुदतवाढ देण्यासंबंधीचे आणि तिसरे होते कामगारांची जुजबी सेना प्रस्थापित करण्याचे. त्याशिवाय इतरही हुकूम देण्यात आले होते; त्यांपैकी एका हुकुमान्वये नगरपालिकेच्या दूमाला रिकामे गाळे व रिकामी घरे ताब्यात घेण्याचा अधिकार दिला होता; दुसऱ्या एका हुकुमानुसार रेल्वे जंक्शनांवर मालडब्यांमधला माल उतरवून आवश्यक वस्तूंचे त्वरेने वाटप करण्याचा आणि अत्यावश्यक वाघिणी मोकळ्या करण्याचा आदेश दिलेला होता.

दोन तासांनंतर किसान सोविएतांची कार्यकारी समिती पुढील तारेचा मजकूर सबंध रशियाभर प्रसारीत करीत होती:

"'किसानांच्या राष्ट्रीय काँग्रेसच्या संघटनाची ब्यूरो' नामक बोलशेविकांच्या लहरीतून निर्माण झालेली एक संघटना सर्व किसान

सोविएतांना नियंत्रण देत आहे की, पेत्रोग्रादमधील काँग्रेसला त्यांनी आपले प्रतिनिधी पाठवावे...

"किसान प्रतिनिधींच्या सोविएतांची कार्यकारी समिती जाहीर करीत आहे की, आत्ता तसेच यापूर्वीही, तिचे असे मत आहे की, कामगारवर्गाच्या आणि देशाच्या रक्षणाचा एकमेव उपाय असलेल्या घटनात्मक सभेच्या निवडणुकांसाठी पूर्वतयारी करायला या घटकेला आवश्यक असलेल्या शक्तींना प्रांतांपासून दूर पाठवणे धोक्याचे ठरेल. किसानांच्या काँग्रेसच्या तारखेला आम्ही पुष्टी देत आहोत, १३ डिसेंबर."

दूमामध्ये एकच धांदल माजली होती. अधिकारी जात येत होते, रक्षक समितीच्या पुढाऱ्यांबरोबर महापौरांची बैठक चालू होती. नेव्स्की रस्त्यावर अगदी खाली येऊन एका विमानाने केरेन्स्कींच्या घोषणेची शेकडो पत्रके उधळली होती. त्या पत्रकाची एक प्रत घेऊन एक कौन्सिलर पळत पळत आत आले होते. त्या पत्रकात सज्जड दम देऊन म्हटले होते की, जे लोक आपणहून शरण येणार नाहीत त्यांच्यावर पुरता सूड उगवण्यात येईल आणि सैनिकांना आज्ञा केली होती की, त्यांनी शस्त्रे खाली ठेवावी व ताबडतोब मंगळ मैदानावर एकत्र जमावे.

मंत्री-अध्यक्षांनी त्सारस्कोये सेलो घेतले आणि पेत्रोग्रादपासून अवघ्या पाच मैलांवर त्यांचा तळ पडलाय असे आम्हाला सांगण्यात आले. उद्या, काही तासांच्या अवधीतच ते शहरात प्रवेश करणार होते. त्यांच्या कझाकांच्या संपर्कात असलेल्या सोविएत फौजा हंगामी सरकारला जाऊन मिळाल्याचे सांगण्यात येत होते. दोहोंच्या मध्ये कुठेतरी चेर्नोव धडपडत होते व यादवी युद्ध थांबविण्यासाठी "तटस्थ" फौज उभी करण्याचा प्रयत्न करीत होते.

शहरातल्या शिबंदीच्या तुकड्या बोल्शेविकांना सोडून चालल्या होत्या असे ते म्हणाले. स्मोल्नी एव्हाना सोडून देण्यात आला होता... सर्व सरकारी यंत्रणा काम करण्याची थांबली होती. सरकारी बँकेच्या कर्मचाऱ्यांनी स्मोल्नीतल्या कमिस्सारांच्या हाताखाली काम करायला नकार दिला होता, त्यांना पैसे द्यायचे नाकारले होते. सर्व खाजगी बँका बंद होत्या. मंत्रालये संपावर होती. आत्तासुद्धा दूमाची एक समिती व्यापारी संस्थांकडे चकरा

मारून निधी[2] गोळा करीत होती व संपावर असलेल्यांना पगार देत होती...

ट्रॉट्स्की परराष्ट्र मंत्रालयात गेले होते आणि शांततेविषयीचे आज्ञापत्र परकी भाषांमध्ये अनुवाद करण्याचा तेथील कारकुनांना त्यांनी हुकूम दिला होता; तिथल्या सहाशे कर्मचाऱ्यांनी त्यांच्या तोंडावर राजिनामे भिरकावले होते...

मजूर खात्याचे कमिस्सार श्ल्याप्निकोव यांनी आपल्या खात्यातल्या सर्व कर्मचाऱ्यांना फर्मान सोडले होते की, चोवीस तासांच्या आत त्यांनी आपापल्या कामांवर हजर व्हावे किंवा आपल्या नोकऱ्या आणि पेन्शनीचे हक्क यांच्यावर पाणी सोडावे; त्यांच्या फर्मानाला फक्त दरवानांनी प्रतिसाद दिला... खास अन्नपुरवठा समितीच्या काही शाखांनी बोल्शेविकांच्या आधीन होण्याऐवजी आपले काम निलंबित करणे श्रेयस्कर मानले... उच्च पगाराची आणि अधिक सुखसोयींची आश्वासने देऊनही, टेलिफोन एक्स्चेंजमधील ऑपरेटर सोविएत मुख्य ठाण्यांशी संपर्क जोडून देईनात...

जे सभासद सोविएतांच्या काँग्रेसमध्ये राहिले होते व जे उठावात भाग घेत होते, त्या सर्वांना हाकलून देण्याचा ठराव समाजवादी-क्रांतिकारक पक्षाने संमत केला होता...

प्रांतिक बातम्या: मोगीलेव यांनी बोल्शेविकांविरुद्ध असल्याचा पुकारा केला. कीव्हमध्ये कझाकांनी सोविएते उलथून टाकली आणि सर्व उठावखोर पुढाऱ्यांना अटक केली. लूगाच्या सोविएतने आणि तेथील तीस हजार ठाणबंद फौजेने हंगामी सरकारभोवती एकवटण्याचे आवाहन केले. दॉन खोऱ्यामधल्या सर्व सोविएतांना आणि युनियनांना कालेदिनने बरखास्त केले होते आणि त्याच्या फौजा उत्तरेकडे सरकत होत्या...

रेल्वे कामगारांचा एक प्रतिनिधी म्हणाला: "काल आम्ही सर्व रशियाभर तार पाठवून मागणी केली आहे की राजकीय पक्षांमधले युद्ध ताबडतोब थांबवावे आणि संमिश्र समाजवादी सरकार स्थापन करावे. अन्यथा उद्या रात्रीपासून आम्ही संप पुकारू... सकाळी या प्रश्नावर विचार करण्यासाठी सर्व गटांची सभा होईल. बोल्शेविक समझोता करायला उत्सुक दिसले..."

"तेवढ्या काळपर्यंत ते टिकले तर!" एक दणकट, लालबुंद नगर-अभियंता हसत म्हणाला...

आम्ही स्मोल्नीला आलो तेव्हा आढळून आले की, तो मोकळा वगैरे सोडून कुणीही गेलेले नव्हते, उलट तेथील कामकाज अधिकच वाढले होते;

कामगारांचे आणि सैनिकांचे जथे आत-बाहेर पळत होते, सर्वत्र दुप्पट पहारा बसवलेला होता — भांडवलदारी आणि "नेमस्त" समाजवादी वर्तमानपत्रांच्या वार्ताहरांशी आमची गाठ पडली.

"आम्हाला बाहेर फेकून दिलं!" 'वोल्या नरोदा'चा एकजण म्हणाला. "बाँच-ब्रूयेविच पत्रकार केंद्रात आले आणि त्यांनी आम्हाला निघून जायला सांगितलं! आम्ही हेर आहोत असं म्हणाले!" त्या सर्वांनी एकाच वेळी एकदम बोलायला सुरुवात केली: "अपमान! जुलूम! वृत्तपत्रस्वातंत्र्याचं हरण! .."

बाहेरच्या दालनात मोठमोठ्या टेबलांवर लष्करी क्रांतिकारक समितीच्या आवाहनांचे, घोषणांचे आणि हुकुमांचे ढीगच्या ढीग पडले होते. कामगार आणि सैनिक लटपटत्या पायांनी ते गठ्ठे बाहेर थांबलेल्या मोटारींमध्ये नेऊन भरत होते.

यातला एक नमुना:

"मानखोड्यात!

रशियन जनता सध्या करुण प्रसंगांमधून जात असताना, मेन्शेविक-तडजोडवादी व उजवे समाजवादी-क्रांतिकारक यांनी कामगारवर्गाचा विश्वासघात केला आहे. कोर्निलोव, केरेन्स्की आणि साविन्कोव यांच्या बाजूला जाऊन ते दाखल झाले आहेत...

"देशद्रोही केरेन्स्कीच्या आज्ञांना ते छापत आहेत आणि शहरात घबराट निर्माण करीत आहेत, त्या गुंडाच्या कल्पित विजयांच्या अत्यंत हास्यास्पद अफवा पसरवीत आहेत...

"नागरिकहो! या खोट्या अफवांवर विश्वास ठेवू नका. जनतेच्या क्रांतीचा कोणतीही सत्ता पराभव करू शकत नाही... पंतप्रधान केरेन्स्की आणि त्यांचे अनुयायी यांना लौकरच योग्य ते शासन करण्यात येईल...

"आम्ही त्यांना मानखोड्यात अडकवतो आहोत. ज्या प्राचीन काळच्या शृंखलांमध्ये ते कामगारांना, सैनिकांना आणि खलाशांना व किसानांना पुन्हा बांधू पहात होते त्या या सर्व लोकांच्या क्षोभाच्या तोंडी आम्ही त्यांना देत आहोत. लोकांना त्यांच्यासंबंधी वाटणाऱ्या तिरस्काराचे आणि संतापाचे कलंक ते आपल्या शरीरांवरून कधीही धुवून टाकू शकणार नाहीत.

"जनतेशी द्रोह करणाऱ्यांचा धिक्कार असो — त्यांचा तळतळाट

होवो ! . .”

लष्करी क्रांतिकारक समितीची कचेरी अधिक मोठ्या दालनात, सर्वांत वरच्या मजल्यावरच्या १७ क्रमांकाच्या खोलीत हलविण्यात आली होती. दाराशी लाल रक्षक होते. आतमध्ये, कठडयासमोरच्या अरुंद जागेत उत्तम पहरावातल्या अनेक लोकांची गर्दी दाटली होती. बाहेरून ते प्रतिष्ठित दिसत असले तरी त्यांची अंत:करणे मात्र खुनसाने भरली होती. आपल्या मोटारींसाठी परवाने मागायला किंवा शहर सोडून जाण्यासाठी प्रवास-परवाने मागायला आलेले ते भांडवलदारवर्गीय लोक होते आणि त्यांच्यात अनेक परदेशी लोकांचाही भरणा होता . . . बिल शातोव आणि पेटर्स कामावर होते. ताजी वार्तापत्रे आम्हाला वाचून दाखवण्यासाठी त्यांनी बाकीची सर्व कामे तात्पुरती बाजूला ठेवली.

१७९ व्या राखीव रेजिमेंटने आपला संपूर्ण पाठिंबा व्यक्त केला आहे. पुतिलोव धक्क्यावरचे पाच हजार गोदी कामगार नव्या सरकारचे स्वागत करीत आहेत. ट्रेड युनियनांची मध्यवर्ती समिती – उत्साहपूर्ण पाठिंबा. रेवल येथील ठाणबंद फौज व स्क्वाड्रन लष्करी क्रांतिकारक समित्यांची निवडणूक घेत आहेत आणि फौजा पाठवीत आहेत. प्स्कोव आणि मिन्स्क येथ लष्करी क्रांतिकारक समित्यांनी ताबा बसवला आहे. त्सारीत्झिन, रोस्तोव-ऑन-दॉन, प्यातिगोर्स्क, सेवास्तोपोल येथील सोविएतांकडून अभि-नंदनपर संदेश . . . फिन्लंड डिव्हिजन, पाचव्या आणि बाराव्या सेनांच्या नव्या समित्या हात पुढे करीत आहेत . . .

मॉस्कोची बातमी अनिश्चित आहे. लष्करी क्रांतिकारक समितीच्या फौजांनी शहरातल्या मोक्याच्या जागा काबीज केल्या आहेत; क्रेमलिन-मधील कामावर असलेल्या दोन कंपन्या सोविएतांच्या बाजूला येऊन मिळा-ल्या होत्या, पण शस्त्रागार कर्नल र्‍याब्त्सेव आणि त्यांचे युंकर यांच्या ताब्यात आहे. लष्करी क्रांतिकारक समितीने कामगारांसाठी शस्त्रांची मागणी केली होती व या सकाळपर्यंत र्‍याब्त्सेवनी तिच्याशी वाटाघाटी चालू ठेवल्या होत्या, पण अचानक त्यांनी समितीला निर्वाणीचा खलिता धाडला व सोविएत फौजांनी शरण येऊन समिती बरखास्त करावी असा हुकूम केला. लढाई जुंपली आहे . . .

पेत्रोग्रादमध्ये वरिष्ठ सेनाधिकारी तात्काळ स्मोल्नीच्या कमिस्सारांच्या स्वाधीन झाले. त्सेंत्रोफ्लोतने नकार दिला तेव्हा दीबेन्को आणि क्रॉन्स्ताद्त-च्या खलाशांची एक कंपनी त्यावर झंझावातासारखी तुटून पडली आणि बा-

ल्टिक व काळ्या सागरांमधील युद्धनौकांचा पाठिंबा असलेले नवे त्मेंत्रोफ्लोत स्थापन करण्यात आले...

पण या सर्व उत्साही आश्वासनांच्या तळाशी एक धोक्याची आगाऊ सूचना होती, वातावरणात एक अस्वस्थ भावना होती. केरेन्स्कींचे कझाक वेगाने चाल करून येत होते; त्यांच्याजवळ तोफखाना होता. कारखाना समित्यांचे चिटणीस, ओढलेल्या आणि पिवळट पडलेल्या चेहऱ्याचे स्क्रिप्निक यांनी खात्रीपूर्वक सांगितले की, कझाकांचे एक पूर्ण कोअर आहे. पण पुढे ते त्वेषाने म्हणाले, "आम्हाला ते जिवंत कधीही नेऊ शकणार नाहीत!" पेत्रोव्स्की दमल्याचा सुस्कारा टाकीत हसून म्हणाले, "उद्या कदाचित आम्हाला झोप मिळेल – एक प्रदीर्घ..." खंगलेल्या, लाल दाढीच्या चेहऱ्याचे लोझोव्स्की म्हणाले, "आम्हाला कसली आशा आहे? संपूर्ण एकाकी... एक जमाव विरुद्ध कसलेले सैनिक!"

दक्षिणेला आणि नैर्ऋत्येला सोविएते केरेन्स्कीसमोर पळून गेल्या होत्या आणि गात्चिना, पावलोव्स्क, त्सारस्कोये सेलो येथील ठाणबंद फौजांमध्ये दुही माजली होती – निम्म्यांनी तटस्थ रहायचे ठरवले होते, बाकीचे सैनिक अधिकाऱ्यांविना, राजधानीकडे सैराट धावत सुटले होते.

सभागृहांमध्ये ते वार्तापत्रे चिकटवीत होते:

"क्रास्नोये सेलो येथून, १० नोव्हेंबर, सकाळी ६ वा.

"वरिष्ठ सेनाधिकारी विभागाच्या सर्व प्रमुखांना, सेनेच्या सर्व प्रमुखांना, प्रमुखांना, सर्वत्र आणि सर्वांना, सर्वांना, सर्वांना कळविण्यात यावे.

"माजी मंत्री केरेन्स्की यांनी सर्वांना सर्वत्र बुद्ध्याच खोटी तार पाठवली आहे की, क्रांतिकारक पेत्रोग्रादच्या फौजांनी स्वेच्छेने आपली शस्त्रे खाली ठेवली आहेत आणि त्या पूर्वीच्या सरकारच्या, विश्वासघातकी सरकारच्या फौजांना जाऊन मिळाल्या आहेत व लष्करी क्रांतिकारक समितीने सैनिकांना म्हणे माघार घेण्याची आज्ञा केली आहे. स्वतंत्र जनतेच्या फौजा माघार घेत नाहीत किंवा त्या शरणही जात नाहीत. आमच्या फौजांनी गात्चिना सोडले कारण त्यांच्यात आणि गैरसमजूत झालेल्या त्यांच्या कझाक बांधवांमध्ये निष्कारण रक्तपात होऊ देण्याची त्यांची इच्छा नव्हती आणि अधिक सोयीच्या जागी मोर्चा बांधावयाचा होता. सध्याचा मोर्चा एवढा भक्कम आहे की,

केरेन्स्कीनी आणि त्यांच्या साथींनी जरी आपल्या फौजा दहापटींनी वाढवल्या तरी काळजीचे कारण उद्भवणार नाही. आमच्या फौजांचे मनोबल उत्तम आहे. पेत्रोग्रादमध्ये सारे काही शांत आहे.

पेत्रोग्रादच्या संरक्षणाचे
आणि पेत्रोग्राद विभागाचे प्रमुख,
लेफ्टनंट-कर्नल **मुराव्योव.**"

आम्ही लष्करी क्रांतिकारक समितीमधून बाहेर पडत होतो तोच प्रेतवत चेहरा झालेले अंतोनोव हातात कागद घेऊन प्रवेशले.

"हे पाठवा," ते म्हणाले.

**"सर्व कामगार प्रतिनिधींच्या विभागीय सोविएतांना आणि कारखाना समित्यांना उद्देशून**

**आज्ञा**

"केरेन्स्कीच्या कोर्निलोववादी टोळ्यांमुळे राजधानीच्या नजीक धोका निर्माण झाला आहे. जनतेच्या आणि तिच्या विजयांच्या विरोधी होणाऱ्या या प्रतिक्रांतिकारी प्रयत्नाला निष्ठुरपणे चिरडून टाकण्याबाबत आवश्यक त्या सर्व आज्ञा दिलेल्या आहेत.

"क्रांतीच्या सेनेला आणि लाल रक्षकांना कामगारांच्या तातडीच्या पाठिंब्याची गरज आहे.

"आम्ही विभागीय सोविएतांना आणि कारखाना समित्यांना आज्ञा करीत आहोत:

१. खंदक खणण्यासाठी, अडथळे उभारण्यासाठी आणि तारांची भेंडोळी अधिक वाढविण्यासाठी जास्तीत जास्त कामगारांना कामाला लावणे.

२. या कामासाठी जेथे कारखाने बंद ठेवणे आवश्यक पडेल तेथे तसे ताबडतोब केले जाईल.

३. सर्व उपलब्ध साध्या आणि काटेरी तारा एकत्र गोळा करण्यात, तसेच खंदक खणण्याची आणि अडथळे उभारण्याची सर्व अवजारे एकत्र करावीत.

८. सर्व उपलब्ध शस्त्रे घेतली पाहिजेत.

५. अत्यंत कडक शिस्त पाळली पाहिजे आणि प्रत्येकाने सर्वार्थाने क्रांतीच्या सैन्याला पाठिंबा देण्याची तयारी ठेवली पाहिजे.

कामगार आणि सैनिक प्रतिनिधींच्या
पेत्रोग्राद सोविएतचे अध्यक्ष,
जन-कमिस्सार **लेव ट्रॉट्स्की.**
लष्करी क्रांतिकारक समितीचे अध्यक्ष,
सरसेनापती **निकोलाय पद्वोयस्की.**"

आम्ही बाहेर पडलो तेव्हा सर्वत्र उदास आणि अंधारलेले वातावरण पसरले होते, भोवतालच्या करड्या क्षितिजवर्तुळात गिरण्यांचे कर्कश्य भोंगे भावी दुश्चिन्हांची जणू पूर्वसूचना देत असल्याच्या सुरात वाजत होते. हजारो कामकरी लोक–पुरुष आणि स्त्रिया–बाहेर पडत होते; बुजबुजलेल्या घाणेरड्या वस्त्यांमधून मळक्या-फाटक्या हजारो लोकांच्या झुंडी लोटत होत्या. लाल पेत्रोग्राद धोक्यात होते! कझाकांपासून धोका होता!.. पुरुष, स्त्रिया आणि मुले रायफली, टिकाव, फावडी, तारांची भेंडोळी घेऊन व आपल्या कामकरी कपड्यांवर काडतुसांचे पट्टे लटकावून घाणेरड्या गल्ल्यांमधून मस्कोव्स्की गेटाकडे दक्षिणेला आणि नैॠत्येला लोंढ्यांनी चालले होते... शहरामधून लोकांचा एवढा अफाट लोंढा चाललेला कधीही पाहण्यात नव्हता! त्यांचा धो धो प्रवाहासारखा लोंढा वहात होता, त्यांच्याबरोबर सैनिकांच्या कंपन्याही चालत होत्या, तोफा, मालवाहू मोटारी, घोडागाड्या चालल्या होत्या. क्रांतिकारक कामगारवर्ग आपल्या छातीचा कोट करून कामगारकिसानांच्या प्रजासत्ताकाच्या राजधानीचे रक्षण करीत होता!

स्मोल्नीच्या दारापुढे एक मोटार उभी होती. एक कृश शरीरयष्टीचा इसम तिच्या मडगार्डला टेकून, आपल्या ढगळ कोटाच्या दोन्ही खिशांमध्ये हात खुपसून उभा होता. त्याच्या चष्म्याच्या जाड भिंगांमधून त्याचे तारवटलेले लाल डोळे आणखीच बटबटीत दिसत होते आणि बोलताना त्याला फार प्रयास पडत होते. नितळ डोळ्याचा एक धिप्पाड दाढीवाला तरुण खलाशी अस्वस्थपणे येरझाऱ्या मारीत होता व विमनस्कपणे हातातल्या

भल्यामोठ्या निळ्या पोलादी रिवॉल्वरशी खेळत होता. पण ते रिवॉल्वर मात्र सतत त्याच्या हातात होते. ते अंतोनोव आणि दीबेन्को होते.

काही सैनिक दोन लष्करी फटफट्यांना मोटारीच्या पावट्याला बांधायचा प्रयत्न करीत होते. शोफरने जोरदार विरोध केला; गाडीच्या मुलाम्यावर चरे पडतील असे तो म्हणाला. हे खरे होते की तो बोल्शेविक होता आणि ती मोटार कुणा धनिकाकडून जप्त केलेली होती; हे ही खरे होते की, त्या फटफट्या ऑर्डर्लींच्या उपयोगासाठी नेण्यात येत होत्या. पण त्या शोफरचा व्यावसायिक अभिमान उसळून आला... तेव्हा त्या फटफट्या बांधण्याचे रद्द करण्यात आले...

युद्ध आणि नाविक खात्यांचे जन-कमिस्सार क्रांतिकारक आघाडीची—जेथे घोटे ती होती—तपासणी करायला जाणार होते. आम्ही त्यांच्याबरोबर जाऊ शकत होतो का? अर्थातच नाही. मोटारीत फक्त पाच लोकांनाच जागा होती—दोन कमिस्सार, दोन ऑर्डर्ली आणि शोफर. तरीही माझ्या ओळखीचा एक रशियन माणूस, त्याला मी त्रुसिष्का (भित्रा) असे संबोधीन, शांतपणे गाडीत शिरून बसला. कुठलीही सबब त्याला बाहेर काढू शकली नाही...

त्रुसिष्काने केलेल्या त्या प्रवासवर्णनावर विश्वास ठेवायला काही हरकत नाही असे मला वाटते. सूवोरोव्स्की प्रॉस्पेक्तवरून ते जात होते तेव्हा कुणीतरी खाण्यापिण्याचा विषय काढला. खेडवळ भागात जिथे काही नीट सोयी नाहीत अशा ठिकाणी त्यांना कदाचित तीन-चार दिवस काढावे लागले असते. त्यांनी खाण्याचे पदार्थ घ्यायला गाडी थांबवली. पण पैसे कुठे होते? युद्ध खात्याच्या कमिस्सारांनी आपले खिसे चाचपले. त्यांच्याजवळ एकही कोपेक नव्हता. नौदल खात्याचे कमिस्सारही कफल्लक होते. शोफरही तसाच कंगाल. त्रुसिष्काने खाद्यपदार्थ विकत घेतले...

नेव्स्कीवर त्यांनी वळण घेतले न घेतले तोच एक रबरी धाव फुटली.

"आता आपण काय करायचं? अंतोनोव यांनी विचारले.

"दुसरी मोटार जप्त करायची!" हातातले रिवॉल्वर हलवीत दीबेन्कोंनी सुचवले.

अंतोनोव रस्त्याच्या मध्यभागी उभे राहिले आणि एक सैनिक चालवीत असलेल्या मोटारीला थांबायचा त्यांनी इशारा केला.

"मला ही मोटार पाहिजे," अंतोनोव म्हणाले.

"तुम्हाला ती मिळणार नाही," सैनिक उत्तरला.

"मी कोण आहे तुला माहीत आहे?" अंतोनोव यांनी खिशातून कागद काढून त्याच्यासमोर धरला. त्यावर लिहिलेले होते की, रशियन प्रजासत्ताकाच्या सर्व सेनांचे सरसेनापती म्हणून त्यांची नेमणूक केलेली होती आणि त्यांच्या आज्ञा प्रत्येकाने बिनतक्रार पाळायच्या होत्या.

"तुम्ही प्रत्यक्ष सैतान असलात तरी मला त्याची पर्वा नाही," तो सैनिक संतापून म्हणाला. "ही मोटार पहिल्या मशिनगन रेजिमेंटची आहे, आम्ही तिच्यातून दारूगोळा घेऊन चाललो आहोत आणि तुम्हाला ती मिळणार नाही..."

पण तेवढ्यात इटलीचा ध्वज फडकावीत चाललेल्या एका जुन्यापुराण्या डबड्या टॅक्सीने तेथे अवतीर्ण होऊन तो समरप्रसंग टाळला. (अशांततेच्या काळात खाजगी गाड्या परकी वकिलातींच्या नांवांवर नोंदवण्यात येत, म्हणजे त्या जप्त होण्याची भीती नसे.) तिच्यामधून एका गलेलठ्ठ, भारी केसाळ कोट घातलेल्या नागरिकाला बाहेर काढण्यात आले आणि ही मंडळी पुढे मार्गस्थ झाली.

सुमारे दहा मैलांवरच्या नावंस्काया झास्तावा येथे आल्यावर अंतोनोव यांनी लाल रक्षकांच्या प्रमुखाला बोलावणे पाठवले. त्यांना शहराच्या एका टोकाला नेण्यात आले. तेथे शेकडो कामगारांनी खंदक खणले होते व कझाकांची वाट पहात होते.

"कॉम्रेड, इथं सारं आलबेल?" अंतोनोवनी विचारले.

"सारं काही उत्तम कॉम्रेड," प्रमुख उत्तरला. "शिपायांमध्ये भरपूर उत्साह आहे... पण एकच उणीव – आमच्याजवळ दारूगोळा नाही..."

"स्मोल्नीत दोन महापद्म फैरी आहेत," अंतोनोव यांनी त्याला सांगितले. "मी तुम्हाला हुकूम लिहून देतो." त्यांनी आपले खिसे चाचपले. "कुणाजवळ कागदाचा तुकडा आहे का?"

दीबेन्कोंजवळ अजिबात कागद नव्हता – त्या ऑर्डर्लीच्या जवळही नव्हता. त्रुसिष्काला आपली टिपणवही द्यावी लागली...

"हात्तिच्या! माझ्याजवळ पेन्सिलही नाही!" अंतोनोव ओरडून म्हणाले. "कुणाजवळ पेन्सिल आहे?" त्या सर्व लोकांमध्ये फक्त त्रुसिष्काजवळच पेन्सिल होती हे काही सांगायची गरज नाही...

आम्ही मागे राहिलेले लोक त्सारस्कोये सेलो स्टेशनकडे निघालो. नेव्‌स्की रस्त्यावरून आम्ही चाललो होतो तेव्हा लाल रक्षक हाती शस्त्रे घेऊन लढाईवर निघाले होते. काहींजवळ संगिनी होत्या, काहींजवळ नव्ह-

त्या. हिवाळ्यातली लौकर मावळणारी संध्याकाळ पसरत होती. ताठ मानेने ते लाल रक्षक थंडगार चिखल तुडवीत, चारा चारांच्या वेड्यावाकड्या रांगांनी, बँडशिवाय. पडघमच्या तालाशिवाय चालले होते. वेड्यावाकड्या सोनेरी अक्षरात "शांतता! भूमी!" असे शब्द कोरलेला एक लाल ध्वज त्यांच्या शिरोभागी फडकत होता. ते वयाने अगदी कोवळे होते. आपण मरणाला मिठी मारायला चाललोय हे समजलेल्या लोकांच्या चेहऱ्यांवर जे भाव असतात तेच त्यांच्या चेहऱ्यांवर होते... अर्धवट भेदरलेले, अर्धवट तुच्छतेच्या भावनेने भरलेले काही लोकांचे जमाव पादपथांवर उभे राहून लाल रक्षकांना न्याहाळत होते. त्यांच्या त्या शांततेत तिरस्कार दाटलेला जाणवत होता...

केरेन्स्कीचा ठावठिकाणा काय आहे आणि युद्धाची आघाडी कोठे आहे याचा रेल्वे स्टेशनावर कुणालाच पत्ता नव्हता. मात्र त्सारस्कोयेच्या पुढे आगगाड्या जात नव्हत्या...

बोचकी व सायंकालीन वर्तमानपत्रे घेऊन गावी जाणाऱ्या खेडवळ लोकांनी आमचा डबा खच्चून भरला होता. बोल्शेविकांचा उठाव हाच सर्वांच्या चर्चेचा विषय होता. या व्यतिरिक्त मात्र कुणालाही पत्ता लागला नसता की, यादवी युद्ध बलाढ्य रशियाची दोन छकले करायला सिद्ध झाले होते आणि ती आगगाडी लढाईच्या परिसरात निघाली होती. झपाट्याने गडद होत चाललेल्या अंधारात सैनिकांचे जथे चिखलभरल्या रस्त्यावरून शहराकडे जात असलेले व वादविवाद करताना हातवारे करीत चाललेले आम्हाला डब्याच्या खिडकीतून दिसत होते. शिपायांनी गच्च भरलेली एक मालगाडी बाजूच्या रूळांवर थांबलेली आम्ही प्रचंड शेकोटीच्या प्रकाशात उजळलेली पाहिली. बस्स एवढेच. पाठीमागच्या बाजूला सपाट क्षितिजावर शहरातल्या दिव्यांच्या उजेडाने रात्र फिकी केली होती. दूर लांब पसरलेल्या उपनगरामधून एक ट्रामगाडी नागमोडी वळणे घेत चालली होती...

त्सारस्कोये सेलो स्टेशन शांत होते, पण इतस्ततः सैनिकांचे छोटे छोटे गट दबत्या आवाजात बोलत असलेले आणि गात्चिनाच्या दिशेने मोकळ्या रूळांकडे अस्वस्थ नजरा टाकीत असलेले दिसत होते. ते कुणाच्या बाजूचे आहेत याबद्दल मी काहींना विचारणा केली. त्यातला एक म्हणाला, "या बाबतीत योग्य बाजू कुणाची आहे हे आम्हाला ठाऊक नाही... केरेन्स्की चिथावणीखोर आहे यात काही शंका नाही, पण रशियन लोकांनी

रशियन लोकांवर गोळ्या झाडणं हे काही योग्य आहे असं आम्हाला वाटत नाही."

स्टेशन प्रमुखाच्या कचेरीत एक धिप्पाड, गमत्या स्वभावाचा, दाढी-वाला साधा सैनिक होता. रेजिमेंट समितीची लाल फीत त्याने दंडावर बांधली होती. स्मोल्नीहून आम्हाला मिळालेल्या अधिकारपत्रांमुळे तात्काळ आम्हाला आदरयुक्त वागणूक मिळाली. तो सरळ सरळ सोविएतांच्या बाजूचा होता, पण तरीही गोंधळलेला होता.

"दोन तासांपूर्वी इथं लाल रक्षक होते, पण ते परत निघून गेले. एक कमिस्सार आज सकाळी आले होते, पण कझाक आले तेव्हा ते पेत्रोग्रादला परत गेले.

"म्हणजे इथं कझाक पोचलेत?"

गंभीरपणे त्याने होकारार्थी मान हलवली. "इथं लढाई झाली. भल्या पहाटेच कझाक आले. त्यांनी आमची दोन-तीनशे माणसं पकडली आणि सुमारे पंचवीसांना ठार मारलं."

"कझाक कुठं आहेत?"

"ते या ठिकाणापर्यंत पोचले नाही. ते नक्की कुठं आहेत मला माहीत नाही. त्या पलिकडं..." त्याने संदिग्धपणे पश्चिमेकडे हात हलवला.

स्टेशनवरच्या रेस्तराँमध्ये आम्ही झकासपैकी जेवलो. इथे पेत्रोग्रादपेक्षा स्वस्त आणि अधिक चांगले जेवण मिळाले. आमच्या शेजारी एक फ्रेंच अधिकारी बसला होता. तो नुकताच गात्चिनाहून पायी चालत आला होता. तिथे सारे काही शांत आहे, तो म्हणाला. शहर केरेन्स्कींच्या ताब्यात होते. "हे रशियन लोक अगदी नमुनेदार आहेत बुवा!" तो उद्गारला. "काय पण यादवी युद्ध! प्रत्यक्ष लढाई सोडून सारं काही चाललंय!"

आम्ही गावात चक्कर मारायला निघालो. स्टेशनाच्या फाटकाशीच दोन सैनिक संगीनधारी रायफली घेऊन उभे होते. त्यांच्याभोवती सुमारे शंभर व्यापाऱ्यांचा, सरकारी अधिकाऱ्यांचा आणि विद्यार्थ्यांचा गराडा पडला होता. हे लोक मोठ्या तावातावाने त्या सैनिकांशी वाद घालत होते व शेलकी विशेषणे भिरकावत होते. निष्कारण रागावल्यास लहान मुले जशी हिरमुसली होऊन दुखावतात त्याप्रमाणे त्या सैनिकांची अवस्था झाली होती.

चेहऱ्यावर मिजासखोर भाव असलेला व विद्यार्थ्याचा गणवेश परिधान केलेला एक उंचापुरा तरुण त्या जमावाचे म्होरकेपण करीत होता.

"मला वाटतं तुम्हाला एव्हाना जाणवलं असेल," तो उर्मट सुरात

म्हणाला, "की आपल्याच बांधवांविरुद्ध शस्त्र उपसून तुम्ही खुन्यांचे आणि देशद्रोह्यांचे हस्तक बनता आहात!"

"हे बघा भाऊसाहेब," तो सैनिक प्रामाणिक तळमळीने म्हणाला, "तुम्हाला समजत नाहीय. दोन वर्ग आहेत, कामगारवर्ग आणि भांडवलदारवर्ग, हे तुम्हाला दिसत नाही का? आम्ही–"

"ह्या:! ती बाष्कल बडबड मला माहीत आहे!" त्या विद्यार्थ्याने उद्धटपणे सैनिकाचे बोलणे मध्येच तोडले. "कुणीतरी भिरकावलेली चार हुकमी वाक्यं तुमच्यासारखी गावढळ शेतकरी माणसं ऐकतात. त्यांचा अर्थ तुम्हाला काहीच समजत नाही. पण पोपटांच्या थव्याप्रमाणं तुम्ही तीच वाक्यं बडबडत राहता." जमावातले लोक त्यावर जोरात हसले. "मी मार्क्सवादाचा विद्यार्थी आहे. मी तुम्हाला सांगतो, तुम्ही ज्यासाठी लढता आहात तो समाजसत्तावाद नाही. ही शुद्ध जर्मनांना धार्जिणी अराजकता आहे!"

"होय मला ठाऊक आहे," कपाळावर घाम थबथबलेला सैनिक उत्तरला. "तुम्ही सुशिक्षित आहात हे सहज समजण्यासारखं आहे. आणि मी बापडा साधाबागडा माणूस आहे. पण तरीही मला असं वाटतं–"

"मला वाटतं," विद्यार्थ्याने तुसडेपणाने सैनिकाला अडवीत म्हटले, "लेनिन कामगारवर्गाचे खरेखुरे मित्र आहेत असा तुमचा विश्वास आहे, होय ना?"

"होय. माझा आहे," हैराण होत सैनिक उत्तरला.

"माझ्या मित्रा, बंद गाडीतून लेनिनना जर्मनीमधून इकडं पाठवण्यात आलं हे तुला ठाऊक आहे का? लेनिननी जर्मनांकडून पैसे घेतलेत हे माहीत आहे का?"

"मला त्याबद्दल फारशी माहिती नाही," सैनिक निग्रहपूर्वक उत्तरला. "पण मला असं वाटतं की ते जे काही बोलतात तेच माझी ऐकायची इच्छा असते, माझ्यासारख्या सर्व साध्या लोकांची तशीच इच्छा असते. आता दोन वर्ग आहेत, भांडवलदारांचा आणि कामगारांचा–"

"अगदी मूर्ख आहेस! अरे मित्रा, मी श्लीसेलबुर्गमध्ये क्रांतिकार्यात दोन वर्षं घालवली तेव्हा तुम्ही अजूनही क्रांतिकारकांना गोळ्या घालत होता आणि "परमेश्वर झारचे रक्षण करो" म्हणून गात होता! माझं नांव वासिली गिओर्गिएविच पानिन. माझ्याबद्दल कधी ऐकलंय का?"

"माफ करा, पण कधीच आपलं नांव ऐकलं नाही" सैनिकाने नम्रपणे

उत्तर दिले. “पण मी काही शिकलेला माणूस नाही. तुम्ही कदाचित फार मोठे पुढारी असाल.”

“आहेच,” तो विद्यार्थी ठामपणे म्हणाला. “आणि आमच्या रशियाचा आमच्या स्वतंत्र क्रांतीचा विध्वंस करणाऱ्या बोल्शेविकांच्या मी विरुद्ध आहे. यावर तुम्हाला काही म्हणायचं आहे?”

सैनिकाने डोके खाजवले. “याला मी काही उत्तर देऊ शकत नाही,” बुद्धीला शिणवणाऱ्या या चर्चेने त्याचा चेहरा वाकडा बनला होता. “मला हे अगदी साधं-सोपं वाटतं. पण मी काही शिकला-सवरलेला नाही. असं दिसतं की फक्त दोन वर्ग आहेत, कामगारवर्ग आणि भांडवलदारवर्ग—”

“पुन्हा लागला ती मूर्ख पोपटपंची करायला!” तो विद्यार्थी संतापाने ओरडला.

“—फक्त दोन वर्ग,” सैनिक हटवादीपणे आपले म्हणणे पटवीत राहिला. “आणि जो एका बाजूला नाही तो दुसऱ्या बाजूला असतो...”

अगदी कमी आणि दूर दूर अंतरावर दिवे असलेल्या रस्त्यांवरून आम्ही भटकलो. तिथे लोकांची क्वचित वर्दळ होती. एक धास्तावणारी शांतता त्या ठिकाणावर ओठंगली होती — जणू स्वर्ग आणि नरक यांच्यामधली ती प्रायश्चित्तभूमी होती, राजकीयदृष्ट्या अनाम भूमी होती. फक्त न्हाव्यांच्या दुकानांमध्ये दिव्यांचा लखलखाट होता आणि माणसांची गर्दी होती. सार्वजनिक हमामखान्यासमोर लोकांची एक रांग लागली होती; कारण ती शनिवारची रात्र होती आणि दर शनिवारी रात्री सबंध रशियातली माणसे आंघोळी करतात व सुवासिक अत्तरे माखतात. हे स्नानविधी जेथे चालले होते तेथे सोविएत शिपाई आणि कझाक एकत्र एकमेकात मिसळले होते, याबद्दल मला यत्किंचितही संदेह नव्हता.

शाही बागेच्या जसजसे आम्ही जवळ येऊ लागलो तसतसे रस्ते अधिकाधिक निर्मनुष्य होऊ लागले. एका भेदरलेल्या पाद्र्याने आम्हाला सोविएतचे मुख्य ठाणे दाखवले आणि घाईघाईने तो पसार झाला. बागेसमोरच्या एका भव्य उमराव प्रासादातील एका कक्षात ही कचेरी थाटलेली होती. खिडक्यांमधून प्रकाश येत नव्हता आणि त्या बंद होत्या. पँटच्या वरच्या खिशांमध्ये हात खुपसून शांतपणे येरझाऱ्या घालणाऱ्या एका सैनिकाने संशयाने आम्हाला आपादमस्तक न्याहाळले. “दोन दिवसांपूर्वीच सोविएतची कचेरी इथून गेली,” तो म्हणाला. “कुठे?” त्याने खांदे उडवले. “मला माहीत नाही.”

तिथून पुढे थोड्याच अंतरावर दिव्यांचा झगमगाट केलेली एक मोठी इमारत होती. तिथून मोठमोठ्याने ठोकण्याचे आवाज येत होते. आम्ही थोडे घुटमळत होतो तोच एक सैनिक आणि एक खलाशी हातात हात अडकवून रस्त्याने आले. मी माझा स्मोल्नीहून मिळालेला पास दाखवला. "तुम्ही सोविएतांच्या बाजूचे आहात काय?" मी विचारले. त्यांनी उत्तर दिले नाही, पण घाबरल्या चर्यांनी एकमेकांकडे पाहिले.

"तिथं काय चाललंय?" खलाशाने इमारतीकडे बोट करून विचारले.

"मला माहीत नाही..."

सैनिकाने घाबरत हाताने दरवाजा हलकेच ढकलला आणि दाराला फट पाडली. आतमधल्या प्रचंड हॉलमध्ये पताका आणि सदापर्णी टांगलेल्या होत्या, खुर्च्यांच्या रांगाच रांगा दिसत होत्या व रंगमंच बांधला जात होता.

हातात हातोडा धरलेली व दातात खिळे दाबून धरलेली एक धिप्पाड बाई बाहेर आली. "काय पाहिजे तुम्हाला?" तिने विचारले.

"आज रात्री खेळ आहे काय?" खलाशाने घाबरत विचारले.

"रविवारी रात्री नाटकाचे खाजगी प्रयोग होतील," कठोर आवाजात ती उत्तरली. "चला जा इथून!"

त्या खलाशाला आणि सैनिकाला संभाषणात गुंतवण्याचा आम्ही प्रयत्न केला, पण ते घाबरलेले आणि चिंताक्रांत दिसले व अंधारात नाहीसे झाले.

अफाट विस्ताराच्या, काळोखभरल्या बागांच्या कडेने फिरत फिरत आम्ही शाही राजवाड्यांकडे निघालो. त्यांचे अद्भुत मंडप आणि नक्षीदार पूल रात्रीच्या अंधुक प्रकाशात अस्पष्ट दिसत होते आणि कारंजांमधून पाण्याचे मंद फवारे उडत होते. एका ठिकाणी एका कृत्रिम गुंफेतला चमत्कारिक दिसणारा लोखंडी हंस चोचीतून पाण्याची अखंड धार उडवीत होता. तिथे आम्हाला अचानक जाणीव झाली की, कुणीतरी आमच्यावर पाळत ठेवतेय. पाहतो तर सुमारे अर्धा डझन धिप्पाड सशस्त्र सैनिक संतापल्या, संशयित नजरांनी एका गवताळ कुरणावरून आमच्याकडे टक लावून चमत्कारिकपणे पहात होते. मी उंचवटा चढून त्यांच्यापाशी गेलो. "तुम्ही कोण आहात?" मी विचारले.

"आम्ही पहारेकरी आहोत," एकजण उत्तरला. ते सगळे निराशेने ग्रासलेले दिसत होते. आठवडेच्या आठवडे दिवसरात्र शंका-कुशंका काढीत, चर्चा करीत घालविल्यामुळे साहजिकच ते हताश बनले होते.

"तुम्ही केरेन्स्कींचे शिपाई आहात की सोविएतांचे?"

एकमेकांकडे अस्वस्थपणे ते पहात असताना क्षणभर तेथे शांतता पसरली. मग एकजण म्हणाला, "आम्ही तटस्थ आहोत."

भव्य येकातेरीनिन्स्की राजवाड्याच्या कमानीतून आम्ही आत गेलो व खुद्द राजवाड्याच्या प्रांगणात जाऊन मुख्य ठाण्याच्या कचेरीची चौकशी केली. राजवाड्याच्या एका कमानदार शुभ्र कक्षातील दरवाजाबाहेरच्या पहारेकऱ्याने कमांडंट आत असल्याचे सांगितले.

आतले सुंदर, शुभ्र, जॉर्जियाच्या पद्धतीने सजवलेले दालन भिंतीतल्या चुल्यामुळे दोन विषम भागांमध्ये विभागले गेले होते व अधिकाऱ्यांचा एक गट चिंताक्रांत मन:स्थितीत संभाषणात गढला होता. त्यांचे चेहरे फिकट आणि विमनस्क दिसत होते. त्यांना झोप मिळालेली नव्हती हे अगदी स्पष्ट दिसत होते. आम्हाला कर्नल म्हणून दाखवलेल्या एका पांढऱ्या दाढीच्या, गणवेषावर मानचिन्हे लावलेल्या म्हाताऱ्याशा व्यक्तीला आम्ही आमची बोल्शेविक कागदपत्रे दाखवली.

त्या इसमाला कमालीचे आश्चर्य वाटलेले दिसले. "जिवाला धक्का न लागता तुम्ही इथपर्यंत येऊन पोचलात कसे?" त्याने आदरपूर्वक विचारले. "आत्ता रस्त्यात फिरणं फार धोक्याचं आहे. त्सारस्कोये सेलो-मध्ये राजकीय प्रक्षोभाचा वणवा जबरदस्त भडकलाय. आज सकाळी एक लढाई झाली आणि उद्या सकाळी आणखी एक होईल. आठ वाजता केरेन्स्की गावात प्रवेश करणार आहेत."

"कझाक कुठं आहेत?"

"त्या दिशेला सुमारे एक मैलावर." त्यांनी हाताने दाखवले.

"आणि त्यांच्यापासून तुम्ही गावाचं रक्षण करणार?"

"नाही रे बाबा!" तो हसून म्हणाला. "आम्ही केरेन्स्कींसाठी हे गाव ताब्यात घेऊन बसलोय." आमच्या काळजांचे पाणी पाणी झाले, कारण आम्ही अस्सल क्रांतिकारक होतो याची नोंद आमच्या पासांनी करून दिली होती. कर्नलनी खाकरून घसा साफ केला. "तुमच्या त्या पासांबद्दल सांगायचं तर," ते पुढे बोलू लागले, "तुम्ही जर पकडला गेलात तर तुमचे जीव धोक्यात येतील. म्हणून तुम्हाला जर लढाई बघायचीच असेल, तर अधिकाऱ्यांसाठी राखून ठेवलेल्या हॉटेलात तुम्हाला खोल्या देण्याबद्दल मी हुकूम लिहून देतो आणि सकाळी सात वाजता इथं परत आलात तर मी तुम्हाला नवीन पास देईन."

"म्हणजे तुम्ही केरेन्स्कींच्या बाजूचे आहात?"

"नाही म्हणजे नेमके केरेन्स्कींच्या **बाजूचे** असे नाही." कर्नल घुटमळले. "हे बघा ठाणबंद फौजेतले बहुतेक सैनिक बोल्शेविक आहेत आणि आज लढाईनंतर, ते सगळेजण बरोबर तोफखाना घेऊन पेत्रोग्रादच्या दिशेनं निघून गेले. **सैनिकांपैकी** कुणीही केरेन्स्कींच्या **बाजूचं** नाही असं तुम्ही म्हणू शकाल; पण त्यांच्यापैकी काहींना लढण्याची मुळीच इच्छा नाही. **अधिकारी** जवळ जवळ सगळे केरेन्स्कींच्या सैन्यात दाखल झालेत किंवा नुसते निघून गेलेत. आम्ही – अं... आम्ही मात्र कठीण परिस्थितीत सापडलो आहोत बघा..."

तिथे लढाई होईल असे काही आम्हाला वाटले नाही... कर्नलसाहेबांनी आदरपूर्वक रेल्वे स्टेशनापर्यंत आमच्या सोबतीला आपला एक ऑर्डर्ली दिला. तो दक्षिणेतला होता आणि देशांतर केलेल्या फ्रेंच आईबापांच्या पोटी बेस्साराबियात त्याचा जन्म झाला होता. तो सतत म्हणत होता, "धोक्याचं किंवा हालअपेष्टांचं मला तेवढं काही वाटत नाही, पण तब्बल तीन वर्षं एवढ्या दूर, आईपासून लांब रहायचं म्हणजे..."

कडक गारठ्यात अंधारामधून आमची आगगाडी पेत्रोग्रादच्या दिशेने धावत होती तेव्हा डब्याच्या खिडकीतून मला वेगवेगळी ओझरती दृश्ये पहायला मिळत होती. शेकोट्यांच्या उजेडात जोरजोराने हातवारे करीत चर्चा करणारे सैनिकांचे गट दिसत होते, रस्त्यांच्या चौकांमध्ये थांबलेल्या चिलखती गाड्यांच्या रांगा आणि झडपा उघडून त्यांतून डोकावत एकमेकांवर ओरडणारे त्यांचे ड्रायव्हर दिसत होते...

त्या अशांत रात्री उजाड मैदानांवरून नेतृत्वहीन सैनिकांच्या आणि लाल रक्षकांच्या झुंडीच्या झुंडी दिशाहीन भटकत होत्या, त्यांच्या टकरा होत होत्या, गोंधळ माजत होता व लष्करी क्रांतिकारक समितीचे कमिस्सार एका गटापासून दुसऱ्या गटाकडे धावत होते, संरक्षणव्यवस्था उभारण्याचा प्रयत्न करीत होते...

---

पेत्रोग्रादमध्ये आम्ही परत आलो तेव्हा उत्तेजित झालेल्या लोकांच्या झुंडीच्या झुंडी नेव्स्की रस्त्यावरून ये-जा करीत होत्या. वातावरण तंग होते. वॉर्सा रेल्वे स्टेशनावरून दूरवरचा तोफांचा गडगडाट ऐकू येत होता. युंकर विद्यालयांमधून जोरदार हालचाली चालू होत्या. दूमाचे सभासद बराकी-बराकींमधून फिरत होते, युक्तिवाद लढवीत होते, विनवण्या करीत होते. बोल्शेविकांच्या अत्याचारांच्या महाभयानक कथा मीठमसाला लावून

मागत होते – उदा. हेमंत प्रासादातील युंकरांची कत्तल, महिला सैनिकां-वरील बलात्कार, दूमासमोर एका तरुणीवर केलेला गोळीबार, राजपुत्र तुमानोव याचा खून... दूमाच्या इमारतीमधील अलेक्सांदर हॉलमध्ये रक्षक समितीची खास बैठक चालू होती; कमिस्सारांची झोकात धावपळ चालू होती... स्मोल्नीमधून हाकलून दिलेले सर्व पत्रकार तिथे होते. ते कमालीचे उल्हसित दिसत होते. त्सारस्कोयेमधील परिस्थितीच्या आमच्या वृत्तांतावर त्यांचा विश्वास बसत नव्हता. कारण प्रत्येकाची ठाम खात्री होती की, त्सारस्कोये केरेन्स्कींच्या ताब्यात होते आणि कझाक आता पूल्कोवोला पोचले होते. सकाळी रेल्वे स्टेशनावर केरेन्स्कींचे स्वागत करण्यासाठी एक समिती नेमली जात होती...

एकाने मला विश्वासात घेऊन एक खास गुपित म्हणून सांगितले की, मध्यरात्रीला प्रतिक्रांती सुरू होणार होती. त्याने मला दोन जाहीर निवेदने दाखवली. एका निवेदनावर गोत्झ आणि पाल्कोव्निकोव यांच्या सह्या होत्या व त्यात आज्ञा केली होती की, युंकर विद्यालयांनी, इस्पितळात बऱ्या होणाऱ्या सैनिकांनी आणि सेंट जॉर्ज पदकाच्या सरदारांनी युद्धपरि-स्थिती समजून एकत्र यावे आणि रक्षक समितीच्या पुढील आज्ञांची वाट पहावी; दुसरे निवेदन खुद्द रक्षक समितीतर्फे होते. त्यातील मजकूर पुढील-प्रमाणे :

**"पेत्रोग्रादमधील जनतेला उद्देशून !**

"क्रांतिकारक पेत्रोग्रादमधील कॉम्रेडहो, कामगारांनो, सैनिकांनो आणि नागरिकांनो !

"आघाडीवर शांततेचे आवाहन करणारे बोल्शेविक पिछाडीवर मात्र यादवी युद्धाला चेतवीत आहेत.

"त्यांच्या चिथावणीखोर आवाहनांकडे लक्ष देऊ नका !

"खंदक खणू नका !

"देशद्रोह्यांच्या अडथळयांचा नाश होवो !

"आपली शस्त्रे खाली ठेवा !

"सैनिकांनो, आपल्या बराकींमध्ये परत जा !

"पेत्रोग्रादमध्ये सुरू झालेली लढाई म्हणजे क्रांतीचा मृत्यू होय !

"स्वातंत्र्य, भूमी आणि शांतता यासाठी देशाच्या व क्रांतीच्या रक्षक समितीभोवती एक व्हा !"

आम्ही दूमामधून बाहेर पडलो तेव्हा अंधाऱ्या, निर्मनुष्य रस्त्यावरून कठोर चेहऱ्याच्या आणि अटीतटीवर आलेल्या लाल रक्षकांची एक कंपनी डझनभर कैद्यांना घेऊन चालत आली. ते कैदी म्हणजे कझाक मंडळाच्या स्थानिक शाखेचे सभासद होते व त्यांच्या मुख्य ठाण्याच्या कचेरीत प्रतिक्रांतीचा कट करीत असताना त्यांना मुद्देमालासकट पकडण्यात आले होते...

खळीची बादली घेऊन चालणाऱ्या एका लहान मुलाला सोबतीला घेऊन एक सैनिक भल्या मोठ्या मथळयाच्या नोटिसा चिकटवीत होता:

> "सदर आदेशानुसार, पेत्रोग्राद शहर आणि त्याची उपनगरे, यांच्यामध्ये वेढ्याची परिस्थिती जाहीर केली जात आहे. पुढील हुकूम देईपर्यंत, रस्त्यांमध्ये जमाव करण्यास किंवा सभा भरविण्यास, विशेषत: खुल्या मैदानात, मनाई करण्यात येत आहे.
>
> **पद्वोयस्की,**
>
> लष्करी क्रांतिकारक समितीचे अध्यक्ष"

आम्ही घरी गेलो तेव्हा वातावरणात अनेक आवाज भरलेले होते — मोटारींचे कर्णे, आरोळ्या, दूरचे स्फोट... सारे शहर अस्वस्थतेने खुदखळून निघत होते, सारे शहर जागे होते...

पहाटेच्या वेळी, सेम्योनोव्स्की रेजिमेंटच्या सैनिकांचा वेष करून आलेली युंकरांची एक कंपनी, पहारा बदलण्याच्या तासापूर्वी जरा आधी, टेलिफोन एक्स्चेंजसमोर हजर झाली. त्यांनी बोल्शेविकांचा परवलीचा शब्द उच्चारला आणि कोणताही संशय निर्माण न करता तेथील ताबा घेतला. काही मिनिटांनंतर तपासणी करण्यासाठी अंतोनोव तेथे उपस्थित झाले. त्यांना गिरफदार करून एका छोट्या खोलीत बंद करण्यात आले. जेव्हा सुटकेसाठी कुमक आली तेव्हा तिच्यावर रायफलींच्या फैरी उडाल्या व अनेक ठार झाले.

प्रतिक्रांतीला आरंभ झाला होता...

प्रकरण आठवे

# प्रतिक्रांती

दुसऱ्या दिवशी सकाळी, रविवार तारीख ११ रोजी, त्सारस्कोये सेलोमध्ये कझाकांनी प्रवेश केला. खुद्द केरेन्स्की पांढऱ्याशुभ्र घोड्यावर स्वार झाले आणि त्यांच्या आगमनाप्रीत्यर्थ सर्व प्रार्थना मंदिरांच्या घंटा घणघणत होत्या. शहराबाहेरच्या एका छोटया टेकडीच्या माथ्यावरून सोनेरी मीनार आणि रंगीबेरंगी घुमट दिसत होते. भयाण सपाटीवर लांबच लांब पसर-लेला राजधानीचा विस्तार अंधुक दिसत होता आणि त्या पलिकडे पोलादी रंगाचे फिन्लंडचे आखात होते.

तेथे लढाई झालीच नाही पण केरेन्स्कींनी एक महाभयानक चूक केली. सकाळी सात वाजता त्यांनी क्रमांक दोनच्या त्सारस्कोये सेलो रायफल तुकडीला निरोप पाठवला की, तिने आपली शस्त्रे खाली ठेवावी. सैनिकांनी उत्तर दिले की, ते तटस्थ राहतील, पण निःशस्त्र होणार नाहीत. केरे-न्स्कींनी त्यांना आज्ञापालनासाठी अवघा दहा मिनिटांचा अवधी दिला. त्या-मुळे सैनिक चिडले; गेले आठ महिने आपल्या समितीतर्फे त्यांनी आपला कारभार चालवला होता आणि आता जुन्या राजवटीने त्यांना पुन्हा जोरदार चपराक मारली होती... काही मिनिटांनतंर कझाकांच्या तोफखान्याने बराकींवर भडिमार केला व आठ लोक मारले गेले. त्या क्षणापासून त्सार-स्कोयेमध्ये "तटस्थ" सैनिक राहिले नाही...

रायफलींच्या बारांच्या आवाजाने आणि कवायत करीत चाललेल्या लोकांच्या दणकट पावलांच्या आवाजांनी पेत्रोग्रादला जाग आली. आकाश काळोखले होते आणि गार वारे आगामी हिमवर्षावाची चाहूल देत होते. पहाटेच्या वेळी लष्करी हॉटेल आणि तारखात्याच्या कचेरीवर युंकरांनी हल्ला चढवून त्यांना काबीज केले होते, पण बरेचसे रक्त सांडून या दोन्ही

इमारती पुन्हा ताब्यात घेण्यात आल्या होत्या. टेलिफोन केंद्राला खलाशांनी वेढा घातला होता. मोर्स्काया रस्त्याच्या मध्यभागी टाकलेल्या पिंपांच्या, खोक्यांच्या आणि पत्र्यांच्या तुकड्यांच्या अडथळयांमागे खलाशी दबा धरून बसले होते, किंवा गोरोखोवाया आणि सेंट आयझॅक चौकाच्या कोपऱ्यामागे लपले होते व जरा काही हललेले दिसताच त्यावर गोळ्या झाडीत होते. अधूनमधून रेडक्रॉसचा झेंडा फडकावत एखादी मोटारगाडी आत-बाहेर करीत होती. खलाशी तिला जाऊ देत होते...

आल्बर्ट रीस विल्यम्स* टेलिफोन केंद्रात होते. जखमींनी भरलेली रेडक्रॉसची गाडी बाहेर पडली तेव्हा ते तिच्यात होते. शहरातून वळसे घेत ती गाडी प्रतिक्रांतीचे मुख्य ठाणे असलेल्या मिखाईलोव्स्की युंकर विद्यालयात गेली. तेथील आवारात उभा असलेला एक फ्रेंच अधिकारी सर्व हालचालींची सूत्रे हलवीत होता... या अशा प्रकारे टेलिफोन केंद्रात दारूगोळा आणि रसद पुरविली जात होती. अशा अनेक खोट्या रुग्णवाहिका युंकरांना दारूगोळा पुरवीत होत्या.

बरखास्त केलेल्या ब्रिटिश चिलखती गाड्यांच्या तुकडीच्या पाच किंवा सहा चिलखती गाड्या त्यांच्या हाती होत्या. लुईसी ब्रयांट** सेंट आयझॅक चौकातून चालली असताना, आरमारी अधिकाऱ्यांच्या इमारतीकडून टेलिफोन केंद्राकडे निघालेली एक चिलखती गाडी धडधडत आली. गोगोल्याच्या कोपऱ्यावर, अगदी तिच्यासमोरच त्या गाडीचे इंजिन थांबले. लाकडांच्या ढिगाऱ्यांमागे लपलेल्या काही खलाशांनी तिच्यावर गोळीबार सुरू केला. त्या गाडीच्या माथ्यावरची मशिनगन खाली झुकली आणि त्या लाकडांच्या ढिगाऱ्यांवर व लोकांच्या जमावावर तिने बेदरकारपणे आगीचा पाऊस पाडला. लुईसी ब्रयांट ज्या कमानीत उभी होती तेथे सात माणसे गोळ्या लागून जागच्या जागी ठार झाली, त्यात दोन लहान मुलेही होती. एकाएकी एक आरोळी ठोकून खलाशांनी झेप घेतली व त्या अग्नीकुंडात ते खुल्यावर आले; त्या पोलादी धूडाला त्यांनी वेढा घातला व आरोळ्या

---

*आल्बर्ट रीस विल्यम्स – जॉन रीड यांचे मित्र; अमेरिकेतील एक पुरोगामी सार्वजनिक पुढारी व पत्रकार. सोविएत संघातील समाजसत्तावादासाठी चाललेल्या लढ्यावर अनेक पुस्तके त्यांनी लिहिली. – सं.

**लुईसी ब्रयांट (१८९०-१९३६) – अमेरिकन लेखिका. जॉन रीड यांची पत्नी व साथी. – सं.

मारीत त्याच्या छिद्रांमध्ये पुनःपुन्हा संतापाने बागनेटे खुपसली... त्या गाडीच्या शोफरने जखमी झाल्याचा बहाणा केला, तेव्हा त्याला त्यांनी जाऊ दिले—दूमामध्ये पळत जाऊन बोल्शेविक अत्याचारांच्या अतिरंजित कथा रंगवून सांगायला... ठार झालेल्यांमध्ये एक ब्रिटिश अधिकारी होता...

त्यानंतर, युंकरांच्या चिलखती गाडीमध्ये सापडलेल्या व पीटर-पॉल-मध्ये पाठवणी केलेल्या एका फ्रेंच अधिकाऱ्याबाबत वर्तमानपत्रांमध्ये हकिकत छापून आली होती. फ्रेंच वकिलातीने ताबडतोब या घटनेचा इन्कार केला, पण नंतर एका दूमाच्या सभासदाने खुद्द मलाच सांगितले की, त्या फ्रेंच अधिकाऱ्याची तुरुंगातून सुटका करायला त्याने खटपट केली होती... दोस्त राष्ट्रांच्या वकिलातींचा या काळात काहीही दृष्टिकोन असला तरी, व्यक्तिशः फ्रेंच आणि ब्रिटिश अधिकारी मात्र या दिवसांमध्ये कमालीचे क्रियाशील बनले होते व रक्षक समितीच्या कार्यकारी बैठकांना सल्ला देण्या-पर्यंत त्यांची मजल पोचली होती...

शहराच्या प्रत्येक कानाकोपऱ्यात सबंध दिवसभर युंकर आणि लाल रक्षक यांच्यामध्ये चकमकी चालू होत्या, चिलखती गाड्यांच्या लढाया चालू होत्या... गोळीबाराच्या फैरी, एखाद-दुसरा बंदुकीचा आवाज आणि मशिनगनचे कर्कश्य कडकडाट दूरवर आणि आसपास ऐकू येत होते. दुका-नांची लोखंडी दारे खाली ओढलेली होती, पण धंदा अजून चालू होता. एवढेच नव्हे तर सिनेमाचे सारे खेळ तुफान गर्दीत चालू होते. फक्त थिएटरांबाहेरचे दिवे विझवलेले होते. ट्रामगाड्या पळत होत्या. सर्व टेलि-फोन दळणवळण चालू होते; केंद्राला फोन केला तर टेलिफोनवरून गोळी-बाराचे आवाज स्वच्छ ऐकू येत होते. स्मोल्नीचे टेलिफोन दळणवळण तोडलेले होते, पण दूमा आणि रक्षक समितीचा सर्व युंकर विद्यालयांशी व त्सारस्कोये येथे केरेन्स्कींशी सतत संपर्क होता.

सकाळी सात वाजता सैनिकांच्या, खलाशांच्या आणि लाल रक्षकांच्या एका गस्ती तुकडीने व्लादीमिर युंकर विद्यालयाला भेट दिली आणि युंकरांना शस्त्रे खाली ठेवायला तिने वीस मिनिटांचा अवधी दिला. हा निर्वाणीचा संदेश धुडकावून लावण्यात आला. एक तासानंतर युंकर चाल करायला तयार झाले, पण ग्रेबेत्स्काया आणि बल्शोय प्रॉस्पेक्तच्या कोपऱ्या-वरून एवढा जबरदस्त गोळीबार झाला की, युंकरांना माघार घ्यावी लागली. सोविएतांच्या सैनिकांनी इमारतीला वेढा घातला व गोळीबार

सुरू केला. दोन चिलखती गाड्या सतत फिरत्या राहिल्या व त्यांच्या मशिनगनांमधून अखंड अग्निवर्षाव चालू राहिला. युंकरांनी मदतीसाठी टेलिफोन केला. कझाकांनी त्यांना उत्तर दिले की, त्यांची मदतीला येण्याची हिंमत नाही, कारण दोन तोफा त्यांच्या बराकींवर रोखून खलाशांची एक मोठी तुकडी त्यांना अडवून बसली होती. पाव्लोव्स्क विद्यालयाला घेरा घातला होता. बहुतेक मिखाईलोवेत्स-युंकर रस्त्यांमधून लढत होते...

साडेअकरा वाजता तेथे तीन मैदानी तोफा आणण्यात आल्या. "शरण या" अशी आणखी एकदा मागणी करण्यात आली तेव्हा पांढरे निशाण घेऊन आलेल्या दोन सोविएत प्रतिनिधींना गोळ्या घालून ठार करून युंकरांनी आपले उत्तर दिले. आता खरा भडिमार सुरू झाला. विद्यालयाच्या भिंतींना प्रचंड भगदाडे पडली. युंकर अटीतटीने प्रतिकार करीत होते. लाल रक्षकांच्या झुंडीच्या झुंडी त्यांच्यावर धावून जात होत्या, पण युंकरांच्या अग्निवर्षावात त्यांचा निभाव लागत नव्हता... केरेन्स्कींनी त्सारस्कोयेहून टेलिफोन करून सांगितले की, लष्करी क्रांतिकारक समितीबरोबर कोणत्याही वाटाघाटी करू नका.

आपल्या पराभवामुळे आणि ठार झालेल्या अगणित साथीदारांच्या प्रेतांच्या दर्शनामुळे बेफाम बनलेल्या सोविएतांच्या सैनिकांनी त्या उध्वस्त इमारतीवर महाभयानक आगीचा वर्षाव केला. त्यांचा तोफांचा भडिमार थांबवणे त्यांच्या अधिकाऱ्यांना अशक्य ठरले. स्मोल्नीमधील किरिलोव नावाच्या कमिस्सारांनी ती आग थोपवण्याचा प्रयत्न केला; त्यांना जिवंत जाळण्याची धमकी घालण्यात आली. लाल रक्षकांचे रक्त खवळले होते.

दुपारी अडीच वाजता युंकरांनी पांढरे निशाण उभारले; त्यांना संरक्षणाची हमी मिळाली तर शरण यायला ते तयार होते. तसे त्यांना आश्वासन देण्यात आले. एका झपाट्यासरशी विजयी आरोळ्या ठोकीत हजारो सैनिक आणि लाल रक्षक खिडक्यांमधून, दारांमधून, भिंतींच्या भगदाडांमधून आत घुसले. त्यांना थोपविण्यापूर्वीच पाच युंकरांना प्रचंड मारहाण करून, भोसकून ठार मारण्यात आले. बाकीच्या सुमारे दोनशे युंकरांना, संरक्षणात पीटर-पॉलमध्ये नेण्यात आले. लोकांचे त्यांच्याकडे लक्ष वेधून त्यांना इजा होऊ नये म्हणून छोट्या छोट्या गटांनी त्या युंकरांची रवानगी करण्यात आली. पण तरीही वाटेत एका गटावर एका जमावाने हल्ला चढवला आणि आणखी आठ युंकर ठार झाले... शंभराहून अधिक लाल रक्षक आणि सैनिक त्या लढाईत धारातीर्थी पडले...

त्यानंतर दोन तासांनी दूमाला टेलिफोनवरून संदेश मिळाला की, विजयी सेना आता इंजिनियेर्नी झामोककडे – अभियंता विद्यालयाकडे – चाल करून आहे. त्यातल्या डझनभर सभासदांनी रक्षक समितीच्या ताज्या घोषणांची पत्रके भराभर वाटायला विद्यालयाकडे धाव घेतली. अनेक परतले नाही... इतर सर्व विद्यालये प्रतिकार न करता शरण आली आणि कोणतीही इजा न करता युंकरांना पीटर-पॉल व क्रॉन्स्तादत येथे पाठवण्यात आले...

टेलिफोन केंद्र दुपारपर्यंत लढवण्यात आले. अखेरीस बोल्शेविकांची एक चिलखती गाडी तेथे अवतीर्ण झाली व खलाशांनी केंद्रावर तुफानी हल्ला चढवला. घाबरलेल्या ऑपरेटर मुली किंचाळत सैरावैरा धावू लागल्या; युंकरांनी आपल्या गणवेषांवरील सर्व मानचिन्हे भराभरा तोडून फेकून दिली. विल्यम्स यांनी आपला ओव्हरकोट तात्पुरता द्यावा, म्हणजे वेषांतर करून जीव बचावता येईल या इराद्याने एका युंकराने त्यांना **काय वाटेल ते** देतो म्हणून' त्यांची विनवणी केली... "आमची ते कत्तल करतील! आमची ते कत्तल करतील!" असे ते ओरडत होते, कारण आपण इतःपर लोकांविरुद्ध शस्त्र उचलणार नाही, असा त्यांच्यापैकी अनेकांनी हेमंत प्रासादात शब्द दिला होता. अंतोनोव यांना मोकळे केले तर आपण रदबदली करू, असे विल्यम्स यांनी त्यांना सांगितले. ती गोष्ट तात्काळ करण्यात आली; आपल्या अनेक साथीदारांच्या मरणाने भडकलेल्या विजयी खलाशांसमोर अंतोनोव आणि विल्यम्स यांनी भाषणे केली – आणि तात्काळ आणखी काही युंकर मोकळे झाले... फक्त जे घाबरून छपरावर पळाले किंवा पोटमाळ्यावर लपायचा ज्यांनी प्रयत्न केला आणि जे सापडले त्यांना मात्र रस्त्यावर भिरकावून देण्यात आले.

थकलेले, रक्ताने माखलेले, विजयी असे खलाशी आणि कामगार स्विचबोर्ड दालनात घुसले व त्यांच्या नजरेला जेव्हा तेथे अनेक सुंदर सुंदर मुली पडल्या, तेव्हा ते एकदम शरमून मागे सरले. त्यांचा गोंधळ उडाला. एकाही मुलीला अपाय झाला नाही, एकीचाही विनयभंग झाला नाही. घाबरून त्या एका कोपऱ्यात दाटीवाटीने उभ्या राहिल्या होत्या. जेव्हा आपण सुरक्षित आहोत अशी त्यांची खात्री पटली तेव्हा त्यांनी आपल्या मनातल्या तिरस्काराला वाट मोकळी करून दिली. "छी:! घाणेरडी, अडाणी माणसं! मूर्ख!.." खलाशी आणि लाल रक्षक शरमले होते. "पशू! डुकरं!" आपले कोट-टोप्या चढवीत असताना त्या मुली त्यांच्या

अंगावर संतापाने फिस्कारल्या. आपल्या तरुण शिलेदारांच्या, युंकरांच्या हाती काडतुसांच्या माळा देण्याचा आणि त्यांच्या जखमांना मलमपट्टी करण्याचा रोमांचकारी अनुभव त्या तरुणींनी काही वेळापूर्वी घेतला होता. बहुतांश युंकर उमराव घराण्यांमधले होते व आपल्या लाडक्या झारची पुनःस्थापना करण्याच्या प्रयत्नात होते! आणि ही अगदी सामान्य कामगार-किसान माणसे होती... "गावढळ माणसं..."

लष्करी क्रांतिकारक समितीचे कमिस्सार बुटके विश्न्याक यांनी त्या मुलींनी तेथे रहावे म्हणून त्यांची खूप मनधरणी केली. नम्रतेची त्यांनी अगदी हद्द गाठली होती. ते मुलींना म्हणाले, "तुम्हाला फार वाईट वागणूक मिळाली आहे. टेलिफोन खातं नगरपालिकेची दूमा चालवीत होती. तुम्हाला महिन्याला फक्त ६० रूबल पगार मिळत होता आणि दहा तास किंवा त्याहूनही जास्त वेळ काम करावं लागत होतं... आता यापुढं ते सारं काही बदलून जाईल. टपाल आणि तार खात्याच्या ताब्यात टेलिफोनचं दळणवळण देण्याचा सरकारचा इरादा आहे. तुमचे पगार ताबडतोब दीडशे रूबलपर्यंत वाढविण्यात येतील आणि तुमच्या कामाचे तास कमी करण्यात येतील. कामगारवर्गाचे सदस्य या नात्यानं तुम्हाला आनंद व्हायला पाहिजे –"

**कामगारवर्गाचे सदस्य**! त्यांना असे सुचवायचे आहे काय की या –या जनावरांमध्ये – आणि आमच्यात काही साम्य आहे? इथे थांबायचे? हजार रूबल देऊ केले तरी नाही!.. संतापाने आणि तिरस्काराने फणफणलेल्या त्या मुली तेथून चालल्या झाल्या...

इमारतीमधले कर्मचारी, लाईनमेन आणि कामगार मात्र तेथेच राहिले. पण स्विचबोर्ड चालू करणे भाग होते – टेलिफोन ही अत्यावश्यक बाब होती... फक्त अर्धा डझन प्रशिक्षित ऑपरेटर उपलब्ध होते. स्वयंसेवकांना पाचारण करण्यात आले; शंभर खलाशांनी, सैनिकांनी, कामगारांनी प्रतिसाद दिला. त्या सहा मुली मागेपुढे धावपळ करू लागल्या, सूचना देऊ लागल्या, मदत करू लागल्या, चिडून रागावू लागल्या... अशा प्रकारे मधून मधून थांबत, लंगडत, पण तरीही कशाबशा एकदाच्या टेलिफोनच्या तारा हळूहळू घुमू लागल्या. स्मोल्नीचे बराकींशी आणि कारखान्यांशी प्रथम दळणवळण जोडणे भाग होते. दुसरे म्हणजे दूमा आणि युंकर विद्यालयांमधला संपर्क तोडायला पाहिजे होता... दुपारच्या अखेरच्या प्रहरी ही बातमी शहरातून पसरली आणि शेकडो भांडवलदार फोनवरून

ओरडू लागले : "मूर्खांनो ! सैतानांनो ! तुमचा किती वेळ टिकाव लागेल ? कझाक येईपर्यंत दम धरा !"

संध्याकाळ झाली होती. जवळ जवळ ओसाड पडलेल्या नेव्स्की रस्त्यावर झोंबरे वारे वहात होते आणि कझान कॅथेड्रलजवळ एक जमाव अखंड वादविवाद करीत उभा होता ; त्यात काही कामगार, काही सैनिक आणि बाकीचे दुकानदार, कारकून व तत्सम माणसे होती.

"पण जर्मनीला तहाला राजी करणं लेनिनना जमणार नाही !" एक ओरडला.

एक संतापलेला तरुण सैनिक उत्तरला. "पण हा दोष कुणाचा ? तुमच्या नालायक केरेन्स्कीचा, भिकार भांडवलदारांचा ! खड्डयात गेला तुमचा केरेन्स्की ! आम्हाला त्याची गरज नाही ! आम्हाला लेनिन हवेत..."

दूमाच्या बाहेरच्या अंगास, पांढरी फीत बांधलेला एक अधिकारी भिंतीवरची पोस्टरे फाडून टाकीत होता व मोठमोठ्याने शिव्यांची लाखोली वहात होता. एका पोस्टरवर लिहिले होते :

**"पेत्रोग्रादच्या नागरिकांना उद्देशून !**

"या संकटकाळी, जेव्हा लोकांना शांत करण्यासाठी, त्यांना पावाचा आणि इतर अत्यावश्यक वस्तूंचा खात्रीशीर पुरवठा करण्यासाठी, दूमाने हरप्रकारच्या साधनांचा वापर करणे आवश्यक असताना, उजवे समाजवादी-क्रांतिकारक आणि कॅडेट आपले कर्तव्य विसरून दूमाला प्रतिक्रांतिकारक सभेमध्ये बदलून टाकीत आहेत, कोर्निलोव-केरेन्स्की यांचा विजय व्हावा म्हणून जनतेच्या एका भागाला शेष जनतेविरुद्ध चिथावण्याचा प्रयत्न करीत आहेत. आपले कर्तव्य बजावण्याऐवजी, उजव्या समाजवादी-क्रांतिकारकांनी आणि कॅडेटांनी दूमाला कामगारांच्या, किसानांच्या, सैनिकांच्या प्रतिनिधींच्या सोविएतांविरोधी, शांतता, भाकरी आणि स्वातंत्र्य देणाऱ्या सरकारविरोधी राजकीय हल्ला चढविण्याचे प्रांगण बनविले आहे.

"**पेत्रोग्रादच्या नागरिकांनो !** आम्ही, तुम्ही निवडून दिलेले बोल्शेविक नगरपालिका सभासद — आम्ही तुम्हाला कळवू इच्छितो की, उजवे समाजवादी-क्रांतिकारक आणि कॅडेट प्रतिक्रांतिकारक कारवायांमध्ये गुंतले आहेत, आपले कर्तव्य विसरले आहेत आणि जनतेला

दुष्काळाच्या, यादवी युद्धाच्या मार्गाकडे नेत आहेत. १८३,००० मतांनी निवडून आलेले आम्ही सभासद, आपले कर्तव्य मानतो की, दूमामध्ये काय चालले आहे त्याकडे आमच्या मतदारांचे लक्ष वेधणे आवश्यक आहे व जाहीर करतो की, जे काही भयानक पण अपरिहार्य परिणाम घडतील त्यांची जबाबदारी आमच्यावर राहणार नाही..."

दूरवर अधूनमधून गोळीबाराचे आवाज ऐकू येत होते, पण शहर मात्र मुकाट, थंड पडून होते. जणू काही नुकत्याच त्याला आलेल्या जबरदस्त झटक्यांनी विदीर्ण झाल्यानंतर ते दमूनभागून पडले होते.

निकोलाय हॉलमधील दूमाची बैठक संपत आली होती. अत्यंत क्रूर निर्दय दूमाही थोडीशी स्तंभित झाली होती. एका पाठोपाठ एक कमिस्सार बातम्या देत होते – टेलिफोन केंद्र काबीज करण्यात आले, रस्त्यांवर चकमकी उडाल्या, व्लादीमिर विद्यालय ताब्यात घेतले गेले... त्रुप्प म्हणाले, "लहरी हिंसाचाराविरुद्धच्या संघर्षात दूमा लोकशाहीच्या बाजूनं आहे; पण कोणत्याही परिस्थितीत, कोणतीही बाजू जिंकली गेली तरी, वध आणि अत्याचार यांना दूमा सदैव विरोध करील..."

कॅडेट पक्षाचे कोनोव्स्की नांवाचे एक उंच, कठोर चेहऱ्याचे म्हातारे गृहस्थ म्हणाले: "जेव्हा वैध सरकारच्या फौजा पेत्रोग्रादमध्ये येतील आणि या उठावखोरांना गोळ्या घालून ठार मारतील तेव्हा ते वध ठरणार नाहीत!" त्यावर सबंध हॉलमध्ये निषेधाचे उद्‌गार उमटले. खुद्द त्यांच्या पक्षाच्या लोकांनीही त्यांचा निषेध केला.

तेथे शंकेचे आणि निराशेचे वातावरण पसरले होते. प्रतिक्रांती मोडून काढली जात होती. समाजवादी-क्रांतिकारक पक्षाच्या मध्यवर्ती समितीने आपल्या पुढाऱ्यांविरुद्ध अविश्वासाचा ठराव मंजूर केला होता; डाव्या गटाचे वर्चस्व होते; अव्क्सेन्तियेवनी राजिनामा दिला होता. एका निरोप्याने बातमी आणली की, केरेन्स्की यांना रेल्वे स्टेशनावर भेटायला गेलेल्या स्वागत समितीला अटक करण्यात आली होती. दूरवर दक्षिणेला आणि नैऋत्येला चाललेल्या तोफांच्या भडिमाराचा मंद ध्वनी रस्त्यांमधून ऐकू येत होता. अद्याप केरेन्स्की आले नव्हते...

फक्त तीन वृत्तपत्रे प्रसिद्ध झाली होती – 'प्रावदा', 'देलो नरोदा' आणि 'नोवाया झीझ्न'. नव्या "संमिश्र" सरकारबद्दल त्या सर्वांनी बरेच

लिहिले होते. समाजवादी-क्रांतिकारक वर्तमानपत्राने मागणी केली होती की, कॅडेट किंवा बोल्शेविक यांच्याशिवायच मंत्रिमंडळ बनविण्यात यावे. गोर्की आशावादी होते; स्मोल्नीने सवलती देऊ केल्या होत्या. विशुद्ध समाजसत्तावादी सरकार आकाराला येत होते — भांडवलदारवर्ग सोडून इतर सर्व घटकांचा त्यात समावेश होता. 'प्रावदा' खोचकपणे म्हणाले होते:

"राजकीय पक्षांबरोबर युती करण्याच्या या कल्पनांचा आम्ही उपहास करतो, कारण या पक्षांचे अत्यंत महत्त्वाचे सदस्य हे शंकास्पद चारित्र्याचे क्षुद्र पत्रकार आहेत; आमचे "संमिश्रण" कामगारवर्गाचे आणि क्रांतिकारक सेनेचे गरीब किसानांशी झालेले आहे..."

भिंतींवर विक्झेलची बढाईखोर घोषणा झळकली होती: दोन्ही बाजूंनी समेट न घडविल्यास तिने संप करण्याची धमकी घातली होती:

"या दंग्याधोप्यांना आवर घालणारे, आपल्या देशाला विनाशातून वाचवणारे, बोल्शेविक असणार नाहीत, किंवा रक्षक समिती असणार नाही, किंवा केरेन्स्कीचे शिपाईही असणार नाहीत — तर आम्ही, रेलकामगारांचा संघ असू..."

"रेल्वेसारखे गुंतागुंतीचे काम हाताळण्यास लाल रक्षक असमर्थ आहेत; हंगामी सरकारने आपण सत्ता हाती ठेवण्यास असमर्थ आहोत हे स्वतःच दाखवून दिले आहे..."

"सर्व लोकशाहीच्या विश्वासावर आधारलेल्या सरकारच्या अधिकारानुसार न वागणाऱ्या कुणाही पक्षाची सेवा करायला आम्ही नकार देत आहोत..."

संघर्षरत अक्षय मानवतेच्या असीम जोमाने स्मोल्नी थरारत होता.

ट्रेड युनियनच्या मुख्य कचेरीत लोझोव्स्की यांनी निकोलाय मार्गावरच्या रेल कामगारांच्या एका प्रतिनिधीशी माझी ओळख करून दिली. तो प्रतिनिधी म्हणाला की, लोक प्रचंड सार्वजनिक सभा भरवीत आहेत, आपल्या पुढाऱ्यांच्या कारवायांचा निषेध करीत आहेत.

"सर्व सत्ता सोविएतांच्या हाती!" टेबलावर मुठी आपटत तो

ओरडला. "मध्यवर्ती समितीमधले अबारोन्त्सी कोर्निलोव यांच्यासारखा डाव खेळताहेत मुख्य ठाणाला प्रतिनिधी पाठवण्याचा त्यांनी प्रयत्न केला, पण आम्ही त्यांना मिन्स्कमध्येच अटक केली... आमच्या शाखेनं अखिल रशियन मेळावा भरविण्याची मागणी केली, त्यांनी त्याला नकार दिला..."

सोविएतांमध्ये, सेना समित्यांमध्ये जी परिस्थिती होती तीच येथेही होती. सबंध रशियाभर विविध लोकशाहीवादी संघटना एका पाठोपाठ एक मोडत होत्या, बदलत होत्या. अंतर्गत संघर्षांनी सहकारी संस्था पिंजल्या होत्या; किसानांच्या प्रतिनिधींच्या कार्यकारी समितीच्या सभात वादळी वादविवाद पेटले होते; खुद्द कझाकांमध्येही दुही निर्माण झाली होती...

स्मोल्नीच्या अगदी वरच्या मजल्यावर लष्करी क्रांतिकारक समितीचे पूर्ण वेगाने काम चालू होते. ती एकामागून एक आघात करीत चालली होती, तिचा वेग मुळीच कमी होत नव्हता. ताजेतवाने, जोमदार लोक आत येत होते; रात्रंदिवस त्यांनी स्वतःला त्या भयंकर यंत्रात झोकून दिले होते; आणि बाहेर येताना गलितगात्र होऊन, विलक्षण श्रमांनी थकून जाऊन, ओरडून घसा बसलेल्या अवस्थेत, मळक्या घाणेरड्या शरीराने फरशीवर येऊन कोसळत आणि झोपी जात... रक्षक समितीला बेकायदेशीर ठरविण्यात आले होते. नव्या निवेदनांच्या[1] मोठमोठ्या ढिगांच्या चळती फरशीवर विखुरलेल्या होत्या:

"...शिबंदीमध्ये किंवा कामगारवर्गामध्ये पाठिंबा नसलेल्या कारस्थानवाल्यांचा सर्वांत जास्त भर अचानक हल्ला करण्यावर होता. लाल रक्षकांमधील एका सैनिकाच्या क्रांतिकारक दक्षतेमुळे कारस्थानवाल्यांची योजना सब-लेफ्टनंट ब्लागोन्रावोव यांनी वेळीच उघडकीला आणली. तो सैनिक कोण होता हे लौकरच शोधून काढले जाईल. कटाच्या केंद्रस्थानी रक्षक समिती होती. कर्नल पालकोव्निकोव त्यांच्या फौजांचे अधिपती होते आणि हुकुमांवर सह्या हंगामी सरकारचे माजी सदस्य गोत्झ यांनी केल्या होत्या, ज्यांना त्यांच्या शब्दांवर विश्वासून मुक्त करण्यात आले होते...

"या सत्य घटना पेत्रोग्रादच्या नागरिकांच्या ध्यानी आणून, लष्करी क्रांतिकारक समिती कटाशी संबंधित असणाऱ्या सर्वांना अटक

करण्याचा हुकूम काढत आहे व अटक केलेल्या सर्वांवर क्रांतिकारक न्यायसेनासमोर खटला भरण्यात येईल..."

मॉस्कोहून बातमी आली आहे की, युंकरांनी आणि कझाकांनी क्रेमलिनला वेढला घातला होता व सोविएतांच्या फौजांनी आपली शस्त्रे खाली ठेवावी अशी त्यांनी आज्ञा केली होती. सोविएतांच्या सैनिकांनी त्यांची आज्ञा मान्य केली आणि जेव्हा ते क्रेमलिनबाहेर पडत होते तेव्हा त्यांच्यावर हल्ला चढवून त्यांना गोळ्या घालून ठार मारण्यात आले. टेलिफोन आणि तार कचेऱ्यांमधील बोल्शेविकांच्या छोटचा फौजांना हाकलून लावण्यात आले; युंकरांनी आता शहराच्या केंद्राचा ताबा घेतला होता... पण त्यांच्या भोवती सर्वत्र सोविएतांच्या फौजा एकवटत होत्या. रस्त्यारस्त्यामधून चकमकी चालू झाल्या होत्या; तडजोडीचे सर्व प्रयत्न फसले होते... सोविएतच्या बाजूला शिबंदीतले दहा हजार सैनिक आणि थोडे लाल रक्षक होते; सरकारच्या बाजूने सहा हजार युंकर, अडीच हजार कझाक आणि दोन हजार श्वेत रक्षक होते.

पेत्रोग्राद सोविएतची बैठक चालू होती; तिच्या शेजारीच नवी केंद्रीय कार्यकारी समिती आज्ञापत्रे आणि हुकूम यांच्यावर विचार करीत होती. वरच्या मजल्यावर बैठकीत असलेल्या जन-कमिस्सारांच्या मंडळामधून[2] या आज्ञापत्रांचा आणि हुकुमांचा अविरत ओघ लागला होता. पुढील हुकुमांवर विचार करण्यात आला: 'कायद्यांची मंजुरी आणि प्रकाशन', 'कामगारांचा कामाचा दिवस आठ तासांचा करणे' व लुनाचार्स्की यांचा 'जनता शिक्षणासाठी पाया'. दोन बैठकींना मिळून फक्त काही शेकडा लोक हजर होते आणि हजर असलेल्यांपैकी बव्हंश सशस्त्र होते. स्मोल्नी जवळ जवळ ओसाड पडला होता. फक्त काही रक्षक हॉलच्या खिडक्यांजवळ धावपळ करीत होते आणि इमारतीच्या दोन्ही फळयांच्या रक्षणार्थ तेथे मशिनगन बसवीत होते.

केंद्रीय कार्यकारी समितीमध्ये विक्झेलचा एक प्रतिनिधी बोलत होता:

"कुणाही पक्षाच्या फौजा वाहून नेण्यास आम्ही नकार देत आहोत... आम्ही एका समितीला केरेन्स्कींकडे पाठवून निरोप धाडलाय की, जर पेत्रोग्रादवर चाल करून येण्याचे त्यांनी चालूच ठेवले, तर आम्ही त्यांचे दळणवळण तोडून टाकू..."

नवे सरकार स्थापन करण्यासाठी सर्व समाजवादी पक्षांची परिषद भरवा हे नेहमीचे आवाहन त्या प्रतिनिधीने केले...

कामेनियेव यांनी अत्यंत सावधानतेने उत्तर दिले. या परिषदेला बोल्शेविकांना हजर राहण्यास अत्यंत आनंद होईल. पण मुख्य प्रश्न अशा सरकारच्या घडणीत नाही, तर सोविएतांच्या काँग्रेसचा कार्यक्रम हे सरकार स्वीकारील किंवा नाही, यामध्ये सामावलेला आहे... केंद्रीय कार्यकारी समितीने डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांनी आणि सामाजिक-लोकशाहीवादी-आंतरराष्ट्रीयवाद्यांनी केलेल्या निवेदनावर विचारविनिमय केला होता व परिषदेत प्रमाणबद्ध प्रतिनिधित्व असावे हा प्रस्ताव मान्य केला होता, सेना समित्यांच्या आणि किसान सोविएतांच्या प्रतिनिधींच्या समावेशालाही मान्यता दिली होती...

मोठ्या हॉलमध्ये ट्रॉट्स्कींनी दिवसभरातल्या घडामोडींचा आढावा घेतला.

"व्लादीमिर विद्यालयातल्या युंकरांना आम्ही शरण येण्याची संधी दिली होती," ते म्हणाले. "रक्तपाताविना आम्हाला मामला सुरळीत पार पाडायची इच्छा होती. पण आता रक्त सांडलेच आहे तर एकमेव मार्ग उरतो — दयामाया न ठेवता लढणे. इतर कुठल्या साधनांनी आम्ही जिंकू शकू असा विचार करणे बालिशपणाचे ठरेल... क्षण निर्णायक आहे. प्रत्येकानं लष्करी क्रांतिकारक समितीशी सहकार्य केलं पाहिजे; काटेरी तारा, पेट्रोल, बंदुका यांचा जेथे साठा असेल त्या जागांची माहिती कळवली पाहिजे... आम्ही सत्ता जिंकली आहे; आता तिला हाती राखली पाहिजे!"

मेन्शेविक योफ्फे यांनी आपल्या पक्षाचे निवेदन वाचून दाखवण्याचा प्रयत्न केला, पण "तत्त्वाबाबत चर्चा करण्यास" ट्रॉट्स्कींनी परवानगी नाकारली.

"आमच्या चर्चा आता रस्त्यांमधून चालू आहेत," ते ओरडून म्हणाले. "निर्णायक पाऊल उचलण्यात आलं आहे. जे काही घडत आहे त्याची आम्ही सर्व आणि विशेषतः खुद्द मी जबाबदारी घेत आहोत..."

आघाडीवरच्या, गात्चिनामधल्या, सैनिकांनी आपल्या कथा सांगितल्या. आहुती पलटणीमधल्या चारशे एक्याऐंशी तोफखान्यातला एक म्हणाला: "जेव्हा खंदकातले सैनिक हे ऐकतील तेव्हा ते ओरडून म्हणतील 'हे **आमचं** सरकार आहे!'" पीटरहॉफमधील एक युंकर म्हणाला की, त्याने आणि आणखी दोघांनी सोविएतांविरुद्ध चालून जाण्यास नकार दिला; आणि जेव्हा हेमंत प्रासादाचा बचाव करणारे त्याचे साथी परतले तेव्हा

त्यांनी त्याला आपला कमिस्सार म्हणून निवडले व **खऱ्या** क्रांतीसाठी आम्ही सेवा बजावायला तयार आहोत, असा त्याच्याकरवी स्मोल्नीमध्ये निरोप पाठवला . . .

पुन्हा एकदा संतापलेले ट्रॉट्स्की आले. ते सतत हुकूम देत होते, प्रश्नांना उत्तरे देत होते.

"कामगार, किसान आणि सैनिक यांचा पराभव करण्यासाठी मध्यम-वर्गीय सैतानाशीसुद्धा हातमिळवणी करतील!" एकदा त्यांनी उद्‌गार काढले होते. गेल्या दोन दिवसात दारू पिऊन तुफान झिंगलेले अनेक लोक नजरेस पडले होते. "कॉम्रेडहो, दारू पिणं बंद! नेहमीच्या पहारेकऱ्यां-शिवाय कुणीही संध्याकाळी आठनंतर रस्त्यांवर दिसता कामा नये! जिथं जिथं मद्याचे साठे आहेत असा संशय असेल तिथं तिथं शोध घेऊन सारं मद्य ओतून टाकण्यात यावं[3]. मद्याची विक्री करणाऱ्यांना अजिबात दया दाखवू नये[4] . . .

लष्करी क्रांतिकारक* समितीने वीबोर्ग विभागातल्या प्रतिनिधीमंडळाला बोलावणे धाडले; नंतर पुतिलोव येथील सदस्यांना बोलावले. ते घाई-घाईने तेथे आले.

"ठार मारलेल्या प्रत्येक क्रांतिकारकाच्या बदल्यात आपण पाच प्रति-क्रांतिकारक ठार मारायचे!" ट्रॉट्स्की म्हणाले.

आम्ही पुन्हा शहराच्या मध्यभागी आलो. दूमाची इमारत प्रकाशाने झगमगत होती आणि लोकांचे थवेच्या थवे आत जात होते. खालच्या हॉलमध्ये शोकपूर्ण विव्हळणे आणि दु:खाने भरलेले उद्‌गार ऐकू येत होते; त्या दिवसभराच्या लढाईत जे युंकर मारले गेले होते किंवा मारले गेलेत असे समजले जात होते, अशांची यादी लावलेल्या वार्ता-फलकापाशी लोकांची गर्दी मागेपुढे होत होती. मारले गेलेत असे समजलेल्यांपैकी बहुतेक जण नंतर हाती-पायी सुरक्षित घरी परतत होते . . . वर अलेक्सान्दर हॉलमध्ये रक्षक समितीची सभा भरली होती. अधिकाऱ्यांच्या सोनेरी आणि लाल रंगांच्या फिती विशेषत्वाने नजरेत भरत होत्या; मेन्शेविक आणि समाज-वादी-क्रांतिकारक प्रज्ञावंतांचे परिचयाचे चेहरे दिसत होते; शुष्क डोळ्यांचे आणि महागडे पण मुळीच शोभून न दिसणारे कपडे घातलेले बँकर आणि मुत्सद्दी तेथे होते, जुन्या राजवटीतले अधिकारी होते आणि उत्तम पोषा-खांमधल्या ललना होत्या . . .

टेलिफोन केंद्रामधल्या मुलींच्या साक्षी चालू होत्या. एकामागून एक

मुलगी सभा-मंचावर येत होती – भडक पोषाख केलेल्या, फॅशनच्या आहारी गेलेल्या, रोड चेहऱ्यांच्या, फाटक्या तळव्यांचे बूट घातलेल्या मुली! एका पाठोपाठ एक मुलगी येत होती – पेत्रोग्रादमधील "चांगल्या" लोकांच्या, अधिकाऱ्यांच्या, श्रीमंतांच्या, राजकारणामधील बड्या बड्या व्यक्तींच्या टाळ्यांनी खूष होऊन लालबुंद होत होती; एकामागून एक मुलगी येत होती आणि कामगारवर्गीयांच्या हाती तिचा कसा छळ झाला त्याचे भडक वर्णन करीत होती व जे जे जुने, प्रस्थापित आणि सामर्थ्यशील आहे त्या सर्वांबद्दल आपली निष्ठा असल्याचे जाहीर करीत होती...

निकोलाय हॉलमध्ये दूमाची बैठक चालू होती. महापौरांनी आशावादी सुरात सांगितले की, पेत्रोग्रादमधील रेजिमेंटांना आपल्या वागणुकीची लाज वाटत आहे; प्रचाराची प्रगती होत आहे... दूतांची ये-जा चालू होती, बोल्शेविकांच्या भयानक कृत्यांच्या वार्ता ते सांगत होते, युंकरांना वाचविण्यासाठी मध्ये पडत होते, जोरदारपणे शोध घेत होते... त्रुप्प म्हणाले, "बोल्शेविक बागनेटांच्या जोरावर जिंकले जाणार नाहीत, नैतिक बळावरच त्यांना जिंकता येईल..."

दरम्यान, क्रांतिकारक आघाडीवर सारे काही ठीक चालले नव्हते. शत्रूने चिलखती आगगाड्या आणल्या होत्या, त्यांच्यावर तोफा चढवलेल्या होत्या. सोविएतांच्या फौजांमध्ये प्रामुख्याने अर्ध्याकच्च्या लाल रक्षकांची भरती होती, त्यांना अधिकारी नव्हते आणि त्यांच्यापाशी निश्चित योजनाही नव्हत्या. फक्त पाच हजार तयार सैनिक त्यांना जाऊन मिळाले होते; शहराची शिबंदी एक तर युंकरांचे बंड मोडून काढण्यात, शहराचे रक्षण करण्यात गुंतली होती, किंवा काय करावे याबद्दल अजून तिचा निर्णय झाला नव्हता. रात्री दहा वाजता, शहरातल्या रेजिमेंटांच्या प्रतिनिधींच्या सभेपुढे लेनिन यांनी भाषण केले. त्या प्रतिनिधींनी बहुमताने लढण्याच्या बाजूने मत दिले. सेनाधिकारी मंडळावर काम करण्यासाठी पाच सैनिकांची एक समिती नेमण्यात आली आणि प्रातःकालच्या पहिल्या प्रहरांनाच लढाईसाठी पूर्ण सज्ज होऊन रेजिमेंटांमधील सैनिक बराकींमधून बाहेर पडले... मी घरी परत चाललो होतो तेव्हा ते दृष्टीस पडले. सराईत सैनिकी चालीने त्यांच्या रांगा चालल्या होत्या, त्यांची बागनेटे एका रांगेत व्यवस्थित दिसत होती, जिंकलेल्या शहरातल्या उजाड रस्त्यांवरून ते चालले होते...

त्याच वेळी, सादोवायावरच्या विक्झेलमधील मुख्य कचेरीमध्ये, नवे

च्या अखेरच्या मोटारगाड्या हिसकावून घेऊन त्यांनी आम्हाला वाहतुकीच्या साधनांपासून वंचित केलंय. शहरात जर दुर्भिक्ष्य पसरलं तर तो आमचा दोष ठरणार नाही. निषेधांना अर्थच उरलेला नाही .."

लष्करी क्रांतिकारक समितीने नगरपालिकेच्या मोटारी खरोखरीच ताब्यात घेतल्या होत्या किंवा नाही, याबद्दल नगर मंडळाचे बोल्शेविक सभासद कोबोझेव यांनी शंका व्यक्त केली. आणि असे जरी प्रत्यक्षात घडले असले, तरी आणीबाणीच्या परिस्थितीत कुणा अनधिकारी व्यक्तीने ही कृती केली होती, असे त्यांचे म्हणणे पडले.

ते पुढे म्हणाले, "महापौर महाशय आम्हाला सांगतात की, दूमाला आम्ही राजकीय बैठकींचं स्वरूप देऊ नये. पण इथं प्रत्येक मेन्शेविक आणि समाजवादी-क्रांतिकारक पक्षीय प्रचाराविना दुसरं काहीही बोलत नाही. शिवाय दाराशी ते 'इस्क्रा' (ठिणग्या), 'सोल्दात्स्की गोलोस' व 'राबोचाया गझेता' ही आपली बेकायदेशीर वृत्तपत्रे वाटत आहेत आणि बंड करायला चिथावणी देत आहेत. आम्ही बोल्शेविकांनीसुद्धा इथं आमची वर्तमानपत्रं वाटलेली चालतील काय? पण असं होणार नाही, कारण आम्ही दूमाचा मान राखतो. आम्ही नगरपालिकेच्या स्वयंशासनावर हल्ला केला नाही आणि तसं आम्ही करणार नाही. पण तुम्ही जनतेला उद्देशून एक आवाहन जाहीर केलंत, तेव्हा आम्हालाही तसं करण्याचा हक्क आहे..."

त्यांच्या पाठोपाठ कॅडेट पक्षाचे शिनगारिओव बोलू लागले. ते म्हणाले की, कायदेशीर आरोपाखाली ज्यांना ॲटर्नी जनरलसमोर खेचून आणले जाण्याची शक्यता आहे व देशद्रोहाच्या आरोपाखाली ज्यांच्यावर खटला भरला पाहिजे, अशांबरोबर समान पातळीवर भाषाच होऊ शकत नाही... त्यांनी पुन्हा ठराव मांडला की, सर्व बोल्शेविक सभासदांना दूमामधून हाकलून लावावे. पण त्यांचा ठराव बेमुदत तहकूब केला गेला, कारण बोल्शेविक सदस्यांविरुद्ध वैयक्तिकरीत्या आरोप नव्हते आणि ते नगरपालिकेच्या कारभारात सक्रिय भाग घेत होते.

मग दोन मेन्शेविक-आंतरराष्ट्रीयवाद्यांनी जाहीर केले की, बोल्शेविक सदस्यांचे आवाहन म्हणजे कत्तलीला उघड उघड चेतावणी होती. "जर बोल्शेविकांच्या विरुद्धची प्रत्येक गोष्ट प्रतिक्रांतिकारक ठरते", पिन्केविच म्हणाले, "तर मला क्रांती आणि अराजक यांच्यातला फरकच समजत नाही... मोकाट सुटलेल्या लोकांच्या अतिरेकी भावनांवर बोल्शेविक अवलं-

वून रहात ; आमच्याजवळ फक्त नैतिक बळ आहे. आम्ही दोन्ही बाजूंच्या कत्तलींविरुद्ध आणि हिंसाचाराविरुद्ध निषेध नोंदवू, कारण शांततावादी तोडगा शोधून काढणं हेच आमचं काम आहे."

नझारियेव म्हणाले, "मेन्शेविक आणि समाजवादी-क्रांतिकारकांना नष्ट करा असं आवाहन जनतेला करणारी 'मानखोड्याकडे' या शीर्षकाची रस्त्यांवर चिकटवलेली जाहीर निवेदनं, हा तुम्हा बोल्शेविकांचा कधीही धुतला न जाणारा गुन्हेगारी कलंक आहे. असं निवेदन घोषित करून तुम्ही कशाची तयारी करीत आहात याची कालची भयानक कृत्यं म्हणजे नुसती नांदी आहे... तुमचा इतर पक्षांशी मेळ घालून देण्याचा मी नेहमी प्रयत्न केला, पण आता मला तुमच्याबद्दल केवळ तिरस्कार वाटतो!"

त्यासरशी ताडकन उठून उभे रहात बोल्शेविक सभासद रागारागाने ओरडू लागले आणि दुसऱ्या बाजूने भसाड्या आवाजात, निंदानालस्ती करीत लोक त्यांच्यावर मुठी उगारून ओरडू लागले...

हॉलच्या बाहेर माझी नगर-अभियंते मेन्शेविक गोम्बेर्ग आणि तीन-चार वार्ताहरांशी गाठ पडली. ते सगळे कमालीचे उत्साहात होते.

"पाहिलंत!" ते म्हणाले. "भेकडांना आमची भीती वाटतेय. दूमाला अटक करण्याची त्यांची हिंमत झाली नाही! त्यांची लष्करी क्रांतिकारक समिती या इमारतीत आपला कमिस्सार पाठवायचं धाडस करीत नाही. एवढंच कशाला, आज सादोवायाच्या कोपऱ्यावर मी पाहिलं की, 'सोल्दातस्की गोलोस' विकणाऱ्या एका पोऱ्याला एका लाल रक्षकानं अडवायचा प्रयत्न केला... त्या पोरानं नुसतं हसून त्या लाल रक्षकाची टवाळी उडवली. तिथं जमलेली लोकांची गर्दी त्या डांबीसाला जिवं मारायला निघाली होती. आता फक्त काही थोड्या तासांचा अवधी. जरी केरेन्स्की आले नाहीत तर यांच्याजवळ सरकार चालवायला माणसंच नाहीत. सारा गाढवांचा बाजार! स्मोल्नीत ते आपापसात भांडताहेत असंसुद्धा मला समजलंय!"

माझ्या एका समाजवादी-क्रांतिकारक मित्राने मला बाजूला ओढून नेले. "रक्षक समिती कुठं लपून बसलीय ते मला ठाऊक आहे," तो म्हणाला. "तुम्हाला तिथं जाऊन त्यांच्याशी बोलायची इच्छा आहे?"

ह्या वेळपावेतो संध्याकाळचा अंधार पडला होता. शहरामधले जीवन पुन्हा सुरळीत चालू झाले होते. दुकानांची सरकती दारे वर ओढलेली होती,

दिवे चमकत होते, रस्त्यांवर लोकांचे मोठमोठे थवे हळूहळू ये-जा करीत होते आणि वादविवाद करीत होते...

नेव्स्कीवर ८६ क्रमांकाच्या घरामधून एका बोळकंडीमधून आम्ही एका आवारात गेलो. त्या आवाराच्या चारी बाजूंना उंच उंच निवासी इमारती होत्या. २२९ क्रमांकाच्या गाळ्याच्या दरवाजावर माझ्या मित्राने एका विशिष्ट पद्धतीने ठोकले. आत खुसपूस ऐकू आली; आतला दरवाजा आपटला गेला; मग पुढच्या दाराची बारीक फट उघडली व तिच्यातून एका महिलेचा चेहरा डोकावला. एक मिनिटभर आम्हाला निरखून घेत-ल्यानंतर तिने आम्हाला आत प्रवेश दिला. सुस्त चेहऱ्याची ती एक मध्यम-वयीन बाई होती. ती तात्काळ ओरडली – "कीरील, सारं काही ठीक आहे!" भोजन दालनामध्ये टेबलावर समोवारमध्ये पाणी उकळत होते आणि पाव व कच्च्या मासळीने भरलेल्या बशा तेथे होत्या. खिडकीच्या पडद्यांमागून लष्करी गणवेषातला एक माणूस बाहेर आला आणि कामगा-राचा पोषाख केलेला* दुसरा कपाटामधून बाहेर आला. एका अमेरिकन वार्ताहराची भेट होत आहे या गोष्टीचा त्यांना खूप आनंद झालेला दिसला. त्यांनी मोठ्या बढाईने सांगितले की, बोल्शेविकांनी जर त्यांना पकडले तर हमखास त्यांना गोळ्या घालून ठार मारण्यात येईल. आपली नांवे मला सांगायला ते तयार नव्हते, पण ते दोघेही समाजवादी-क्रांतिकारक होते.

मी विचारले, "तुम्ही आपल्या वर्तमानपत्रांमधून अशा खोटचा बातम्या का छापता?"

माझ्या प्रश्नाचा अपमान वाटून न घेता तो अधिकारी उत्तरला, "होय, मला ठाऊक आहे; पण आम्ही काय करू शकतो?" त्याने खांदे उडवले. "लोकांच्या मनाची एक विशिष्ट घडण बनवणं आमच्या दृष्टीनं आवश्यक आहे हे तुम्हाला मान्य केलं पाहिजे..."

दुसऱ्या माणसाने त्याचे बोलणे मध्येच थांबवले. "बोल्शेविकांच्या दृष्टीनं हे केवळ एक साहस आहे. त्यांच्यापाशी बुद्धिजीवी लोक नाहीत... सरकारी खाती चालू शकणार नाहीत... रशिया म्हणजे केवळ एक शहर नव्हे, तर एक मोठा अख्खा देश आहे... ते फार थोडे दिवस टिकून राहतील याची जाणीव झाल्यामुळं, त्यांना विरोध करणाऱ्या सर्वांत बलाढ्य शक्तीला – केरेन्स्कींना – मदत करून सुव्यवस्था परत स्थापन करण्याचा आम्ही निर्णय घेतला."

"ते सारं ठीक आहे," मी म्हणालो. "पण तुम्ही कॅडेटांशी कशाला युती केली?"

कामगाराचे सोंग आणलेला तो माणूस दिलखुलास हसला: "तुम्हाला खरं सांगायचं तर या क्षणाला जनतेचा बोल्शेविकांना पाठिंबा आहे. आम्हाला सध्या अनुयायी नाहीत. मूठभर सैनिकांना आम्ही एकवटू शकत नाही. शस्त्रं उपलब्ध नाहीत... एका विशिष्ट मर्यादेपर्यंत बोल्शेविकांचं म्हणणं बरोबर आहे; या घटकेला काही बळ असलेले असे केवळ दोनच पक्ष रशियात अस्तित्वात आहेत—बोल्शेविक आणि कॅडेटांच्या लांब कोटांच्या शेपटांमागं लपणारे सर्व प्रतिगामी. कॅडेटांना वाटतं की ते आमचा वापर करून घेताहेत; पण प्रत्यक्षात आम्हीच त्यांचा उपयोग करून घेत आहोत. बोल्शेविकांचा फडशा पाडल्यानंतर आम्ही कॅडेटांविरुद्ध मोर्चा वळवू..."

"नव्या सरकारमध्ये बोल्शेविकांना प्रवेश दिला जाईल?"

त्याने डोके खाजवले. "तो मोठा प्रश्न आहे," त्याने कबुली दिली. "अर्थात त्यांना प्रवेश दिला नाही तर कदाचित पुन्हा ते असाच गोंधळ घडवून आणतील. कोणत्याही परिस्थितीत त्यांना घटनात्मक सभेत सत्ता-संतुलन राखण्याची, जर घटनात्मक सभा असलीच तर, संधी मिळेल."

"आणि मग नव्या सरकारमध्ये त्याच कारणांसाठी कॅडेटांना प्रवेश देण्याचा प्रश्नही उद्‌भवतो," अधिकारी म्हणाला. "तुम्हाला माहीतच आहे की, कॅडेटांना खरं म्हणजे घटनात्मक सभा नकोय—जर आत्ताच बोल्शेविकांचा नाश करता आला तर मुळीच नकोय." त्याने आपले डोके हलवले. "आम्हा रशियनांना राजकारण खेळणं फार अवघड जातं. तुम्ही अमेरिकन लोक जन्मतः मुत्सद्दी आहात; तुमच्या सगळ्या आयुष्यभर तुम्ही राजकारणाचे डावपेच खेळत आलात. पण तुम्हाला माहीत आहे—आम्हाला राजकारणात पडून जेमतेम एक वर्ष झालंय!"

"केरेन्स्कींबद्दल आपलं काय मत आहे?" मी विचारले.

"हंगामी सरकारच्या पापांना केरेन्स्की जबाबदार आहेत," दुसरा ठाम उत्तरला. "भांडवलदारवर्गाबरोबर हातमिळवणी करण्याची केरेन्स्कींनी आमच्यावर बळजबरी केली. त्यांनी धमकी दिली होती त्याप्रमाणं जर खरोखरीच राजिनामा दिला असता, तर घटनात्मक सभेच्या आधी केवळ १६ आठवडे राहिले असताना नव्या मंत्रिमंडळाचं अरिष्ट निर्माण झालं असतं; आणि आम्हाला नेमकं ते टाळायचं होतं."

"पण अखेरीस तसंच झालं नाही का?"

“होय, पण असं घडेल हे त्यावेळी आम्हाला काय माहीत? केरेन्स्कीवाद्यांनी आणि अव्क्सेन्तियेववाद्यांनी आम्हाला चकवलं. गोत्झ अधिक जहाल नाहीत. मी चेर्नोव यांच्या बाजूचा आहे, ते खरे क्रांतिकारक आहेत... फार कशाला, आजच लेनिन यांनी निरोप पाठवला होता की, चेर्नोव यांनी सरकारमध्ये सामील व्हायचं ठरवल्यास त्यांचा विरोध नाही.

“केरेन्स्की सरकारच्या जाचातूनही सुटका करून घ्यायची आमची इच्छा होती, पण घटनात्मक सभेची वाट पाहणं इष्ट असा आम्ही विचार केला... या प्रकरणाच्या आरंभी मी बोल्शेविकांच्या बाजूचा होतो, पण आमच्या पक्षाच्या मध्यवर्ती समितीनं एकमतानं त्यांच्याविरुद्ध मतदान केलं—मग मी काय करणार? पक्ष-शिस्तीचा तो प्रश्न होता...

“आठवड्याच्या आत बोल्शेविक सरकारच्या ठिकऱ्या उडतील; जर समाजवादी-क्रांतिकारक फक्त बाजूला उभे राहून दम धरू शकले, तर सरकार आपोआप त्यांच्या हाती पडेल. पण आम्ही जर एक आठवडाभर थांबलो तर देशात एवढं प्रचंड अराजक माजेल, की जर्मन साम्राज्यवादी विजयी होतील. म्हणून अवघ्या दोन सैनिक-रेजिमेंटांच्या पाठिंब्याच्या आश्वासनावर आम्ही आमचा उठाव सुरू केला—आणि तेच आमच्याविरुद्ध उलटले... मग आमच्याबरोबर फक्त युंकर उरलेत...”

“कझाक तुमच्या बरोबर नाहीत?”

अधिकाऱ्याने एक उसासा टाकला. “त्यांनी अजिबात हालचाल केली नाही. प्रथम ते म्हणाले होते की, पायदळाचा पाठिंबा मिळाला तर ते येतील. आणखी ते म्हणाले की, त्यांची माणसं केरेन्स्की यांच्याबरोबर आहेत आणि ती आपली कामगिरी बजावीत आहेत... मग ते असंही म्हणाले की, कझाक लोकशाहीचे वंशपरंपरेनं शत्रू आहेत असा नेहमी आरोप केला जातो... अखेरीस म्हणाले की, ‘आमची जमीन काढून घेणार नाही असं बोल्शेविकांनी वचन दिलंय. आम्हाला धास्ती नाही. आम्ही तटस्थ राहतो’”.

या बोलण्याच्या दरम्यान लोकांची सतत ये-जा चालू होती. त्यातले बहुतेक लष्करी अधिकारी होते, त्यांच्या खांद्यांवरच्या फिती तोडून टाकलेल्या होत्या. हॉलमध्ये ते जमलेले आम्ही पाहू शकत होतो. आणि त्यांची खालच्या आवाजातली रागीट बोलणी ऐकू येत होती. अधूनमधून, दरवाजावरच्या अर्धवट ओढलेल्या पडद्यांमधून, न्हाणीघराच्या दाराचे ओझरते दर्शन आम्हाला घडत होते. तेथे भक्कम बांध्याचा, कर्नलच्या गणवेषामधील

एक अधिकारी शौचकूपाच्या कुंडीवर बसला होता व आपल्या मांडीवर धरलेल्या पॅडवर काहीतरी लिहीत होता. तो अधिकारी म्हणजे पेत्रोग्रादचे माजी सेनाप्रमुख कर्नल पालकोव्‌निकोव आहेत हे मी ओळखले. त्यांना पकडून देणाऱ्याला लष्करी क्रांतिकारक समितीने प्रचंड रक्कम बक्षीस दिली असती.

"आमचा कार्यक्रम काय?" अधिकारी म्हणाला. "आमचा कार्यक्रम असा. जमीन परत भूमी समित्यांच्या हाती सुपूर्द करायची. उद्योगधंद्यांवर नियंत्रण राखण्यात कामगारांना पूर्ण प्रतिनिधित्व द्यायचं. जोमदार शांतता कार्यक्रम अंमलात आणायचा, पण बोल्शेविकांनी जगाला निर्वाणीचा संदेश दिला तसं मात्र करायचं नाही. बोल्शेविक देशातल्या देशात सुद्धा आपल्या लोकांना दिलेली आश्वासनं पुरी करू शकत नाहीत. आम्ही लोकांचा असा अवसानघात करणार नाही... किसानांचा पाठिंबा मिळविण्यासाठी त्यांनी आमचा जमीनविषयक कार्यक्रम चोरला. ही लबाडी आहे. जर त्यांनी घटनात्मक सभेपर्यंत वाट पाहिली असती—"

"घटनात्मक सभेचा काही संबंध नाही!" दुसरा अधिकारी मध्येच बोलला. "जर बोल्शेविकांना इथं समाजवादी राज्य स्थापन करायचं असलं, तर कोणत्याही परिस्थितीत आम्ही त्यांच्याबरोबर काम करू शकत नाही! केरेन्स्कींनी घोडचूक केली. त्यांनी बोल्शेविकांना अटक करण्याचा हुकूम दिला आहे असं प्रजासत्ताक मंडळात जाहीर करून, आपण काय करणार आहोत याची त्यांनी बोल्शेविकांना आगाऊ खबर दिली..."

"पण आता काय करायचा तुमचा इरादा आहे?" मी विचारले.

त्या दोघांनी एकमेकांकडे पाहिले. "काही दिवसातच तुम्हाला दिसून येईल. आघाडीवरच्या पुरेशा फौजा जर आमच्या बाजूनं असतील, तर आम्ही बोल्शेविकांशी समझोता करणार नाही. जर तसं नसलं, तर नाइलाजानं आम्हाला तडजोड करणं भाग पडेल..."

आम्ही पुन्हा नेव्स्की रस्त्यावर बाहेर आलो आणि लोकांनी गच्च भरलेल्या ट्रामगाडीच्या दरवाजाच्या पायरीवर लोंबकळत जाऊ लागलो. ट्रामचे पावंडे अतिवजनाने खाली दबले होते आणि जमिनीला घसटत चालले होते. स्मोल्नीपर्यंतचे ते प्रदीर्घ लांब अंतर ट्रामगाडी कमालीच्या कंटाळवाण्या मंद वेगाने कापत चालली होती.

नीटनेटके, कृश अंगयष्टीचे, बुटके मेश्कोव्‌स्की हॉलमध्ये येत होते. त्यांचा चेहरा चिंताग्रस्त होता. त्यांनी आम्हाला सांगितले की, मंत्रालयांमधल्या संपांचा परिणाम दिसून येऊ लागला होता. उदाहरणार्थ, गुप्त करार

प्रकाशित करण्याचे जन-कमिस्सारांनी आश्वासन दिले होते ; पण तेथे काम करणारे प्रमुख नेरातोव नांवाचे गृहस्थ ते दस्तऐवज बरोबर घेऊन अदृश्य झाले होते. ब्रिटिश दूतावासात ते लपून बसले असावेत असा अंदाज होता...

पण सगळ्यात वाईट अवस्था झाली होती बँकांच्या संपामुळे. मेन्झिन्स्की म्हणाले, "पैशाविना आम्ही असहाय्य आहोत. रेलकामगारांचे, टपाल आणि तार खात्यांमधल्या कर्मचाऱ्यांचे पगार देणे आहेत... बँका बंद आहेत ; आणि ही परिस्थिती पालटायला गुरुकिल्ली ठरणारी सरकारी बँकही बंद आहे. रशियामधल्या सर्व बँक कारकुनांना त्यांनी काम थांबवावे म्हणून लाच चारण्यात आलीय...

"पण सरकारी बँकेच्या तिजोऱ्या डायनामाईटने उडवून उघडण्याचा हुकूम लेनिन यांनी आत्ताच दिलाय आणि खाजगी बँका उद्या उघडाव्यात किंवा त्यांना आम्हीच उघडू, असे जाहीर करणारे आज्ञापत्र नुकतेच निघालेय !"

पेत्रोग्राद सोविएतची बैठक जोरात चालू होती. सशस्त्र लोकांची तेथे एकच दाटी झाली होती. ट्रॉट्स्की अहवाल देत होते :

"कझाक क्रास्नोये सेलोहून माघार घेत आहेत." (टाळ्यांचा उत्साहपूर्ण तीव्र कडकडाट.) "पण लढाईला आत्ता कुठं सुरुवात होतेय. पूल्कोवो इथं घनघोर झुंज चालली आहे. सर्व उपलब्ध फौजा त्वरेनं तिकडं पाठवल्या पाहिजेत...

"मॉस्कोहून वाईट बातमी आलीय. क्रेमलिन युंकरांच्या हाती आहे आणि कामगारांजवळ अगदी थोडी शस्त्रं आहेत. पेत्रोग्रादवर तिथला निर्णय अवलंबून आहे.

"आघाडीवर, शांततेच्या आणि जमीनविषयक आज्ञापत्रांनी मोठा उत्साह निर्माण केला आहे. पेत्रोग्राद आगीनं धगधगत आहे आणि तिथं रक्ताचे पाट वाहताहेत, बोल्शेविकांनी बायका-मुलांची जबरदस्त कत्तल केली आहे, अशा आशयाच्या कथांचा केरेन्स्की खंदकातल्या सैनिकांवर भडिमार करीत आहेत. पण कुणीही त्यांच्यावर विश्वास ठेवत नाही...

"'अलेग', 'आव्रोरा' आणि 'रिस्पुब्लिका' या युद्धनौका नेवा नदीत नांगरून उभ्या आहेत व त्यांच्या तोफा नगराकडे जाणाऱ्या रस्त्यांवर रोखलेल्या आहेत..."

"तुम्ही तिथं बाहेर लाल रक्षकांबरोबर का जात नाही?" एक भसाडा आवाज ओरडला.

"आता मी चाललोय!" ट्रॉट्स्की उत्तरले आणि व्यासपीठावरून निघाले. त्यांचा चेहरा नेहमीपेक्षा अधिक फिकुटला होता. उत्सुक मित्रांनी वेढलेल्या खोलीच्या बाजूने ते तडक बाहेर थांबलेल्या मोटारीकडे गेले.

आता कामेनियेव बोलत होते. समेटाच्या परिषदेच्या कामकाजाचे वर्णन ते करीत होते. ते म्हणाले की, मेन्शेविकांनी पुढे मांडलेल्या शस्त्रसंधीच्या अटी संतापपूर्वक धुडकावून लावण्यात आल्या. अशा प्रस्तावाविरुद्ध रेल्कामगार संघाच्या शाखांनीसुद्धा मतदान केले...

"आम्ही आता सत्ता काबीज केलीय आणि सबंध रशिया आमच्या ताब्यात येतोय," त्यांनी जाहीर केले, "अशा वेळी तीन छोट्या मागण्या ते आमच्यापाशी करताहेत: १. सत्ता सोडून द्यावी. २. सैनिकांना युद्ध चालू ठेवायला भाग पाडावे. ३. किसानांना जमिनीबद्दल विसर पाडावा..."

समाजवादी-क्रांतिकारकांच्या आरोपांना उत्तर देण्यासाठी क्षणकाल लेनिन तेथे आले:

"त्यांचा जमीनविषयक कार्यक्रम आम्ही चोरला असा ते आमच्यावर आरोप करतात... तसं जर असेल तर आम्ही त्यांना वंदन करतो. आमच्या दृष्टीनं तो कार्यक्रम चांगला आहे..."

अशा रीतीने सभा गर्जत राहिली; नेत्यामागून नेता खुलासे करीत होता, प्रतिपादन करीत होता. प्रेरणा देत होता; सैनिकामागून सैनिक उठत होता, कामगारामागून कामगार उभा रहात होता, आपल्या मनातल्या, आपल्या काळजातल्या गोष्टी बोलून दाखवत होता... श्रोते बदलत होते, जुन्यांच्या जागी सतत नवे येत होते. वारंवार माणसे आत येत होती, अमुक अमुक तुकडीतल्या लोकांनी आघाडीवर जावे म्हणून मोठ्यांदा ओरडून सांगत होती; दुसरी मोकळी केलेली, जखमी झालेली किंवा शस्त्रांसाठी आणि सामग्रीसाठी स्मोल्नीमध्ये येणारी, लोंढ्यांनी माणसे येत होती...

पहाटेचे तीन वाजले होते आणि आम्ही हॉलमधून नुकते बाहेर पडत होतो तेव्हा लष्करी क्रांतिकारक समितीचे होल्त्झमान कमालीच्या आनंदी मुद्रेने धावत खाली आले.

"सारं काही ठीक!" माझे हात पकडून ते ओरडले. "आघाडीवरून तार आली. केरेन्स्कींचा चक्काचूर केला! पहा!" घाईघाईने पेन्सिलीने खरडलेला एक कागदाचा तुकडा त्यांनी आमच्या समोर धरला. पण आम्ही तो मजकूर वाचू शकत नाही हे ध्यानात येताच ते मोठ्याने घडघडा वाचू लागले:

"पूल्कोवो. सेनाधिकारी. पहाटेचे २ वा. १० मि.

"नोव्हेंबर १२ ते १३ पर्यंतची रात्र इतिहासात नोंदली जाईल. क्रांतीच्या राजधानीविरुद्ध प्रतिक्रांतिकारक फौजांची स्वारी करण्याचा केरेन्स्कींचा प्रयत्न निर्णायकपणे परतवून लावण्यात आला आहे. केरेन्स्की माघार घेताहेत, आम्ही पुढे घुसतो आहोत. पेत्रोग्रादच्या सैनिकांनी, खलाशांनी आणि कामगारांनी दाखवून दिले की, हाती शस्त्र घेतल्यानंतर ते लोकशाहीची इच्छा व अधिकार अंमलात आणू शकतात. भांडवलदारांनी क्रांती सेनेला एकाकी पाडण्याचा प्रयत्न केला. केरेन्स्कींनी कझाकांच्या मदतीने तिला मोडून काढण्याचा प्रयत्न केला. पण दोन्ही मनसुब्यांचा दारुण पराभव झाला.

"कामगार आणि किसानांच्या लोकशाहीचे वर्चस्व स्थापित करण्याच्या महान विचाराला सेनेमधल्या सैनिकांची जोड मिळाली आणि त्याचा निर्धार दृढ बनला. यापुढे सर्व देशाची खात्री पटेल की, सोविएतांची सत्ता ही क्षणभंगुर बाब नसून एक अजिंक्य सत्य आहे. केरेन्स्कींचा पराभव म्हणजे एकूण जमीनदारांचा, भांडवलदारांचा आणि कोर्निलोववाद्यांचा पराभव. केरेन्स्कींचा पराभव म्हणजे शांततापूर्ण स्वतंत्र जीवन, जमीन, भाकरी आणि सत्ता जनतेला मिळण्याच्या हक्काची खात्रीलायक हमी. पूल्कोवोच्या सेनेने आपल्या शौर्यशाली पराक्रमाने कामगार-किसान क्रांतीच्या ध्येयाला बळकट केले आहे. आता भूतकाळाकडे माघारी वळणे नाही. आमच्यासमोर संघर्ष, अडथळे आणि त्याग उभे आहेत. पण मार्ग स्पष्ट आहे आणि विजय निश्चित आहे.

"कर्नल वाल्देन यांच्या आधिपत्याखाली लढणाऱ्या पूल्कोवो सेनाविभागाचा क्रांतिकारक रशियाला आणि सोविएतांच्या सत्तेला अभिमान वाटतो. धारातीर्थी पडलेल्यांची स्मृती अमर राहील! क्रांतीच्या योद्धयांचा, जनतेशी प्रामाणिक राहणाऱ्या सैनिकांचा आणि अधिकाऱ्यांचा विजय असो!

"क्रांतिकारक, जनतेचा समाजसत्तावादी रशिया चिरायू होवो!

मंडळाच्या वतीने, **ट्रॉट्स्की,** जन-कमिस्सार

झ्नामेन्स्की चौकातून घरी परत जात असताना निकोलाय रेल्वे स्टेशनासमोर आम्हाला अपूर्व गर्दी दिसली. रायफली घेतलेले हजारो खलाशी तेथे एकत्र जमले होते.

पायऱ्यांवर उभे राहून, विक्झेलचा एक सभासद त्यांची समजूत घालत होता.

"कॉम्रेडहो, आम्ही तुम्हाला मॉस्कोला घेऊन जाऊ शकत नाही. आम्ही तटस्थ आहोत. आम्ही दोन्हीपैकी कोणत्याच पक्षाच्या फौजा घेऊन जात नाही. मॉस्कोत भयानक यादवी युद्ध पेटलंय, आम्ही तिथं तुम्हाला नेऊ शकत नाही..."

चौकातली उत्तेजित बनलेली गर्दी त्या माणसावर ओरडू लागली; खलाशी पुढे घुसायचा प्रयत्न करू लागले. अचानक दुसरा दरवाजा खाड-कन सताड उघडला; त्यात दोन किंवा तीन ब्रेकमन, एक फायरमन असे कुणीतरी उभे होते.

"कॉम्रेडहो, इकडून या!" त्यातला एक ओरडला. "आम्ही तुम्हाला मॉस्कोला नेतो–हवं तर व्लादीवस्तोकलासुद्धा नेतो! क्रांती चिरायू होवो!"

प्रकरण नववे

# विजय

## हुकूम क्रमांक १

### पूल्कोवो तुकडीच्या शिपायांना उद्देशून.

१३ नोव्हेंबर १९१७. सकाळचे ९ वा. ३८ मि.

"घनघोर लढाईनंतर, पूल्कोवो तुकडीच्या शिपायांनी प्रतिक्रांतिकारक फौजांचा संपूर्ण धुव्वा उडवला व त्यानंतर त्या सैरभैर होऊन माघारी पळाल्या आणि त्सारस्कोये सेलोचे छत्र घेऊन पाव्लोव्स्कोये २ व गात्चिनापर्यंत मागे गेल्या.

"आमच्या आघाडीच्या तुकड्यांनी त्सारस्कोये सेलोच्या ईशान्य सीमा व अलेक्सांद्रोव्स्काया स्टेशन यांच्यावर कबजा केला आहे. कोल्पिनो तुकडी आमच्या उजव्या अंगाला होती आणि क्रास्नोये सेलो तुकडी डाव्या अंगाला होती.

"त्सारस्कोये सेलो ताब्यात घेऊन त्याची नाकेबंदी करण्याचा, विशेषतः गात्चिनाच्या बाजूने, मी पूल्कोवोच्या फौजांना हुकूम दिला.

"तसेच पाव्लोव्स्कोयेपर्यंत जाऊन त्याचा ताबा घेण्याचा, त्याच्या दक्षिण बाजूची नाकेबंदी करण्याचा आणि द्नो स्टेशनापर्यंत रेलमार्ग ताब्यात घेण्याचा मी हुकूम केला.

"शिपायांनी काबीज केलेले आपले मोर्चे भक्कम करण्यासाठी सर्व उपाययोजना अंमलात आणल्या पाहिजेत, खंदक खणले पाहिजेत, इतर संरक्षक कार्ये केली पाहिजेत.

"कोल्पिनो आणि क्रास्नोये सेलो येथील तुकड्यांशी, तसेच पेत्रोग्रादच्या संरक्षणाच्या सरसेनापतींच्या सेनाधिकारी विभागाशी त्यांनी निकट संपर्क राखला पाहिजे.

सही,
केरेन्स्कीच्या प्रतिक्रांतिकारक फौजांविरुद्ध लढणाऱ्या
सर्व सेनांचे सरसेनापती, लेफ्टनंट-कर्नल
**मुराव्योव.**"

मंगळवार सकाळ. पण हे कसे घडले? अवघ्या दोन दिवसांपूर्वी पेत्रोग्रादच्या आसपास नेतृत्वहीन शिपायांचे तांडे निरुद्देश भटकत होते; त्यांच्याजवळ अन्नपाणी नव्हते, तोफखाना नव्हता, योजना नव्हती. या विस्कळीत, बेशिस्त लाल रक्षकांच्या आणि अधिकारी नसलेल्या सैनिकांच्या झुंडींना, स्वयंनियुक्त सेनाधिकारीवर्गाच्या आज्ञेत राहणाऱ्या शिस्तबद्ध सेनेत स्वतःचा कायापालट घडवून आणण्याची व तोफांच्या आणि कझाक घोडदळाच्या जबरदस्त हल्ल्याला तोंड देऊन त्याला मोडून काढण्याची प्रेरणा कुठून मिळाली? [1]

बंड करणाऱ्या जनतेचा लष्करी शिरस्ते खोटे पाडण्याचा एक मार्ग आहे. फ्रेंच क्रांतीच्या हलाखीच्या अवस्थेतल्या सेना — वाल्मी आणि वेइसेम्बुर्ग* येथील सेनांना — या संदर्भात विसरता येत नाही. सोविएतांच्या फौजांविरुद्ध युंकर, कझाक, जमीनदार, उमराव, काळे शंभर असे सारे उभे ठाकले होते. झार पुन्हा येऊ पहात होता, आख्राना आणि सैबेरियाच्या शृंखली पुन्हा अस्तित्वात येऊ पहात होत्या; आणि जर्मनांचा प्रचंड भयानक धाका होता... कार्लाईल यांच्या शब्दांमध्ये विजय याचा अर्थ होता "अनंत स्वत्व आणि सुवर्णयुग!"

---

*२० सप्टेंबर १७९२ रोजी वाल्मी येथे झालेल्या ऐतिहासिक लढाईत, फ्रेंच क्रांतिसेनेच्या स्वयंसेवक तुकडीने, पॅरिसच्या दिशेने कूच करणाऱ्या प्रशियन फौजांचा पराभव केला व त्यांना माघार घ्यायला भाग पाडले. १७९४ मधील वेइसेम्बुर्गच्या लढाईत, सेंट जस्ट यांच्या नेतृत्वाखालील फ्रेंच क्रांतिफौजांनी ऑस्ट्रियाच्या सैन्याचा संपूर्ण पराभव केला आणि फ्रान्सच्या सीमेपार त्याला हाकून लावले. — सं.

रविवारी रात्री लष्करी क्रांतिकारक समितीचे कमिस्सार लढाईच्या मैदानावरून निराश होऊन परतत होते. पेत्रोग्रादच्या शिबंदीने पाच जणांची – प्रतिक्रांतिकारकतेच्या कलंकापासून संपूर्ण मुक्त असल्याचा निर्वाळा दिलेले तीन सैनिक आणि दोन अधिकारी यांची – एक समिती निवडली. ती त्यांची रणांगण-समिती होती. सर्व अधिकार कर्नल मुराव्योव या माजी स्वदेशभक्तांकडे होते. ते अत्यंत कार्यक्षम होते, पण त्यांच्या हालचालींवर लक्षपूर्वक नजर ठेवणे आवश्यक होते.* कोल्पिनो, ओबुखोवो, पूल्कोवो आणि क्रास्नोये सेलो येथे हंगामी तुकड्या स्थापन करण्यात आल्या. सभोवतालच्या प्रदेशामधून जसजसे भटके सैनिक त्यांच्यामध्ये येऊन सामील होऊ लागले, तसतसा या तुकड्यांचा आकार फुगत गेला. या लोकांमध्ये सैनिक होते, खलाशी होते, लाल रक्षक होते, रेजिमेंटांचे छोटे भाग होते, पायदळ, घोडदळ, तोफखाना यांचा समावेश होता. काही चिलखती गाड्याही सामील झाल्या होत्या.

दिवस उजाडला आणि केरेन्स्कींच्या कझाकांच्या गस्ती तुकड्यांशी या सैनिकांची चकमक उडाली. सैरभैर रायफलींचे बार उडाले आणि शरण येण्याचे आवाहन करण्यात आले. त्या ओसाड मैदानात थंड निवांत हवेत लढाईचे आवाज पसरू लागले आणि शेकोट्यांभोवती जमा होऊन वाट पाहणाऱ्या फिरत्या तुकड्यांच्या कानी पडू लागले... म्हणजे लढाईला आरंभ झाला होता! त्यांनी रणक्षेत्राकडे कूच केले; आणि सरळ रस्त्यांवर त्यांना येऊन मिळणाऱ्या कामगारांच्या झुंडींनी त्यांची गती वाढवली... अशा प्रकारे हल्ल्याच्या सर्व ठिकाणांवर संतापलेल्या लोकांच्या झुंडी आपोआप एकवटल्या, तेथे हजर असलेल्या कमिस्सारांनी त्यांना भराभर मोर्चे धरायला सांगितले किंवा त्यांनी कामगिऱ्या नेमून दिल्या. ही **त्यांची** लढाई होती, **त्यांच्या** जगासाठी लढाई होती; त्यांच्यावर हुकूम गाजवणारे अधिकारी **त्यांनीच** निवडून दिलेले होते. त्या क्षणाला असंख्य इच्छाशक्तींनी एकच एक इच्छेचे रूप धारण केले होते...

ज्यांनी लढाईत भाग घेतला होता त्यांनी तिचे वर्णन माझ्यापाशी कर-

---

*मुराव्योव यांचे राजकीय विचार ठाम नव्हते. सोविएतांच्या बाजूला येण्यापूर्वी, त्यांनी विजयापर्यंत युद्ध लढण्याच्या घोषणेला पाठिंबा दिला होता. कोर्निलोव बंडाच्या वेळी त्यांनी डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांची बाजू घेतली होती. पुढे ते सोविएत सत्तेच्या शत्रूंना जाऊन मिळाले. – सं.

ताना सांगितले की, शेवटची काडतुसे संपेपर्यंत कसे खलाशी लढत राहिले व नंतर शत्रूवर तुटून पडले; अंगावर चालून येणाऱ्या कझाकांवर लष्करी शिक्षण नसलेले कामगार कसे धावले आणि त्यांनी कझाकांना घोड्यांवरून खाली खेचले; रणक्षेत्राच्या धुमाळीत भोवती गोळा झालेल्या अज्ञात लोकांच्या झुंडी एखाद्या महाप्रचंड लाटेप्रमाणे शत्रूवर कशा तुटून कोसळल्या... सोमवारच्या मध्यरात्रीपूर्वी कझाक मोडून पडले आणि त्यांनी पळून जायला आरंभ केला; त्यांनी तोफखाना तसाच मागे ठेवला. उध्वस्त झालेल्या लांबच लांब युद्ध आघाडीवर कामगारवर्गाची सेना पुढे सरकली आणि मोठे सरकारी बिनतारी संदेशाचे केंद्र नष्ट करण्याची शत्रूला संधी मिळण्यापूर्वीच तिने त्सारस्कोयेमध्ये घुसून त्याचा ताबा मिळवला. आता त्या केंद्रामधूनच स्मोल्नीचे कमिस्सार जगाला आपली जयगीते ऐकवीत होते...

"**कामगार आणि किसान प्रतिनिधींच्या सर्व सोविएतांना उद्देशून**

"१२ नोव्हेंबरला, त्सारस्कोये सेलोनजीक झालेल्या रक्तपाती झुंजीत, क्रांतिकारक सैन्याने केरेन्स्की व कोर्निलोव यांच्या प्रतिक्रांतिकारक फौजांचा धुव्वा उडवला.

"क्रांतिकारक सरकारच्या वतीने मी हुकूम करतो की, क्रांतिकारक लोकशाहीच्या शत्रूंविरुद्ध सर्व रेजिमेंटांनी आक्रमक पवित्रा घ्यावा, केरेन्स्कींना अटक करण्यासाठी सर्व उपाययोजना अंमलात आणाव्यात आणि क्रांतीच्या विजयांना व कामगारवर्गाच्या विजयाला धोका उत्पन्न करील अशा कोणत्याही साहसाला विरोध करावा.

"क्रांतिकारक सेना चिरायू होवो!

**मुराव्योव."**

प्रांतिक बातम्या...

सेवास्तोपोल येथे स्थानिक सोविएताने सत्ता हाती घेतली होती; बंदरामधल्या युद्धनौकांवरील खलाशांच्या प्रचंड सभेत, त्यांनी आपल्या अधिकाऱ्यांना एका रांगेत उभे रहायला लावले होते आणि नव्या सरकारशी एकनिष्ठ

राहू अशी शपथ घ्यायला लावली होती. नीझ्नी नोवगोरद येथे सोविएतच्या हाती नियंत्रण होते. कझानमधून बातम्या येत होत्या की, रस्त्यारस्त्यांमधून लढाया चालू होत्या, बोल्शेविक ठाणबंद फौजेविरुद्ध युंकर आणि तोफखान्याची एक ब्रिगेड लढत होती...

मॉस्कोमध्ये पुन्हा निकराची लढाई चालू झाली होती. युंकर आणि श्वेतरक्षक आपल्या ताब्यात क्रेमलिन आणि शहराचा मध्यभाग धरून होते व चारी बाजूंनी लष्करी क्रांतिकारक समितीच्या फौजा त्यांच्यावर मारा करीत होत्या. स्कोबेलियेव चौकात सोविएत तोफखाना उभा होता व तेथून नगर-दूमाच्या इमारतीवर, अंमलदार कचेरीवर आणि 'मेत्रोपोल' हॉटेलवर मारगिरी करीत होता. खंदकांसाठी आणि अडथळे उभारण्यासाठी त्वेरस्काया आणि निकित्स्काया रस्त्यांवरचे फरसबंदी दगड उखडून काढण्यात आले होते. मोठ्या बँकांवर व व्यापारी भवनांवर मशिनगनच्या गोळ्यांचा तुफानी भडिमार चालू होता. तिथे दिवे नव्हते, टेलिफोन नव्हते; भांडवलदारी जनता तळघरांमधून रहात होती... शेवटच्या वार्तापत्रात म्हटले होते की, लष्करी क्रांतिकारक समितीने सार्वजनिक सुरक्षा समितीला* निर्वाणीचा संदेश पाठवला होता व क्रेमलिन ताबडतोब शरण न आल्यास त्यावर तोफांचा भडिमार केला जाईल, असे कडकपणे बजावले होते.

"क्रेमलिनवर तोफा डागणार?" सर्वसामान्य नागरिक म्हणत होता. "त्यांची तसं करायची हिंमत होणार नाही!"

वोलोग्दापासून अतिदूरच्या सैबेरियामधल्या चीतापर्यंत, प्स्कोवपासून काळ्या समुद्रतीरावरच्या सेवास्तोपोलपर्यंत, मोठ्या शहरांमधून आणि छोट्या खेड्यांमधून, यादवी युद्धाच्या ज्वाला भडकल्या. हजारो कारखान्यांमधून, किसान कम्यूनांमधून, रेजिमेंटांमधून आणि सेनांमधून, खुल्या दर्यावरच्या जहाजांवरून पेत्रोग्रादमध्ये अभिनंदनपर संदेशांचा वर्षाव होऊ लागला — जनतेच्या सरकारला शुभेच्छा पाठवल्या जाऊ लागल्या.

नोवोचेर्कास्क येथील कझाक सरकारने केरेन्स्कींना तार पाठवली:

**"जर शक्य असेल तर हंगामी सरकारने आणि प्रजासत्ताक मंडळाच्या सदस्यांनी नोवोचेर्कास्कला यावे, असे कझाक शिपायांचे सरकार आमंत्रण**

---

*सार्वजनिक सुरक्षा समिती — १९१७ च्या नोव्हेंबरात मॉस्कोतील प्रतिक्रांतीचे मुख्य केंद्र. — सं.

करीत आहे व येथून आपण बोल्शेविकांविरुद्ध सामायिक लढा संघटित करू शकू..."

फिन्लंडमध्येही वातावरण खदखदत होते. हेल्सिंगफोर्स आणि त्सेंत्रोबाल्त (बाल्तिक काफल्याची मध्यवर्ती समिती) यांच्या सोविएतने वेढ्याची परिस्थिती संयुक्तपणे जाहीर केली आणि म्हटले की, बोल्शेविक फौजांमध्ये ढवळाढवळ करण्याच्या सर्व प्रयत्नांना व त्यांच्या हुकुमांविरुद्ध केलेल्या सर्व सशस्त्र प्रतिकाराला कडकपणे मोडून काढण्यात येईल. त्याच वेळी, केरेन्स्कींनी विसर्जित केलेल्या समाजवादी संसदेने जूनच्या १९१७ मध्ये मंजूर केलेले कायदे अंमलात यावेत, म्हणून फिन्लंडच्या रेल्वे युनियनने देशव्यापी सार्वत्रिक संप घडवून आणला...

---

भल्या सकाळीच मी स्मोल्नीमध्ये गेलो. बाहेरच्या गेटापासून लांब वरापर्यंत गेलेल्या लाकडी पादचारी मार्गावरून चालत जात असताना धूसर, वारा नसलेल्या वातावरणातून पहिले, पातळ पापुद्र्यासारखे हिमकण भिरभिरत येत असलेले मी पाहिले. "बर्फ!" दाराजवळच शिपाई ओरडला. आनंदाने तो हसत होता "वा! छान!!" आतल्या अंगाला लांबच लांब पसरलेली अंधारी दालने आणि ओसाड खोल्या ओक्याबोक्या भासत होत्या. त्या प्रचंड इमारतीत अजिबात हालचाल दिसत नव्हती. एक खोल, अस्वस्थ करणारा आवाज माझ्या कानी पडला तेव्हा मी चमकून सभोवती पाहिले. सर्वत्र फरशीवर, भिंतीलगत माणसे झोपली होती. आडदांड, घाणेरडे लोक, चिखलाने माखलेले कामगार आणि सैनिक, एकेकटे किंवा ढिगांनी, अगदी गाढ मढ्यांगत झोपले होते. काहींच्या जखमांवरच्या पट्ट्यांवर रक्ताचे डाग दिसत होते. बंदुका आणि काडतुसांचे पट्टे इतस्ततः विखुरले होते... ती विजयी कामगारवर्गीय सेना होती!

वरच्या मजल्यावरच्या उपहारगृहात ते एवढ्या दाटीने पसरले होते की, त्यांच्यामधून वाट काढत चालत जाणे अवघड झाले होते. हवा कोंदट बनली होती. धुरकटलेल्या खिडक्यांमधून फिकट प्रकाश झिरपत होता. चेंदामेंदा झालेला एक समोवार थंडपणे काऊंटरवर उभा होता आणि अनेक काचेच्या पेल्यांमधून चहाचे अवशेष दिसत होते. त्यांच्या शेजारीच लष्करी क्रांतिकारक समितीच्या शेवटच्या वार्तापत्राची एक प्रत उलटी पडली होती व तिच्यावर कुणीतरी वेडचावाकडचा हस्ताक्षरात खरडलेले होते. केरेन्स्कीविरुद्धच्या लढाईत समरांगणावर मृत्युमुखी पडलेल्या आपल्या साथींना उद्देशून

कुणा एका सैनिकाने तेथे फरशीवर झोपी जाण्यापूर्वी लिहिलेली आदरांजली होती. ती अक्षरे बहुधा अश्रू पडल्यामुळे पुसट झालेली दिसत होती...

विनोग्रादोव
मस्क्वीन
स्तोल्बिकोव
वस्क्रेसेन्स्की
लेओन्स्की
प्रेओब्राझेन्स्की
लायदान्स्की
बेर्चिकोव

१५ नोव्हेंबर १९१६ रोजी हे लोक सैन्यात दाखल झाले होते. त्यांपैकी फक्त तीन जिवंत राहिले होते:

मिखाईल बेर्चिकोव
अलेक्सेई वस्क्रेसेन्स्की
दिमित्री लेओन्स्की

* * *

झोपा, गरुडवीरांनो, निश्चिंत मनानं झोपा.
आमच्या लाडक्यांनो, अनंत सुख-शांती तुम्हाला गवसलीय,
मातीखालच्या थडग्यात तुम्ही
एका ओळीनं पहुडला आहात. झोपा, नागरिकांनो!

---

फक्त लष्करी क्रांतिकारक समिती न झोपता अद्याप काम करीत होती. आतल्या खोलीतून बाहेर येत स्क्रिप्निकनी माहिती दिली की, गोत्झना अटक केलीय, पण अव्क्सेन्तियेव यांच्याप्रमाणेच, रक्षक समितीच्या जाहीर निवेदनावर सही केल्याचा त्यांनी इन्कार केला होता; खुद्द रक्षक समितीने शिबंदीला उद्देशून केलेल्या आवाहनाचे जनकत्व नाकारले होते. शहरातल्या रेजिमेंटांमध्ये अजून असंतोष धुमसत होता, असे स्क्रिप्निक यांनी सांगितले; वोलीन्स्की रेजिमेंटने केरेन्स्कींविरुद्ध लढायला नकार दिला होता.

गात्चिना येथे चेर्नोव यांच्या नेतृत्वाखाली "तटस्थ" शिपायांच्या अनेक तुकड्या होत्या व केरेन्स्कींनी पेत्रोग्रादवर चाल करून जाण्याचे थांबवावे म्हणून त्यांचे मन वळविण्याचा प्रयत्न करीत होत्या.

स्क्रिप्निक हसले. ते म्हणाले, "आता 'तटस्थ' अस्तित्वातच असू शकत नाहीत. आम्ही जिंकलो आहोत!" त्यांच्या धारदार, दाढी राखलेल्या चेहऱ्यावर जणू धार्मिक अत्यानंद लाभल्यासारखी प्रभा फाकली होती. "आघाडीवरून साठपेक्षा अधिक प्रतिनिधी सर्व सेनांचा पाठिंबा असल्याची आश्वासने घेऊन आले आहेत, फक्त रूमानियाच्या आघाडीवरील शिपायांकडून काही खबर नाही. सेना समित्यांनी पेत्रोग्रादहून येणाऱ्या सर्व बातम्या दडपून टाकण्याचे धोरण स्वीकारले आहे, पण आम्ही आता नियमितपणे संदेशवाहकांना पाठवण्याची व्यवस्था केली आहे..."

नवे सरकार स्थापन करण्याबाबत सबंध रात्रभर चाललेल्या परिषदेच्या बैठकीला हजर राहून थकले भागलेले पण आनंदात असलेले कामेनियेव खालच्या मजल्यावरील पुढील हॉलमध्ये नुकताच प्रवेश करीत होते. "नव्या सरकारमध्ये आम्हाला प्रवेश देण्याबाबत एव्हाना समाजवादी-क्रांतिकारकांची मनाची तयारी झाली आहे," त्यांनी मला सांगितले. "क्रांतिकारक न्यायालयांची उजव्या गटांनी धास्ती घेतली आहे; पुढं काही हालचाल करण्यापूर्वीच आम्ही त्यांना विसर्जित करावं, अशी घाबरून त्यांनी मागणी केली आहे... एकसंध समाजवादी मंत्रिमंडळ स्थापन करण्याचा विक्झेलचा प्रस्ताव आम्ही मान्य केलाय आणि त्यावर आता ते तपशीलवार काम करताहेत... बघा, आमच्या विजयामुळं या सर्वांची सुरुवात झाली. आमचं पारडं रिकामं होतं तेव्हा आम्हाला घ्यायला ते कोणत्याही परिस्थितीत तयार नव्हते; आता सोविएतांशी काही तडजोड करायला प्रत्येकजण अनुकूल आहे... आम्हाला फक्त निर्णायक विजयाची गरज आहे, केरेन्स्कींना शस्त्रसंधी करण्याची इच्छा आहे, पण त्यांना शरण यावं लागेल..."[2]

बोल्शेविक पुढाऱ्यांची अशी मन:स्थिती* होती. एका परदेशी पत्रकाराने

---

* विक्झेल – रेलकामगारांच्या ट्रेड युनियनची अखिल रशिया कार्यकारी समिती. नोव्हेंबर क्रांतीनंतर सोविएतविरोधी हालचालींचे एक मुख्य केंद्र बनले होते व ११ नोव्हेंबर रोजी त्याने "सर्व समाजवादी पक्षांचे" सरकार स्थापन करण्याची मागणी करणारा ठराव मंजूर केला. लेनिन आणि मध्यवर्ती समिती यांनी संकल्पिल्याप्रमाणे "युद्धावर राजकीय मुत्सद्देगिरीचा

ट्रॉट्स्कींना जेव्हा विचारले की, जगापुढे त्यांना काय निवेदन करायचे होते, तेव्हा ट्रॉट्स्की उत्तरले: "या क्षणाला एकच निवेदन करणं शक्य आहे आणि ते आम्ही आमच्या तोफांच्या तोंडांमधून करतो आहोत!"

पण विजयाच्या त्या लाटेमध्ये एक खऱ्याखुऱ्या चिंतेचा अंतप्रवाह वाहत होता; पैशाच्या पुरवठ्याचा प्रश्न होता. लष्करी क्रांतिकारक समितीच्या हुकुमानुसार बँका उघडण्याऐवजी, बँक कर्मचारी संघाने एक सभा घेतली होती आणि औपचारीक संप जाहीर केला होता. सरकारी बँकेकडे स्मोल्नीने सुमारे साडेतीन कोटी रूबलची मागणी केली होती, पण खजीनदाराने तिजोऱ्यांना कुलुपे ठोकली होती व फक्त हंगामी सरकारच्या प्रतिनिधींना तो पैसे देत होता. प्रतिगामी लोक सरकारी बँकेचा राजकीय अस्त्रासारखा वापर करीत होते. उदाहरणार्थ, सरकारी रेलमार्गावरील कर्मचाऱ्यांचे पगार देण्यासाठी विक्झेलने पैशांची मागणी केली तेव्हा स्मोल्नीकडे अर्ज करा असे तिला सांगण्यात आले...

पेत्रोविच नांवाच्या लाल केस असलेल्या युक्रेनी बोल्शेविक नव्या कमिस्सा-रना भेटायला मी सरकारी बँकेत गेलो. संपावरील कारकुनांनी निर्माण

---

पडदा" म्हणून विक्झेल बरोबरच्या वाटाघाटींचा उपयोग करण्यात येणार होता. पण या वाटाघाटींमध्ये बोल्शेविकांतर्फे भाग घेणाऱ्या कामेनियेव आणि सकोल्निकोव यांनी लेनिन व मध्यवर्ती समिती यांच्या आदेशांप्रमाणे न वागता विक्झेलच्या मागण्यांना मान्यता दिली व प्रतिक्रांतिकारक मेन्शेविक आणि समाजवादी-क्रांतिकारक पक्षांच्या प्रतिनिधींना आपल्याबरोबर सर-कारमध्ये समाविष्ट करण्यास ते कबूल झाले.

१५ नोव्हेंबर रोजी, लेनिन यांच्या ठरावानुसार, या पक्षांबरोबरचा करार नाकारणारा ठराव मध्यवर्ती समितीने मंजूर केला. ठरावात भर देऊन म्हटले होते की, "सोविएत सत्तेच्या घोषणेशी विश्वासघात केल्याविना विशुद्ध बोल्शेविक सरकारला नाकारणे अशक्य आहे," कारण सोविएतांच्या अखिल रशिया कॉंग्रेसने या देशामधील सत्ता या सरकारच्या हाती सोपवली आहे. म्हणून रीड यांनी याठिकाणी उद्धृत केलेले कामेनियेव यांचे शब्द सर्व बोल्शेविकांच्या भावना व्यक्त करीत नाहीत, तर रशियामध्ये समाज-सत्तावादी क्रांती घडणे अशक्य आहे अशी मनोधारणा बाळगणाऱ्या मध्यवर्ती समितीमधील एका छोटचा संधिसाधूवादी गटाच्या भावना व्यक्त करतात. —सं.

केलेल्या गोंधळात स्थिरस्थावरता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न ते करीत होते. त्या प्रचंड इमारतीमधील सर्व कचेऱ्यांमधून घामेजलेले स्वयंसेवक कामगार, सैनिक आणि खलाशी काम करीत होते; गोंधळल्या मनःस्थितीत त्या मोठमोठ्या कीर्दखतावण्यांची पाने धुंडाळण्याच्या परिश्रमांनी त्यांचे जीव मेतकुटीला आलेले दिसत होते...

दूमाच्या इमारतीत लोकांची गर्दी दाटलेली होती. नव्या सरकारला धुडकावून लावण्याचे तुरळक प्रसंग तेथे घडत होते, पण असे आता क्वचित होत होते. मध्यवर्ती भूमी समितीने किसानांना आवाहन केले होते की, सोविएतांच्या काँग्रेसने मंजूर केलेल्या जमीनविषयक आज्ञापत्रकाला त्यांनी मान्यता देऊ नये, कारण त्यामुळे गोंधळ आणि यादवी युद्ध यांची भीती निर्माण झाली असती. महापौर श्रायडर यांनी निवेदन केले होते की, बोल्शेविक उठावामुळे घटनात्मक सभेच्या निवडणुका बेमुदत पुढे ढकलाव्या लागणार होत्या.

यादवी युद्धाच्या क्रौर्यामुळे धसकलेल्या सर्व मनांमध्ये दोन प्रश्न प्रामुख्याने घोटाळत असलेले जाणवत होते; पहिला, रक्तपाताला आवर घालणाऱ्या शस्त्रसंधीचा[3] – दुसरा, नव्या सरकारच्या निर्मितीचा. "बोल्शेविकांना नष्ट करण्याची" भाषा इतःपर ऐकू येत नव्हती आणि जन-समाजवादी व किमान सोविएते यांचा अपवाद वगळता, बोल्शेविकांना सरकारमधून वगळावे असे कुणीही म्हणत नव्हते. स्मोल्नीचा कट्टर शत्रू समजल्या जाणाऱ्या मुख्य ठाणाच्या मध्यवर्ती सेना समितीनेसुद्धा मोगीलेव यांच्या मार्फत फोन केला: "नवे मंत्रिमंडळ बनवायचे असेल तर बोल्शेविकांशी समझोता करणे आवश्यक आहे, मंत्रिमंडळात त्यांना **अल्पसंख्यांमध्ये** प्रवेश देण्यास आमची मान्यता आहे."

'प्रावदा'ने उपहासाने केरेन्स्कींच्या "मानवतावादी भावनां"कडे लक्ष वेधून, त्यांनी रक्षक समितीला पाठवलेला खलिता प्रसिद्ध केला:

> "रक्षक समितीच्या आणि तिच्याभोवती एकत्रित झालेल्या सर्व लोकशाहीवादी संघटनांच्या प्रस्तावांनुसार, बंडखोरांविरोधी सर्व लष्करी हालचाली मी थांबविल्या आहेत. वाटाघाटींसाठी समितीचा एक प्रतिनिधी पाठवलेला आहे. निष्कारण रक्तपात थांबविण्यासाठी सर्व उपाययोजना करा."

विक्झेलने सर्व रशियाला उद्देशून एक तार पाठवली होती:

"समझोता होणे आवश्यक आहे असे मान्य करणाऱ्या दोन्ही युद्ध-मान पक्षांच्या प्रतिनिधींबरोबर चाललेली रेलकामगारांच्या युनियनची परिषद, यादवी युद्धामध्ये राजकीय दहशतवादाचा वापर करण्याविरुद्ध जोरदार निषेध करीत आहे – विशेषत: क्रांतिकारक लोकशाहीच्या भिन्न गटांमध्ये हे यादवी युद्ध चालू असताना – आणि जाहीर करीत आहे की, कोणत्याही प्रकारचा राजकीय दहशतवाद हा वाटाघाटींच्या मूळ कल्पनेशीच विसंगत आहे ..."

परिषदेहून* आघाडीवर, गात्चिनाला प्रतिनिधीमंडळे पाठवण्यात आली होती. खुद्द परिषदेत असे भासत होते की, सर्व काही अंतिम निर्णयाच्या अवस्थेला येऊन पोचले आहे. हंगामी जन-मंडळ स्थापन करण्याचेही निश्चित झाले. सुमारे चारशे सदस्यांच्या या मंडळात स्मोल्नीचे पंचाहत्तर, जुन्या केंद्रीय कार्यकारी समितीचे पंचाहत्तर प्रतिनिधी असणार होते व बाकीचे नगर दूमा, ट्रेड युनियना, भूमी समित्या आणि राजकीय पक्षांमध्ये वाटून दिले जाणार होते. नवे पंतप्रधान म्हणून चेर्नोव यांचा उल्लेख केला होता. अफवा होती की, लेनिन आणि ट्रॉट्स्कींना वगळण्यात येणार होते ...

---

दुपारच्या प्रहरी मी पुन्हा स्मोल्नीच्या पुढील भागात होतो. क्रांतिकारक आघाडीवर निघालेल्या फिरत्या दवाखान्याच्या ड्रायव्हरशी बोलत होतो. त्याच्याबरोबर मी जाऊ शकेन का, असे मी त्याला विचारले आणि त्याने तात्काळ होकार भरला. विद्यापीठातला तो विद्यार्थी स्वयंसेवक म्हणून काम करीत होता. रस्त्यावरून आम्ही भरवेगाने जात असताना तो भ्रष्ट जर्मन भाषेतली वाक्ये माझ्या दिशेने फेकत होता: «Also, gut! Wir nach die Kasernen zu essen gehen!»** कुठल्यातरी बराकींमध्ये दुपारचे जेवण होईल, एवढाच मी त्यावरून अर्थ काढला.

किरोचनायावर आम्ही लष्करी इमारतींनी वेढलेल्या एका विस्तीर्ण आवारात शिरलो. अंधारा जिना चढून एका बैठ्या छताच्या खोलीत गेलो.

---

* "समझोता परिषदे"चा – नवे सरकार स्थापन करण्याबाबत वाटाघाटी करण्यासाठी भरविलेल्या परिषदेचा येथे संदर्भ आहे. – सं.

** या वाक्याचा मतितार्थ "ठीक आहे, आपण आता जाऊ आणि बराकींमध्ये जेवण घेऊ." – सं.

त्या खोलीला एकच खिडकी होती आणि तिच्यामधून प्रकाश येत होता. एका लांबड्या लाकडी मेजाशी सुमारे वीस सैनिक बसले होते व एका भल्या मोठ्या पत्र्याच्या घंगाळ्यामधून कोबीचे सूप लाकडी चमच्यांनी भुरकत होते. मोठमोठ्याने हसत खिदळत त्यांच्या गप्पा चालल्या होत्या.

"सहाव्या राखीव इंजिनिअर बटालियनच्या बटालियन समितीमध्ये तुमचे स्वागत असो!" माझा मित्र मोठ्यांदा ओरडला आणि अमेरिकन समाजवादी म्हणून त्याने माझी इतरांशी ओळख करून दिली. त्यासरशी माझ्याशी हस्तांदोलन करायला प्रत्येक जण उठून उभा राहिला. एका वृद्ध सैनिकाने मला आपल्या बाहूंमध्ये धरले आणि मनापासून प्रेमाने माझे चुंबन घेतले. एक लाकडी चमचा माझ्या हाती देण्यात आला आणि मी मेजाशी बसलो. खीर भरलेले आणखी एक घंगाळे आणण्यात आले, काळ्या पावाचा भला मोठा तुकडा समोर ठेवण्यात आला आणि अर्थातच अपरिहार्यपणे चहाची भांडी आली. प्रत्येकाने एकाच वेळी मला अमेरिकेबद्दल प्रश्न विचारायला आरंभ केला: स्वतंत्र देशातले लोक आपली मते **पैशाला** विकतात हे खरे का? असे असेल तर त्यांना जे पाहिजे ते कसे मिळते? या "टॅमानी"*चे कसे काय? स्वतंत्र देशामध्ये लोकांचा एक छोटा गट सबंध शहरावर ताबा ठेवतो आणि वैयक्तिक फायद्यासाठी त्या शहराचे शोषण करतो हे खरे का? लोक हे सहन का करतात? रशियामध्ये झारच्या अमदानीतसुद्धा अशा गोष्टी घडू शकल्या नसत्या; इथे लाचलुचपत नेहमी चालत आलीय हे खरे असले तरी लोकांनी भरलेले अख्खे शहर विकत घ्यायचे आणि विकायचे म्हणजे काय? ते सुद्धा एका स्वतंत्र देशात! लोकांमध्ये क्रांतिकारक भावना नाहीत काय? मी खुलासा करण्याचा प्रयत्न केला की, माझ्या देशामध्ये लोक कायद्यामार्फत परिस्थिती बदलण्याचा प्रयत्न करतात.

"ते ठीक आहे," फ्रेंच बोलणारा बक्लानोव नांवाचा एक तरुण सार्जंट मान डोलवीत म्हणाला. "पण तुमच्याकडं अत्यंत प्रगत भांडवलदारी वर्ग आहे ना? मग भांडवलदारी वर्गाच्या ताब्यात कायदेमंडळ आणि न्यायालयं असणार! अशा परिस्थितीत लोक काय परिस्थिती बदलणार? माझं चुकीचं

---

*"टॅमानी हॉल"—न्यूयॉर्क येथील अमेरिकन डेमॉक्रॅटिक पक्षाची मुख्य कचेरी. त्यावेळी उघडकीला आलेल्या काही निंद्य प्रकारांनंतर लाचलुचपत आणि गुन्हेगारीला "टॅमानी" असा प्रतिशब्द वापरला जाऊ लागला.—सं.

असण्याची शक्यता आहे, कारण मला तुमचा देश माहीत नाही; पण मला हे सारं अतर्क्य वाटतं..."

मी त्सारस्कोये सेलो येथे चाललोय असे सांगितले. "मी सुद्धा," अचानक बक्लानोव म्हणाला. त्या पाठोपाठ "आणि मी – आणि मी" – अशा आवाजांचा त्या खोलीत एकच गिल्ला व तेथल्या तेथे खोलीतल्या सर्वांनी त्सारस्कोये सेलोला जाण्याचा निर्णय घेतला.

तेवढ्यात दारावर कुणीतरी ठोठावले. ते उघडले गेले आणि कर्नल यांची आकृती उभी राहिलेली दिसली. कुणीही उठून उभे राहिले नाही, पण सर्वांनी ओरडून त्यांचे स्वागत केले. "मी आत येऊ शकतो काय?" कर्नलनी विचारले. "आत या!" सर्वांनी मनःपूर्वक उत्तर दिले.

सोनेरी कशिदाकाम केलेली मेंढ्याच्या कातड्याची टोपी घातलेले हसत-मुख, धिप्पाड, उंच व्यक्तिमत्वाचे कर्नल खोलीत आत आले. "कॉम्रेडहो, तुम्ही त्सारस्कोये सेलोला चालला आहात असं मी ऐकलं," ते म्हणाले. "मी तुमच्याबरोबर आलेलं चालेल का?"

"बक्लानोवने थोडा विचार केला. "आज इथं काही काम करायचं आहे असं मला वाटत नाही," तो उत्तरला. "कॉम्रेड, आमच्या बरोबर तुम्ही आलात तर आम्हाला आनंद वाटेल." कर्नलनी त्याचे आभार मानले व चहाने भरलेला प्याला घेऊन ते खाली बसले.

कर्नलांचा अभिमान दुखावला जाऊ नये म्हणून बक्लानोवने खालच्या आवाजात मला खुलासा केला. "त्याचं काय आहे, मी समितीचा अध्यक्ष आहे. बटालियनवर आमचा पूर्ण ताबा आहे; फक्त लढाईच्या वेळी आम्ही कर्नलांच्या हाती सर्व अधिकार देतो. लढाईच्या वेळी त्यांचे हुकूम मानले पाहिजेत, पण ते आम्हाला सर्वथा जबाबदार आहेत. कोणतीही कृती करण्यापूर्वी बराकींमध्ये त्यांनी आमची परवानगी विचारली पाहिजे... तुम्ही त्यांना आमचे कार्यकारी अधिकारी म्हणू शकता..."

आम्हाला बंदुका आणि रिवॉल्वर अशी शस्त्रे वाटण्यात आली – "कदाचित कझाकांशी गाठ पडण्याची शक्यता आहे" – मला सांगण्यात आले. आम्ही सारेजण त्या फिरत्या दवाखान्यात दाटीवाटीने बसलो. आघाडीवर वाटण्यासाठी बरोबर वर्तमानपत्रांचे तीन भले मोठे गठ्ठे घेतले होते. लितेयनी महामार्गावरून सरळ धडधडत आम्ही झागोरद्नी महामार्गाला लागलो. माझ्यापुढेच खांद्यावर लेफ्टनंटच्या हुद्द्याच्या फिती लावलेला एक तरुण

जमला होता. त्याला बहुतेक सर्व युरोपीय भाषा सफाईदारपणे बोलता येत होत्या असे दिसत होते. तो बटालियन समितीचा सभासद होता.

"मी बोल्शेविक नाही," त्याने ठासून जोर देत मला सांगितले. "माझं घराणं फार जुनं आणि खानदान आहे. मी स्वत: कॅडेट आहे असं मानायला हरकत नाही..."

"पण कसं—?" मी गोंधळून विचारले.

"होय, मी समितीचा सभासद आहे. माझी राजकीय मतं झाकून ठेवण्याचा मी प्रयत्न करीत नाही, पण त्याचं इतरांना काही वाटत नाही, कारण बहुसंख्याकांच्या इच्छेला विरोध करण्यावर माझा विश्वास नाही हे त्यांना ठाऊक आहे... सध्याच्या यादवी युद्धात कोणतीही हालचाल करायला मी नकार दिलाय, कारण माझ्या रशियन बांधवांविरुद्ध शस्त्र उचलण्याच्या मताचा मी नाही..."

"चिथावणीखोर! कोर्निलोववादी!" दुसऱ्या एकाने गंमतीने त्याच्या खांद्यावर थाप मारून त्याला चिडवले...

मस्कोव्स्की गेटाच्या प्रचंड भुरकट दगडी कमानीवर सोनेरी अक्षरे, प्रचंड शाही गरुड आणि वेगवेगळ्या झारांची नांवे कोरलेली होती. त्या कमानीखालून आम्ही भरवेगाने रुंद, सरळ महामार्गावरून जाऊ लागलो. पहिल्या हलक्याशा हिमवर्षावाने रस्ता बनला होता. क्रांती आघाडीवर पायी निघालेल्या लाल रक्षकांनी रस्ता फुलला होता. ते ओरडत होते, गात होते. आणि दुसऱ्या बाजूने काळवंडल्या चेहऱ्याचे व चिखलाने माखलेले परत येत होते. त्यांच्यापैकी बहुतेक पोरगेले होते. बायका हाती फावडी घेऊन चाल-ल्या होत्या, काहींच्या हाती रायफली होत्या व दारूगोळ्याचे तोस्तान अडकवण्याचे कातडी पट्टे त्यांच्या खांद्यावर लटकावलेले होते. काहींच्या दंडांवर रेड-क्रॉस चिन्हाच्या फिती बांधलेल्या होत्या. गलिच्छ वस्त्यांमधून राहणाऱ्या, श्रमांनी थकलेल्या-वाकलेल्या अशा त्या बायका होत्या. सैनि-कांच्या तुकड्या तालबद्ध चालत नव्हत्या व काही सैनिक लाल रक्षकांना प्रेमाने साद घालीत होते; खलाशी गंभीर दिसत होते; मुले आपल्या आई-बापांसाठी खाण्याच्या पदार्थांची बोचकी घेऊन चालली होती. ही सारी जाण्या-येण्याची रहदारी त्या महामार्गाच्या फरसबंदी दगडांना, इंच इंचभर माखलेल्या पांढुरक्या चिखलाला तुडवीत चालली होती. आम्हाला तोफ-गाड्या दारूगोळ्याच्या पेटयांसह दक्षिणेकडे रुणझुण आवाज करीत चालले-ल्या दिसल्या; सशस्त्र लोकांनी खच्चून भरलेल्या मालमोटारी दोन्ही दिशांनी

धावत होत्या. लढाईच्या ठिकाणाच्या दिशेने येणाऱ्या रुग्णवाहिका जखमींनी पुरेपूर भरलेल्या होत्या. एका किसानाच्या हळूहळू खडखडत चाललेल्या छकड्यात विवर्ण चेहऱ्याचा एक मुलगा आपल्या घायाळ पोटावर झुकून बसला होता व एकसुरात किंचाळत होता. दोन्ही बाजूंच्या शेतांमधून बायका आणि म्हातारी माणसे खंदक खणत होती आणि काटेरी तारांचे अडथळे उभारत होती.

मागे उत्तरेच्या दिशेला मोठ्या नाट्यपूर्ण रीतीने ढग बाजूला झाले आणि फिकट सूर्य त्यांच्यामधून बाहेर आला. सपाट, दलदली मैदानाच्या पलिकडे पेत्रोग्राद चमकत होते. उजव्या बाजूला पांढरे, मुलामेदार आणि रंगीबेरंगी घुमट आणि मिनार होते; डाव्या बाजूला उंच उंच धुराडी होती व काहींमधून काळा धूर ओकला जात होता; त्यापलिकडे फिन्लंडचे खाली झुकलेले आकाश होते. आमच्या दोन्ही अंगांना प्रार्थनामंदिरे आणि मठ होते... अधूनमधून एखादा भिक्षू दिसायचा. रस्त्यावरून जाणाऱ्या कामगारवर्गीय सेनेच्या थडथडणाऱ्या नाडीचे स्पंदन तो शांतपणे निरखीत असायचा.

पूल्कोवो येथे रस्त्याला फाटे फुटले होते. तीन दिशांनी येणारे लोकांचे प्रवाह तेथे एकवटून प्रचंड गर्दी जमली होती. आम्हीही तेथे थोडा वेळ थांबलो. मित्रांच्या भेटी होत होत्या, उत्तेजित स्वरांनी ते एकमेकांची अभिनंदने करीत होते, लढाईच्या हकिकती वर्णन करून सांगत होते. दोन रस्ते एकमेकांना मिळत होते त्यांच्या समोरच्या घरांच्या रांगेवर बंदुकीच्या गोळ्यांच्या खुणा उमटलेल्या होत्या व त्यांच्या भोवतीची अर्धा मैल जमीन पायांखाली तुडवली गेल्याने सर्वत्र चिखलच चिखल माजला होता. इथे तुंबळ लढाई झाली होती... जवळच स्वाररहित कझाकांचे घोडे भुकेने व्याकुळ होऊन गोल चकरा मारीत होते, कारण या मैदानातले गवत केव्हाच वाळून गेले होते. आमच्या समोरच एक लाल रक्षक एका घोड्यावर स्वार होण्याची वेडीवाकडी धडपड करीत होता, पुनःपुन्हा खाली पडत होता आणि भोवतालचे सुमारे हजार रांगडे पुरुष त्या दृश्यापासून बालिश आनंद मिळवीत खिदळत होते.

डाव्या बाजूच्या रस्त्यावरून कझाकांच्या उरलेल्या तुकड्यांनी माघार घेतली होती. तो रस्ता एका छोट्या टेकडीवर वसलेल्या बारक्याशा खेड्याकडे जात होता. तेथून विस्तीर्ण पसरलेल्या मैदानाचा मोठा देखणा देखावा दिसत होता. वारा पडलेल्या धूसर सागराप्रमाणे ते मैदान भासत होते,

उसळत्या ढगांनी त्याच्यावर एकच दाटी केली होती आणि शाही नगरीमधून सर्व रस्त्यांवर हजारो लोकांचे लोंढे भराभरा बाहेर पडत होते. डाव्या अंगाला दूरवर क्रास्नोये सेलोची छोटी टेकडी उभी होती, शाही रक्षकांच्या उन्हाळी छावणीचे कवायती मैदान जवळच पसरले होते आणि नजीकच शाही गो-शाळा होती. मधल्या अंतरात एकसुरी सपाट मैदानात इतर कसलाही व्यत्यय नव्हता. फक्त भिंतींच्या उंच कुंपणांनी वेढलेले काही मठ आणि महिलाश्रम, काही एकाकी कारखान्यांच्या इमारती आणि झाडीझुडपे बेसुमार वाढलेल्या आश्रमांच्या आणि अनाथालयाच्या अनेक मोठ्या इमारती तेवढ्या मधून मधून डोकावत होत्या...

आम्ही एका ओसाड टेकडीवरून जात असताना ड्रायव्हर म्हणाला, "या ठिकाणी वेरा स्लूत्स्काया मारल्या गेल्या. होय, दूमाच्या बोल्शेविक मदस्या. आज सकाळच्याच प्रहरी हे घडलं. झालकिन्द आणि आणखी एक इसम यांच्याबरोबर त्या मोटारीतून चालल्या होत्या. शस्त्रसंधी झाला होता आणि आघाडीवरच्या खंदकांकडं जाण्यासाठी ते निघाले होते. हसत-बोलत ते चालले होते. त्याचवेळी पलिकडून एक चिलखती आगगाडी चालली होती व खुद्द केरेन्स्की तिच्यामधून प्रवास करीत होते. अचानक कुणीतरी ही मोटार पाहिली आणि तिच्यावर तोफ डागली. तोफगोळा नेमका वेरा स्लूत्स्काया यांच्या वर्मी लागला आणि त्या ठार झाल्या..."

अशा प्रकारे आम्ही त्सारस्कोयेमध्ये आलो. कामगारवर्गीय सेनेमधील दिमाखात वावरणाऱ्या वीरांची तेथे एकच गर्दी उसळली होती. जेथे सोविएत भरली होती त्या प्रासादात आता धामधूम चालू होती. लाल रक्षकांनी आणि खलाशांनी आवार भरून गेले होते. दारांशी पहारेकरी उभे होते. संदेशवाहकांची आणि कमिस्सारांची आत-बाहेर पळापळ चालू होती. सोवि-एतच्या दालनात एक समोवार पेटत होता, त्याच्याभोवती सुमारे पन्नासएक कामगार, सैनिक, खलाशी आणि अधिकारी चहा पीत उभे होते. अगदी दीपेच्या आवाजात त्यांच्या गप्पा चालल्या होत्या. एका कोपऱ्यात दोन अननु-भवी कामगार सायक्लो मशिन चालू करण्याची खटपत करीत होते. मध्य-भागी ठेवलेल्या टेबलाशी धिप्पाड दीबेन्को नकाशावर झुकून लाल आणि निळ्या पेन्सिलींनी शिपायांच्या मोर्चांच्या जागांवर खुणा करीत होते. त्यां-च्या रिकाम्या हातात नेहमीप्रमाणे भले मोठे निळे पोलादी रिवॉल्वर होते. थोड्याच वेळात ते टंकलेखनयंत्रापाशी बसले व एकाच बोटाने टंकलेखन

करू लागले; मधून मधून ते थांबत, रिवॉल्वर उचलून घेत व प्रेमाने त्याला कुरवाळत.

भिंतीशी एक सोफा पडला होता व त्यावर एक तरुण कामगार आडवा पसरला होता. दोन लाल रक्षक त्याच्यावर ओणवे झाले होते. पण इतर लोक तिकडे अजिबात लक्ष देत नव्हते. त्या तरुणाच्या छातीवर भोक पडले होते. काळजाच्या प्रत्येक ठोक्याबरोबर त्याच्या कपडयांमधून ताज्या रक्ताचा लोट बाहेर उसळून येत होता. त्याचे डोळे मिटलेले होते; त्याचा तरुण, दाढी राखलेला चेहरा हिरवट-फिकट पडला होता. अत्यंत मंदपणे आणि हळूहळू त्याचा अद्याप श्वासोच्छ्वास चालू होता, प्रत्येक श्वासाबरोबर पुट-पुटत होता, "शांतता येणार आहे! शांतता येणार आहे!"

आम्ही आत आलो त्याक्षणी दीबेन्को यांनी वर पाहिले. "अरे वा," ते बक्लानोवला म्हणाले. "कॉम्रेड, तुम्ही सेना नायकाच्या मुख्य कचेरीत जाऊन तिथला कारभार हाती घेता का? थांबा, मी तुम्हाला अधिकारपत्र लिहून देतो." ते टंकलेखनयंत्रापाशी गेले आणि हळू हळू एकेक अक्षर त्यांनी टंकलिखित केले.

त्सारस्कोये सेलोचे नवे सेनानायक आणि मी येकातेरीनिन्स्की प्रासादाकडे निघालो. बक्लानोव कमालीचा उत्तेजित झाला होता. नव्या हुद्द्यामुळे त्याला एकदम मोठेपणा आला होता. त्याच नक्षीदार पांढऱ्याशुभ्र दालनात काही लाल रक्षक कुतूहलाने तेथील वस्तू न्याहाळीत होते, तर माझे जुने स्नेही कर्नल महाशय खिडकीशी उभे राहून आपली मिशी कुरतडीत होते. दीर्घ काळ न भेटलेल्या भावाला पहावे तसे त्यांनी माझे स्वागत केले दारा-जवळच्या टेबलाशी तो बेस्साराबियाची फ्रेंच बसला होता. त्याने तेथेच थां-बून आपले काम पुढे चालवावे, असा बोल्शेविकांनी त्याला हुकूम केला होता.

"मी काय करणार?" तो अस्फुट पुटपुटला. "अशा प्रकारच्या युद्धात माझ्यासारखी माणसं कोणत्याही एका पक्षाच्या बाजूनं लढू शकत नाहीत. जमावाची हुकूमशाही आम्हाला मनापासून आवडत नसली तरी काही इलाज नाही... मला वाईट एवढंच वाटतं की, बेस्साराबियातल्या माझ्या आई-पासून मी फार दूर आहे!"

बक्लानोव औपचारीकरीत्या सेनानायकाचे अधिकार हाती घेत होता. घाबरट सुरात कर्नल म्हणाले, "मेजाच्या कप्प्याच्या चाव्या या इथं आहेत."

एका लाल रक्षकाने मध्येच अडवले. "पैसे कुठं आहेत?" त्याने

उर्मटपणे विचारले. कर्नलना आश्चर्य वाटले. "पैसे? पैसे? हां हां, तुम्हाला पेटी म्हणायचीय. ती तिथं आहे," कर्नल म्हणाले, "तीन दिवसांपूर्वी मी इथला ताबा घेतला तेव्हा सापडली तशीच आहे. चाव्या?" कर्नलनी खांदे उडवले. "चाव्या माझ्याजवळ नाहीत."

लाल रक्षकाने जणू काही आपल्याला सारे माहीत आहे अशा थाटात उपहासाने म्हटले, "सोयीस्कर कारण सांगितलंत!"

"आपण पेटी उघडू या," बक्लानोव म्हणाला. "कुऱ्हाड घेऊन ये. इथं आपले अमेरिकन कॉम्रेड आहेत. त्यांनाच ही पेटी फोडू दे आणि त्यांना इथं काय आढळतं ते लिहूं देत."

मी कुऱ्हाडीचा घाव घातला. ती लाकडी पेटी रिकामी होती.

"त्याला अटक करा," लाल रक्षक त्वेषाने म्हणाला. "हा केरेन्स्कीचा माणूस आहे. त्यानं पैसे चोरले आणि केरेन्स्कीला दिले."

बक्लानोवला तसे करायचे नव्हते. "छे: छे:! त्यांच्यापूर्वीच्या कोर्निलोववाद्याचं हे काम असावं. यांना दोषी धरणं योग्य नाही."

"सैतान!" लाल रक्षक ओरडला. "मी तुम्हाला सांगतो, हा केरेन्स्कीचा माणूस आहे. जर तुम्ही त्याला अटक केली नाहीत, तर आम्ही अटक करू आणि पेत्रोग्रादला नेऊन पीटर-पॉलमध्ये त्याला डांबू! तिथंच त्याची जागा आहे!" त्यावर इतर लाल रक्षकांनी आरडाओरडा करीत सहमत असल्याचे दर्शवले. बिचारे कर्नल आमच्याकडे केविलवाण्या नजरेने पहात असताना त्यांना तेथून नेण्यात आले...

सोविएत प्रासादाच्या प्रवेशद्वाराशी एक मोटारट्रक आघाडीवर जाण्यासाठी सज्ज उभा होता. एका महाधिप्पाड कामगाराच्या पुढारीपणाखाली अर्धा डझन लाल रक्षक, काही खलाशी आणि एकदोन सैनिक त्या ट्रकमध्ये चढून बसले. त्यांच्याबरोबर मी चलावे म्हणून त्यांनी ओरडून बोलावले. मुख्य ठाण्याकडून लाल रक्षकांना पन्हळी पत्र्याच्या छोटया बॉंबची बोचकी दिली होती. त्या बोचक्यांच्या वजनांनी लाल रक्षक लटपटत होते. त्या बॉंबमध्ये सुरुंगापेक्षा दहापट जोरदार आणि पाचपट संवेदनाक्षम असे ग्रुबित भरल्याचे त्यांनी सांगितले. बॉंबची बोचकी त्यांनी ट्रकमध्ये भरली. मग लाकडखंडाच्या आणि तारेच्या तुकडयांनी ट्रकच्या मागच्या बाजूस तीन इंची तोफ चढवून बांधण्यात आली.

एक जोरदार आरोळी ठोकून आम्ही अर्थातच तुफान वेगाने निघालो; तो अवजड ट्रक दोन्ही बाजूंना झुकांडया खात होता. पाठीमागे बांधलेली

तोफ एका चाकापासून दुसऱ्या चाकाकडे झेपावत होती. ग्रुबित बाँब आमच्या पावलांशी गडगडत होते व ट्रकच्या फळ्यांवर आतल्या बाजूला जोराने जाऊन आपटत होते.

व्लादीमिर निकोलायेविच नांवाच्या त्या धिप्पाड लाल रक्षकाने माझ्यावर अमेरिकेविषयीच्या प्रश्नांचा भडिमार केला. "अमेरिका युद्धात का सामील झाली? अमेरिकन कामगार भांडवलदारांना उलथून टाकायला तयार आहेत का? मूनी* खटल्याची परिस्थिती सध्या काय आहे? बर्कमनला** ते सान फ्रान्सिस्कोच्या हवाली परत करणार का?" आणि इतर असेच अनेक उत्तर द्यायला अवघड असे प्रश्न त्या ट्रकच्या प्रचंड घरघराटामधून वरच्या पट्टीत ओरडून तो विचारीत होता, तर आम्ही सारे कसेबसे एकमेकांना पकडून हेलकावे खात होतो व आमच्या पायांशी बाँबच्या गोळ्यांचा थयथयाट चालू होता.

मधून मधून गस्तीचे शिपाई आम्हाला अडवायचा प्रयत्न करीत होते. रस्त्यावर सैनिक आमच्या वाटेत आडवे धावत येत व "थांब!" असे ओरडून आमच्यावर बंदुका रोखत.

आम्ही त्यांच्याकडे मुळीच लक्ष देत नव्हतो. "सैतान तुमचा साथी!" लाल रक्षक ओरडत. "आम्ही कुणाहीसाठी थांबणार नाही! आम्ही लाल रक्षक आहोत!" आणि आम्ही दिमाखाने पुढे सुसाटत जात होतो, तर पनामा कालव्याच्या आंतरराष्ट्रीयकरणाबाबत आणि तत्सम विषयांबाबत व्लादीमिर निकोलायेविच बेंबीच्या देठापासून ओरडून मला प्रश्न विचारत होते...

सुमारे पाच मैल अंतर पुढे गेल्यानंतर, खलाशांची एक तुकडी परत

---

*टॉम मूनी – अमेरिकेतील मजूरवर्गीय चळवळीतील एक क्रियाशील ओतारी. २२ जुलै १९१६ रोजी सान फ्रान्सिस्को येथे कवायतीच्या वेळी बाँब फेकल्याच्या खोटया आरोपाखाली त्यांना मृत्युदंडाची शिक्षा झाली होती. संतापलेल्या लोकमताच्या दबावाखाली अध्यक्ष विल्सन यांना हस्तक्षेप करावा लागला व मृत्युदंडाची शिक्षा कमी करून आजीव कारावासाची शिक्षा देण्यात आली. पुढे टॉम मूनी यांचे निर्दोषित्व जरी पूर्णतया सिद्ध झाले, तरी त्यांना वीसपेक्षा अधिक वर्षे कारागृहात घालवावी लागली व रूझवेल्ट अध्यक्षपदावर येईपर्यंत त्यांची सुटका झाली नाही. – सं.

**बर्कमन यांच्यावर टॉम मूनींबरोबरच खटला भरला गेला होता. – सं.

येत असताना आम्हाला दिसली व आम्ही वेग कमी केला.

"बंधूंनो, आघाडी कुठं आहे?"

सर्वांत पुढचा सैनिक थांबला आणि डोके खाजवीत विचार करून म्हणाला, "आज सकाळी या रस्त्यापासून खालच्या अंगाला सुमारे अर्ध्या किलोमीटरवर होती. पण साली आता ती कुठंच सापडत नाहीय. आम्ही चाललो, चाललो, चाललो, पण आम्हाला सापडली नाही."

ते ट्रकमध्ये चढले आणि आम्ही पुढे निघालो. अंदाजे मैलभर अंतर गेलो न गेलो तोच व्लादीमिर निकोलायेविचनी कान टवकारून काहीतरी ऐकले आणि ट्रक थांबवायला शोफरला ओरडून सांगितले.

"गोळीबार!" ते म्हणाले. "तुम्ही ऐकलात?" क्षणभर स्मशानवत शांतता पसरली आणि नंतर, किंचित पुढे डाव्या अंगाला तीन बार लागोपाठ उडाले. त्या बाजूच्या रस्त्याला दाट झाडी होती. जेथून गोळीबार झाला होता त्या ठिकाणाच्या अगदी विरुद्ध जागी ट्रक येईपर्यंत आम्ही सरपटत, उत्तेजित होऊन एकमेकांशी दबत्या आवाजात बोलत होतो. खाली उतरून आम्ही पांगलो आणि प्रत्येकजण आपली रायफल घेऊन चोरपावलांनी जंगलात घुसला.

दरम्यान दोन साथींनी तोफ वेगळी केली आणि आमच्या जवळ जवळ पाठींशी तिचा नेम धरीपर्यंत तिला फिरवली.

जंगलात कमालीची शांतता होती. पाने झडून गेली होती आणि शरद ऋतूमधल्या फिकट, निस्तेज सूर्याच्या ऊन्हात झाडांचे बुंधे म्लान भासत होते. आमच्या पावलांखाली दबल्यामुळे चुरचुरणाऱ्या बर्फाशिवाय दुसरी काहीही हालचाल दृष्टोत्पत्तीस येत नव्हती. शत्रू दबा धरून तर बसला नव्हता ना?

झाडांची रांग विरळ होईपर्यंतचे अंतर आम्ही निर्वेध कापले. मग थोडे थांबलो. पलिकडच्या छोटया मोकळ्या जागेत तीन सैनिक बारीकशा शेकोटीभोवती बिनधास्तपणे बसले होते.

व्लादीमिर निकोलायेविच पुढे झाले. "नमस्ते कॉम्रेडहो!" त्यांनी अभिवादन केले. त्यांच्या इशाऱ्यासरशी त्यांच्या मागे एक तोफ, वीस रायफली आणि ट्रक भरून ग्रुबित बॉंब यांचा धडाका उडायला जय्यत तयारी होती. ते सैनिक दचकून एकदम उभे राहिले.

"इथं कसला गोळीबार चालू होता?"

त्यांच्यापैकी एका सैनिकाच्या चेहऱ्यावरचा ताण कमी झालेला दिसला

ИСПОЛНИТЕЛЬНЫЙ КОМИТЕТ
ПЕТРОГРАДСКОГО СОВЕТА
РАБОЧИХЪ и СОЛДАТСКИХ
ДЕПУТАТОВЪ
Военныи Отдѣлъ

28 Октября 191 г.
26143

# УДОСТОВѢРЕНIЕ.

Настоящее удостовѣренiе дано представите Американской Соцiалъ - демократiи Интернацiоналисту товарищу ДЖОНУ РИДЪ въ томъ, Военно - Революцiонный Комитетъ Петербургскаг Совѣта Рабочихъ и Солдатскихъ Депутатовъ пред - ставиевъ имъ права свободнаго проѣзда по всѣи Сѣверному фронту въ цѣляхъ освѣдомленiя нашихъ Американскихъ товарищей интернацiоналистовъ съ событiями въ Россiи.



Предсѣдатель:

Секретарь:

जॉन रीड यांना उत्तर आघाडीवर मुक्त प्रवास करण्याचा हक्क देणारी प्रवेशपत्रिका

व तो उत्तरला, "कॉम्रेड, आम्ही फक्त एक-दोन ससे मारीत होतो..."

---

स्वच्छ सूर्यप्रकाशात आमची ट्रक रोमानोवच्या दिशेने निघाली. पहिल्या फाटच्यावर दोन सैनिक आपल्या रायफली हलवीत आम्हाला आडवे आले. आम्ही वेग कमी करून थांबलो.

"कॉम्रेडहो, तुमचे परवाने कुठं आहेत?"

लाल रक्षकांनी एकच गिल्ला केला. "आम्ही लाल रक्षक आहोत. आम्हाला कसल्याही परवान्यांची गरज लागत नाही... चला पुढं! त्यांच्या-कडं लक्ष देऊ नका!"

पण एका खलाशाने आक्षेप घेतला. "इथं तुमची चूक होतीय कॉम्रे-डांनो. आपल्यात क्रांतिकारक शिस्त असली पाहिजे. समजा काही प्रति-क्रांतिकारक अशाच एखाद्या ट्रकमधून आले आणि म्हणाले: 'आम्हाला कसल्याही परवान्यांची गरज नाही!' कारण इथले कॉम्रेड तर तुम्हाला ओळखत नाहीत."

यावर तिथे एकच वादंग माजले. पण अखेरीस एकामागून एक खलाशी आणि सैनिक त्या पहिल्या खलाशाच्या बाजूचे झाले. कुरकुरत प्रत्येक लाल रक्षकाने आपला मळका कागद दाखवला. माझा सोडून त्या सर्वांचे परवाने एकसारखे होते. माझा स्मोल्नीमधल्या क्रांतिकारक सेनाधिकाऱ्यांनी दिलेला होता. पहारेकरी म्हणाले की, मला त्यांच्याबरोबर गेले पाहिजे. लाल रक्ष-कांनी त्यावर जोरदार आक्षेप घेतला, पण प्रथम जो खलाशी बोलला होता त्याने आग्रह धरला. "हे कॉम्रेड सच्चे आहेत हे आपल्याला माहीत आहे," तो म्हणाला. "पण समितीचे काही हुकूम आहेत आणि ते हुकूम पाळले पाहिजेत. त्यालाच क्रांतिकारक शिस्त म्हणतात..."

काही गोंधळ घडू नये म्हणून मी मुकाटपणे ट्रकमधून खाली उतरलो व रस्त्याच्या वळणावरून ती नाहीशी होईपर्यंत, मला हात हलवून निरोप देणाऱ्या त्या सर्वांना पहात राहिलो. त्या सैनिकांनी क्षणभर खालच्या आवा-जात एकमेकांशी सल्लामसलत केली आणि नंतर मला बरोबर घेऊन एका भिंतीशी नेऊन बसवले. एकदम माझ्या डोक्यात प्रकाश चमकला; ते मला गोळ्या घालून ठार मारणार होते!

तीनही दिशांना एकही मानवी प्राणी दृष्टीपथात नव्हता. जीवनाची एकमेव खूण म्हणजे बाजूच्या रस्त्यापासून पाव मैल अंतरावर एका लाकडी

खोपटामधून, चिमणीतून धूर बाहेर पडत होता. ते दोन सैनिक रस्त्याकडे चालले होते. जिवाच्या कराराने मी त्यांच्या मागे धावलो.

"अरे कॉम्रेडांनो! जरा नीट पहा तरी! इथं लष्करी क्रांतिकारक समितीची मोहर आहे!"

त्यांनी वेंधळयासारखे माझ्या परवान्याकडे पाहिले, मग एकमेकांकडे पाहिले.

"हा परवाना इतरांपेक्षा वेगळा आहे," एकजण रागावून म्हणाला. "बंधू, आम्हाला वाचता येत नाही."

मी त्याच्या दंडाला धरले. "चल!" मी म्हणालो. "त्या घराकडं जाऊ या. तिथं राहणाऱ्या कुणाला तरी नक्की वाचता येत असेल." ते घुटमळले. "नाही," एक म्हणाला. दुसऱ्याने मला संपूर्ण न्याहाळले. "का नाही?" तो पुटपुटला. "शेवटी निष्पाप माणसाला ठार मारणं हा गंभीर गुन्हा ठरतो..."

आम्ही त्या घराच्या पुढच्या दाराशी जाऊन ठोठावले. एका बुटक्या, भक्कम बांध्याच्या बाईने दरवाजा उघडला आणि सावध होऊन ती एकदम मागे सरली व चाचरत बोलू लागली, "मला त्यांच्याबद्दल काही एक माहिती नाही – खरंच नाही!"

माझ्याबरोबरच्या एका रक्षकाने माझा परवाना तिच्यासमोर धरला. ती किंचाळली. "कॉम्रेड, जरा वाचून दाखवा." तो म्हणाला. बिचकत तिने तो कागद हातात घेतला आणि मोठ्याने भरभर वाचला:

**"हा परवाना धारण करणारे जॉन रीड हे अमेरिकन सामाजिक-लोकशाहीचे एक प्रतिनिधी आहेत, एक आंतरराष्ट्रीयवादी आहेत..."**

बाहेर रस्त्यावर त्या दोन सैनिकांनी पुन्हा एकमेकांशी सल्लामसलत केली. "तुम्हाला घेऊन रेजिमेंटच्या समितीकडं गेलं पाहिजे," ते म्हणाले. वेगाने गडद होत जाणाऱ्या संधिप्रकाशात चिखलभरल्या रस्त्यावरून आम्ही रखडत निघालो. मधून मधून आम्हाला सैनिकांच्या तुकड्या भेटत होत्या, ते थांबत आणि धडकी भरविणाऱ्या नजरांनी पहात मला गराडा घालीत, सारेजण माझा परवाना न्याहाळून पहात आणि मला ठार करावे किंवा नाही याबाबत जोरजोराने वाद घालीत...

त्सारस्कोये सेलो रायफलच्या क्रमांक दोनच्या तुकडीच्या बराकींपर्यंत आम्ही पोचलो तेव्हा अंधार पडला होता. रस्त्याच्या कडेला उतरत्या छप-

रांच्या इमारतींची दाटी उभी होती. फाटकाशी ढिसाळपणे रेंगाळणाऱ्या अनेक सैनिकांनी उत्सुकतेने चौकशा केल्या: "हेर? चिथावणीखोर?" एका वाटोळ्या जिन्यावरून चढून जाऊन आम्ही एका भल्यामोठ्या उघड्याबोडक्या हॉलमध्ये आलो. तेथे मध्यभागी प्रचंड चुलाणा होता, फरशीवर रांगांनी खाटा उभ्या होत्या व सुमारे हजारभर सैनिक पत्ते खेळत होते, गात होते किंवा झोपले होते. छपराला केरेन्स्कींच्या तोफेने एक भगदाड पाडले होते.

मी दारात उभा राहिलो त्याक्षणी त्या सर्व गटांमध्ये एकदम शांतता पसरली व मागे वळून माझ्याकडे टक लावून ते पाहू लागले एकाएकी त्या सर्वांनी पुढे सरकायला सुरुवात केली. प्रथम ते हळू हळू आले व नंतर एकदम जोरात आरोळ्या ठोकीत धावून आले. त्यांच्या चेहऱ्यांवर पुरेपूर द्वेष भरला होता. "कॉम्रेडहो! कॉम्रेडहो!" माझा एक रक्षक मोठ्याने ओरडला. "समिती! समिती!" तो जमाव थांबला. माझ्याभोवती वेढा घालून कुजबुजू लागला. त्यातला एक सडपातळ तरुण वाट काढीत माझ्याजवळ आला. त्याच्या दंडावर लाल फीत होती.

"कोण आहे हा?" त्याने राकट आवाजात विचारले. रक्षकांनी खुलासा केला. "बघू कागद!" त्याने माझ्याकडे चौकस डोळ्यांनी कटाक्ष टाकीत तो कागद काळजीपूर्वक वाचला. मग तो हसला आणि माझा परवाना माझ्यापाशी परत दिला. "कॉम्रेडहो, हे अमेरिकन कॉम्रेड आहेत. मी समितीचा अध्यक्ष आहे आणि आमच्या रेजिमेंटमध्ये मी तुमचं स्वागत करतो..." त्या एकाएकी सुरू झालेल्या गोंगाटाचे स्वागतपर आरोळ्यांमध्ये रूपांतर झाले आणि माझ्याशी हस्तांदोलन करण्यासाठी ते पुढे पुढे घुसू लागले.

"तुमचं जेवण झालं नसेल ना? इथं आमची जेवणं झालीत. तुम्ही अधिकाऱ्यांच्या क्लबात चला, तिथं तुमची भाषा बोलणारे काहीजण आहेत..."

त्याने मला आवारामधून दुसऱ्या इमारतीच्या दाराकडे नेले. खांद्यावर लेफ्टनंटच्या हुद्द्याच्या फिती लावलेला, उच्चकुलीन दिसणारा एक तरुण प्रवेश करीत होता. अध्यक्षाने मला त्याच्या हवाली केले व हस्तांदोलन करून तो माघारी गेला.

"मी स्तेपान गेओर्गियेविच मोरोव्स्की, आपल्या सेवेला हजर आहे," तो लेफ्टनंट अस्खलित फ्रेंच भाषेत म्हणाला.

नक्षीदार प्रवेशदालनामधून एक कमानदार देखणा जिना वरपर्यंत गेला होता व त्यावर बिलोरी झुंबरे चमकत होती. दुसऱ्या मजल्यावर हॉलमधून

बिलियर्डच्या खोल्या, पत्ते खेळायच्या खोल्या व ग्रंथालयाकडे वाटा जात होत्या. आम्ही भोजन-कक्षात शिरलो. तेथे मध्यभागी टेवलेल्या लांबलचक मेजापाशी संपूर्ण गणवेष परिधान केलेले, सोनेरी आणि चांदीच्या मुठींच्या तलवारी लटकावलेले, शाही बहुमानाच्या फिती व पदके लावलेले सुमारे वीस अधिकारी बसले होते. मी प्रवेश करताच सर्व आदबीने उठून उभे राहिले व धिप्पाड, भारदस्त व्यक्तिमत्वाच्या, भुऱ्या दाढीवाल्या कर्नल महाशयांशेजारी मला बसायला जागा करून दिली. ऑर्डर्ली कुशलपणे जेवण वाढत होते. युरोपातल्या कोणत्याही लष्करी अधिकाऱ्यांच्या भोजनगृहात जसे वातावरण आढळले असते, तसेच तेथील वातावरण होते. क्रांती कुठे होती?

"तुम्ही बोल्शेविक नाही?" मी मोरोव्स्कींना विचारले.

त्या टेबलावरील सर्वांच्या चेहऱ्यांवर स्मित पसरले. पण एकदोघेजण ऑर्डर्लीकडे चोरून कटाक्ष टाकत असलेले मी पाहिले.

"नाही," माझे स्नेही उत्तरले. "या रेजिमेंटमध्ये फक्त एक बोल्शेविक अधिकारी आहे. रात्री तो पेत्रोग्रादमध्ये आहे. कर्नल मेन्शेविक आहेत. कॅप्टन खेर्लोव कॅडेट आहेत. मी स्वतः उजव्या गटाच्या समाजवादी-क्रांति-कारक पक्षाचा आहे... सैन्यातले बहुतेक अधिकारी बोल्शेविक नाहीत असं म्हटलं तरी चालेल, पण माझ्याप्रमाणंच त्यांची लोकशाहीवर श्रद्धा आहे; सर्वसाधारण सैनिकांना अनुसरलं पाहिजे असे त्यांना वाटतं..."

जेवण संपले, नकाशे आणण्यात आले आणि कर्नलनी ते मेजावर पसरले. बाकीचे निरीक्षण करायला दाटीवाटीने उभे राहिले.

पेन्सिलीच्या खुणांकडे निर्देश करून कर्नल म्हणाले, "आज सकाळी आपण इथं होतो. व्लादीमिर किरीलोविच, तुमची कंपनी. कुठं आहे?"

कॅप्टन खेर्लोवनी जागा दाखवली. "हुकूमांप्रमाणं, या रस्त्यावर आम्ही जागा धरल्या. पाच वाजता कार्साविननी मला मोकळं केलं..."

तेवढ्यात दार उघडले गेले आणि एका सैनिकासह रेजिमेंट समितीचे अध्यक्ष आत आले. कर्नल यांच्या पाठीशी उभ्या राहिलेल्या जमावात तेही सामील झाले व नकाशावर डोकावू लागले.

"छान," कर्नल म्हणाले. "आता आपल्या क्षेत्रात कझाकांनी दहा किलोमीटरपर्यंत माघार घेतलीय. पुढं घुसून मोर्चे लावण्याची गरज आहे असं मला वाटत नाही. सद्गृहस्थहो, आजच्या रात्रीपुरत्या तुम्ही आपापल्या जागा सांभाळून रहा आणि मोर्चे भक्कम करण्यासाठी—"

"जरा माफ करा." रेजिमेंट समितीच्या अध्यक्षांनी कर्नलना मध्येच अडवून म्हटले. "सर्व वेगानिशी पुढं जाऊन सकाळच्या प्रहरी गात्चिनाच्या उत्तरेला कझाकांशी झुंज घेण्याची तयारी करण्याचे हुकूम आहेत. जोरदार पराभव करणं जरूरीचं आहे. कृपा करून त्याप्रमाणं योग्य त्या हालचाली कराव्यात..."

क्षणकाल तिथे स्तब्धता पसरली. कर्नल पुन्हा नकाशाकडे वळले. "ठीक आहे," वेगळ्या सुरात ते म्हणाले. "स्तेपान गेओर्गियेविच तुम्ही–" निळ्या पेन्सिलीने भरभर खुणा करीत त्यांनी आपले हुकूम दिले. दरम्यान एक सार्जंट लघुलिपीत टिपणे घेत होता. मग सार्जंट तेथून निघून गेला आणि दहा मिनिटांनंतर टंकलिखित हुकुमांचा कागद व त्याची एक नक्कल-प्रत घेऊन आला. समितीच्या अध्यक्षांनी हुकुमांच्या नक्कल-प्रतीला समोर ठेवून नकाशाचा अभ्यास केला.

"ठीक आहे," उठत ते म्हणाले. ती प्रत घडी करून त्यांनी आपल्या खिशात ठेवली. मग दुसऱ्या कागदावर त्यांनी सही केली, आपल्या खिशातून काढलेल्या गोलाकार मोहोरेचा शिक्का त्यावर मारला आणि तो कागद कर्नलांच्या हवाली केला...

इथे क्रांती होती!

---

रेजिमेंटच्या सेनाधिकाऱ्यांच्या मोटारीतून मी त्सारस्कोयेमधील सोविएत प्रासादात परतलो. अजूनही कामगारांचे, सैनिकांचे आणि खलाशांचे लोंढे आत-बाहेर करीत होते; अजूनही दाराशी ट्रकमोटारी, चिलखती गाड्या, तोफा यांची दाटी कोंदली होती व अपरिचित विजयाच्या आरोळ्या आणि हशा वातावरणात उमटत होता. अर्ध्या डझन लाल रक्षकांनी त्या गर्दीतून वाट काढली. त्यांच्या मध्यभागी एक धर्मगुरू होता. लाल रक्षकांचे म्हणणे होते की, कझाक जेव्हा शहरात घुसले तेव्हा या इवानबाबाने त्यांना आशीर्वाद दिले होते. नंतर मी ऐकले की, त्याला गोळी घालून मारण्यात आले.[4]

दीबेन्को नुकतेच बाहेर येत होते आणि आपल्या उजव्या-डाव्या बाजूच्या लोकांना भराभरा आज्ञा देत होते. आपल्या हातात त्यांनी मोठे रिवॉल्वर खाळगले होते. वळणावर एक मोटार इंजिन सुरू ठेवून उभी होती. ते मागील आसनावर एकटेच तिच्यात बसले आणि निघाले–गात्चिनाकडे, केरेन्स्कींना जिंकायला!

रात्रीच्या सुमाराला ते शहराच्या सीमेलगत पोचले व पायी चालत गेले. कझाकांना दीबेन्कोनी काय सांगितले ते कुणालाच माहीत नाही, पण वस्तुस्थिती अशी आहे की, जनरल क्रास्नोव व त्यांचे अधिकारी आणि हजारो कझाक शरण आले. एवढेच नव्हे तर केरेन्स्कींनीही तसेच वागावे असा त्यांनी सल्ला दिला[5].

केरेन्स्कींच्या बाबतीत बोलायचे तर, १४ नोव्हेंबरच्या सकाळी जनरल क्रास्नोव यांनी दिलेली जबानी मी प्रस्तुत ठिकाणी पुन्हा छापीत आहे:

"गात्चिना, १४ नोव्हेंबर १९१७. आज सुमारे तीन वाजता (पहाटे) मला सरसेनापतींकडून (केरेन्स्की) बोलावणे आले. ते अत्यंत अस्वस्थ आणि घाबरलेले होते.

"जनरल,' ते मला म्हणाले, 'तुम्ही माझा विश्वासघात केलात. तुमच्या कझाकांनी स्पष्टपणे जाहीर केलेय की, ते मला अटक करून खलाशांच्या हवाली करणार आहेत."

"'होय,' मी उत्तरलो, 'तशी वदंता आहे आणि कुठेही तुमच्याबद्दल सहानुभूती नाही हे मला माहीत आहे.'

"'पण अधिकारीसुद्धा तसेच बोलतात.'

"'होय, बहुतांशी अधिकारीच तुमच्याबाबत असंतुष्ट आहेत.'

"'मी काय करू? मला आत्महत्या करावी लागेल!'

"जर तुम्ही नेकनामदार गृहस्थ असलात तर पांढरे निशाण घेऊन तुम्ही ताबडतोब पेत्रोग्रादला जाल, तुम्ही स्वतःहून लष्करी क्रांतिकारक समितीच्या आधीन व्हाल आणि हंगामी सरकारचे प्रमुख या नात्याने ताबडतोब वाटाघाटी सुरू कराल.'

"ठीक आहे जनरल. मी तसे करीन.'

"'मी तुमच्याबरोबर रक्षक देईन आणि तुमच्याबरोबर एका खलाशाने जावे असे सांगीन.'

"'नाही नाही, खलाशी नको. दीबेन्को इथे आहेत याची तुम्हाला माहिती आहे?'

"'दीबेन्को कोण आहे मला माहीत नाही.'

"'तो माझा शत्रू आहे.'

"'करता येण्यासारखे दुसरे काही नाही. तुम्हाला मोठा जुगार खेळायचा असेल तर संधी कशी घ्यायची याची तुम्हाला जाण असली पाहिजे.'

"'ठीक आहे, मी आज रात्री निघेन!'

"'का? ते पळून जाणे ठरेल. अत्यंत शांतपणे आणि उजळ माथ्याने निघा, म्हणजे प्रत्येकाला समजेल की तुम्ही पळून जात नाही."

"'तसे करतो. पण मला ज्यांच्यावर विसंबून राहता येईल असे रक्षक सोबतीला द्या.'

"'ठीक.'

"मी बाहेर गेलो आणि दॉनच्या दहाव्या रेजिमेंटचे कझाक रुसाकोव यांना बोलावून घेतले आणि सरसेनापतींबरोबर सोबतीला जायला आठ कझाकांची निवड करायचा त्यांना हुकूम दिला. अर्ध्या तासानंतर कझाक मला सांगायला आले की, केरेन्स्की आपल्या निवासामध्ये नव्हते, ते पळून गेले होते. मी धोक्याचा इशारा दिला आणि त्यांच्या शोधाचा हुकूम दिला, कारण गात्चिना सोडून ते बाहेर गेले नसावेत असा माझा तर्क होता, पण त्यांचा तपास लागला नाही."

आणि अशा रीतीने केरेन्स्की एकटेच पळाले, खलाशाचा वेष घालून पळाले, व या कृतीने त्यांच्याबद्दलचा उरलासुरला आदरही रशियन जनतेच्या मनातून नष्ट झाला.

---

लाल रक्षकांनी भरलेल्या एका मोटार ट्रकच्या पुढच्या सीटवर बसून मी पेत्रोग्रादला परत गेलो. एक कामगार ती ट्रक चालवत होता. आमच्याजवळ केरोसीन नव्हते, त्यामुळे आमचे दिवे पेटत नव्हते. घरी परतणाऱ्या कामगारवर्गीय सेनेने रस्ते भरले होते व त्यांच्या जागा घेणाऱ्या नव्या राखीव सैनिकांचे लोंढे कोसळत होते. त्या रात्रीत आमच्याप्रमाणेच दिवे नसलेल्या असंख्य मोटारट्रक, तोफखान्यांच्या गाड्या, घोडागाड्या यांच्या अंधुक आकृती धावताना दिसत होत्या. आम्ही तुफान वेगाने जात होतो, अपरिहार्य वाटणाऱ्या टकरी टाळायला उजवी-डावीकडे ट्रक वळवीत होतो, चाकांचा घसटणारा कर्कश्य आवाज होत होता व त्या पाठोपाठ पादचाऱ्यांनी वाहिलेली शिव्यांची लाखोली ऐकू येत होती.

क्षितिजरेषेवर राजधानीमधील चमकत्या दिव्यांची आभा पसरली होती, दिवसापेक्षा रात्री ती कितीतरी पटींनी अधिक सुंदर दिसत होती; जणू ओसाड माळरानावर रत्नांचा बांध उभारला होता.

ट्रक चालवणाऱ्या म्हाताऱ्या कामगाराने एका हाताने चाक धरले होते, तर दुसरा हात त्याने उत्साहाने दूरवर चमकणाऱ्या राजधानीच्या दिशेने फेकला.

"माझं!" आनंदाने पूर्ण उजळलेल्या मुद्रेने तो ओरडला. "सारं काही आता माझं! माझं पेत्रोग्राद!"

## प्रकरण दहावे

# मॉस्को

लष्करी क्रांतिकारक समिती विजय मिळाल्यानंतर स्वस्थ न बसता तेवढ्याच तडफेने पुढील कामाला लागली :

"१४ नोव्हेंबर.

सेनेतील सर्व कोअर, डिव्हिजन आणि रेजिमेंट समित्या, कामगार, सैनिक, किसान प्रतिनिधींची सर्व सोविएते यांना उद्देशून, सर्व जनतेला उद्देशून.

"कझाक, युंकर, सैनिक, खलाशी आणि कामगार यांच्यामध्ये झालेल्या करारानुसार, अलेक्सान्दर फ्योदोरोविच केरेन्स्की यांना जनता न्यायालयासमोर आरोपी म्हणून उभे करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. केरेन्स्कींना अटक करण्याची आम्ही मागणी करीत आहोत आणि इथे नमूद केलेल्या संघटनेच्या वतीने त्यांना हुकूम करीत आहोत, की त्यांनी ताबडतोब पेत्रोग्रादला यावे आणि न्यायालयासमोर आपण होऊन सादर व्हावे.

सह्या : कझाकांच्या उस्सुरी घोडदळाची पहिली डिव्हिजन ;
युंकरांची पेत्रोग्राद गनीम तुकडीची समिती ;
पाचव्या सेनेचा प्रतिनिधी.

जन-कमिस्सार,
दीबेन्को."

रक्षक समिती, दूमा, केरेन्स्की हे आपले सभासद आहेत असा दावा अभिमानाने करणाऱ्या समाजवादी-क्रांतिकारक पक्षाची मध्यवर्ती समिती

या सर्वांनी जोरदार निषेध करून म्हटले की, केवळ घटनात्मक सभेलाच केरेन्स्कींना जबाबदार धरण्यात यावे.

१६ नोव्हेंबरच्या संध्याकाळी, दोन हजार लाल रक्षक झागोरद्नी प्रॉस्पेक्तवरून 'मार्सेलिए' गीत वाजवीत येणाऱ्या लष्करी बँडमागून संचलन करीत येत असलेले मी पाहिले. ते गीत त्यावेळी किती योग्य वाटत होते. कामगारांच्या काळसर रांगांवर लालभडक झेंडे फडकत होते. लाल पेत्रोग्रादचे रक्षण करणाऱ्या आपल्या भावांचे ते घरी स्वागत करीत होते. त्या चावऱ्या थंडीतल्या संधिप्रकाशात पुरुष आणि स्त्रिया संचलन करीत चालले होते, त्यांनी उंच बागनेटे हेलकावे खात होती; अंधुक प्रकाशाच्या, चिखलाने निसरडचा बनलेल्या रस्त्यांवरून, संतापलेल्या परंतु घाबरलेल्या भांडवलदारी जनतेच्या दुतर्फा उभ्या राहिलेल्या जमावांमधून ते संचलन दिमाखाने जात होते.

सारे लोक त्यांच्याविरुद्ध होते – व्यापारी, सट्टेबाज, सावकार, जमीनदार, लष्करी अधिकारी, मुत्सद्दी, अध्यापक विद्यार्थी, व्यावसायिक लोक, दुकानदार, कारकून, दलाल. इतर समाजवादी पक्ष बोल्शेविकांचा विलक्षण तिरस्कार करीत होते. सोविएतांच्या बाजूने सर्वसामान्य कामगार, खलाशी होते, धीर न खचलेले सैनिक होते, भूमीहीन शेतकरी होते आणि अगदी थोडे प्रज्ञावंत होते.

महान रशियाच्या अतिदूरच्या कोनाकोपऱ्यांमध्ये जेथे निकराच्या रस्त्यावरच्या लढाया एखाद्या लाटेसारख्या फुटत गेल्या होत्या, तेथे केरेन्स्कीच्या पराभवाच्या वार्तेचे पडसाद कामगारवर्गीय सेनेच्या विजयाच्या दुंदुभी वाजवीत होते. कझान, सारातोव, नोवगोरद, वीनीत्सा – जेथे रस्ते रक्ताने रंगले होते; मॉस्को, जेथे बोल्शेविकांनी आपल्या तोफा भांडवलदारांच्या अखेरच्या बालेकिल्ल्यावर – क्रेमलिनवर – रोखल्या होत्या.

"ते क्रेमलिनवर तोफा डागत आहेत!" पेत्रोग्रादच्या रस्त्यांमधून ही बातमी तोंडातोंडी दहशत पसरवीत गेली. "शुभ्र आणि तेजस्वी माता मॉस्को" येथून येणारे प्रवासी थरकाप उडवणाऱ्या कथा सांगत होते. हजारो ठार मारले गेले; त्वेरस्काया आणि कुझ्नेत्स्की मोस्त आगीने धडाडून पेटत आहेत; सेंट बेसिल प्रार्थनामंदिराची जळून राख झालीय; उस्पेन्स्की कॅथेड्रल कोसळून पडतेय; क्रेमलिनच्या स्पास्काया दरवाजाला खिंडार पडलेय; दूमा पूर्ण भस्मसात झालीय[1].

बोल्शेविकांनी जे काही केले होते त्याची तुलना पवित्र रशियामधील

आजवर घडलेल्या कोणत्याही भयानक ईश्वरनिंदेशी केली जाणे शक्य नव्हते. पवित्र ऑर्थोडॉक्स चर्चवर आदळल्या जाणाऱ्या तोफगोळ्यांचे आवाज श्रद्धाळू लोकांच्या कानांमध्ये दडे बसवीत होते, रशियन राष्ट्राच्या धर्मक्षेत्राला धुळीत लोळवले जात होते.

१५ नोव्हेंबरला, शिक्षणमंत्री लुनाचार्स्की यांना जन-कमिस्सारांच्या मंडळाच्या बैठकीत रडू कोसळले व सभागृहाच्या बाहेर ते ओरडत गेले, "मला हे सहन होत नाही! सौंदर्याचा आणि परंपरेचा हा राक्षसी संहार मला सहन होत नाही..."

त्याच दुपारी त्यांचे राजिनामापत्र वर्तमानपत्रांमधून प्रसिद्ध झाले :

"मॉस्कोहून येणाऱ्या लोकांकडून मला तेथील हकिकत नुकतीच समजली.

"सेंट बेसिल कॅथेड्रलवर आणि उस्पेन्स्की कॅथेड्रलवर तोफांचा मारा होत आहे. पेत्रोग्राद आणि मॉस्को येथील महत्त्वाची कला भांडारे सध्या जेथे गोळा करून ठेवली आहेत त्या क्रेमलिनवर तोफा आग ओकीत आहेत.

"हजारो लोकांचा बळी पडला आहे.

"तेथील भयानक संघर्षाने पाशवी क्रौर्याची हद्द गाठली आहे.

"काय उरले आहे? आणखी काय घडायचे राहिले आहे?

"मला हे सहन होत नाही. माझा प्याला पुरेपूर भरला. ही भयानकता माझ्याने सोसवत नाही.

"मला वेडापिसा करून सोडणाऱ्या विचारांच्या दबावाखाली काम करणे अशक्य आहे!

"म्हणून मी जन-कमिस्सार मंडळ सोडत आहे.

"या निर्णयाचे गांभीर्य मी जाणून आहे. पण मला इतःपर सहन होत नाही..."[२]

त्याच दिवशी क्रेमलिनमधील श्वेतरक्षक आणि युंकर शरण आले. त्यांना कोणतीही इजा न करता बाहेर जाऊ देण्यात आले. तहाच्या अटी पुढील-प्रमाणे होत्या :

"१. सार्वजनिक सुरक्षा समिती बरखास्त करण्यात येत आहे.

२. श्वेतरक्षक शस्त्रे खाली ठेवून विसर्जित होत आहेत. अधिकारी आपल्या तलवारी आणि नियमानुसार मान्य असलेली कमरेची शस्त्रे स्वतःजवळ ठेवतील. लष्करी विद्यालयांमध्ये केवळ शिक्षण देण्यापुरती

शस्त्रे ठेवण्यात येतील ; इतर सर्व शस्त्रे युंकर सोडून देत आहेत. लष्करी क्रांतिकारक समिती व्यक्तिगत सुरक्षेची आणि स्वातंत्र्याची हमी देत आहे.

३. विभाग २ मध्ये नमूद केल्याप्रमाणे, निःशस्त्रीकरणाचा प्रश्न सोडविण्यासाठी, शांतता तहाच्या वाटाघाटींमध्ये भाग घेणाऱ्या सर्व संघटनांमधून प्रतिनिधी निवडून एक खास आयोग स्थापन करण्यात आला आहे.

४. या शांतता तहावर सह्या केल्याच्या क्षणापासून, दोन्ही पक्षांनी ताबडतोब गोळीबार थांबवण्याचे आणि सर्व लष्करी कारवाया थांबवण्याचे हुकूम द्यावेत व या हुकुमाचे काटेकोर पालन होण्याची खबरदारी घ्यावी.

५. या करारावर सह्या झाल्यानंतर, दोन्ही पक्षांनी पकडून ठेवलेल्या सर्व कैद्यांना मुक्त करण्यात यावे..."

दोन दिवस आता शहर बोल्शेविकांच्या ताब्यात होते. भेदरलेले नागरिक आपल्या मृत नातेवाईकांचा शोध घेण्यासाठी तळघरांमधून हळूहळू बाहेर येत होते ; रस्त्यांमधले अडथळे बाजूला करण्यात येत होते. पण मॉस्कोतील संहाराच्या कथा कमी होण्याऐवजी अधिकच वाढत राहिल्या... आणि अशा या भयानक वार्ता सतत ऐकल्यामुळे, आम्ही स्वतः तेथे जाण्याचा निर्णय घेतला.

पेत्रोग्राद येथे दोन शतकांहून अधिक काळ सरकारची राजधानी आहे हे खरे असले तरी ते एक कृत्रिम शहर आहे. मॉस्को म्हणजे खराखुरा रशिया – रशिया जसा होता आणि जसा होईल त्याचे मूर्तिमंत प्रतीक. मॉस्कोत आम्हाला क्रांतिबद्दलच्या रशियन जनतेच्या खऱ्याखुऱ्या प्रतिक्रिया अजमावता आल्या असत्या. तेथील आयुष्य अधिक तीव्र होते.

गेल्या आठवड्यापासून, पेत्रोग्राद लष्करी क्रांतिकारक समितीने सर्वसामान्य रेलकामगारांच्या साह्याने निकोलाय लोहमार्गाचा कबजा केला होता व खलाशी आणि लाल रक्षक भरलेल्या आगगाड्यांमागून आगगाड्या नैऋत्येकडे पाठवीत होती. आम्हाला स्मोल्नीमधून परवाने देण्यात आले होते. त्या परवान्यांविना कुणीही राजधानी सोडून जाऊ शकत नव्हते... आगगाडी स्टेशनात येताच घाणेरड्या मळक्या सैनिकांचे तांडे आपल्या खाण्याच्या पदार्थांनी भरलेल्या भल्या मोठ्या थैल्या घेऊन सर्व डब्यांवर तुटून पडत होते, सर्व बाकडी भरून टाकत होते, एवढेच नव्हे तर छपरांवर चढून बसत

होते. आमच्यापैकी तिघेजण मोठ्या मिनतवारीने एका डब्यात जाऊ शकले, पण त्यांच्या पाठोपाठ सुमारे वीस सैनिक घुसले... तिथे फक्त चार लोकांसाठी जागा होती, आम्ही वादविवाद घातला, समजुतीच्या चार गोष्टी सांगितल्या, डब्याच्या कंडक्टरनेही आमचे समर्थन केले, पण त्या सैनिकांनी निव्वळ हसण्यावारी नेले. भांडवलदारांच्या आरामाची फिकीर त्यांनी का म्हणून करावी? आम्ही स्मोल्नीमधून मिळालेले परवाने त्यांच्यासमोर धरले; लगेच त्या सैनिकांची वागणूक बदलली.

"चला कॉम्रेडहो," एकजण ओरडला, "हे अमेरिकन कॉम्रेड्स आहेत. आपली क्रांती बघायला ते तीस हजार वेर्स्ता ओलांडून इथं आलेत. साहजिकच ते दमलेले आहेत..."

अत्यंत नम्रपणे आणि मित्रत्वाच्या नात्याने माफी मागत सैनिकांनी तेथून जायला आरंभ केला. त्यानंतर लौकरच दोन धिप्पाड, उत्तम पोषाखातल्या रशियनांच्या डब्यावर त्यांनी धाड घातलेली आम्ही ऐकली. त्या दोघांनी कंडक्टरला लाच चारून आपल्या दरवाजाला कुलूप घातले होते.

संध्याकाळी सात वाजण्याच्या सुमारास आमची आगगाडी स्टेशनामधून हलली. लांबच लांब डब्यांची ती आगगाडी एक कमकुवत, छोटे, लाकडांच्या इंधनावर चालणारे इंजिन ओढत होते. त्यामुळे ती गाडी रडतखडत, अनेक ठिकाणी थांबत चालली होती. छपरांवरचे सैनिक आपल्या टाचा आपटून लांब सूर ओढीत किसानगीते गात होते; आणि मुंगी जायला जागा नव्हती अशा गच्च भरलेल्या कॉरीडॉरमध्ये सबंध रात्रभर जोरदार राजकीय चर्चा झडत होत्या. मधून मधून सवयीनुसार तिकीटे तपासायला कंडक्टर येत होता. आमच्याशिवाय आणखी फारच थोड्या लोकांजवळ त्याला तिकीटे सापडत; अर्धा-एक तास व्यर्थ वादविवाद घातल्यानंतर तो हताश होऊन आपले हात वर उडवी आणि परत निघून जाई. वातावरण कमालीचे कुंद, धुराने व दुर्गंधीने भरलेले होते; जर खिडक्या मोडक्या नसत्या तर त्या रात्री आम्ही नक्की गुदमरून खलास झालो असतो.

सकाळ उजाडेपर्यंत आमच्या गाडीला ठरल्या वेळेपेक्षा कित्येक तास उशीर झाला होता. आम्ही बाहेर पाहिले तेव्हा बर्फाचे साम्राज्य पसरलेले दिसत होते. कडाक्याची थंडी होती. दुपारच्या सुमाराला एक शेतकरी बाई पावाच्या तुकड्यांनी भरलेली टोपली व कोमट कॉफीसारख्या दिसणाऱ्या पाण्याचे भांडे घेऊन डब्यात चढली. तेव्हापासून अंधार पडेपर्यंत नुसती गच्च भरलेली आगगाडी, मधून हिसके देत थांबणारी; क्वचित स्टेशन येई तेव्हा

भुकेला जमाव किरकोळ सामानाच्या उपाहारगृहावर तुटून पडे व सर्व काही फस्त करी... बस्स! दुसरे काहीही दृश्य नव्हते. अशाच एका स्टेशनावर माझी नोगीन आणि रीकोव या बाहेर पडलेल्या कमिस्सारांशी गाठ पडली. आपल्या स्वतःच्या सोविएतसमोर गाऱ्हाणी मांडायला ते मॉस्कोला परत चालले होते;* त्यांच्यापासून जरा दूर अंतरावर बुटके, लाल दाढीवाले, डोळ्यात वेडसर चमक असलेले बुखारीन उभे होते – "लेनिन यांच्यापेक्षाही डावे," असे लोक त्यांच्याबद्दल म्हणत.

तेवढ्यात घंटेचे तीन टोल पडले आणि आम्ही आगगाडीकडे पळत सुटलो, लोकांनी गच्च भरलेल्या डब्यातून कशीबशी रेटारेटी करीत आपल्या जागांकडे जाऊ लागलो. तेथील गैरसोयी लोकांचा जमाव सुस्वभावीपणे सहन करीत होता, त्या गैरसोयींवर थट्टा-विनोद करून त्रास सुसह्य करीत होता, पेत्रोग्रादमधील घटनांपासून तहत ब्रिटिश ट्रेड युनियन पद्धतीपर्यंत अखंड चर्चा करीत होता व डब्यातल्या मूठभर भांडवलदारांबरोबर वाद घालीत होता. आम्ही मॉस्कोला पोचण्यापूर्वी बहुतेक प्रत्येक डब्यात खाद्यपदार्थ पैदा करून त्यांचे वाटप करण्यासाठी एक एक समिती स्थापन झाली होती व या समित्यांचे राजकीय गटांमध्ये विभाजन त्या मूलभूत तत्त्वांवर जोरदारपणे भांडत होत्या...

मॉस्कोतले स्टेशन ओसाड होते. आमच्या परतीच्या तिकीटांची व्यवस्था करण्यासाठी आम्ही कमिस्सारच्या कचेरीत गेलो. खांद्यावर लेफ्टनंटच्या हुद्द्याच्या फिती लावलेला तो एक दुर्मुखलेला तरुण होता; आम्ही जेव्हा त्याला स्मोल्नीहून आम्हाला मिळालेले कागदपत्र दाखवले तेव्हा तो एकदम भडकला आणि म्हणाला की, तो बोल्शेविक नाही, तो सार्वजनिक सुरक्षा समितीचा प्रतिनिधी होता... ही एक वैशिष्ट्यपूर्ण घटना होती – शहर काबीज करण्याच्या एकूण धामधुमीत, मुख्य रेल्वे स्टेशन ताब्यात घ्यायचे राहून गेले होते...

बाहेर एकही घोडागाडी दिसत नव्हती. पण रस्त्यावर काही घरे अंतरावर मात्र जाडजूड बंडी घातलेला एक गाडीवाला आपल्या छोट्या घसरगाडीच्या पेटीवर बसून डुलक्या घेत होता. आम्ही त्याला उठवले. "शहराच्या मध्यभागात जायला किती पैसे घेणार?"

त्याने डोके खाजवले. "प्रतिष्ठितांना कुठल्याही हॉटेलात जागा मिळा-

---

*प्रकरण ११ पहा.

यची नाही," तो म्हणाला. "पण शंभर रूबलना मी तुम्हाला फिरवून आणीन..." क्रांतीपूर्वी अवघे दोन रूबल पडत! आम्ही जोरदार हरकत घेतली, पण त्याने नुसते खांदे उडवले. "आजकालच्या दिवसात घसरगाडी चालवायला मोठं धैर्य लागतं," तो पुढे म्हणाला. पन्नासच्या खाली काही आम्ही त्याला आणू शकलो नाही.... मॉस्कोतल्या त्या निवांत, बर्फाळ, अर्धउजेडातल्या रस्त्यांवरून आम्ही घसरगाडीमधून चाललो होतो तेव्हा सहा दिवसांच्या लढाईमधील त्याने आपल्या स्वतःच्या साहसकथांच्या आठवणी सांगितल्या. "गाडी चालवीत असताना किंवा भाड्यासाठी एखाद्या कोपऱ्यावर थांबले असताना," तो म्हणाला, "एकदम धुडुम्! इकडं तोफेचा गोळा पडतोय धुडुम्! तिथं गोळा पडतोय... फाड् फाड् फाड्! मशिनगनची फैर... मी जोरात दौडतोय, सभोवार सैतान गोळ्या झाडताहेत. मी एका छान निवांत रस्त्याला गेलो आणि तिथं थांबून थोडी डुलकी घेतली – धुडुम्! आणखी एक तोफगोळा! फाड् फाड् फाड्...सैतान साले! हलकट!"

शहराच्या मध्यभागातील बर्फाचे थर साचलेले रस्ते आजारपणानंतरची विश्रांती घेत असल्यासारखे थंड पडले होते. अगदी थोडे आर्कचे दिवे जळत होते, बाजूच्या पादपथांवरून थोडेसेच पादचारी घाईघाईने जात होते. मोठ्या मैदानावरून वहात येणारे बर्फाळ वारे हाडांमध्ये घुसत होते. आम्ही ज्या पहिल्या हॉटेलात प्रवेश केला त्याच्या कचेरीत दोन मेणबत्त्या तेवत होत्या.

"होय, आमच्यापाशी काही खूप आरामशीर खोल्या आहेत, पण सर्व खिडक्यांवरची तावदाने गोळीबाराने फुटून गेलीत. श्रीमानांना जर थोडीशी ताजी हवा चालत असेल..."

त्वेरस्कायाच्या खालच्या अंगाला दुकानांची तावदाने फुटली होती आणि रस्त्यांमध्ये तोफगोळ्यांच्या स्फोटांनी खड्डे पडून रस्त्यामधले दगड उखडून पडले होते, हॉटेलामागून हॉटेल आम्ही पहात चाललो होतो. सारी गच्च भरली होती किंवा त्यांचे मालक अजून एवढे घाबरलेले होते की, ते फक्त एवढेच म्हणत, "छेः छेः! आमच्यापाशी खोली नाही! आमच्यापाशी रिकामी खोली नाही!" ज्या मुख्य रस्त्यांवर मोठ्या बँकांच्या इमारती होत्या किंवा व्यापारी भवने होती, तेथे बोल्शेविकांच्या तोफखान्याने बेफाम भडिमार केला होता. एका सोविएत अधिकाऱ्याने मला सांगितले होते,

"जेव्हा युंकर किंवा श्वेतरक्षक कुठं आहेत ते आम्हाला समजायचं नाही तेव्हा आम्ही त्यांच्या बँकबुकांवर तोफांचा भडिमार करायचो."

अखेरीस आम्हाला मोठ्या 'नॅशनल' हॉटेलात जागा मिळाली; कारण आम्ही परदेशी होतो आणि जेथे परदेशी राहतात त्या राहत्या इमारतींचे रक्षण करण्याचे लष्करी क्रांतिकारक समितीने वचन दिले होते. अगदी वरच्या मजल्यावर कुलपी गोळयाने विदीर्ण केलेल्या अनेक खिडक्या मॅनेजरने आम्हाला दाखवल्या. "जनावरं!" काल्पनिक बोल्शेविकांना उद्देशून रागाने दात-ओठ खात हाताच्या मुठी उगारून तो उद्गारला. "पण जरा थांबा! त्यांची पण घडी भरेल! थोडयाच दिवसात त्यांचं हे मूर्खांचं सरकार कोलमडून पडेल आणि मग आम्ही त्यांच्यावर चांगला सूड उगवू!"

"मी कुणालाही खात नाही" असे आकर्षक नांव असलेल्या एका शाकाहारी रेस्तराँमध्ये आम्ही भोजन घेतले. तेथे भिंतींवर तल्स्तोयचे मोठे चित्र लावले होते. नंतर आम्ही रस्त्यांमधून भटकलो.

मॉस्को सोविएतची* मुख्य कचेरी माजी गव्हर्नर-जनरलच्या प्रासादात होती. स्कोबेलियेव चौकाच्या समोर असलेली ही शुभ्र इमारत मोठी भव्य होती. दाराशी पहारा द्यायला लाल रक्षक उभे होते. एका रुंद जिन्यावरून चढून आम्ही वर गेलो. तेथील भिंतींवर समितीच्या बैठकांच्या आणि राजकीय पक्षांच्या भाषणांच्या जाहीर सूचना चिकटवलेल्या होत्या. त्यानंतर आम्ही अनेक भव्य बैठकीच्या खोल्या ओलांडत गेलो. त्या खोल्यांमधून सोनेरी चौकटीमध्ये बसवलेली आणि लाल मखमली वस्त्रांनी झाकलेली चित्रे लटकावलेली होती. अखेरीस आम्ही एका मुलामा दिलेल्या कंगोरेदार नक्षीकाम केलेल्या शाही दालनात पोचलो. तेथे भव्य बिलोरी झुंबरे टांगलेली होती. तेथे खालच्या आवाजात चाललेल्या बोलण्याच्या आवाजात अनेक शिवणयंत्रांची खर्जातली घरघर मिसळली होती. लाल आणि काळ्या कपडयांचे प्रचंड तागे उलगडून टाकलेले होते व त्या कपडयांची भेंडोळी लाकडी तक्तपोशीच्या फरशीवर आणि मेजांवर नागमोडी पसरली होती. त्या मेजांशी सुमारे पन्नास बायका बसल्या होत्या आणि क्रांतीत मरण पावलेल्यांच्या अंत्यविधींसाठी पताका व झेंडे कापून शिवत होत्या. या बायकांच्या चेहऱ्यांवर कठीण काळाच्या आघातांच्या जबरदस्त खुणा उमटल्या होत्या. त्या आता ताठरपणे काम करीत होत्या. त्यांच्यापैकी बहुतेकींचे डोळे रडून रडून लाल झाले होते... लाल सेनेची जबरदस्त प्राणहानी झाली होती...

एका कोपऱ्यातल्या मेजाशी दाढीवाले, चष्मा लावलेले, बुद्धिमान रोगोव

बसले होते. त्यांनी कामगाराचा काळा डगला अंगात चढवला होता. दुसऱ्या दिवशी सकाळी निघणाऱ्या अंत्ययात्रेला मध्यवर्ती कार्यकारी समितीबरोबर चलण्यासाठी त्यांनी आम्हाला आमंत्रण दिले.

"समाजवादी-क्रांतिकारकांना आणि मेन्शेविकांना काहीही शिकवणं अशक्य आहे!" ते उद्गारले. "तडजोड करण्याची सवय त्यांच्या हाडी-माशी खिळलीय... तुम्ही कल्पना करू शकाल? आम्ही युंकरांबरोबर संयुक्त अंत्ययात्रा काढावी असा त्यांनी प्रस्ताव मांडला!"

पलिकडून हॉलमधून फाटक्यातुटक्या सैनिकी कोटातला आणि डोक्यावर टोपी घातलेला एक गृहस्थ आला. त्याचा चेहरा ओळखीचा वाटत होता. मी मेल्नीचान्स्कींना ओळखले. "स्टॅन्डर्ड ऑईल"च्या मोठ्या संपाच्या वेळे-पासून, न्यू जर्सी येथील बायोन्नेमधील घड्याळ दुरुस्त करणारे जॉर्ज मेल्चर, म्हणून मी त्यांना ओळखत होतो. त्यांनी मला सांगितले की, आता ते मॉस्को धातु-कामगार संघाचे चिटणीस होते व लढाईच्या वेळी लष्करी क्रां-तिकारक समितीचे कमिस्सार होते.

"तुम्ही माझी अवस्था पाहिलीत!" आपले फाटके कपडे दाखवीत ते म्हणाले. "युंकर जेव्हा प्रथम आले तेव्हा मी आमच्या तरुण मंडळींबरोबर क्रेमलिनमध्ये होतो. त्यांनी मला तळघरात कोंडून घातलं आणि माझा मोठा कोट, माझे पैसे, घड्याळ, एवढंच नव्हे तर माझ्या बोटातली अंगठीसुद्धा लंपास केली. आता अंगावर घालायला माझ्यापाशी फक्त हे एवढेच कपडे उरलेत!"

ज्या सहा दिवसांच्या रक्तपाती लढाईने मॉस्कोची दोन भागात विभागणी केली होती त्या लढाईसंबंधीचे अनेक तपशील मला त्यांच्याकडून समजले. पेत्रोग्रादमधील दूमाप्रमाणे न वागता, मॉस्कोतल्या नगर-दूमाने युंकरांचा आणि श्वेतरक्षकांचा ताबा घेतला होता. महापौर रूद्नेव आणि दूमाचे अध्यक्ष मीनोर यांनी सार्वजनिक सुरक्षा समितीच्या व फौजांच्या हालचालींचे संचालन केले. लोकशाही प्रवृत्तीकडे कल असणारे नगरसेनानायक र्याबृत्सेव यांनी लष्करी क्रांतिकारक समितीला विरोध करायला थोडी का कू केली होती; पण दूमाने त्यांच्यावर सक्ती केली... क्रेमलिनचा कबजा घ्यावा हा महा-पौरांचा आग्रह होता; "तिथं ते तुमच्यावर तोफा डागायचं धाडस करणार नाहीत," ते म्हणाले होते.

दीर्घकाळ काहीही न केल्यामुळे कमालीची नीतीभ्रष्ट बनलेल्या ठाणबंद फौजेच्या एका रेजिमेंटकडे दोन्ही पक्षांचे लोक गेले होते. कोणती हालचाल

करावी हे ठरविण्यासाठी रेजिमेंटने सभा भरवली. त्या सभेत अखेरीस निर्णय घेण्यात आला की, रेजिमेंटने तटस्थ रहावे व सध्याचा उद्योग चालू ठेवावा – लायटर आणि सूर्यफुलाच्या बिया विकण्याचा !

"पण सर्वांत वाईट गोष्ट म्हणजे," मेल्नीचान्स्की म्हणाले, "आम्ही लढत असतानाच आम्हाला संघटनकार्य करावं लागत होतं. दुसऱ्या पक्षाला नेमकं काय पाहिजे ते माहीत होतं; पण इथं सैनिकांचं एक सोविएत, कामगारांचं स्वतःचं... सरसेनापती कुणी व्हावं याबाबत जबरदस्त भांडणं झाली; काही रेजिमेंट तर कोणतीही कृती करण्यापूर्वी दिवसचे दिवस नुसत्या चर्चा करीत राहिल्या; आणि जेव्हा अधिकारी अचानक आम्हाला सोडून गेले तेव्हा हुकूम द्यायला आमच्याकडे लढाईच्या वेळी अधिकारीच राहिले नाही..."

त्यांनी माझ्यासमोर छोटे छोटे प्रसंग ठळकपणे उभे केले. एका गारठ्याच्या धूसर दिवशी ते निकित्स्कायाच्या कोपऱ्याशी उभे होते. तिथे मशिनगनच्या फैरींवर फैरी झडत होत्या. वर्तमानपत्रे विकणारी काही लहान पोरे तिथे जमली होती. जणू एखादा नवा खेळ मिळाल्यासारखा त्यांच्यात उत्साह संचारला होता. गोळीबार कमी व्हायची ती मुले वाट पहायची आणि पळत रस्ता ओलांडून जायची. अनेक मुले ठार झाली, पण बाकीची मागे-पुढे धाडसाने पळापळ करीत राहिली, खिदळत राहिली, एकमेकांना धाडसाला प्रवृत्त करीत राहिली.

त्या दिवशी संध्याकाळी उशीरा मी द्वोर्यान्स्कोये सब्रानिये – उमरावांचा क्लब – येथे गेलो. तेथे मॉस्कोतील बोल्शेविक एकत्र जमणार होते आणि जन-कमिस्सार मंडळ सोडून आलेल्या नोगीन, रीकोव व इतर मंडळींच्या कैफियती ऐकणार होते.

या सभेचे स्थळ एक नाटचगृह होते. जुन्या राजवटीच्या काळात, लष्करी अधिकाऱ्यांच्या आणि उच्चभ्रू महिलांच्या उपस्थितीत, अत्याधुनिक फ्रेंच प्रहसनांचे हौशी प्रयोग तेथे सादर केले जात.

सुरुवातीला तेथे जवळ राहणाऱ्या आणि शहराच्या मध्यभागी राहणाऱ्या प्रजावंतांनी सभास्थळ भरून गेले. नोगीन बोलले आणि श्रोत्यांपैकी बहुतेक लोक त्यांच्या बाजूचे होते. कामगारांना यायला खूप उशीर झाला होता. कामगारांच्या वस्त्या शहराच्या सीमेलगत होत्या आणि ट्रामगाड्या धावत नव्हत्या. पण मध्यरात्रीच्या सुमाराला दहा दहा किंवा बारा बारा गटांनी जिन्यांवर जमायला त्यांनी सुरुवात केली. ती सारी धिप्पाड, रांग-

डी, जाडयाभरडया कपडयांमधील माणसे होती, लढाईचा ताजा अनुभव घेतलेली होती. आठवडाभर त्यांनी राक्षसी ताकदीने झुंजी दिल्या होत्या, आपल्या साथीदारांना रणांगणावर मृत्युमुखी पडताना त्यांनी पाहिले होते.

सभेला औपचारिक आरंभ झाला असेल नसेल तोच नोगीन यांच्यावर कुचेष्टादर्शक आणि संताप व्यक्त करणाऱ्या आरोळ्यांचा पाऊस पडला. त्यांनी युक्तिवाद करण्याचा, समजावून सांगण्याचा प्रयत्न केला; पण लोक ऐकायला तयार नव्हते. त्यांनी जन-कमिस्सार मंडळ सोडले होते; लढाई चालू असताना त्यांनी पदत्याग केला होता... मॉस्कोमध्ये भांडवलदारी वर्तमानपत्रे अस्तित्वातच नव्हती; नगर दूमासुद्धा विसर्जित केलेली होती. बुखारीन उभे राहिले. त्यांच्या बोलण्यात हिंस्त्रपणा होता, तर्कशुद्धता होती, त्यांच्या आवाजाला अशी विलक्षण धार होती की जणू सुरीचे प्रहारावर प्रहार भोसकले जात होते. त्यांचे बोलणे लोकांनी चकाकत्या डोळ्यांनी आतुरतेने ऐकले. जन-कमिस्सारांच्या मंडळाच्या कृतीला पाठिंबा देणारा ठराव प्रचंड बहुमताने मंजूर झाला. मॉस्को असे बोलले...[3.4]

रात्री खूप उशीरा आम्ही निर्मनुष्य रस्त्यांवरून फिरत फिरत इवेरिया गेटामधून क्रेमलिनसमोरच्या भल्या मोठ्या लाल चौकात गेलो. सेंट बेसिल चर्चची अंधुक आकृती विलक्षण सुंदर दिसत होती. त्याचे गडद रंगाचे वळसेदार घुमट अंधारात अस्पष्ट चमकत होते. तेथे नुकसान झाल्याची काहीही खूण नव्हती. चौकाच्या एका बाजूला क्रेमलिनचे काळोखे मिनार आणि त्याच्या भिंती उभ्या होत्या. त्या उंच भिंतींवर अदृश्य ज्वालांचा लालसर उजेड मधून मधून झळाळत होता. पलिकडच्या विस्तीर्ण जागेमधून लोकांचे आवाज आमच्यापर्यंत ऐकू येत होते. कुदळफावडयांचे आवाज येत होते. आम्ही चौक ओलांडून तिकडे गेलो.

भिंतीच्या पायथ्याशी चिखलाचे व दगडांचे ढीग साचवून उभे केले होते. त्या ढिगांवर चढून आम्ही दुसऱ्या बाजूला डोकावलो. पलिकडे दहा ते पंधरा फूट खोल व पंधरा यार्ड लांब असे दोन भलेमोठे खड्डे खणलेले होते. तेथे मोठ्या शेकोटयांच्या उजेडात शेकडो सैनिक आणि कामगार खणत होते.

एक तरुण विद्यार्थी आमच्याशी जर्मन भाषेत बोलला. "बांधवांचं थडगं आहे," त्याने खुलासा केला. "क्रांतीसाठी मेलेल्या पाचशे कामगार-वर्गीयांचं उद्या आम्ही इथं दफन करणार आहोत."

तो आम्हाला खालच्या खड्डयात घेऊन गेला. कुदळी आणि फावडी वेगाने काम करीत होती व मातीचे ढिगारे वाढत होते. कुणीही बोलत

नव्हते. डोक्यावरचे रात्रीचे आकाश तारकांनी खच्चून भरले होते व प्राचीन शाही क्रेमलिनची भिंत अजस्र भासत होती.

तो विद्यार्थी म्हणाला, "या पवित्र ठिकाणी, सबंध रशियात अत्यंत पवित्र मानल्या गेलेल्या या ठिकाणी, आम्ही आमच्या पवित्र लोकांचे दफन करू. ज्या ठिकाणी – झारांची थडगी आहेत तिथं आमचा झार – जनता – चिरनिद्रा घेईल..." लढाईत बंदुकीची गोळी घुसल्यामुळे जखमी झालेला त्याचा हात प्लास्टरमध्ये अडकवलेला होता. त्याने त्याकडे पाहिले. "दीर्घ काळपर्यंत आम्ही मध्ययुगीन राजसत्ता सहन करीत राहिलो म्हणून तुम्ही परदेशी लोक आम्हा रशियनांकडे तुच्छतेनं पाहता," तो म्हणाला. "पण आम्हाला असं आढळून आलं की, झार हा काही जगातला एकमेव जुलूमशहा नव्हता; भांडवलशाही त्याहून वाईट होती आणि जगातल्या सर्व देशांमध्ये भांडवलशाही सम्राट होती... रशियन क्रांतिकारक डावपेच सर्वात उत्तम आहेत..."

आम्ही तेथून निघालो तेव्हा त्या खड्डयामधले कामगार कमालीचे थकून गेले होते. थंडी असूनही घामाने न्हाऊन निघाले होते आणि हळू हळू चढ चढून वर निघाले होते. लाल चौकाकडून माणसांचा एक काळसर दिसणारा जथा घाईघाईने तेथे आला. त्यांचा घोळका खड्डयांमध्ये उतरला आणि हत्यारे उचलून एकही शब्द न उच्चारता त्यांनी भराभरा खणायला आरंभ केला...

अशा प्रकारे सबंध रात्रभर जनतेमधील स्वयंसेवक एकमेकांना विश्रांती देत, अखंडपणे वेगाने काम करीत राहिले आणि जेव्हा पहाटेचा झुंजूमुंजू प्रकाश बर्फाने शुभ्र दिसणाऱ्या मोठ्या चौकावर पसरला तेव्हा तपकिरी आ वासलेली बांधवांची थडगी खणून जवळ जवळ पुरी झाली होती.

आम्ही सूर्योदयापूर्वीच उठलो आणि अद्याप अंधाऱ्या दिसणाऱ्या रस्त्यांवरून स्कोबेलियेव चौकाकडे घाईघाईने निघालो. एवढ्या मोठ्या शहरात चिटपाखरू नजरेला पडत नव्हते. पण घोंघावणारे जोरदार वारे येत असावेत तसा नजीक आणि दूर खळबळल्याचा अस्पष्ट ध्वनी ऐकू येत होता. अर्धवट उजाडलेल्या प्रकाशात सोविएत मुख्य कचेरीसमोर स्त्री-पुरुषांचा एक छोटा जमाव गोळा झालेला दिसला. त्यांच्या हाती सोनेरी अक्षरे कोरलेल्या लाल पताका होत्या – मॉस्को सोविएतांची मध्यवर्ती कार्यकारी समिती. दिवस उजाडला. दुरून येणारा खळबळीचा अस्पष्ट आवाज वाढत वाढत मोठा होत गेला व अखंड घनगंभीर खर्ज ऐकू येऊ लागला. शहर जागे होत होते.

आम्ही त्वेरस्कायाकडे निघालो. डोक्यांवर पताका फडफडत होत्या. आमच्या मार्गावरची छोटी छोटी प्रार्थनामंदिरे बंद केलेली होती व तेथे अंधार होता. त्याप्रमाणे माता मेरीचे इवेरिया प्रार्थनामंदिरही बंद होते. प्रत्येक नवा झार स्वतःला राज्याभिषेक करून घेण्यासाठी क्रेमलिनमध्ये जाण्यापूर्वी या प्रार्थनामंदिराला भेट देत असे. हे प्रार्थनामंदिर पूर्वी दिवस-रात्र खुले असे व लोकांची तेथे सतत गर्दी असायची. त्याना अंतर्भाग मेणबत्त्यांच्या प्रकाशाने सदैव उजळलेला असायचा आणि त्या पवित्र प्रकाशात पुतळ्यांच्या अंगावरील सोने-चांदी आणि हिरेमाणके चमकत रहायची. लोक म्हणत होते की, जेव्हा नेपोलियन मॉस्कोत होता त्या काळानंतर आता प्रथमच पुन्हा एकदा या प्रार्थनामंदिरातल्या मेणबत्त्या पेटत नव्हत्या.

क्रेमलिनवर तोफा डागणाऱ्या नीच अश्रद्धांचा अड्डा बनलेल्या मॉस्कोवरचा आपला पवित्र प्रकाश परमपवित्र ऑर्थोडॉक्स चर्चने झाकोळून टाकला होता. सारी प्रार्थनामंदिरे अंधारी, गप्प आणि थंडगार होती; धर्मगुरू अदृश्य झाले होते. लाल दफनासाठी पाद्री नव्हते, मृतांवर संस्कार करायला कुणी नव्हते किंवा नास्तिकांच्या थडग्याशी कुणी प्रार्थना म्हणायला नव्हते. मॉस्कोचे मुख्य धर्मगुरू लौकरच सोविएतांना वाळीत टाकणार होते.

त्याचप्रमाणे दुकाने बंद होती व धनिक वर्ग आपापल्या घरांमध्ये बसून राहिला होता—पण त्याला कारणे वेगळी होती. हा जनतेचा दिवस होता आणि तिच्या आगमनाचा ध्वनी समुद्राच्या फुटणाऱ्या महाप्रचंड लाटेसारखा गर्जत होता.

एव्हाना इवेरिया दरवाजामधून मानवी नदीचा ओघ वाहू लागला होता आणि अफाट लाल चौकात हजारो माणसे दिसू लागली होती. मी बारकाईने टिपले की, ज्या इवेरिया प्रार्थनामंदिराजवळ पूर्वी येणारा-जाणारा माणूस क्षणभर थांबून हातांनी क्रूसचिन्ह करीत असे तेथे आता त्या प्रचंड जनसमुदायांचे अजिबात लक्षसुद्धा जात नव्हते...

क्रेमलिन भिंतीपाशी जमलेल्या दाट गर्दीमधून वाट काढीत आम्ही मातीच्या एका ढिगाऱ्यावर उभे राहिलो. आतापावेतो तेथे अनेक माणसे हजर झाली होती. त्यांच्यात मुरालोव होते. उंच, साध्या दिसणाऱ्या, प्रेमळ दाढीवाल्या चेहऱ्याच्या या सैनिकाला मॉस्कोचा सेनानायक म्हणून निवडण्यात आले होते.

सर्व रस्त्यांमधून लाल चौकाच्या दिशेने हजारो लोकांचे लोंढे येऊन कोसळत होते. त्या लोकांवर दारिद्र्याच्या आणि कष्टांच्या खुणा ठळकपणे

दिसत होत्या. 'इंटरनॅशनल' वाजवीत एक लष्करी बँड संचलन करीत तेथे आला आणि सागरावर वायुलहरी जशा हळू हळू पसरत जातात तशा त्या गीताच्या लहरी उत्स्फूर्तपणे त्या जनसागरामध्ये पसरत गेल्या व वातावरणाला एक पवित्र गांभीर्य आले. क्रेमलिन भिंतीच्या माथ्यावरून महाप्रचंड पताका खाली जमिनीपर्यंत रूळत होत्या. त्या लाल पताकांवर सोनेरी व शुभ्र अक्षरे कोरलेली होती: "जागतिक सामाजिक क्रांतीच्या आरंभाचे हुतात्मे" आणि "जगातील कामगारांची बांधिलकी चिरायू होवो!"

बोचरे वारे चौकामधून वाहू लागले होते आणि पताकांना वर उडवीत होते. आता नगराच्या दूरदूरच्या वस्त्यांमधील कामगार आपल्या मृतांना सांगाती घेऊन लाल चौकात येत होते. दरवाजाच्या कमानीमधून येताना ते दिसत होते—फिकट लाल रंगाच्या त्यांच्या पताका आणि भडक रक्तरंगी शवपेटिका त्यांचे आगमन जाहीर करीत होत्या. त्या शवपेटिका ओबडधोबड होत्या, त्यांचे लाकूड तासलेले नव्हते व त्यांना लाल रंग माखला होता. या शवपेटचा खांद्यावर उंच धरून चालणाऱ्या रांगडचा पुरुषांच्या डोळयांमधून अश्रुधारा वहात होत्या, त्यांच्यापाठोपाठ महिला हुंदके देत, किंचाळत किंवा पांढऱ्याफटक प्रेतवत चेहऱ्यांनी ताठरपणे चालत येत होत्या. काही शवपेटिका उघडचा होत्या व त्यांची झाकणे मागचे लोक घेऊन चालले होते; इतर पेटचा सोनेरी किंवा रुपेरी मुलाम्याच्या कापडाने झाकल्या होत्या किंवा त्यांच्या टपावर सैनिकाची टोपी खिळे ठोकून बसवलेली होती. अत्यंत विद्रूप दिसणाऱ्या अशा कृत्रिम फुलांचे अनेक हार त्यांच्यावर घातलेले होते...

लोकांच्या गर्दीमधून वेडीवाकडी वाट काढत ती अंत्ययात्रा हळूहळू आमच्या दिशेने आली. आता दरवाजाच्या कमानीतून लाल रंगाच्या सर्व छटांच्या पताकांचा ओघ अविरतपणे वाहू लागला होता. त्यांच्यावर रुपेरी आणि सोनेरी अक्षरे कोरलेली होती व काळया फिती वरच्या टोकांना बांधल्या होत्या. काही पांढरी अक्षरे कोरलेले अराजकवादी काळे झेंडेही फडकत होते. बँडवर क्रांतिकारक अंत्ययात्रेचे सूर वाजत होते, उघडचा डोक्यांनी उभा राहिलेला प्रचंड जनसंमर्द तेच शोकगीत गात होता आणि अंत्ययात्रेमधले लोकही हुंदक्यांनी दबणाऱ्या आपल्या बसक्या आवाजांमध्ये सूर मिसळीत होते...

कामगारांच्या मधून मधून सैनिकांच्या कंपन्याही आपल्या शवपेटचा घेऊन येत होत्या, घोडदळाच्या तुकडचा सलामी देऊन जात होत्या, तोफखान्याच्या तुकडचा तोफा लाल आणि काळया वस्त्रात गुंडाळून घेऊन जात

होत्या – जणू त्या तोफांची तोंडे पुन्हा कधीही उघडणार नाहीत असे वाटत होते. त्यांच्या पताकांवर म्हटले होते, "तिसरी इंटरनॅशनल चिरायू होवो!" किंवा "आम्हाला प्रामाणिक, सार्वत्रिक, लोकशाहीवादी शांतता पाहिजे!"

अंत्ययात्रेतले लोक हळूहळू थडग्याच्या तोंडाशी येत होते, शवपेटचा घेतलेले लोक खड्ड्याच्या तळाशी उतरून जात होते. त्यांच्यापैकी अनेक स्त्रिया होत्या – आडव्या हाडाच्या, भक्कम कामगारवर्गीय बायका. मृतांच्या पाठोपाठ इतर बायका येत होत्या – तरुण, शोकव्याकुळ किंवा जखमी जनावरांसारख्या विव्हळणारे आवाज करणाऱ्या वृद्ध, चेहऱ्यावर सुरकुत्या पडलेल्या बायका. आपल्या मुलांच्या किंवा नवऱ्यांच्या पाठोपाठ त्या बांधव-थडग्यात उड्या टाकायचा प्रयत्न करीत होत्या व शोकाने विव्हळ होऊन किंचाळत होत्या. त्यांच्याविषयी अनुकंपा वाटणारी माणसे त्यांना आवरून धरत होती. गरीब माणसे एकमेकांवर केवढे निस्सीम प्रेम करतात!..

सबंध दिवसभर अंत्ययात्रा चालू होती, इवेरिया नरवाजाकडून मिरवणुका लाल चौकात येत व निकोल्स्कायाच्या वाटेने बाहेर जात. लाल पताकांची नदी जणू दुथडी भरून वहात होती, आशेचे आणि बांधिलकीचे शब्द त्यांच्यावर कोरलेले होते, भव्य भविष्यकाळाची आश्वासने त्यांच्यावर झळकत होती. पन्नास हजार लोकांच्या उपस्थितीत ती मिरवणूक चालली होती – जगातल्या कामगारांचे डोळे तिच्याकडे वेधले होते, त्या कामगारांच्या वंशजांची तिकडे सदैव नजर राहणार होती...

एका पाठोपाठ एक अशा पाचशे शवपेटचा थडग्यांमध्ये ठेवण्यात आल्या. संध्याकाळ झाली तरी अजूनही झुकलेल्या आणि फडकणाऱ्या पताका येत होत्या, बँड शोकगीताचे सूर वाजवीत होता आणि महाप्रचंड जनसमूह शोकगीत गात होता. थडग्यावरच्या पर्णहीन वृक्षांवर लटकावलेले हार रंगीबेरंगी फुलांसारखे दिसत होते. दोनशे लोकांनी फावड्यांनी माती लोटायला आरंभ केला. पावसाची भुरभुर चालू होती व त्या शोकगीताच्या गंभीर ध्वनीमधूनही शवपेटचांवर पडणाऱ्या पाण्याच्या थेंबांची टपटप स्पष्टपणे वेगळी ऐकू येत होती.

दिवे उजळले. शेवटच्या पताका गेल्या आणि जाता जाता कमालीच्या तणावाने मागे पुनःपुन्हा वळून पाहणाऱ्या त्या शोकविव्हल शेवटच्या महिलाही गेल्या. त्या महाप्रचंड चौकामधली कामगारवर्गीय सागराची भरती हळूहळू ओसरली...

मला एकाएकी जाणवले की, श्रद्धाळू रशियन जनतेला तिच्यासाठी स्वर्गात प्रार्थना म्हणायला आता यापुढे पाद्रयांची जरूरी नव्हती. कुठल्याही स्वर्गाने देऊ केले असते त्यापेक्षा अधिक सुखी राज्य ती जनता या पृथ्वीतलावर उभारीत होती व अशा राज्यासाठी मरण्यात एक गौरवच सामावला होता...

**प्रकरण अकरावे**

# सत्ताग्रहण[1]

## "रशियातील जनतेच्या हक्कांबाबतची घोषणा[2]

...या वर्षाच्या जूनमध्ये भरलेल्या सोविएतांच्या पहिल्या काँग्रेसने रशियातील जनतेच्या स्वयंनिर्णयाच्या हक्काची घोषणा केली.

"गेल्या नोव्हेंबरात झालेल्या सोविएतांच्या दुसऱ्या काँग्रेसने रशियातील जनतेच्या या अदेय हक्काला अधिक निर्णायकपणे आणि निश्चितपणे दुजोरा दिला:

"या काँग्रेसांच्या इच्छेची अंमलबजावणी करून, राष्ट्रजमातींविषयीच्या प्रश्नाची सोडवणूक करताना, जन-कमिस्सार मंडळाने पुढील तत्त्वे पायाभूत मानण्याचे ठरविले आहे:

(१) **रशियातील लोकांची समता आणि सार्वभौमत्व.**

(२) **रशियातील लोकांचा स्वतंत्रपणे स्वयंनिर्णय घेण्याचा हक्क; वेगळे होऊन स्वतंत्र राज्य स्थापन करण्यापर्यंत त्याची मर्यादा पोचू शकते.**

(३) **कोणत्याही आणि सर्व राष्ट्रीय व राष्ट्रीय-धार्मिक खास हक्कांचे आणि अपात्रतांचे निर्मूलन.**

(४) **रशियाच्या प्रदेशात राहणाऱ्या राष्ट्रीय अल्पसंख्यांचा व वांशिक गटांचा मुक्त विकास.**

राष्ट्रजमातींविषयक आयोग स्थापन केल्यानंतर ताबडतोब आज्ञापत्रे तयार करण्यात येतील.

रशियन प्रजासत्ताकाच्या वतीने,
राष्ट्रजमातींचे जन-कमिस्सार
**जोसेफ जुगाश्विली-स्तालिन.**
जन-कमिस्सार मंडळाचे अध्यक्ष
**व्ला. उल्यानोव (लेनिन).**

कीव्हच्या मध्यवर्ती रादाने युक्रेन स्वतंत्र प्रजासत्ताक असल्याचे जाहीर केले, तसेच हेल्सिंगफोर्स येथील सेनेटच्या वतीने फिन्लंडच्या सरकारने आपण स्वतंत्र असल्याचे जाहीर केले. सैबेरिया आणि कॉकेशस येथेही स्वतंत्र "सरकारे" निर्माण झाली. पोलिश मुख्य लष्करी समितीने रशियन सेनेमधील पोलिश शिपाई वेगाने एकत्र गोळा केले, त्यांच्या समित्या बरखास्त केल्या आणि विलक्षण कडक शिस्त प्रस्थापित केली...

या सर्व "सरकारांची" आणि "चळवळींची" दोन समान वैशिष्टचे होती ; त्यांच्यावर मालमत्तादार वर्गाचे नियंत्रण होते व त्यांना बोल्शेविकवादाबाबत भीती आणि धास्ती होती.

हळूहळू, या एकदम धक्का देणाऱ्या परिवर्तनाच्या वातावरणातच, जन-कमिस्सारांचे मंडळ समाजसत्तावादी व्यवस्था प्रस्थापित करण्याच्या उद्योगात गुंतले होते. सामाजिक सुरक्षानिधीबाबत आज्ञापत्र, कामगारांचे वर्चस्व प्रस्थापित करण्याबाबत आज्ञापत्र, वोलोस्त भूमी समित्यांचे नियम, दर्जे आणि पदव्या यांचे निर्मूलन, न्यायालयांचे निर्मूलन आणि जनता न्यायालयांची निर्मिती अशा अनेक गोष्टी घडल्या...[3]

"जनतेच्या नव्या सरकारचे आनंदाने अभिनंदन करण्यासाठी," सेनेपाठीमागून सेना, काफल्यामागून काफला आपली प्रतिनिधीमंडळे पाठवीत होता.

एके दिवशी, स्मोल्नीसमोर, नुकतीच खंदकांमधून आलेली फाटक्यातुटक्या कपड्यांमधील एक रेजिमेंट उभी असलेली मी पाहिली. ते हडकुळे आणि मातीने माखलेल्या चेहऱ्यांचे सैनिक मोठ्या दरवाजांसमोर ओळीत उभे होते व जणू आत देव आहे अशा भावनेने समोरील इमारतीकडे पहात होते. कुणीतरी कुचेष्टा करीत दरवाजावरच्या शाही गरुडचिन्हांकडे लक्ष वेधवले... लाल रक्षक तेथे पहारा द्यायला आले. सर्व सैनिकांच्या नजरा अशा उत्सुकतेने त्यांच्या दिशेने वळल्या की जणू त्यांनी लाल रक्षकांबद्दल ऐकले होते, पण त्यांना कधीही पाहिले नव्हते. ते दिलखुलासपणे हसले व लाल रक्षकांच्या पाठीवर शाबासकीची थाप मारायला रांगा सोडून बाहेर आले. त्यांच्या या कृतीमध्ये थोडा विनोद होता, थोडे कौतुकही होते...

हंगामी सरकार आता राहिले नव्हते. १५ नोव्हेंबरला, राजधानीमधील सर्व प्रार्थनामंदिरांमधून, त्याच्यासाठी प्रार्थना करण्याचे पाद्र्यांनी बंद केले. पण लेनिन यांनी स्वतःच केंद्रीय कार्यकारी समितीला सांगितल्याप्रमाणे "सत्ताग्रहणाची ती केवळ सुरुवात होती." हातून शस्त्रे काढून घेतल्यामुळे, देशाच्या आर्थिक जीवनाच्या नाड्या अजूनही हातात धरणाऱ्या विरोधी

पक्षाने, देशात अव्यवस्था माजविण्याचा चंग बांधला. सोविएतांना अडथळा करण्यासाठी, पांगळे बनविण्यासाठी आणि बदनाम करण्यासाठी सर्व रशियन बुद्धिमंत एकजुटीने कामाला लागले होते.

सरकारी कर्मचाऱ्यांचा संप सुसंघटित होता, त्याला बँकांचे आणि व्यापारी संस्थांचे आर्थिक पाठबळ होते. सरकारी यंत्रणा ताब्यात घेण्याच्या बोल्शेविकांच्या प्रत्येक हालचालीला प्रतिकार घडला.

ट्रॉट्स्की परराष्ट्र खात्याच्या कचेरीत गेले; तेथील काम करणाऱ्या लोकांनी त्यांच्या अधिकाराला मान्यता द्यायला नकार दिला, आणि आतून दारे लावून ते बसून राहिले; जेव्हा दारे जबरदस्तीने उघडण्यात आली तेव्हा त्यांनी राजिनामे दिले. ट्रॉट्स्कींनी दफ्तरखान्यांच्या किल्ल्या मागितल्या; जेव्हा कुलुपे फोडण्यासाठी कामगारांना आणण्यात आले तेव्हाच त्या देण्यात आल्या. नंतर असे आढळून आले की, माजी उपपरराष्ट्र मंत्री नेरातोव गुप्त करारांचे कागदपत्र बरोबर घेऊन गायब झाले होते...

श्ल्याप्निकोव यांनी मजूर खाते आपल्या ताब्यात घेण्याचा प्रयत्न केला. तेथे वातावरण कमालीचे गारठलेले होते व खोल्या गरम करण्यासाठी आगी पेटवायला कुणीही नव्हते. मंत्र्याची कचेरी कोणती हे त्यांना दाखवायला तेथील शेकडो कर्मचाऱ्यांपैकी एकहीजण तयार नव्हता...

१३ नोव्हेंबरला अलेक्सान्द्रा कल्लोन्ताय यांची समाज कल्याण खात्याच्या – अनुदाने व सार्वजनिक संस्थांचा विभाग – मंत्री म्हणून नियुक्ती झाल्यानंतर, त्यांच्या खात्यामधील चाळीस लोक सोडता इतर सर्वांनी संप पुकारून त्यांचे स्वागत केले. तात्काळ मोठ्या शहरामधील गरीब लोकांवर, अनुदानांवर चालणाऱ्या संस्थांमधील लोकांवर दैन्य कोसळले. उपासमारीने पोळणाऱ्या लंगड्यापांगळ्या लोकांच्या, चेहरे निळेकाळे पडलेल्या रोडावलेल्या अनाथांच्या झुंडींनी मंत्रालयाच्या इमारतीला वेढा घातला. हे दृश्य पाहून कळवळलेल्या कल्लोन्ताय यांच्या डोळ्यांमधून अश्रुधारा वाहू लागल्या. कचेरीच्या व तिजोरीच्या किल्ल्या मिळेपर्यंत त्यांनी संपवाल्यांना अटक करण्याचे हुकूम दिले; जेव्हा त्यांना किल्ल्या मिळाल्या तेव्हा मात्र असे आढळून आले की, माजी मंत्री काऊंटेस पानिना या आपल्याबरोबर सर्व निधी घेऊन गेल्या होत्या व घटनात्मक सभेच्या हुकुमाविना ते निधी परत करण्यास त्यांनी नकार दिला.[4]

शेतकी खात्यात, पुरवठा खात्यात, अर्थ खात्यात, अशाच तऱ्हेच्या घटना घडल्या. तेथील कर्मचाऱ्यांनी कामावर परत यावे किंवा आपल्या नोकऱ्या

आणि पेन्शनी गमवाव्या असा जेव्हा निर्वाणीचा हुकूम काढण्यात आला, तेव्हा ते परत आलेच नाहीत किंवा घातपात करण्यासाठी कामावर हजर झाले... जवळ जवळ सर्व प्रज्ञावंतवर्ग बोल्शेविकविरोधी असल्याने, सोविएत सरकारला नवा कर्मचारीवर्ग भरती करण्यासाठी कुठेही माणसे मिळेनात...

खाजगी बँका कमालीच्या हट्टीपणाने बंद राहिल्या, मात्र सट्टेबाजांसाठी त्यांची मागली दारे उघडी होती. जेव्हा बोल्शेविक कमिस्सारांनी तेथे प्रवेश केला तेव्हा जमाखर्चाच्या वह्या लपवून आणि पैसे दुसरीकडे हलवून कारकून निघून गेले. सरकारी बँकेच्या सर्व कर्मचाऱ्यांनी संप केला होता, फक्त तिजोऱ्यांचा ताबा असलेले कारकून आणि पैशाच्या टांकसाळीत काम करणारे लोक कार्य करीत राहिले. त्यांनी स्मोल्नीच्या सर्व मागण्या धुडकावून लावल्या आणि रक्षक समितीला व नगर दूमाला खाजगीरीत्या प्रचंड रकमा दिल्या.

सरकारी खर्चासाठी मोठ्या रकमा द्याव्यात अशी औपचारीक मागणी करायला, लाल रक्षकांना सांगाती घेऊन एक कमिस्सार दोनदा तेथे गेले. पहिल्या वेळी तेथे नगर दूमाचे सदस्य आणि मेन्शेविक व समाजवादी-क्रांतिकारक पक्षांचे पुढारी महाप्रचंड संख्येने हजर होते व भावी परिणामांविषयी ते एवढ्या गंभीरपणे बोलले की बिचारे कमिस्सार घाबरले. दुसऱ्या वेळी ते वॉरंट बरोबर घेऊन आले व रीतीप्रमाणे मोठ्याने वाचून दाखवू लागले; पण कुणीतरी त्यांच्या लक्षात आणून दिले की, त्या वॉरंटावर तारीख आणि शिक्का नाही; "दस्तऐवजां"बाबतच्या परंपरागत रशियन आदरापोटी त्यांना पुन्हा माघारी जाणे भाग पडले...

कर्ज विभागातील अधिकाऱ्यांनी सर्व वह्या नष्ट करून टाकल्या, त्यामुळे परदेशांशी रशियाचे जे आर्थिक व्यवहार होते त्या सर्वांच्या नोंदी नाहीशा झाल्या.

पुरवठा समित्यांनी, नगरपालिकेच्या ताब्यातील सार्वजनिक सुखसोयी पाहणाऱ्या कारभाऱ्यांनी, एक तर अजिबात काम केले नाही, किंवा घातपात घडवले. नगरवासियांच्या तातडीच्या गरजा पुऱ्या करण्यासाठी जेव्हा बोल्शेविकांनी मदत करण्याचा प्रयत्न केला, किंवा सार्वजनिक सेवा विभाग ताब्यात घेणे त्यांना भाग पडले, तेव्हा सर्व कर्मचारी ताबडतोब संपावर गेले, "नगरपालिकेच्या स्वायत्ततेचा भंग" बोल्शेविकांनी केल्याबद्दल, निषेधाच्या तारांचा दूमाने रशियाभर पाऊस पाडला.

लष्करी मुख्य ठाण्यांमध्ये आणि युद्ध व नौदल खात्यांच्या कचेऱ्यांमध्ये,

जेथे जुन्या अधिकाऱ्यांनी काम करायला मान्यता दिली होती, तेथे सेना समित्यांनी आणि उच्च सेनाधिकारी वर्गाने सोविएतांना हरतऱ्हांनी अडथळे आणले, एवढेच नव्हे तर युद्धआघाडीवरच्या शिपायांकडे दुर्लक्ष करण्यापर्यंत त्यांची मजल गेली. विक्झेलने वैर धरले होते, सोविएत सैनिकांना आगगाड्यांमधून नेण्यास नकार दिला होता; पेत्रोग्रादहून जाणारी प्रत्येक सैनिकी-आगगाडी बळजबरीने ताब्यात घ्यावी लागली होती व दरवेळी रेल्वे अधिकाऱ्यांना अटक करावे लागले होते – त्यावर विक्झेलने धमकी दिली होती की, त्या अधिकाऱ्यांची सुटका न केल्यास ताबडतोब सार्वत्रिक संप पुकारला जाईल...

स्मोल्नी उघड उघड निर्बल बनला होता. वर्तमानपत्रे म्हणत होती की, इंधनाच्या अभावी पेत्रोग्रादमधील सर्व कारखाने येत्या तीन आठवड्यांच्या आत बंद करावे लागणार होते; विक्झेलने जाहीर केले होते की, पहिल्या डिसेंबरपर्यंत आगगाड्या धावायच्या बंद पडणार होत्या; पेत्रोग्रादमध्ये फक्त तीन दिवस पुरेल एवढाच अन्नपदार्थांचा साठा होता, आणि बाहेरून काहीही पुरवठा होत नव्हता; आणि युद्ध आघाडीवरच्या सैन्याची उपासमार चालली होती... सरकारी आज्ञापत्रांकडे संपूर्ण दुर्लक्ष करावे, अशी जनतेला प्रोत्साहन देणारी आवाहने रक्षक समितीने आणि इतर विविध मध्यवर्ती समित्यांनी सबंध देशभर पाठवली होती. आणि दोस्त राष्ट्रांच्या वकिलाती एक तर कमालीच्या तटस्थ होत्या, किंवा उघडपणे वैरी बनल्या होत्या...

विरोधी पक्षांच्या वृत्तपत्रांवर आज बंदी घातली, तर दुसऱ्या दिवशी नव्या नांवांनी ती छापली जात होती, त्यांच्यामध्ये नव्या राजवटीसंबंधी अत्यंत उपहासात्मक मजकूर ठासून भरलेला होता[5]. 'नोवाया झीझ्न'सुद्धा नव्या राजवटीला "वाक्पांडित्य आणि नपुसकतेचे मिश्रण" म्हणून संबोधले होते.

> "दर दिवसागणिक (त्याने म्हटले होते) जन-कमिस्सारांचे सरकार कृत्रिम घाईगर्दीच्या दलदलीत अधिकाधिक खोलवर रुतत चालले आहे. अगदी सहजपणे सत्ता जिंकूनही... बोल्शेविकांना तिचा वापर करणे जमेनासे झालेय.
>
> "अस्तित्वात असलेल्या सरकारी यंत्रणेला चालविण्याची त्यांच्यात ताकद नाही आणि त्याच वेळी, सामाजिक प्रयोगकर्त्यांच्या सिद्धातांनु-

सार सहजपणे आणि मुक्तपणे काम करील असे नवे सरकार निर्माण करण्याची त्यांच्यात धमक नाही.

"थोड्या दिवसांपूर्वी बोल्शेविकांजवळ आपल्या वाढत्या पक्षाला चालवायला पुरेशी माणसे नव्हती – जे काम प्रामुख्याने वक्त्यांचे आणि लेखकांचे आहे; मग विविध आणि गुंतागुंतीची सरकारी कार्ये चालवायला प्रशिक्षित माणसे ते कुठून शोधून आणणार आहेत?

"नवे सरकार कारवाया करते आहे आणि धमक्या घालते आहे, देशावर ते वेगवेगळ्या आज्ञापत्रांचा वर्षाव करते आहे, प्रत्येक नवे आज्ञापत्र पूर्वीच्या आज्ञापत्राहून अधिक जहाल आणि अधिक "समाजवादी" असते. पण समाजसत्तावादाच्या या कागदी प्रदर्शनात – आमच्या वंशजांना स्तंभित करण्यासाठीच प्रामुख्याने ते रचले आहे असे वाटते – आजच्या घडीच्या तातडीच्या प्रश्नांची उकल करण्याची इच्छा दिसत नाही, किंवा क्षमताही जाणवत नाही!"

दरम्यान नवे सरकार स्थापन करण्यासाठी विक्झेलच्या परिषदेच्या रात्रंदिवस बैठका चालू होत्या. सरकारचा पायाभूत आधार कोणता असावा याबाबत दोन्ही बाजू तत्त्वतः सहमत झाल्या होत्या; जन-मंडळाच्या घडणीसंबंधी चर्चा चालू होती; मंत्रिमंडळाची तत्त्वतः निवड केली होती व चेर्नोव यांना पंतप्रधान नेमण्यात आले होते; बोल्शेविकांना प्रबळ अल्पसंख्य म्हणून निवडले होते, पण लेनिन आणि ट्रॉट्स्की यांना वगळले होते. मेन्शेविकांच्या आणि समाजवादी-क्रांतिकारकांच्या पक्षांच्या मध्यवर्ती समित्यांनी, किसान सोविएतांच्या कार्यकारी समितीने, निर्णय घेतला होता की, बोल्शेविकांच्या "गुन्हेगारी राजकारणा"बाबत जरी त्यांचा अपरिवर्तनीय विरोध असला, तरी "बांधवांचा रक्तपात टाळण्यासाठी" जन-मंडळामध्ये बोल्शेविकांचा प्रवेश होऊ देण्यास त्या विरोध करणार नाहीत.

परंतु केरेन्स्की यांच्या पलायनामुळे आणि सोविएतांना सर्वत्र मिळालेल्या आश्चर्यकारक यशामुळे परिस्थिती पालटली. १६ तारखेला, केंद्रीय कार्यकारी समितीच्या बैठकीत, डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांनी आग्रह धरला की, बोल्शेविकांनी इतर समाजवादी पक्षांबरोबर संमिश्र सरकार स्थापन करावे; अन्यथा लष्करी क्रांतिकारक समिती व केंद्रीय कार्यकारी समितीमधून ते आपले अंग काढून घेतील. माल्किन म्हणाले, "मॉस्कोहून येणाऱ्या बातम्यांमुळे, जेथे अडथळ्यांच्या दोन्ही बाजूंना आमच्या कॉम्रेड लोकांचे

रक्त सांडत आहे, आम्हाला पुन्हा एकदा सत्तेच्या संघटनाबाबतचा प्रश्न निर्माण करावा लागत आहे, आणि हा आमचा केवळ हक्कच नाही तर आमचे हे कर्तव्य आहे... स्मोल्नी संस्थेच्या अंतरंगातील भिंतींच्या आत बोल्शेविकांबरोबर बसण्याचा आणि या व्यासपीठावरून बोलण्याचा हक्क आम्ही जिंकला आहे. पक्षांतर्गत जोरदार संघर्षानंतर, जर तुम्ही तडजोड करण्याचे नाकारलेत, तर आम्हाला बाहेर जाऊन उघडपणे लढा पुकारणे भाग पडेल... ग्राह्य तडजोडीसाठी आपण लोकशाहीवादीपुढे अटी मांडल्या पाहिजेत..."

या निर्वाणीच्या निरोपानंतर, त्यावर विचार करायला दिलेल्या विश्रामाच्या वेळेनंतर, बोल्शेविक ठराव तयार करून परतले व तो कामेनियेव यांनी वाचून दाखवला :

"केंद्रीय कार्यकारी समितीचे असे मत आहे की, सरकारमध्ये सर्व समाजवादी पक्षांच्या प्रतिनिधींचा समावेश होणे आवश्यक आहे, ज्यात कामगार, सैनिक आणि किसान प्रतिनिधींच्या सोविएतांना सामावलेले आहे व ७ नोव्हेंबरच्या क्रांतीचा विजय ज्यांनी मान्य केलेला आहे — म्हणजेच सोविएतांच्या सरकारची स्थापना, शांतता, जमीन, कामगारांचे उद्योगधंद्यांवर वर्चस्व व कामगारवर्गाला सशस्त्र करणे याबाबतची आज्ञापत्रे यांना ज्यांनी मान्यता दिलेली आहे. म्हणून केंद्रीय कार्यकारी समिती असा प्रस्ताव मांडत आहे की, सोविएतच्या सर्व पक्षांनी सरकारच्या घडणीबाबत वाटाघाटी कराव्या आणि पुढील अटी पायाभूत मानाव्यात असा आग्रह धरीत आहे :

"सरकार केंद्रीय कार्यकारी समितीला जबाबदार राहील. केंद्रीय कार्यकारी समितीचा १५० सदस्यांपर्यंत विस्तार केला जाईल. कामगार आणि सैनिक प्रतिनिधींच्या सोविएतांच्या या १५० सदस्यांच्या जोडीला प्रांतिक किसान प्रतिनिधींच्या सोविएतांचे ७५ प्रतिनिधी, सेना आणि नौदल यांच्या युद्धआघाडीवरील संघटनांचे ८० प्रतिनिधी, ट्रेड युनियनांचे ४० (विविध अखिल रशिया युनियनांचे त्यांच्या महत्त्वाच्या प्रमाणात २५, विक्झेलचे १०, टपाल आणि तार कामगारांचे ५), आणि पेत्रोग्राद नगर दूमामधील समाजवादी गटांचे ५० प्रतिनिधी समाविष्ट केले जातील. खुद्द मंत्रिमंडळात किमान अर्धी खाती तरी बोल्शेविकांसाठी राखून ठेवली पाहिजेत. मजूर, गृह आणि परराष्ट्र खाती बोल्शेविकांना

दिली पाहिजेत. पेत्रोग्राद आणि मॉस्को येथील ठाणबंद फौजांवर मॉस्को व पेत्रोग्राद सोविएतांच्या प्रतिनिधींचा ताबा राहिला पाहिजे. सबंध रशियामधील कामगारांना पद्धतशीरपणे सशस्त्र करण्याची कामगिरी सरकार आपल्या अंगावर घेत आहे. मंत्रिमंडळात लेनिन आणि ट्रॉट्स्की यांचा समावेश करण्याचा आग्रह करण्याबद्दल निर्णय घेण्यात आला आहे.

कामेनियेव यांनी खुलासा केला. ते म्हणाले,

"परिषदेने सुचवलेल्या तथाकथित जन-मंडळात सुमारे ४२० सभासद असतील, त्यांपैकी १५० बोल्शेविक राहतील. त्याशिवाय प्रतिक्रांतिकारक जुन्या केंद्रीय कार्यकारी समितीचे प्रतिनिधी असतील, नगरपालिकांच्या दूमांनी निवडलेले १०० पैकी सर्वच्या सर्व सदस्य कोर्निलोववादी असतील; अव्क्सेन्तियेव यांनी नेमलेले किसान सोविएतांचे १०० प्रतिनिधी आणि इतःपर सैनिक समूहांचे प्रतिनिधित्व न करणाऱ्या जुन्या सेना समित्यांचे ८० प्रतिनिधी असतील.

"जुन्या केंद्रीय कार्यकारी समितीच्या प्रतिनिधींना, तसेच नगरपालिकांच्या दूमांच्या प्रतिनिधींना प्रवेश देण्यास आम्ही नकार देतो. किसान सोविएतांचे प्रतिनिधी किसान काँग्रेसने निवडून पाठवावेत; ही काँग्रेस आम्ही बोलावली आहे व त्याच वेळी ती नवीन कार्यकारी समिती निवडील. लेनिन आणि ट्रॉट्स्की यांना वगळण्याचा प्रस्ताव म्हणजे आमच्या पक्षाचा शिरच्छेद करण्याचा प्रस्ताव होय आणि तो आम्हाला ग्राह्य नाही. सरतेशेवटी सांगायचे म्हणजे कोणत्याही तऱ्हेने आम्हाला जन-मंडळ असण्याची जरूरी वाटत नाही; सोविएते सर्व समाजवादी पक्षांना खुली आहेत आणि जनतेमधील त्यांच्या खऱ्या प्रमाणांमध्ये केंद्रीय कार्यकारी समिती त्यांचे प्रतिनिधित्व करते..."

डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांच्या वतीने कारेलिन यांनी जाहीर केले की, त्यांचा पक्ष बोल्शेविक ठरावाच्या बाजूने मत देईल, पण काही तपशील सुधारण्याबाबतचा हक्क राखून ठेवील; उदा. किसानांचे प्रतिनिधित्व व डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांसाठी शेतकी खाते राखून ठेवण्याची मागणी. याला मान्यता देण्यात आली...

नंतर, पेत्रोग्राद सोविएतच्या बैठकीत, नव्या सरकारच्या स्थापनेबाबतच्या एका प्रश्नाला ट्रॉट्स्कींनी उत्तर दिले:

"मला त्याबाबत काहीही माहिती नाही. मी वाटाघाटींमध्ये भाग घेत

नाहीय... तरीही त्या काही फार महत्त्वाच्या आहेत असं मला वाटत नाही..."

त्या रात्री परिषदेमध्ये फार अस्वस्थ वातावरण होते. नगर दूमाच्या प्रतिनिधींनी तिच्यातून आपले अंग काढून घेतले...

पण खुद्द स्मोल्नीमध्ये, बोल्शेविक पक्षाच्या सभासदांमध्येच, लेनिन यांच्या धोरणाला जोरदार विरोध व्हायला आरंभ झाला होता. १७ नोव्हेंबरच्या रात्री तेथील मोठा हॉल खच्चून भरला होता. केंद्रीय कार्यकारी समितीच्या सभेत काहीतरी अनिष्टसूचक घडण्याची चाहूल लागत होती.

बोल्शेविक लारिन म्हणाले की, घटनात्मक सभेच्या निवडणुकांचा क्षण आला आहे व "राजकीय दहशतवाद" नष्ट करण्याची वेळ होऊन गेलीय.

"वृत्तपत्रस्वातंत्र्याविरुद्ध केलेल्या उपाययोजनांमध्ये दुरुस्त्या कराव्यात. लढ्याच्या काळात त्यांना सबळ कारणे होती, पण आता यापुढे सबबी सांगून भागणार नाही. वृत्तपत्रांना स्वातंत्र्य असावे, कारण ती दंग्याधोप्याची आणि उठावाची आवाहने करीत नाहीत.

त्यांच्या स्वतःच्याच पक्षाकडून टवाळीच्या उद्गारांचे आणि आरोळ्यांचे रान उठले असताना लारिन यांनी तसेच आपल्या ठरावाचे घोडे पुढे दामटले:

"जन-कमिस्सार मंडळाचे वृत्तपत्रांबाबतचे आज्ञापत्र इतःपर रद्दबातल ठरविण्यात येत आहे... केंद्रीय कार्यकारी समितीने निवडलेल्या लष्करी न्यायसभेच्या (प्रतिनिधित्व असलेल्या विविध पक्षांच्या ताकदीच्या प्रमाणात निवडलेल्या)* निर्णयानुसारच केवळ राजकीय दडपशाहीचे उपाय अंमलात आणावेत; आणि आधीच अंमलात आणलेल्या उपाययोजनांचा फेरविचार करण्याचाही या न्यायसभेला हक्क राहील."

या ठरावाचे टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटाने स्वागत केले व या टाळ्या केवळ डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांनीच नव्हे, तर काही बोल्शेविकांनीही पिटल्या होत्या.

लेनिनवाद्यांच्या बाजूने अवानेसोव यांनी घाईघाईने प्रस्ताव मांडला की, समाजवादी पक्षांमध्ये काही समझोता घडून येईपर्यंत, वृत्तपत्रांसंबंधीचा प्रश्न तहकूब करावा. या ठरावाला प्रचंड मतांनी विरोध झाला.

"सध्या साध्य होत जाणाऱ्या क्रांतीनं," अवानेसोव पुढे म्हणाले,

---

*कंसात घातलेले शब्द मध्यवर्ती कार्यकारी समितीच्या टिपणांमध्ये समाविष्ट नाहीत. —सं.

"खाजगी मालमत्तेवर प्रहार करायला मार्गपुढं पाहिलं नाही ; आणि खाजगी मालमत्ता या नात्यानं आपण वृत्तपत्रांच्या प्रश्नाची तपासणी केली पाहिजे ..."

त्यावर त्यांनी अधिकृत बोल्शेविक ठराव वाचून दाखवला :

"उठावाच्या आणि प्रतिक्रांतिकारक कारवायांना दडपून टाकण्याच्या काळातच केवळ लष्करी कारणांकरिताच भांडवलदारी वृत्तपत्रांवर बंदी घालण्यात आली नाही, तर वृत्तपत्रांबाबत एक नवी शासनप्रणाली स्थापित करण्याकडे स्थित्यंतर घडविण्यातील तो एक अत्यावश्यक उपाय आहे ; या नव्या शासनप्रणालीत छापखान्यांचे आणि वृत्तपत्राचे मालक जनमत घडविण्यातील सर्वश्रेष्ठ व एकमेव कारखानदार बनणार नाहीत.

"खाजगी मालकीचे छापखाने आणि कागद पुरवठे जप्त करण्यासाठी आम्ही पुढे आणखी कारवाई केली पाहिजे, या गोष्टी राजधानीत आणि प्रांतांमध्ये अशा दोन्ही ठिकाणी सोविएतांच्या मालकीच्या बनल्या पाहिजेत ; म्हणजे राजकीय पक्षांना व कटांना ते मांडीत असलेल्या विचारांच्या ताकदीच्या प्रमाणात – दुसऱ्या शब्दात सांगायचे तर त्यांच्या मतदारांच्या संख्येच्या प्रमाणात – छपाईच्या सवलतींचा उपयोग करून घेता येईल.

"तथाकथित "वृत्तपत्रस्वातंत्र्याची" पुनःस्थापना करणे, भांडवलदारांना – लोकांच्या मनांमध्ये वीष भरविणाऱ्यांना – छापखाने आणि कागद सरळ परत देऊन टाकणे, म्हणजे भांडवलाच्या इच्छेपुढे अग्राह्य शरणागती पत्करणे होय, क्रांतीच्या एका सर्वांत महत्त्वाच्या विजयाला गमावून बसणे होय ; दुसऱ्या शब्दात सांगायचे म्हणजे हा निर्विवादपणे प्रतिक्रांतिकारक स्वरूपाचा उपाय ठरेल.

"उपरोक्त परिस्थिती विचारात घेऊन, वृत्तपत्रांच्या प्रांतात जुनी शासनप्रणाली पुन्हा स्थापन करण्याच्या उद्दिष्टाने केलेले सर्व प्रस्ताव केंद्रीय कार्यकारी समिती ठामपणे नाकारीत आहे आणि मध्यमवर्गीय पूर्वग्रहांमधून निर्माण झालेल्या किंवा प्रतिक्रांतिकारक भांडवलदारवर्गाच्या स्वारस्यांच्या उघडपणे आहारी गेल्यामुळे निर्माण झालेल्या बहाण्यांविरुद्ध व निर्वाणीच्या भाषांविरुद्ध जन-कमिस्सारांच्या मंडळाने घेतलेल्या भूमिकेला : निसंदिग्धपणे पाठिंबा देत आहे."

या ठरावाचे वाचन चालू होते तेव्हा डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांच्या बाजूने उपहासात्मक आरोळ्यांनी आणि बंडखोर बोल्शेविकांच्या बाजूने संताप-युक्त उद्‌गारांनी अडथळे आणले जात होते. कारेलिन उभे राहून निषेध व्यक्त करीत होते. "तीन आठवड्यांपूर्वी वृत्तपत्रस्वातंत्र्याचे बोल्शेविक कट्टर कैवारी होते... या ठरावामधील युक्तिवाद जुन्या शंभर काळे संघटनेच्या आणि झारशाही राजवटीमधील सेन्सॉरच्या दृष्टिकोनाशी तंतोतंत मिळताजुळता आहे. कारण 'लोकांच्या मनांमध्ये वीष भरविण्याची' भाषा ते सुद्धा बोलत."

ठरावाला अनुकूल असे एक लांबलचक भाषण ट्रॉट्स्कींनी केले. यादवी युद्धाच्या काळातील वृत्तपत्रे आणि विजयानंतरची वृत्तपत्रे यांच्यामधील फरक त्यांनी विशद करून सांगितला. "यादवी युद्धात हिंसेचा वापर करण्याचा हक्क फक्त दलितांचा होता..." (आरोळ्या – "आता कोण दलित आहे? नरमांसभक्षक!")

"आमच्या विरोधकांवर आम्ही अद्याप विजय मिळवलेला नाही आणि वृत्तपत्रे ही त्यांच्या हातांमधली शस्त्रे आहेत. अशा परिस्थितीत वृत्तपत्रे बंद पाडणे ही संरक्षणाची कायदेशीर उपाययोजना आहे..." मग विजया-नंतरच्या वृत्तपत्रांसंबंधीच्या प्रश्नाकडे जात ट्रॉट्स्की पुढे म्हणाले:

"वृत्तपत्रस्वातंत्र्यासंबंधीचा समाजवाद्यांचा दृष्टिकोन हा व्यवसाय-स्वातंत्र्यासंबंधीच्या त्यांच्या दृष्टिकोनासारखाच असावा... रशियामध्ये सध्या प्रस्थापित होत असलेल्या लोकशाही सत्तेमध्ये ज्याप्रमाणे खाजगी मालकीच्या उद्योगधंद्यांचे वर्चस्व नष्ट केले जात आहे, त्याचप्रमाणे खाजगी मालकीच्या वृत्तपत्रांचे वर्चस्व नष्ट करण्याची आवश्यकता आहे... सोविएतांच्या सत्तेने सर्व छापखाने जप्त केले पाहिजेत." (आरोळ्या – "'प्रावदा'चा छाप-खाना जप्त करा!") भांडवलदारांची वृत्तपत्रांची मक्तेदारी नष्ट केली पाहिजे. अन्यथा आम्ही सत्ता हाती घेण्यात काही अर्थ नाही! नागरिकांच्या प्रत्येक गटासाठी छापखाना आणि कागद उपलब्ध असला पाहिजे... छाप-खाने आणि कागद यांची सर्वप्रथम मालकी कामगार-किसानांकडे आहे व केवळ नंतरच अल्पसंख्य भांडवलदारी पक्षांकडे आहे... सोविएतांच्या हाती सत्ता गेल्याने अस्तित्वाच्या आवश्यक परिस्थितीमध्ये आमूलाग्र बदल घडून येईल आणि हा बदल वर्तमानपत्रांच्या क्षेत्रात ठळकपणे जाणवेल... आम्ही जर बँकांचे राष्ट्रीयीकरण करणार आहोत, तर अर्थवाल्यांच्या नियतका-लिकांचे अस्तित्व आम्ही कसे सहन करणार? जुनी शासनप्रणाली मेली पाहि-

जे; ही गोष्ट कायमची मनावर ठसवून घेतली पाहिजे..." (टाळ्या आणि संतापजनक आरोळ्या.)

कारेलिन यांनी जाहीर केले की, या महत्त्वाच्या प्रश्नाचा निर्णय खास समितीकडे सोपवला पाहिजे; केंद्रीय कार्यकारी समितीला त्यावर चर्चा करण्याचा काहीएक अधिकार नाही. वृत्तपत्रे स्वतंत्र असावीत अशी पुन्हा एकदा त्यांनी आवेशाने मागणी केली.

नंतर लेनिन बोलायला उभे राहिले. त्यांचे बोलणे अगदी शांत, भावना-प्रधानतेचा लवलेशही नसलेले असे होते. वेचक शब्द हळूहळू बोलताना त्यांच्या कपाळावर सुरकुत्यांचे जाळे पडत होते. प्रत्येक वाक्य घणाघाती प्रहार करणारे होते.

"यादवी युद्ध अद्याप संपलेलं नाही; शत्रू अजूनही आमच्याशी झुंजतोय; त्याच्या परिणामी वृत्तपत्रांवर घातलेली बंदी उठवणे अशक्य आहे.

"आम्ही बोल्शेविक नेहमीच सांगत आलो आहोत की, जेव्हा आमच्या हाती सत्ता येईल, तेव्हा भांडवलदारांची वृत्तपत्रं आम्ही बंद पाडू. भांडवलदारी वृत्तपत्रांचं अस्तित्व सहन करणं म्हणजे समाजवादी म्हणून जगायचं थांबणं. जेव्हा क्रांती करायची असते तेव्हा वेळकाढूपणा करणं शक्य नसतं; नेहमीच पुढं जावं लागतं – किंवा मागं यावं लागतं. जो आत्ता "वृत्तपत्र-स्वातंत्र्याची" भाषा बोलतोय तो मागं जातोय, आणि समाजसत्तावादाकडच्या आमच्या चौखूर प्रगतीला थांबवतोय.

"पहिल्या क्रांतीनं जसं झारशाहीचं जोखड फेकून दिलं, तसं आम्ही भांडवलशाहीचं जोखड फेकून दिलंय. **जर पहिल्या क्रांतीला राजनिष्ठ वृत्तपत्रं बंद करायचा हक्क होता,** तर आम्हाला भांडवलनिष्ठ वृत्तपत्रं बंद पाडायचा हक्क आहे. वर्गलढ्याच्या इतर प्रश्नांपासून वृत्तपत्रस्वातंत्र्याचा प्रश्न अलग करणं अशक्य आहे. ही वर्तमानपत्रं बंद पाडण्याचं आम्ही आश्वासन दिलं होतं आणि आम्ही ते पार पाडू. बहुसंख्य जनता आमच्या बाजूची आहे!

"आता उठाव संपला आहे आणि इतर समाजवादी पक्षांची वर्तमानपत्रं बंद पाडण्याची आमची अजिबात इच्छा नाही; कारण ती सशस्त्र उठावाची किंवा सोविएत सरकारविरुद्ध कायदेभंगाची चळवळ करण्याची आवाहनं करीत नाहीत. तरीही समाजवादी वृत्तपत्रस्वातंत्र्याच्या बहाण्याखाली, भांडवलदारवर्गाकडून गुप्तपणे मदत घेण्यास, छापखाने, शाई आणि कागद यांची मक्तेदारी प्राप्त करण्यास, आम्ही त्यांना परवानगी देणार नाही... सर्व अत्यावश्यक वस्तू प्रथम सोविएत सरकारच्या मालकीच्या

झाल्या पाहिजेत आणि नंतरच समाजवादी पक्षांना त्यांच्या मतांच्या बलाच्या प्रमाणात त्यांचं वाटप केलं जाईल..."

मग मतदान झाले. लारिन आणि डावे समाजवादी-क्रांतिकारक यांच्या ठरावाचा २२ विरुद्ध ३१ मतांनी पराभव झाला* लेनिन यांचा ठराव ३४ विरुद्ध २४ मतांनी मंजूर झाला. अल्पसंख्यांमध्ये बोल्शेविक रिआझानोव आणि लोझोव्स्की होते; वृत्तपत्रस्वातंत्र्याविरुद्ध कोणत्याही बंधनाच्या बाजूने मत देणे आपल्याला अशक्य आहे, असे त्यांनी सांगितले.

त्यावर डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांनी जाहीर केले की, जे काही केले जात आहे त्याला इतःपर ते जबाबदार राहणार नाहीत व लष्करी क्रांतिकारक समितीमधून आणि इतर सर्व शासकीय जबाबदारीच्या स्थानांमधून त्यांनी आपले अंग बाहेर काढून घेतले.

नोगीन, रीकोव, मिल्यूतिन, तेओदोरोविच आणि श्ल्याप्निकोव या पाच सभासदांनी जन-कमिस्सार मंडळाचे राजिनामे दिले. त्यांनी जाहीर केले:

"सोविएतांमधील सर्व पक्षांचे मिळून बनलेल्या समाजवादी सरकारला आम्ही अनुकूल आहोत. केवळ अशाच सरकारच्या निर्मितीमुळे कामगार-वर्गाच्या आणि क्रांतिकारक सेनेच्या शौर्यशाली लढ्याच्या फलश्रुतींची हमी मिळू शकेल, असे आम्हाला वाटते. त्यापलिकडे फक्त एकच मार्ग उरतो: राजकीय दहशतवादाच्या साह्याने विशुद्ध बोल्शेविक सरकारची स्थापना. हा शेवटचा मार्ग जन-कमिस्सारांच्या मंडळाने पत्करला आहे. आम्ही त्याला अनुसरू शकत नाही आणि शकणार नाही. यामधून सरळ सरळ अनेक काम-गारवर्गीय संघटनांना राजकीय जीवनातून वगळण्यात येईल, बेजबाबदार राजवट स्थापन होईल आणि क्रांतीचा व देशाचा नाश होईल, हे आम्हाला दिसते आहे. अशा धोरणाची जबाबदारी आम्ही घेऊ शकत नाही आणि जन-कमिस्सार म्हणून आमच्या केंद्रीय कार्यकारी समितीसमोर आम्ही त्याग करतो."

इतर कमिस्सारांनी आपल्या पदांचे राजिनामे न देता निवेदनावर सह्या केल्या: रिआझानोव, वृत्तपत्रविभागाचे देर्बीशेव, सरकारी छापखान्याचे

---

*चुकीचे आहे. लारिन आणि डावे समाजवादी-क्रांतिकारक यांचा ठराव २० विरुद्ध २५ मतांनी पराभूत झाला.—सं.

अर्बुझोव, लाल रक्षकांचे यूरेनियेव, मजूर खात्याचे फ्योदोरोव व आज्ञापत्र-निर्मिती विभागाचे चिटणीस लारिन.

तसेच बोल्शेविक पक्षाच्या मध्यवर्ती समितीचा कामेनियेव, रीकोव, मिल्यूतिन, झिनोवियेव आणि नोगीन यांनी राजिनामा दिला. त्याची पुढील कारणे त्यांनी जाहीर केली :

"...जर नव्याने रक्तपात घडवायचा नसेल, आगामी दुष्काळ टाळायचा असेल, कालेदिनवाद्यांकडून क्रांतीचा नाश घडवायचा नसेल, योग्य वेळी घटनात्मक सभा भरविण्याची हमी मिळवायची असेल आणि सोविएतांच्या दुसऱ्या काँग्रेसने संमत केलेला कार्यक्रम प्रभावीपणे अंमलात आणावयाचा असेल, तर अशा सरकारची स्थापना (सोविएतांमधील सर्व पक्षांचा समावेश असलेल्या) अपरिहार्य आहे...

"लोकशाहीमधील भिन्न राजकीय पक्षांमधील रक्तपात त्वरित थांबलेला पाहण्यास उत्सुक असलेल्या अगणित कामगारवर्गीयांच्या आणि सैनिकांच्या इच्छेविरुद्ध अंमलात आणल्या जाणाऱ्या मध्यवर्ती समितीच्या सर्वनाशी धोरणाला जबाबदार राहण्याची आमची तयारी नाही...

"कामगारांच्या आणि सैनिकांच्या समूहांना आमचे मत उघडपणे सांगता यावे म्हणून मध्यवर्ती समितीच्या सभासदपदाचा आम्ही त्याग करीत आहोत...

"विजयाच्या क्षणी आम्ही मध्यवर्ती समिती सोडून जात आहोत; विजयाच्या फळांना गमावणाऱ्या आणि कामगारवर्गाला चिरडून टाकणाऱ्या दिशेने मध्यवर्ती समितीचे पुढारी धोरण चालवीत असता स्वस्थ बसून राहणे आम्हाला जमत नाही..."

कामगार समुदायांमध्ये, शिबंदीच्या सैनिकांमध्ये अस्वस्थ खळबळ माजली. ते आपली प्रतिनिधीमंडळे स्मोल्नीला पाठवू लागले, नव्या सरकारची स्थापना करणाऱ्या परिषदेला पाठवू लागले. बोल्शेविकांच्या पक्षात दुफळी माजलेली पाहून परिषदेतील लोकांना अत्यानंद झाला होता.

पण लेनिनवाद्यांनी त्वरित आणि कठोरपणे उत्तर दिले. श्ल्याप्निकोव आणि तेओदोरोविच यांनी पक्ष-शिस्तीपुढे मान तुकवली व आपापल्या पदांवर ते परतले. कामेनियेव यांची केंद्रीय कार्यकारी समितीच्या अध्यक्षपदावरून हकालपट्टी करण्यात आली व स्वेर्दलोव यांची त्यांच्या जागी नियुक्ती झाली. झिनोवियेव यांना पेत्रोग्राद सोविएतच्या अध्यक्षपदावरून दूर करण्यात आले. २० तारखेच्या सकाळी, 'प्रावदा'मध्ये रशियातील जनतेला उद्देशून एक

मणसणीत जाहीरनामा प्रसिद्ध करण्यात आला; तो लेनिननी लिहिला होता, त्याच्या लाखो प्रती छापण्यात आल्या, सर्व भिंतींवर तो चिकटवण्यात आला आणि सबंध रशियाभर त्याचे वाटप झाले*:

"सोविएतांच्या दुसऱ्या अखिल रशिया काँग्रेसने बोल्शेविक पक्षाला बहुमत मिळवून दिले. म्हणून केवळ या पक्षाने स्थापलेले सरकारच तेवढे सोविएत सरकार असू शकेल. आणि सर्वांना विदित आहेच की, नव्या सरकारच्या स्थापनेला काही तासांचा अवधी असताना आणि सोविएतांच्या अखिल रशिया काँग्रेसपुढे त्याची यादी सादर करण्यापूर्वी, बोल्शेविक पक्षाच्या मध्यवर्ती समितीने आपल्या बैठकीला येण्याचे डाव्या समाजवादी-क्रांतिकारक गटाच्या तीन अत्यंत मान्यवर सदस्यांना – काम्कोव, स्पीरो आणि कारेलिन या कॉम्रेडांना – आमंत्रण दिले होते व नव्या सरकारमध्ये सहभागी होण्याबद्दल **त्यांना विचारणा केली होती.** आमंत्रित कॉम्रेड मंडळींनी नकार दिला याचे आम्हाला अतीव दुःख होते; क्रांतिकारकांच्या आणि कामगारवर्गाच्या पुरस्कर्त्यांच्या दृष्टीने त्यांचा नकार अस्वीकारार्ह आहे असे आम्हाला वाटते; डाव्या समाज-वादी-क्रांतिकारकांना केव्हाही सरकारमध्ये समाविष्ट करून घ्यायला आमची तयारी आहे; पण सोविएतांच्या दुसऱ्या अखिल रशिया काँग्रेस-मध्ये बहुमत मिळवलेला पक्ष म्हणून आम्ही जाहीर करतो की, नवे सरकार बनविण्यास जनतेसमोर आम्हाला अधिकार आहे **आणि ते आमचे कर्तव्य आहे**...

"...कॉम्रेडहो! आमच्या पक्षाचे आणि जन-कमिस्सार मंडळाचे अनेक सभासद, कामेनियेव, झिनोवियेव, नोगीन, रीकोव, मिल्यूतिन व इतर काही काल १७ नोव्हेंबर रोजी आमच्या पक्षाच्या मध्यवर्ती समितीला सोडून गेले, आणि शेवटचे तीन जन-कमिस्सार मंडळाला सोडून गेले... आम्हाला सोडून गेलेले कॉम्रेड पळपुट्या सैनिकांप्रमाणे वागलेत, कारण त्यांच्यावर सोपवलेल्या पदांचा त्यांनी त्याग केला

---

*लेनिन यांनी १८-१९ नोव्हेंबर रोजी लिहिलेल्या आणि 'प्रावदा'-मध्ये २० नोव्हेंबर १९१७ ला 'रशियन सामाजिक-लोकशाही कामगार पक्षाच्या (बोल्शेविक) मध्यवर्ती समितीतर्फे पक्षाच्या सर्व सदस्यांना व रशियातील सर्व कामगारवर्गांना उद्देशून' या शीर्षकाखाली प्रसिद्ध झालेल्या आवाहनाचा येथे संदर्भ आहे. – सं.

एवढेच नाही, तर निवृत्त होण्यापूर्वी पेत्रोग्रादच्या आणि मॉस्कोच्या पक्ष संघटनांच्या निर्णयांची त्यांनी वाट पहावी, असे आमच्या पक्षाच्या मध्यवर्ती समितीने त्यांना सरळ आदेश दिले असताना, त्यांनी त्या आदेशांची अवज्ञा केली. अशा प्रकारचा पळपुटेपणा आम्ही दोषार्ह मानतो. आमचा ठाम विश्वास आहे की, आमच्या पक्षातील सर्व सुजाण कामगार, सैनिक आणि किसान, किंवा आमच्या पक्षाबद्दल सहानुभूती बाळगणारे लोक, या पळपुटयांच्या वर्तनाचा धिक्कार करतील...

"कॉम्रेडहो, जरा आठवण करा, यांपैकी कामेनियेव व झिनोवियेव हे दोन पळपुटे, पेत्रोग्रादचा उठाव होण्यापूर्वीच पळपुटे आणि संपफोडे असल्याची चिन्हे दाखवीत होते; २३ ऑक्टोबर १९१७ रोजी झालेल्या मध्यवर्ती समितीच्या निर्णायक बैठकीत त्यांनी उठावाविरुद्ध मतदान केले होते; आणि मध्यवर्ती समितीने उठाव करण्याचा ठराव संमत केल्यानंतरही त्यांनी पक्षकार्यकर्त्यांच्या बैठकीत आपली मोहीम चालू ठेवली... पण आगगाडी जसा लाकडाचा भुस्सा उधळून लावते त्याप्रमाणे जनतेच्या प्रभावी भावनेने, मॉस्कोत, पेत्रोग्रादमध्ये, आघाडीवर, खंदकांमध्ये, खेडयांमध्ये, लक्षावधी कामगारांनी, सैनिकांनी आणि किसानांनी जबरदस्त शौर्य गाजवून या पळपुटयांना बाजूला सारले आहे...

"ज्यांची निष्ठा नाही, जे घुटमळतात, ज्यांना शंका वाटते, जे भांडवलदारांना घाबरतात किंवा भांडवलदारांच्या प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष गुन्ह्यांना साथ करतात, अशांचा धिक्कार असो! पेत्रोग्रादच्या, मॉस्कोच्या, बाकीच्या रशियाच्या **जनसमूहांमध्ये** द्विधावस्थेची **किंचितही छटा नाही**... ज्यांना जनतेचे पाठबळ नाही, ज्यांना **प्रत्यक्षात** केवळ कोर्निलोववाद्यांचा, साविन्कोववाद्यांचा, युंकरांचा आणि तत्समांचा पाठिंबा आहे, अशा प्रज्ञावंतांच्या छोटया गटांच्या निर्वाणीच्या निरोपांपुढे आम्ही मुळीच झुकणार नाही..."

तप्त वादळाच्या लाटा उसळाव्यात तसा सबंध देशाकडून प्रतिसाद मिळाला. बंडखोरांना "कामगार आणि सैनिक यांच्या समूहांसमोर उघडपणे आपले मत सांगण्याची" कधी संधीच मिळाली नाही. "पळपुटयांचा" धिक्कार करणारे जनतेचे संतापजनक निषेध केंद्रीय कार्यकारी समितीवर उत्तुंग लाटांप्रमाणे कोसळू लागले. युद्धआघाडीवरून, वोल्गामधून, पेत्रोग्रादच्या

कारखान्यांमधून संतापलेली प्रतिनिधीमंडळे, आणि समित्या अनेक दिवसपर्यंत स्मोल्नीवर गर्दीने येत राहिली. त्यांनी सरकार सोडण्याचे धाडस कसे केले? क्रांती नष्ट करायला भांडवलदारांनी त्यांना पैसे चारले काय? त्यांनी परत आले पाहिजे आणि मध्यवर्ती समितीच्या निर्णयांपुढे मान तुकवली पाहिजे!"

फक्त पेत्रोग्रादच्या शिबंदीमध्ये अद्याप अनिश्चित वातावरण होते. २४ नोव्हेंबरला सैनिकांची एक प्रचंड सभा भरली व सर्व राजकीय पक्षांचे प्रतिनिधी त्या सभेत बोलले. अफाट बहुमताने लेनिन यांचे धोरण राखण्याचा निर्णय घेण्यात आला व डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांना सरकारमध्ये सामील होण्याबद्दल सांगण्यात आले[७].

मेन्शेविकांनी अंतिम निर्वाणीचा संदेश देऊन मागण्या केल्या की, सर्व मंत्र्यांची आणि युंकरांची मुक्तता व्हावी, सर्व वृत्तपत्रांना संपूर्ण स्वातंत्र्य देण्यात यावे, लाल रक्षकांना निःशस्त्र करावे आणि शिबंदीवर दूमाचे वर्चस्व स्थापन करावे. त्यावर स्मोल्नीने उत्तर दिले की, सर्व समाजवादी मंत्री आणि अगदी थोडे वगळता सर्व युंकर आधीच मुक्त करण्यात आले आहेत, भांडवलदारी वृत्तपत्रे सोडता सर्व वृत्तपत्रे स्वतंत्र आहेत पण सेनादलांवर सोविएतचा अधिकार राहील. १९ तारखेला नवे सरकार स्थापणारी परिषद बरखास्त झाली आणि विरोधी पक्ष एकामागून एक सटकून मोगीलेव येथे जमा झाले; तेथे सेनाधिकाऱ्यांच्या अख्त्याराखाली त्यांनी शेवटपर्यंत सरकारामागून नवे सरकार स्थापन करण्याचा उद्योग चालू ठेवला...

दरम्यान विक्झेलच्या ताकदीला बोल्शेविक सुरुंग लावीत होते. पेत्रोग्राद सोविएतने सर्व रेल-कामगारांना आवाहन केले होते की, त्यांनी विक्झेलला आपले अधिकार सोडून देण्यास भाग पाडावे. १५ तारखेला, केंद्रीय कार्यकारी समितीने किसानांबाबत स्वीकारलेल्या आपल्या धोरणाची पुनरुक्ती करून १ डिसेंबरला रेल-कामगारांची अखिल रशिया काँग्रेस भरविली जाईल अशी घोषणा केली; विक्झेलने ताबडतोब आपली काँग्रेस दोन आठवड्यांनंतर भरणार असल्याचे जाहीर केले. १६ नोव्हेंबरला, विक्झेलचे सदस्य केंद्रीय कार्यकारी समितीमध्ये आपापल्या जागी स्थानापन्न झाले. २ डिसेंबरच्या रात्री, रेल-कामगारांच्या अखिल रशिया काँग्रेसच्या उद्घाटनाच्या अधिवेशनाला, रस्ते आणि दळणवळण खात्याचे कमिस्सारपद, केंद्रीय कार्यकारी समितीने औपचारिकपणे विक्झेलला देऊ केले — ते स्वीकारले गेले...

सत्तेचा प्रश्न सोडविल्यानंतर, प्रत्यक्ष शासनकारभारामधील समस्यांकडे बोल्शेविकांनी आपले लक्ष वळवले. पहिल्यप्रथम, शहराला, देशाला,

सैन्याला खाऊ घालणे भाग होते. खलाशांच्या आणि लाल रक्षकांच्या तुकड्या गुदामांवर, रेल्वे जंक्शनांवर, एवढेच नव्हे तर कालव्यांमधल्या पडावांवरही धाडी घालत होते व खाजगी सटोडियांनी लपवून ठेवलेले हजारो पूड * धान्य शोधून काढून ते जप्त करीत होते. प्रांतांमध्ये दूत पाठविण्यात आले व तेथे त्यांनी भूमी समित्यांच्या मदतीने मोठ्या धान्य व्यापाऱ्यांच्या कोठारांना ताब्यात घेतले. दक्षिणेकडे, सैबेरियाकडे, पाच पाच हजारांच्या गटांनी, भरपूर शस्त्रास्त्रे देऊन खलाशांच्या मोहीमा धाडण्यात आल्या. त्या प्रदेशांमध्ये अद्याप श्वेतरक्षकांच्या ताब्यात असलेली शहरे काबीज करून, तेथे सुव्यवस्था स्थापन करून, **खाद्यपदार्थ हस्तगत करण्याची** फिरती कामगिरी त्यांच्यावर सोपवलेली होती. ट्रान्स-सैबेरिया रेलमार्गावरील उतारूंची वाहतूक दोन आठवडेपर्यंत स्थगित करण्यात आली व कारखाना समित्यांनी जुळणी केलेल्या कापडाच्या गासड्या आणि लोखंडाच्या कांबीनी भरलेल्या तेरा आगगाड्या पूर्वेकडे पाठवण्यात आल्या. त्या प्रत्येक आगगाडीबरोबर एक एक कमिस्सार होता व आगगाडीमधून नेलेल्या मालाच्या बदली सैबेरियातील किसानांकडून धान्य आणि बटाटे पैदा करण्याचे काम त्यांच्यावर सोपवलेले होते...

दॉनच्या कोळसा खाणी कालेदिनच्या ताब्यात असल्यामुळे इंधनाचा प्रश्न तातडीचा बनला. स्मोल्नीने सर्व थिएटरांमधली, दुकाने व रेस्तराँ यांच्यामधली वीज कापली, ट्रामगाड्यांची संख्या कमी केली, खाजगी वखारवाल्यांच्या वखारींमधले सर्पणाचे साठे जप्त केले... आणि जेव्हा पेत्रोग्रादमधील कारखाने कोळशाच्या अभावी बंद पडण्याच्या बेतात होते, तेव्हा बाल्तिक काफल्यामधील खलाशांनी युद्धनौकांमधील कोळसा-भांडारांमधून दोन लाख पूड कोळसा कामगारांच्या हवाली केला...

नोव्हेंबरच्या अखेरीस "मद्यपग्रोम"[7] – मद्याची कोठारे लुटण्याचा – आरंभ हेमंत प्रासादामधील मद्य-कोठारांच्या लुटालुटीने झाला. अनेक दिवसपर्यंत रस्त्यांवर झिंगलेले सैनिक आढळत होते... या सर्व दंगलींमागे प्रतिक्रांतिकारकांचा हात होता हे स्पष्ट दिसत होते. मद्याचे साठे कुठे कुठे आहेत त्याचे नकाशे त्यांनी रेजिमेंटांमधून वाटले होते. स्मोल्नीमधील कमिस्सारांनी सैनिकांच्या समजावण्या घातल्या, त्यांच्याशी युक्तिवाद केले; पण तरीही वाढती अव्यवस्था थांबली नाही, उलट सैनिकांमध्ये आणि लाल रक्ष-

---

*एक पूड म्हणजे १६ किलोग्राम.

कांमध्ये घनघोर लढाया सुरू झाल्या... अखेरीस लष्करी क्रांतिकारक समितीने मशिनगनधारी खलाशांच्या कंपन्या पाठवल्या. त्यांनी दंगेखोरांवर निर्दयपणे गोळीबार केला व अनेकांना ठार मारले; आणि शासकीय हुकुमानुसार खास समित्यांना फारशा-कुऱ्हाडी देऊन मद्य-कोठारांवर बाटल्या फोडून टाकण्यासाठी पाठवण्यात आले, किंवा सुरुंग लावून ही कोठारे उडवून देण्यात आली...

पूर्वीच्या मिलिशिआऐवजी आता विभागीय सोविएतांच्या मुख्य कचेऱ्यांवर शिस्तबद्ध आणि चांगला पगार देण्यात येणाऱ्या लाल रक्षकांच्या कंपन्या दिवस-रात्र पहारा देऊ लागल्या. छोट्या गुन्ह्यांची दखल घेण्यासाठी, शहराच्या सर्व भागांमध्ये कामगारांनी आणि सैनिकांनी छोटी नियुक्त क्रांतिकारक न्यायालये स्थापन केली...

अद्यापही मोठ्या हॉटेलांमधून जोरदार धंदा करणाऱ्या सटोडियांना लाल रक्षकांनी गराडा घातला व सटोडियांना तुरुंगात डांबण्यात आले[8]...

सावध आणि संशयाने पछाडलेल्या कामगारवर्गाने सबंध शहरभर आपली विस्तीर्ण हेरयंत्रणा पसरली. भांडवलदारांच्या घरांमधले नोकरचाकर तेथील सर्व बित्तंबातम्या लष्करी क्रांतिकारक समितीला पुरवू लागले व समिती अखंडपणे आपले घणाघाती प्रहार चालवीत राहिली. अशाच पद्धतीने माजी दूमा-सदस्य पूरीश्केविच आणि उमरावांचा व लष्करी अधिकाऱ्यांचा एक गट यांनी मिळून रचलेला एक राजनिष्ठवादी कट उघडकीला आणण्यात आला; त्यांनी लष्करी अधिकाऱ्यांच्या उठावाची योजना आखली होती व कालेदिनला पेत्रोग्रादला येण्याचे निमंत्रण करणारे पत्र लिहिले होते[9]. अशा रीतीने, कालेदिनला पैसा व रंगरूट यांचा पुरवठा करणाऱ्या पेत्रोग्रादच्या कॅडेटांचा कट खणून काढण्यात आला...

आपल्या पलायनामुळे जनमत एवढे प्रक्षुब्ध झालेले पाहून नेरातोव घाबरले आणि त्यांनी गुप्त करारांचे कागदपत्र मुकाट्याने ट्रॉट्स्कींच्या हवाली केले. ट्रॉट्स्कींनी 'प्रावदा'मधून त्यांना प्रकाशित करायला आरंभ करून जगाला स्तंभित केले...

जाहिराती ही केवळ अधिकृत सरकारी वृत्तपत्राची मक्तेदारी बनविणाऱ्या आज्ञापत्राने[10], वृत्तपत्रांवरील नियंत्रणे अधिकच वाढविण्यात आली. त्यासरशी इतर सर्व वृत्तपत्रांनी निषेध म्हणून प्रकाशन स्थगित केले, किंवा कायदेभंग करून ती बंद झाली... अखेरीस तीन आठवड्यांनंतर ती शरण आली.

अजूनही मंत्रालयांचा संप चालू होता, अजूनही जुने अधिकारी घातपात

करीत होते, सुरळीत आर्थिक जीवनाला अडसर बसलेला होता. स्मोल्नीच्या पाठीशी फक्त अफाट, विस्कळीत जनसमूहांची इच्छाशक्ती उभी होती; त्यांच्याशी सहकार्य घडवून जन-कमिस्सार मंडळ आपल्या शत्रूंविरुद्ध क्रांतिकारक सामूहिक कृतींचे मार्गदर्शन करीत होते[11]. अत्यंत साध्या शब्दांमध्ये लिहिलेल्या आणि सबंध रशियाभर प्रसारीत होणाऱ्या बोलक्या घोषणांद्वारे[12], लेनिन क्रांतीचा अर्थ समजावून सांगत होते, लोकांनी आपल्या हाती सत्ता घ्यावी, मालमत्ताधारी वर्गांचा प्रतिकार बळाने मोडून काढावा, सरकारी संस्था बळाने आपल्या ताब्यात घ्याव्या, असा आग्रह करीत होते. क्रांतिकारक सुव्यवस्था! क्रांतिकारक शिस्त! कडक हिशेब आणि नियंत्रण! संप बंद! फुकटची भटकेगिरी बंद!

२० नोव्हेंबरला लष्करी क्रांतिकारक समितीने इशारा प्रसिद्ध केला:

"धनिक वर्ग सोविएतांच्या सत्तेला—कामगारांच्या, सैनिकांच्या आणि किसानांच्या सरकारला विरोध करीत आहेत. त्यांच्याबद्दल सहानुभूती बाळगणारे लोक सरकारी व दूमाच्या कर्मचाऱ्यांचे काम थांबवीत आहेत, बँकांमध्ये संप करण्याला चिथावणी देत आहेत, रेल्वे, टपाल आणि तार यांच्या दळणवळणामध्ये अडथळे आणण्याचा प्रयत्न करीत आहेत...

"**ते आगीशी खेळत आहेत असा आम्ही त्यांना इशारा देतो.** देशापुढे आणि सैन्यापुढे दुष्काळाचा धोका निर्माण झाला आहे. त्याविरुद्ध सामना करण्यासाठी, सर्व सेवा सुरळीत चालू राहणे अत्यावश्यक आहे. देशाला आणि सैन्याला आवश्यक ते सर्व उपलब्ध करून देण्यासाठी कामगार व किसानांचे सरकार हरतऱ्हेच्या उपाययोजना अंमलात आणत आहे.

"**या उपायांना विरोध म्हणजे जनतेविरुद्ध अपराध करणे होय.** धनिक वर्गांना आणि त्यांच्याबद्दल सहानुभूती बाळगणाऱ्यांना आम्ही इशारा देतो की, त्यांनी जर आपल्या घातपाती कारवाया थांबवल्या नाही व खाद्याची वाहतूक थांबवण्याच्या प्रक्षोभक कारवायांना आळा घातला नाही, **तर प्रथम त्यांनाच त्याचे परिणाम भोगावे लागतील. धान्य मिळण्याचा त्यांचा हक्क हिरावून घेण्यात येईल. त्यांच्या ताब्यातील सर्व साठे जप्त करण्यात येतील. मुख्य अपराध्यांची मालमत्ता हिसकावून घेतली जाईल.**

"जे आगीशी खेळताहेत त्यांना सावधगिरीचा इशारा देण्याचे आमचे कर्तव्य आम्ही बजावले आहे.

"आमची खात्री पटली आहे की, निर्णायक स्वरूपाचे उपाय योजणे जर आवश्यक ठरले, तर सर्व कामगारांचा[13], सैनिकांचा आणि किसानांचा आम्हाला भरभक्कम पाठिंबा मिळेल."

२२ नोव्हेंबरला शहरातल्या भिंतींवर '**असाधारण सूचना**' अशा शीर्षकाची पत्रके चिकटवलेली होती :

"जन-कमिस्सार मंडळाला उत्तर आघाडीवरील सेनाधिकाऱ्यांकडून एक तातडीची तार आली आहे : 'आता अधिक विलंब करून चालणार नाही ; सैन्याला उपाशी मरू देऊ नका ; उत्तर आघाडीवरच्या सेनांना गेल्या कित्येक दिवसांत पावाचा तुकडादेखील मिळालेला नाही आणि आत्तापर्यंत हात न लावलेल्या राखीव साठ्यांमधली बिस्कीटे त्यांना सध्या थोडी थोडी करून देत आहोत व दोन तीन दिवसात तीसुद्धा संपतील... सैन्याचा काही भाग पिछाडीला न्यावा म्हणून आघाडीच्या सर्व भागांमधील प्रतिनिधींनी एव्हाना बोलणे लावले आहे ; कारण भुकेपायी मरणाऱ्या, खंदकांमध्ये तीन वर्षेपर्यंत लढल्याने उध्वस्त बनलेल्या, आजारलेल्या, अपुऱ्या कपड्यातल्या, अनवाणी, अमानुष दैन्याने वेडेपिसे बनलेल्या सैनिकांची काही दिवसातच पळापळ सुरू होईल, हे भवितव्य स्पष्ट जाणवत आहे.'

"लष्करी क्रांतिकारक समिती ही वस्तुस्थिती पेत्रोग्राद शिबंदीच्या आणि पेत्रोग्रादच्या कामगारांच्या निदर्शनास आणत आहे. आघाडीवरील परिस्थितीबाबत अत्यंत तातडीच्या आणि निर्णायक उपाययोजना करणे आवश्यक आहे... दरम्यान सरकारी संस्थांचे, बँकांचे, रेलमार्गांचे, टपाल आणि तार खात्यांचे उच्चाधिकारी संपावर आहेत व आघाडीवर रसद पुरविण्याच्या सरकारी कामात व्यत्यय आणत आहेत... प्रत्येक तासाचा उशीर हजारो सैनिकांच्या प्राणहानीला कारणीभूत ठरेल.

"प्रतिक्रांतिकारक कार्यकर्ते हे आघाडीवरच्या त्यांच्या उपाशी आणि मरणोन्मुख बांधवांचे सर्वांत अधिक अप्रामाणिक गुन्हेगार आहेत...

"लष्करी क्रांतिकारक समिती या गुन्हेगारांना शेवटची ताकीद

देत आहे. त्यांनी किंचितही प्रतिकार अगर विरोध केला, तर त्यांच्या अपराधाच्या गांभीर्याच्या प्रमाणात त्यांच्या विरुद्ध कठोर उपाययोजना केल्या जातील..."

कामगारांच्या आणि सैनिकांच्या समूहांमध्ये याची तीव्र प्रतिक्रिया उमटली. सबंध रशियाभर त्यांच्या क्रोधाची लाट पसरली. राजधानीमध्ये सरकारी आणि बँक कर्मचाऱ्यांनी शेकडो घोषणा आणि आवाहने[14] प्रसिद्ध केली, निषेध केले, आपले बचाव केले. त्यातील एक नमुना असा:

**"सर्व नागरिकांच्या माहितीसाठी.**

सरकारी बँक बंद आहे! का?

कारण सरकारी बँकेविरुद्ध बोल्शेविकांनी केलेल्या हिंसाचारामुळे आम्हाला काम करणे अशक्य ठरले आहे. जन-कमिस्सारांनी पहिल्या प्रथम एक कोटी रूबल मागितले, त्यानंतर २७ नोव्हेंबर रोजी त्यांनी अडीच कोटी रूबल मागितले, पण या पैशांचा विनियोग कसा होणार आहे, याबद्दल अवाक्षराने खुलासा केला नाही.

"जनतेचा पैसा लुटण्यात आम्ही कर्मचारी भाग घेऊ शकत नाही. आम्ही काम थांबवले.

"नागरिकहो! सरकारी बँकेतील पैसा तुमचा आहे, जनतेचा पैसा आहे, तुमच्या श्रमाचा, तुमच्या घामाचा आणि रक्ताचा पैसा आहे.

"नागरिकहो! जनतेची मालमत्ता दरोडेखोरीपासून वाचवा आणि आम्हाला हिंसाचारांपासून वाचवा, मग आम्ही ताबडतोब कामावर पुन्हा हजर होऊ.

**सरकारी बँकचे कर्मचारी."**

पुरवठा खात्याकडून, अर्थ खात्याकडून, खास पुरवठा खात्याकडून जाहीर निवेदने निघाली की, लष्करी क्रांतिकारक समितीने या खात्यांच्या कर्मचाऱ्यांना काम करणे अशक्य करून टाकले होते; स्मोल्नीविरुद्ध या कर्मचाऱ्यांना जनतेने पाठिंबा द्यावा अशी आवाहने निघाली... पण वर्चस्वधारी कामगाराने आणि सैनिकाने त्यांच्यावर विश्वास ठेवला नाही; कर्मचारी घातपात करीत आहेत, सेनेला उपाशी मारीत आहेत, जनतेची

उपासमार करीत आहेत, ही धारणा लोकांच्या मनात ठाम बसली होती... हिवाळयातल्या बर्फाळ थंडीत रस्त्यांवर पूर्वीप्रमाणेच पावासाठी लोकांच्या लांबलचक रांगा लागत होत्या; पण केरेन्स्कीच्या अमदानीत लोक **सरकारला** दूषणे देत उभे रहात तसे आता होत नव्हते, तर **कारकूनांना**, घातपात्यांना, दूषणे देत होते; कारण सरकार हे **त्यांचे** सरकार होते, **त्यांच्या** सोविएतांचे होते – आणि मंत्रालयांमधील अधिकारी त्याच्या विरोधी होते...

या सर्व विरोधाच्या केंद्रभागी दूमा आणि तिची लढाऊ संस्था – रक्षक समिती – होती; जन-कमिस्सार मंडळाच्या सर्व आज्ञापत्रांविरोधी त्यांचा निषेध चालू होता, सोविएत सरकारला मान्यता देण्याविरुद्ध पुनःपुन्हा मतदान करीत होती, मोगीलेव येथे स्थापन होणाऱ्या नव्या प्रतिक्रांतिकारक "सरकारांना" उघड उघड सहकार्य चालू होते... उदाहरणार्थ, १७ नोव्हेंबरला, रक्षक समितीने "सर्व नगरपालिका शासने, झेम्स्त्वो व किसानांच्या, कामगारांच्या, सैनिकांच्या आणि इतर नागरिकांच्या सर्व लोकशाहीवादी व क्रांतिकारक संघटनांना" पुढील शब्दांमध्ये उद्देशून म्हटले:

> "बोल्शेविकांच्या सरकारला मान्यता देऊ नका आणि त्याच्या विरुद्ध लढा करा!
>
> "देशाच्या आणि क्रांतीच्या रक्षणासाठी स्थानिक समित्या स्थापन करा; त्या सर्व लोकशाहीवादी शक्तींना एकवटतील आणि त्यायोगे अखिल रशियन रक्षक समितीने आपल्यासमोर ठेवलेल्या उद्दिष्टांची पूर्ती करण्यात मदत करतील..."

दरम्यान, घटनात्मक सभेसाठी पेत्रोग्रादमध्ये झालेल्या निवडणुकांमध्ये[15] बोल्शेविकांना प्रचंड बहुमत मिळाले; त्यामुळे मेन्शेविक-आंतरराष्ट्रीयवादीही म्हणू लागले की, दूमाच्या फेरनिवडणुका झाल्या पाहिजेत, कारण पेत्रोग्रादच्या जनतेचे ती इतःपर योग्य राजकीय प्रतिनिधित्व करीत नाही... त्याच वेळी कामगार संघटनांकडून, लष्करी विभागांकडून, एवढेच नव्हे तर भोवतालच्या ग्रामीण भागांमधील किसानांकडूनही निषेधाच्या ठरावांचा दूमाकडे महापूर लोटला होता, दूमाला "प्रतिक्रांतिकारक, कोर्निलोववादी" अशी शेलकी विशेषणे बहाल केली जात होती व तिच्या राजिनाम्याची मागणी होत होती. दूमाचे अखेरचे दिवस हे नगरपालिकेच्या कामगारांच्या वेतनवाढीच्या जोरदार मागण्यांमुळे व संपांच्या धमक्यांमुळे कमालीचे वादळी ठरले...

२३ तारखेला, लष्करी क्रांतिकारक समितीने एक औपचारिक आज्ञापत्र काढून रक्षक समितीला बरखास्त केले. २९ तारखेला, पेत्रोग्रादच्या नगर दूमाला विसर्जित करून तिच्या पुन्हा निवडणुका घेण्याबाबत जन-कमिस्सार मंडळाने हुकूम काढला :

"सप्टेंबरच्या २ तारखेला निवडलेल्या पेत्रोग्रादच्या केंद्रीय दूमाने... तिच्या मनःस्थितीत आणि आकांक्षांमध्ये पूर्णतः विसंवाद निर्माण झाल्याने, पेत्रोग्रादच्या जनतेचे प्रतिनिधित्व करण्याचा हक्क निश्चितपणे गमावला आहे, ही वस्तुस्थिती लक्षात घेऊन... आणि सर्व राजकीय पाठिंबा गमावूनदेखील दूमातील बहुसंख्याकांचे अधिकारी कामगारांच्या, सैनिकांच्या आणि किसानांच्या इच्छाशक्तीविरुद्ध प्रतिक्रांतिकारकांप्रमाणे आपल्या अधिकारांचा वापर करीत आहेत, सरकारच्या सुरळीत कारभारात घातपात घडविण्याचा आणि अडथळे आणण्याचा प्रयत्न करीत आहेत, ही वस्तुस्थिती लक्षात घेता — नगरपालिकेच्या स्वयंशासनाच्या धोरणाबाबत राजधानीमधील जनतेने आपला न्याय जाहीर करावा, असे आवाहन करणे जन-कमिस्सार मंडळ आपले कर्तव्य मानते.

त्यानुसार जन-कमिस्सार मंडळ निर्णय घेत आहे :

(१) नगरपालिकेची दूमा विसर्जित करणे; ३० नोव्हेंबर १९१७ रोजी विसर्जनाची अंमलबजावणी होईल.

(२) नव्या दूमाच्या प्रतिनिधींनी अधिकारग्रहण करीपर्यंत, सध्याच्या दूमाचे निवडलेले अथवा नेमलेले सर्व कर्मचारी आपापल्या पदांवर राहून त्यांच्यावर सोपवलेली कामे पार पाडत राहतील.

(३) सर्व नगरपालिका कर्मचारी आपापली कामे करण्याचे पुढे चालू ठेवतील; जे स्वतःहून नोकरी सोडतील त्यांना हाकलून देण्यात आले असे समजले जाईल.

(४) पेत्रोग्रादच्या नगरपालिकेच्या दूमाच्या नव्या निवडणुका ९ डिसेंबर १९१७ रोजी मुक्रर करण्यात आल्या आहेत...

(५) पेत्रोग्रादच्या नगरपालिकेच्या दूमाची बैठक ११ डिसेंबर १९१७ रोजी दुपारी दोन वाजता होईल.

(६) जे या आज्ञापत्राची अवज्ञा करतील, तसेच जे नगरपालिकेच्या मालमत्तेचे बुद्ध्याच नुकसान करण्याचा किंवा नाश करण्याचा

प्रयत्न करतील, त्यांना ताबडतोब अटक करून क्रांतिकारक न्याया-
लयांसमोर उभे करण्यात येईल..."

पण या आज्ञापत्राची पर्वा न करता दूमाने आपली बैठक भरवली, "आपल्या रक्ताचा शेवटचा थेंब सांडेपर्यंत आपले स्थान लढवण्याचे" ठराव तिने मंजूर केले आणि "स्वतःचे निवडून दिलेले नगरशासन" वाचवा अशी अगतिकतेने जनतेकडे विनवणी केली. पण जनता तिच्याशी अलिप्त-पणे किंवा शत्रुभावनेने वागली. ३० तारखेला महापौर श्रायडर आणि इतर अनेक सभासदांना अटक करण्यात आली, त्यांच्या जबान्या घेण्यात आल्या व सोडून देण्यात आले. त्या दिवशी आणि त्याच्या दुसऱ्या दिवशी दूमाची बैठक चालू राहिली, मधून मधून लाल रक्षक आणि खलाशी तिच्यात व्यत्यय आणत होते व तेथे जमलेल्या लोकांनी निघून जावे असे नम्रतापूर्वक सांगत होते. २ डिसेंबरला निकोलाय हॉलमध्ये भरलेल्या सभेत एक सदस्य भाषण करीत असताना एक अधिकारी व काही खलाशी तेथे घुसले आणि सदस्यांनी हॉलमधून तात्काळ निघून जावे, अन्यथा बळाचा वापर करण्यात येईल, असा त्यांनी हुकूम सोडला. सदस्यांनी हॉल सोडला, पण अखेरपर्यंत ते निषेध करीत राहिले व शेवटी "हिंसेपुढे त्यांनी मान तुकवली."

दहा दिवसांनंतर निवडलेल्या नव्या दूमाला मतदान करण्यास "नेमस्त" समाजवाद्यांनी नकार दिला होता व तिच्यात बहुतेक सर्व सभासद बोल्शेविक होते[16].

युक्रेन आणि फिन्लंडच्या "प्रजासत्ताकां"सारखी धोकादायी विरोधाची अनेक केंद्रे राहिलेली होती व ती उघड उघड सोविएतविरोधी प्रवृत्ती व्यक्त करीत होती. हेल्सिंगफोर्स आणि कीव्ह अशा दोन्ही ठिकाणची सरकारे फौजा गोळा करीत होती; बोल्शेविकवादाविरुद्ध हल्ले चढवून त्याचा चिरडून नाश करणे व रशियन फौजांना निःशस्त्र बनवून हाकून लावणे, हा त्यांचा त्यामागील उद्देश होता. युक्रेनच्या रादाने सबंध दक्षिण रशियाची सूत्रे आपल्या हाती घेतली होती व ती कालेदिनला सैन्याची कुमक आणि रसद पुरवीत होती. फिन्लंडने आणि युक्रेनने अशा दोघांनीही जर्मनांशी गुप्त बोलणी सुरू केली व त्यांना दोस्त राष्ट्रांच्या सरकारांनी तात्काळ मान्यता दिल्या आणि मालमत्ताधारी वर्गांशी संगनमत करून प्रचंड रकमांची कर्जे पुरवून सोविएत रशियावर हल्ला चढविण्यासाठी प्रतिक्रां-

तिकारक केंद्रे निर्माण केली. अखेरीस जेव्हा या दोन्ही देशांमध्ये बोल्शेविकवादाचा विजय झाला, तेव्हा पराभूत भांडवलदारवर्गाने आपल्या हाती पुन्हा सत्ता यावी म्हणून जर्मनांना मदतीला बोलावले...

पण सोविएत सरकारला सर्वांत भयानक धोका अंतर्गत होता आणि द्विमुखी होता — कालेदिनची चळवळ आणि जनरल दुखोनिन यांचा अधिकारसूत्रे घेतलेला मोगीलेव येथील सेनाधिकारी वर्ग.

कझाकांविरुद्धच्या लढाईचे सेनापतीपद सर्वव्यापी मुराव्योव यांच्याकडे सोपविण्यात आले आणि कारखान्यातील कामगारांची भरती करून लाल सेना उभारण्यात आली. दॉनकडे शेकडो प्रचारक धाडण्यात आले. जनकमिस्सार मंडळाने कझाकांना उद्देशून एक जाहीर निवेदन[17] प्रसृत केले. त्यात सोविएत सरकार म्हणजे काय त्याचा खुलासा केला होता; मालमत्ताधारी वर्ग, कारकून, जमीनदार, बँकर आणि त्यांचे दोस्त, कझाक राजपुत्र, जमीनमालक आणि सेनापतीवर्ग, क्रांतीचा नाश करायचा कसा प्रयत्न करीत आहेत व जनतेने त्यांची संपत्ती जप्त करण्याचा प्रयत्न केल्यास कसा प्रतिबंध करीत आहेत, त्याचा खुलासा केला होता.

२७ नोव्हेंबरला, ट्रॉट्स्की आणि लेनिन यांची भेट घ्यायला स्मोल्नी येथे कझाकांची एक समिती आली, कझाकांच्या जमिनी महान रशियातल्या किसानांमध्ये वाटण्याचा सोविएत सरकारचा इरादा आहे, हे खरे किंवा खोटे याची शहानिशा करायला ते आले होते. तसा इरादा "नाही" असे ट्रॉट्स्की उत्तरले. कझाकांनी थोडा वेळ विचार करून पुन्हा विचारले, "आमच्या मोठ्या कझाक जमीनमालकांच्या इस्टेटी जप्त करून कामकरी कझाकांमध्ये त्या वाटण्याचा सोविएत सरकारचा इरादा आहे काय?" त्यावर लेनिन यांनी उत्तर दिले. ते म्हणाले, "ते काम **तुम्ही** करायचं आहे. आम्ही कामकरी कझाकांना त्यांच्या सर्व हालचालींमध्ये मदत करू... आरंभ करण्याचा सर्वांत उत्तम मार्ग म्हणजे कझाक सोविएतं स्थापन करा; तुम्हाला केंद्रीय कार्यकारी समितीमध्ये प्रतिनिधित्व दिलं जाईल आणि मग ते **तुमचं**ही सरकार ठरेल..."

खूप विचारमग्न अवस्थेत कझाक परतले. दोन आठवड्यांनंतर जनरल कालेदिन यांच्या सैनिकांचे एक प्रतिनिधीमंडळ त्यांना भेटायला गेले. "कझाक जमीनदारांच्या मोठ्या इस्टेटी कझाक कामकऱ्यांमध्ये वाटून द्यायचं तुम्ही आश्वासन द्याल?" सैनिकांनी कालेदिनना विचारले.

"माझ्या प्रेताला तुडवूनच तुम्हाला जमिनी घ्याव्या लागतील,"

कालेदिन उत्तरले. आपल्या डोळ्यांदेखत आपली सेना विघटित होत गेलेली पाहून एक महिन्यानंतर कालेदिनने स्वतःच्या डोक्यावर पिस्तूल झाडून आत्महत्या केली. कझाक चळवळ नष्ट झाली...

दरम्यान मोगीलेव येथे जुन्या केंद्रीय कार्यकारी समितीचे सदस्य जमले होते ; अव्क्सेन्तियेवपासून चेर्नोवपर्यंत "नेमस्त" समाजवादी पुढारी, जुन्या सेना समित्यांचे क्रियाशील प्रमुख आणि प्रतिगामी सेनाधिकारी यांचा त्यात समावेश होता. जन-कमिस्सार मंडळाला मान्यता देण्यास सेनाधिकारीवर्ग सातत्याने नकार देत होता. आहुती पलटणी, सेंट जॉर्ज पदकाचे सरदार, आघाडीवरील कझाक यांना त्यांनी आपल्या भोवती एकवटले होते ; तसेच दोस्तांच्या लष्करी ॲटॅचींबरोबर, कालेदिन चळवळीबरोबर आणि युक्रेनच्या रादाबरोबर त्यांनी सातत्याने व गुप्तपणे निकट संपर्क राखला होता...

सोविएतांच्या काँग्रेसने सार्वत्रिक शस्त्रसंधीची मागणी केलेल्या ८ नोव्हेंबरच्या शांततेच्या आज्ञापत्राला दोस्त सरकारांनी उत्तर दिले नव्हते. २० नोव्हेंबरला ट्रॉट्स्कींनी दोस्तांच्या राजदूतांना उद्देशून एक पत्र पाठवले [18] :

> "श्रीमान राजदूत महाशय, आपल्याला कळविण्याचे सद्भाग्य मला प्राप्त होत आहे की, सोविएतांच्या अखिल रशियन काँग्रेसने ८ नोव्हेंबर रोजी, जन-कमिस्सार मंडळाच्या स्वरूपात रशियन प्रजासत्ताकाचे नवे सरकार स्थापले. या सरकारचे अध्यक्ष व्लादीमिर इल्यिच लेनिन आहेत. परराष्ट्र खात्याचा जन-कमिस्सार या नात्याने माझ्या हाती परराष्ट्र खात्याची सूत्रे सोपवलेली आहेत...
>
> "अखिल रशियन काँग्रेसने मान्य केलेल्या, जनतेच्या स्वयंनिर्णयाच्या हक्कावर आधारलेल्या, विलीनीकरण न करता अथवा नुकसानभरपाई न देता, शस्त्रसंधी आणि लोकशाहीवादी शांतता तह करण्याचा प्रस्तावामधील मजकुराकडे आपले लक्ष वेधून, आपल्याला विनंती करण्याचा सन्मान मला लाभत आहे की, सर्व आघाड्यांवर तात्काळ शस्त्रसंधी घडविण्यासाठी व ताबडतोबीच्या शांतता वाटाघाटींचा आरंभ करण्यासाठी औपचारिक प्रस्ताव म्हणून या दस्तऐवजाचा आपण विचार करावा ; रशियन प्रजासत्ताकाचे अधिकृत सरकार याचवेळी सर्व युद्धमान लोकांना आणि त्यांच्या सरकारांना उद्देशून हा प्रस्ताव मांडत आहे.

"मान्यवर राजदूत महाशय, फ्रान्सच्या जनतेविषयी सोविएत सरकारला वाटणाऱ्या अतीव आदरभावनेचा कृपया स्वीकार करावा. इतर लोकांप्रमाणेच आपले लोकही शांततेची इच्छा करीत आहेत, ह्या अतुलनीय कत्तलीने दमूनभागून गेले आहेत, शुष्क बनले आहेत..."

त्याच रात्री जन-कमिस्सार मंडळाने जनरल दुखोनिन यांना तार केली :

"...शत्रूच्या आणि दोस्तांच्या अशा दोघांच्या सर्व सत्तांना औपचारिक शस्त्रसंधीचे आवाहन विनाविलंब करणे अपरिहार्य आहे, असे जन-कमिस्सार मंडळ मानते. या निर्णयाला अनुसरून एक जाहीर निवेदन परराष्ट्र खात्याच्या कमिस्सारनी पेत्रोग्रादमधील दोस्त सत्तांच्या प्रतिनिधींना पाठवले आहे.

"नागरिक सेनापती, जन-कमिस्सार मंडळ आपल्याला हुकूम देत आहे... शत्रूच्या लष्करी अधिकाऱ्यांपुढे ताबडतोब चकमकी थांबवण्याचा प्रस्ताव मांडा आणि शांततेच्या वाटाघाटी चालू करा. वाटाघाटींपूर्वीची अनौपचारिक बोलणी सुरू करण्याची ही जबाबदारी तुमच्यावर टाकताना जन-कमिस्सार मंडळ आपल्याला आदेश देत आहे :

१. शत्रूसेनांच्या प्रतिनिधींबरोबरच्या अनौपचारिक बोलण्यांमधील कोणत्याही आणि सर्व टप्प्यांबद्दल मंडळाला थेट तारेने तात्काळ माहिती कळवा.

२. जन-कमिस्सार मंडळाने संमत केल्याविना शस्त्रसंधीच्या तहावर सही करू नका."

ट्रॉट्स्कींच्या पत्रावर प्रतिक्रिया म्हणून दोस्तांच्या राजदूतांनी तिरस्कार-दर्शक मौन पाळले, त्याचवेळी वृत्तपत्रांमध्ये द्वेषाने आणि उपहासाने भरलेल्या निनांवी मुलाखती प्रसिद्ध करण्यात आल्या. दुखोनिन यांना देण्यात आलेला आदेश म्हणजे राजद्रोहाची कृती आहे, असे उघडपणे म्हणण्यात येऊ लागले...

पण दुखोनिन गप्प राहिले. २२ नोव्हेंबरच्या रात्री त्यांच्याशी टेलिफोनवरून दळणवळण साधण्यात आले आणि आज्ञा पाळण्याचा त्यांचा इरादा आहे किंवा नाही, अशी त्यांना विचारणा करण्यात आली. दुखोनिन यांनी उत्तर दिले की, "सैन्याचा आणि देशाचा पाठिंबा असलेल्या सरकारचा" हुकूमच तेवढा ते मानतील, जन-कमिस्सार मंडळाचा नाही.

ताबडतोब तारेने त्यांना सरसेनापती पदावरून दूर करण्यात आले आणि त्यांच्या जागी क्रीलेन्को यांची नेमणूक करण्यात आली. जनतेला आवाहन करण्याच्या आपल्या डावपेचांचा वापर करून, लेनिन यांनी सर्व रेजिमेंटच्या, डिव्हिजनच्या, कोअरच्या समित्यांना, सैन्यातल्या आणि नौदलातल्या सर्व सैनिकांना आणि खलाशांना रेडिओद्वारे संदेश पाठवला, दुखोनिन यांच्या नकाराबद्दल त्यांना माहिती सांगितली आणि आदेश दिला की, "आपल्या मोर्चांच्या विरोधी दिशेला असलेल्या शत्रूच्या तुकड्यांबरोबर वाटाघाटी सुरू करण्यासाठी, आघाडीवरील रेजिमेंटांनी आपले प्रतिनिधी निवडावे..."

२३ तारखेला, दोस्त राष्ट्रांच्या लष्करी ॲटॅचींनी, आपापल्या सरकारांच्या सूचनांनुसार, दुखोनिन यांना खलिता पाठवला, त्यात त्यांना गंभीर इशारा देण्यात आला होता की, एंटाँट सत्तांमध्ये झालेल्या करारांमधील अटींचा त्यांनी भंग करू नये." खलित्यात पुढे म्हटले होते की, जर्मनीबरोबर जर अलग शस्त्रसंधी करण्यात आला, तर त्या कृतीचे रशियाला "अत्यंत गंभीर परिणाम भोगावे लागतील." दुखोनिन यांनी हा खलिता ताबडतोब सर्व सैनिक समित्यांकडे पाठवला...

दुसऱ्या दिवशी सकाळी ट्रॉट्स्की यांनी सैनिकांना उद्देशून आणखी एक आवाहन प्रसृत केले. दोस्तांच्या प्रतिनिधींचा खलिता म्हणजे रशियाच्या अंतर्गत बाबींमध्ये त्यांनी केलेला धडधडीत हस्तक्षेप आहे, असे ट्रॉट्स्कींनी म्हटले होते; तसेच "झारने केलेल्या करारांच्या पालनार्थ रशियन सेनेला आणि रशियन जनतेला बळजबरीने युद्ध चालू ठेवणे भाग पाडायला लावणारा," हा उघडानागडा प्रयत्न आहे, असे म्हटले होते...

स्मोल्नीमधून घोषणांमागून घोषणांचा पूर वाहू लागला होता[19], दुखोनिन आणि त्यांच्या भोवतालचे प्रतिक्रांतिकारक अधिकारी यांचा धिक्कार करण्यात येत होता, मोगीलेव येथे जमा झालेल्या प्रतिगामी मुत्सद्द्यांचा धिक्कार करण्यात येत होता, एक हजार मैल पसरलेल्या युद्धआघाडीवर एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंतच्या संतप्त, संशयी बनलेल्या लक्षावधी सैनिकांना जागृत केले जात होते. त्याचवेळी जबरदस्त निष्ठावंत खलाशांच्या तीन तुकड्या सोबत घेऊन, सूडाच्या[20] जोरदार घोषणा करीत क्रीलेन्को मुख्य ठाणाकडे निघाले; वाटेत ठिकठिकाणी सैनिकांनी त्यांचे महाप्रचंड स्वागत केले—त्यांची विजयी दौड चालू झाली. मध्यवर्ती सेना

समितीने दुखोनिन यांना अनुकूल असे एक निवेदन काढले ; आणि तात्काळ दहा हजार सैनिकांनी मोगीलेववर चढाई केली...

२ डिसेंबरला मोगीलेवच्या ठाणबंद फौजेने उठाव करून शहर ताब्यात घेतले, दुखोनिन आणि सेना समिती यांना अटक केली, व नव्या सरसेनापतींच्या स्वागतासाठी विजयी लाल पताका फडकावीत ती सामोरी गेली. दुसऱ्या दिवशी सकाळी क्रीलेन्कोंनी मोगीलेवमध्ये प्रवेश केला, तेव्हा दुखोनिन यांना ज्या आगगाडीच्या डब्यात कैद करून ठेवले होते त्याभोवती संतप्त लोकांचा जमाव त्यांना आढळला. क्रीलेन्को यांनी आपल्या भाषणात सैनिकांना विनवून सांगितले की, त्यांनी दुखोनिन यांना कोणत्याही तऱ्हेची इजा करू नये, कारण त्यांना पेत्रोग्रादला नेऊन क्रांतिकारक न्यायालयासमोर त्यांचा निवाडा व्हावयाचा होता. त्यांचे भाषण संपताच अचानक दुखोनिन डब्याच्या खिडकीशी येऊन उभे राहिले. जणू त्यांना गर्दीला उद्देशून बोलायचे होते. पण पाशवी गर्जना करीत लोक डब्याच्या दिशेने धावले, त्या म्हाताऱ्या सेनापतीवर तुटून पडले, त्याला बाहेर खेचून काढले आणि त्या फलाटावर मरेस्तोवर मारहाण केली.

मुख्य ठाणाचे बंड असे संपले...

रशियातील विरोधी लष्करी सत्तेचा शेवटचा बालेकिल्ला असा ढासळून पडल्यामुळे जबरदस्त सामर्थ्यवान बनलेल्या सोविएत सरकारने विश्वासपूर्वक राज्याच्या संघटनाला आरंभ केला. अनेक जुने कर्मचारी त्याच्या ध्वजेभोवती धावत पळत गर्दीने आले, इतर पक्षांचे अनेक सदस्य सरकारी सेवांमध्ये दाखल झाले. पण सरकारी कर्मचाऱ्यांच्या पगारांविषयी एक आज्ञापत्र काढून, जन-कमिस्सारांचा पगार – सर्वांत अधिक पगार – महिना पाचशे रूबल ठरवून (सुमारे पन्नास डॉलर), आर्थिक महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्यांना आळा घालण्यात आला... सरकारी कर्मचाऱ्यांच्या संपापाठीमागे असणारे भांडवलदार आणि व्यापारी त्यांना सोडून पळाल्याने, युनियनांच्या युनियनतर्फे लढविला जाणारा तो संप कोसळला. बँकांमधले कारकून आपापल्या जागी कामांवर परतले...

बँकांच्या राष्ट्रीयीकरणाचे आज्ञापत्र, जन-अर्थव्यवस्थेच्या सर्वोच्च मंडळाची स्थापना, खेड्यांमधून जमीनविषयक आज्ञापत्राची प्रत्यक्ष अंमलबजावणी, सेनेमध्ये लोकशाही पुनर्संघटन, सरकारच्या आणि जीवनाच्या सर्व शाखांमध्ये वेगवान बदल – या सर्व गोष्टी कामगार, सैनिक आणि किसान समूहांच्या इच्छाबळावरच केवळ अंमलात आल्या व अनेक चुका करीत,

अनेक अडथळे ओलांडीत, कामगारवर्गीय रशियाच्या घडणीला हळू हळू आरंभ झाला.

मालमत्ताधारी वर्गाशी किंवा इतर राजकीय पुढाऱ्यांशी तडजोड न करता, जुन्या सरकारी यंत्रणेशी समझोता न करता, बोल्शेविकांनी सत्ता संपादन केली. छोटया कंपूच्या संघटित हिंसाचाराच्या आधारे नव्हे. सबंध रशियाभरची जनता जर उठावाला सज्ज नसती, तर तो अपयशी झाला असता. जनतेच्या गाभ्यामधील स्तराच्या अफाट आणि साध्या मागण्या पुऱ्या करण्यात, जुन्या राजवटीला चिंध्या चिंध्या करून तिचा नाश करण्यासाठी या जनतेलाच आवाहन करण्यात आणि नंतर, कोसळत्या अवशेषांच्या धुराळयात नवी चौकट उभी करताना तिच्याशी सहकार्य करण्यात केवळ बोल्शेविकांच्या यशाचे गमक साठवलेले आहे...

*

प्रकरण बारावे

# किसान कॉंग्रेस

१८ नोव्हेंबरला पहिला हिमवर्षाव झाला. सकाळी आम्ही उठून पाहतो तो खिडक्यांच्या तावदानांवर पांढरेशुभ्र थर बसले होते आणि हिमकण एवढ्या वेगाने भिरभिरत येत होते की, दहा फूट अंतरापलिकडचे पाहणे अवघड झाले होते. चिखल नाहीसा झाला होता; जणू पापणीच्या एका उघडझापेत अंधारलेले शहर शुभ्र, चकचकीत बनले होते. जाडजूड बंड्या घातलेल्या गाडीवानांनी आपल्या बग्गींचे घसरगाड्यांमध्ये रूपांतर केले होते व वेड्यावाकड्या रस्त्यांवरून भरधाव वेगाने जाताना गाडीवानांच्या दाढ्या बर्फामुळे पांढऱ्याशुभ्र आणि कडक थिजलेल्या बनत होत्या... क्रांती घडली होती, सबंध रशियाने एका अज्ञात आणि भयकारी भविष्यात बेभान अवस्थेत उडी घेतली होती, तरीसुद्धा या पहिल्या हिमवर्षावाने सबंध शहर-भर आनंदाची लाट पसरली. प्रत्येक व्यक्तीच्या चेहऱ्यावर हास्य विलसत होते; लोक रस्त्यांमधून धावत होते, मऊ मऊ हिमकणांना झेलण्यासाठी हसत खिदळत आपले हात पुढे पसरत होते. सर्वत्र राखी रंगाची निस्तेज छाया पसरली होती; फक्त सोनेरी आणि रंगीबेरंगी मीनार व घुमट मधूनच चमकत होते, पांढऱ्याशुभ्र हिमाने त्यांच्या परकी, रानटी सौंदर्याची आभा वाढली होती.

दुपारच्या वेळी तर फिकट, पाणचट सूर्याचेही दर्शन झाले. पावसाळी महिन्यांची सरदलेली थंडी आणि सांधे धरणारी हवा संपली. शहरामधील जीवन अधिक आनंदी बनले, खुद्द क्रांतीचा वेग अधिक वाढला...

एके दिवशी संध्याकाळी, स्मोल्नीच्या प्रवेशद्वारांपुढच्या रस्त्याच्या पलिकडे असलेल्या खालच्या दर्जाच्या एका खाणावळीत मी बसलो होतो; उतरत्या छपराची गोंगाट होणारी "टॉम काकाची केबिन" नांवाची एक

जागा होती व तिथे बहुश: लाल रक्षकांची गर्दी होत असे. आत्तासुद्धा त्यांनी खूप दाटी केली होती; तेथे ठेवलेल्या छोटचा टेबलांवर मळकी आच्छादने पसरली होती, त्यांच्यावर मोठमोठचा चिनी मातीच्या चहादाण्या ठेवल्या होत्या, त्यांच्याभोवती कोंडाळी करून लाल रक्षक बसले होते, सबंध जागेत सिगारेटच्या धुराची घाण भरली होती, तर "आत्ता! एका मिनिटात!" असे ओरडत संत्रस्त वेटर धावपळ करीत होते.

एका कोपऱ्यात गणवेषातला एक कप्तान बसला होता व जमलेल्या लोकांना उद्देशून भाषण देत होता, त्याला दर काही शब्दांनंतर जमाव अडथळा करीत होता.

"तुम्ही खुन्यांएवढेच वाईट आहात!" तो ओरडला. "आपल्या रशियन भावांना रस्त्यांमध्ये गोळ्या घालून मारलंत!"

"आम्ही ते केव्हा केलं?" एका कामगाराने विचारले.

"गेल्या रविवारी, जेव्हा युंकर —"

"पण त्यांनी आमच्यावर गोळ्या झाडल्या नाही?" एका माणसाने गळयात अडकवलेला आपला हात दाखवला. "त्या सैतानांनी मला ही आठवण ठेवली की नाही?"

कप्तान तार स्वरात ओरडला. "तुम्ही तटस्थ राहिलं पाहिजे! तुम्ही तटस्थ राहिलं पाहिजे! कायदेशीर सरकारला नष्ट करणारे तुम्ही कोण? कोण हा लेनिन? एक जर्मन —"

"तुम्ही कोण आहात? प्रतिक्रांतिकारक! चिथावणीखोर!" ते त्याच्यावर तेवढ्याच जोरात ओरडले.

गोंगाट थोडा कमी झाल्यानंतर, तो कप्तान उठून उभे रहात म्हणाला, "ठीक आहे! तुम्ही स्वत:ला रशियाची जनता म्हणवता. पण **तुम्ही** रशियाची जनता **नव्हे**. किसान खरे रशियाची जनता आहेत. थांबा जोपर्यंत किसान —"

"हो हो," ते लोक ओरडले, "किसान बोलेपर्यंत थांबा. किसान काय म्हणतील ते आम्हाला ठाऊक आहे... ती आमच्यासारखीच कामकरी माणसं नाहीत का?"

सरतेशेवटी सारे काही किसानांवर अवलंबून होते. राजकीयदृष्टचा जरी किसान मागासलेले असले, तरी त्यांच्या स्वत:च्या काही विशिष्ट ठाम कल्पना होत्या आणि रशियामधील जनतेत त्यांचे प्रमाण ८० टक्के होते. तुलनात्मकदृष्टचा किसानांमध्ये बोल्शेविकांचे अनुयायी फार कमी

होते; आणि औद्योगिक कामगारांची हुकूमशाही रशियावर कायम चालविणे शक्य नव्हते... समाजवादी-क्रांतिकारक पक्ष हा परंपरागत किसान पक्ष होता; आता सोविएत सरकारला पाठिंबा देणाऱ्या सर्व पक्षांमधील, डावे समाजवादी-क्रांतिकारक हे किसानांच्या पुढारीपणाचे तर्कसंगत वारस ठरले असते आणि संघटित शहरी कामगारवर्गाच्या दयेवर अवलंबून असलेल्या डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांना किसानांच्या पाठिंब्याची अत्यंत जरूरी होती...

दरम्यान स्मोल्नीने किसानांकडे दुर्लक्ष केले नव्हते. जमीनविषयक आज्ञापत्रानंतर, किसान सोविएतांच्या कार्यकारी समितीला डावलून, नव्या केंद्रीय कार्यकारी समितीने केलेल्या पहिल्या कारवायांपैकी एक म्हणजे किसान काँग्रेस बोलावली होती. काही दिवसांनंतर वोलोस्त (नगरवस्ती) भूमी समित्यांबद्दलचे तपशीलवार नियम प्रसृत करण्यात आले, त्या पाठोपाठ बोल्शेविक क्रांतीबद्दल आणि नव्या सरकारबद्दल अत्यंत सोप्या शब्दात खुलासा करणारे लेनिन यांचे 'किसानांना आदेश'[1] जाहीर झाले; आणि १६ नोव्हेंबरला लेनिन आणि मिल्यूतिन यांनी 'प्रांतिक दूतांना आदेश' प्रसिद्ध केले; खेड्यांमधून सोविएत सरकारने असे हजारो दूत धाडले होते.

"१. ज्या प्रांतात नेमणूक केली असेल तेथे आगमन झाल्यानंतर, दूताने कामगारांच्या, सैनिकांच्या व किसानांच्या प्रतिनिधींच्या सोविएतांच्या मध्यवर्ती कार्यकारी समित्यांची संयुक्त बैठक बोलवावी, त्यांना शेतकीविषयक कायद्यांचा अहवाल द्यावा आणि सोविएतांच्या संयुक्त सर्वसदस्य बैठकीचे बोलावणे करावे...

२. प्रांतामधल्या शेतकीविषयक प्रश्नाच्या अंगाचा त्याने अभ्यास करावा:

अ. – जमीनदारांची मालमत्ता ताब्यात घेण्यात आली आहे का, आणि तसे घडले असेल तर कोणत्या विभागांमधल्या?

ब. – जप्त केलेल्या जमिनीवर कोण व्यवस्था पाहते – पूर्वीचा मालक, किंवा भूमी समित्या?

क. – शेतकी यंत्रसामग्रीचे आणि गोठ्यातल्या जनावरांचे काय करण्यात आले?

३. किसानांकडून मशागत केल्या जाणाऱ्या जमिनीत वाढ झालीय का?

४. सरकारने निश्चित केलेल्या सरासरी किमान जमिनीपेक्षा, आत्ता मशागतीखाली असलेली जमीन किती प्रमाणात आणि कोणत्या तेऱ्हेने भिन्न आहे?

५. दूताने आग्रह धरला पाहिजे की, किसानांना जमीन मिळाल्यानंतर, मशागतीखालच्या जमिनीचे प्रमाण त्यांनी लौकरात लौकर वाढवणे अत्यावश्यक आहे व दुष्काळ टाळण्याचा एकमेव उपाय म्हणून शहरांमध्ये धान्य पाठवण्याबाबत त्यांनी त्वरा करावी.

६. जमीनदारांकडून जमिनीची मालकी काढून घेऊन ती भूमी समित्यांच्या किंवा सोविएतांनी नेमलेल्या तत्सम संस्थांच्या हवाली करण्यासाठी कोणत्या उपाययोजना ठरविण्यात आल्या आहेत, किंवा अंमलात आणण्यात आल्या आहेत?

७. अशी अपेक्षा आहे की, सुनियोजित आणि सुसंघटित शेतकी मालमत्तांचा कारभार, सुपात्र शेतकी तज्ज्ञांच्या मार्गदर्शनाखाली, त्या जमिनींवर राबणाऱ्या भाडोत्री शेतकऱ्यांच्या प्रतिनिधींच्या सोविएतांमार्फत चालवावा..."

केवळ जमीनविषयक आज्ञापत्राच्या विद्युत्‌प्रभावामुळेच नव्हे, तर क्रांतिकारक विचारांचे हजारो किसान-सैनिक आघाडीवरून परतू लागल्यामुळेही, गावोगाव बदल घडविण्याचे वारे जोरात घुमत होते... या लोकांनी विशेष करून, किसान काँग्रेसच्या घोषणेचे स्वागत केले.

कामगारांच्या आणि सैनिकांच्या सोविएतांच्या दुसऱ्या काँग्रेसमध्ये ज्याप्रमाणे जुन्या केंद्रीय कार्यकारी समितीने अडथळे आणायचे प्रयत्न केले, त्याप्रमाणे स्मोल्नीने बोलावलेल्या किसान काँग्रेसला प्रतिबंध करण्याचे कार्यकारी समितीने प्रयत्न केले. आणि आपला प्रतिकार व्यर्थ ठरत आहे याची जाणीव होताच, जुन्या केंद्रीय कार्यकारी समितीप्रमाणेच कार्यकारी समितीनेही, पुराणमतवादी प्रतिनिधींच्या निवडीचा हुकूम देणाऱ्या तारा पिसाटासारख्या पाठवल्या. किसानांमध्ये अशीही अफवा पसरली की, मोगीलेव येथे काँग्रेस भरणार आहे व काही प्रतिनिधी तिकडे गेले; पण २३ नोव्हेंबरच्या दरम्यान सुमारे चारशे पेत्रोग्रादमध्ये जमले आणि पक्षाच्या अंतर्गत गुप्त बैठका चालू झाल्या...

पहिली बैठक दूमाच्या इमारतीमधील अलेक्सांदर हॉलमध्ये भरली. पहिल्या मतदानात असे आढळून आले की, एकूण प्रतिनिधींपैकी अर्ध्याहून

अधिक डावे समाजवादी-क्रांतिकारक होते, तर बोल्शेविक फक्त एक पंचमांश होते, समाजवादी-क्रांतिकारक एक चतुर्थांश होते आणि बाकीचे सर्व केवळ एकाच भावनेने एकत्र आले होते – अव्क्सेन्तियेव, चैकोव्स्की आणि पेशेखोनोव यांचे वर्चस्व असलेल्या जुन्या कार्यकारी समितीला विरोध करण्यासाठी . . .

तो मोठा हॉल लोकांनी खच्चून भरलेला होता व सतत चाललेल्या गोंगाटाने अक्षरशः हादरत होता. कट्टर, खोलवरच्या कडवट भावनेपायी प्रतिनिधी संतप्त गटांमध्ये विभागले गेले. उजव्या पक्षात गणवेषामधील तुरळक अधिकारी, वयोवृद्ध अधिक सधन दाढीवाले शेतकऱ्यांचे चेहरे दिसत होते; मध्यममार्गी पक्षात थोडे किसान, कनिष्ठ अधिकारी आणि काही सैनिक होते; आणि डाव्या पक्षात जवळ जवळ प्रतिनिधींच्या अंगावर सर्वसामान्य सैनिकी गणवेष परिधान केलेले होते. हे शेवटचे प्रतिनिधी म्हणजे सेनेमध्ये सेवा बजावणारी तरुण पिढी होती . . . सज्जांमध्ये कामगारांची दाटून गर्दी जमली होती – रशियामधील कामगार आपली मूळ किसानघराणी अद्याप विसरले नव्हते . . .

जुन्या केंद्रीय कार्यकारी समितीप्रमाणे न वागता, कार्यकारी समितीने, उद्घाटनाच्या बैठकीतच, काँग्रेसला अधिकृत म्हणून मान्यता दिली नाही; अधिकृत काँग्रेस १३ डिसेंबरला बोलावण्यात आली होती. टाळ्यांच्या आणि संतप्त आरोळ्यांच्या प्रचंड वादळात सभापतींनी जाहीर केले की, हा मेळावा म्हणजे केवळ "खास परिषद" होती . . . पण या "खास परिषदे"ने आपली कार्यकारी समितीबाबतची भूमिका लौकरच प्रकट केली – डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांच्या नेत्या मारीया स्पिरीदोनोवा यांची अध्यक्षपदी निवड केली.

वोलोस्त सोविएतांच्या प्रतिनिधींना बसविण्यात यावे, की फक्त प्रांतिक संघटनांचे प्रतिनिधीच बसवावे यावरच्या वादळी चर्चेतच पहिल्या दिवसाचा बव्हंश वेळ खर्ची पडला. आणि कामगार व सैनिक काँग्रेसप्रमाणेच, प्रचंड बहुमताने जाहीर केले की, जास्तीत जास्त विस्तृत प्रतिनिधित्व असावे. त्यावर जुन्या कार्यकारी समितीने सभात्याग केला . . .

जन-कमिस्सारांच्या सरकारला बहुतेक प्रतिनिधींचा विरोध होता ही गोष्ट तात्काळ स्पष्ट झाली. बोल्शेविकांच्या वतीने बोलण्याचा झिनोवियेव यांनी प्रयत्न केला तेव्हा टाळ्याशिट्ट्यांचा गोंगाट करून त्यांना नामोहरम करण्यात आले; जेव्हा त्यांनी व्यासपीठ सोडले तेव्हा कुत्सित हंशामध्ये

आवाज उमटले, "जन-कमिस्साराला कसा चिखलाच्या डबक्यात लोळवला!"

प्रांतिक प्रतिनिधी नझारियेव मोठ्या आवेशाने म्हणाले, "जोपर्यंत किसानांना प्रतिनिधित्व मिळत नाही तोपर्यंत या तथाकथित कामगारकिमान सरकारला मान्यता द्यायची आम्हा डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांची मुळीच तयारी नाही. या घटकेला केवळ कामगारांची हुकूमशाही चालू आहे... संपूर्ण लोकशाहीचे प्रतिनिधित्व करील असे नवे सरकार स्थापन करण्याचा आम्ही आग्रह धरतो!"

बोल्शेविक बाकड्यांकडून जरी निषेध प्रकट झाले तरी प्रतिगामी प्रतिनिधींनी अत्यंत धूर्तपणे बैठकीत अशी भावना निर्माण केली की, जन-कमिस्सार मंडळाचा या काँग्रेसवर वर्चस्व स्थापन करण्याचा, किंवा शस्त्रांच्या बळावर तिला विसर्जित करण्याचा डाव होता—या निवेदनासरशी किसानांमधून संतापाचे स्फोट उमटले...

तिसऱ्या दिवशी अचानकपणे लेनिन व्यासपीठावर चढून उभे राहिले; दहा मिनिटेपर्यंत सभागृहात एकच गोंधळ माजला. "लेनिन मुर्दाबाद!" लोक किंचाळत होते. "आम्ही तुमच्या कोणत्याही जन-कमिस्साराला ऐकणार नाही! तुमच्या सरकारला आम्ही ओळखत नाही!"

अत्यंत शांतपणे, दोन्ही हातांनी मेज घट्ट पकडून, सभागृहात चाललेला गोंधळ आपल्या बारीक डोळ्यांनी विचारपूर्वक न्याहाळत लेनिन उभे होते. अखेरीस, सभागृहाची उजवी बाजू सोडता, बाकीची निदर्शने आपोआप कशीबशी शमली.

"जन-कमिस्सारांच्या मंडळाचा सभासद या नात्यानं मी इथं आलेलो नाही," लेनिन म्हणाले आणि गोंगाट कमी होईपर्यंत पुन्हा वाट पहात गप्प बसले, "पण या काँग्रेससाठी रीतसर निवडलेल्या बोल्शेविक गटाचा सदस्य म्हणून आलोय." आणि सर्वांना दिसतील अशा तऱ्हेने आपली अधिकारपत्रे त्यांनी हातात उंच धरली.

"तरीही" अत्यंत स्थिर आवाजात ते पुढे बोलू लागले, "रशियातलं सध्याचं सरकार बोल्शेविक पक्षानं स्थापन केलंय हे कुणीही नाकारू शकणार नाही—" त्यांना क्षणभर थांबावे लागले, "तेव्हा एकूण सारं तेच आहे..." याठिकाणी उजव्या बाकड्यांनी कानठळ्या बसवणारा गोंधळ केला, पण मध्यम पक्षीय आणि डावे कुतूहलाने बघू लागले व त्यांनी जबरदस्तीने शांतता प्रस्थापित केली.

लेनिन यांचा युक्तिवाद अगदी साधा होता. "किसानांनो, खरं सांगा, जमीनदारांच्या जमिनी आम्ही तुम्हाला दिल्या; उद्योगधंद्यांवर कामगारांचं वर्चस्व स्थापन करायला आता तुम्ही अडथळा करणार? हे वर्गयुद्ध आहे. अर्थातच जमीनदार किसानांना विरोध करतात आणि कारखानदार कामगारांना विरोध करतात. कामगारवर्गाच्या आघाडचांमध्ये तुम्ही दुफळी पडू देणार काय? तुम्ही कोणाची बाजू घ्याल?

"आम्हा बोल्शेविकांचा पक्ष हा कामगारवर्गाचा पक्ष आहे – शेतकी कामगारांचा तसाच औद्योगिक कामगारांचा. आम्ही बोल्शेविक सोविएतांचे रक्षक आहोत – किसान सोविएतांचे तसेच कामगारांच्या आणि सैनिकांच्या सोविएतांचे. आत्ताचं सरकार हे सोविएतांचं सरकार आहे; आम्ही केवळ किसान सोविएतांना सरकारमध्ये सामील होण्याचं निमंत्रण दिलेलं नाही, तर डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांच्या प्रतिनिधींनी जन-कमिस्सार मंडळात दाखल व्हावं, असंही आम्ही निमंत्रण केलंय...

"सोविएतं म्हणजे जनतेचे अगदी खरेखुरे प्रतिनिधी आहेत – कारखान्यांमधल्या आणि खाणींमधल्या कामगारांचे प्रतिनिधी, शेतांमधल्या कामगारांचे प्रतिनिधी. जो कुणी सोविएतांचा नाश करण्याचा प्रयत्न करील तो लोकशाहीविरोधी आणि प्रतिक्रांतिकारक कृत्य केल्याबद्दल दोषी ठरेल. आणि या ठिकाणी मी आपल्याला जाहीर सूचना देतो, उजव्या समाजवादी-क्रांतिकारक पक्षाच्या कॉम्रेडहो – आणि कॅडेट मंडळीहो – जर घटनात्मक सभेत तुम्ही सोविएतांना नष्ट करण्याचा प्रयत्न केलात, तर आम्ही तसं होऊ देणार नाही!"

२५ नोव्हेंबरच्या दुपारी, कार्यकारी समितीच्या बोलावण्यानुसार, चेर्नोव मोगीलेवहून धावत पळत आले. अवघ्या दोन महिन्यांपूर्वी त्यांना कट्टर क्रांतिकारक मानले जात होते व किसानांमध्ये कमालीचे लोकप्रिय मानले जात होते; आणि आत्ता मात्र काँग्रेसचा डावीकडे कल जाण्याचा धोका टाळण्यासाठी त्यांना बोलावण्यात आले होते. चेर्नोव यांचे आगमन होताच त्यांना अटक करून स्मोल्नीमध्ये नेण्यात आले. तेथे छोटचा संभाषणानंतर त्यांची मुक्तता करण्यात आली.

पहिल्याप्रथम, कार्यकारी समितीने काँग्रेसचा त्याग केल्याबद्दल त्यांनी तिची खडसून हजेरी घेतली. कार्यकारी समितीच्या सदस्यांनी काँग्रेसमध्ये परत यायला मान्यता दिली. जेव्हा चेर्नोव यांनी सभागृहात प्रवेश केला,

तेव्हा बहुसंख्यांनी टाळ्या वाजवून त्यांचे स्वागत केले, पण बोल्शेविकांनी मात्र उपहासदर्शक आरोळ्या ठोकल्या.

चेर्नोव बोलू लागले: "कॉम्रेडहो! मी इथून दूरवर होतो. पश्चिम आघाडीवरच्या सेनांमधल्या सर्व किसान प्रतिनिधींची काँग्रेस बोलावण्याच्या प्रश्नाची चर्चा करण्यासाठी भरलेल्या बाराव्या सेनेच्या परिषदेत मी भाग घेतला आणि इथं घडलेल्या बंडाबद्दल मला अगदी थोडी माहिती आहे—"

झिनोवियेव आपल्या जागेवरून उठून ओरडले, "होय, तुम्ही दूर होतात—काही मिनिटांपुरते!" त्यावर भयानक गोंधळ. ओरडा, "बोल्शेविक मुर्दाबाद!"

चेर्नोव पुढे बोलू लागले. "पेत्रोग्रादवर सैन्य पाठवण्यात मी मदत केली हा आरोप बिनबुडाचा आहे आणि साफ खोटा आहे. असा आरोप निर्माण झाला तरी कुठून? त्याचा उगम मला दाखवा!"

झिनोवियेव: "'इझ्वेस्तिया' आणि 'देलो नरोदा'—तुमचीच वर्तमानपत्रं—तीच असं बोलतात!"

छोटया डोळ्यांचा, कुरळया केसांचा, भुरकट दाढीचा चेर्नोव यांचा विशाल चेहरा संतापाने लालबुंद बनला, पण त्यांनी आत्मसंयमन केले व पुढे बोलू लागले. "मी पुन्हा एकवार सांगतो की, इथं काय घडलं याचा मला अजिबात पत्ता नाही आणि या सेनेशिवाय (त्यांनी किसान प्रतिनिधींकडे बोट दाखवून म्हटले), जिला इथं आणायला मी मोठया प्रमाणात जबाबदार आहे, दुसऱ्या कोणत्याही सेनेचं मी नेतृत्व केलं नाही!" हशा आणि "शाब्बास!" अशा आरोळ्या.

"परत आल्यावर मी स्मोल्नीला भेट दिली. तिथं असा कोणताही आरोप माझ्यावर करण्यात आला नाही... छोटया संभाषणानंतर मी तिथून निघालो—बस्स, एवढंच! इथं हजर असलेल्या कुणाची माझ्यावर तसा आरोप करण्याची इच्छा आहे?"

त्यासरशी प्रचंड हलकल्लोळ माजला. डावे समाजवादी-क्रांतिकारक आणि बोल्शेविक एकदम उठून, मुठी वळवून जोरजोराने ओरडू लागले व बाकीचे सभागृह त्यांना गप्प करण्यासाठी ओरडू लागले.

"हे अधिवेशन नाही, तमाशा आहे!" चेर्नोव संतापाने ओरडले व हॉलबाहेर पडले. गोंधळ आणि अव्यवस्था माजल्यामुळे बैठक तहकूब करण्यात आली...

---

दरम्यान, कार्यकारी समितीच्या स्थानाबाबतचा प्रश्न सर्वांच्या डोक्यांना त्रास देत होता. या अधिवेशनाला "खास परिषद" म्हणून जाहीर करून, कार्यकारी समितीची फेरनिवडणूक करण्याचा मार्ग रोखण्यात आला होता. पण त्यामुळे दुहेरी साधले; डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांनी ठरवले की, जर काँग्रेसची कार्यकारी समितीवर सत्ता नाही, तर कार्यकारी समितीची काँग्रेसवर सत्ता नाही. २५ नोव्हेंबर रोजी अधिवेशनाने निर्णय घेतला की, कार्यकारी समितीचे अधिकार खास परिषदेने ग्रहण करावेत व ज्या कार्यकारी समितीच्या सदस्यांची प्रतिनिधी म्हणून निवड झालीय, त्यांनाच फक्त मतदान करता येईल...

दुसऱ्या दिवशी, बोल्शेविकांनी जोरदार विरोध करूनसुद्धा, ठरावात सुधारणा करण्यात आली व प्रतिनिधी म्हणून निवड झालेली असो अथवा नसो, कार्यकारी समितीच्या सर्व सदस्यांना अधिवेशनात बोलण्याचा आणि मतदान करण्याचा अधिकार देण्यात आला.

२७ तारखेला जमिनीच्या प्रश्नावर वादविवाद झडला व बोल्शेविकांच्या आणि डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांच्या शेतकी कार्यक्रमामधील मतभेद उघड झाले.

डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांच्या वतीने काचिन्स्की यांनी क्रांतिकाळातील जमीनविषयक प्रश्नाच्या इतिहासाची रूपरेषा समजावून सांगितली. ते म्हणाले की, जमीनविषयक मालमत्ता ताबडतोब भूमी समित्यांच्या हाती देण्याबाबतच्या ठरावाला किसान सोविएतांच्या पहिल्या काँग्रेसने स्पष्टपणे आणि औपचारिकपणे अनुकूल मत दिले होते. पण क्रांतीच्या चालकांनी आणि सरकारमधल्या भांडवलदारांनी आग्रह धरला की, घटनात्मक सभेची बैठक होईपर्यंत या प्रश्नाची उकल करता येणार नाही... क्रांतीचा दुसरा कालखंड, "समझोत्याचा कालखंड", चेर्नोव यांच्या मंत्रिमंडळातील प्रवेशाने सुरू झाला. किसानांची खात्री पटली की, आता जमीनविषयक प्रश्नाच्या व्यवहार्य उलागडीला आरंभ होईल; पण पहिल्या किसान काँग्रेसने आदेशात्मक निर्णय देऊनसुद्धा, कार्यकारी समितीमधील प्रतिगाम्यांनी आणि तडजोडवाद्यांनी कोणतीही कृती करण्यास प्रतिबंध केला. या धोरणामुळे शेतकी क्षेत्रात अनेक गोंधळ माजले; किसानांच्या अधीरतेची आणि दाबून टाकलेल्या शक्तीची ती स्वाभाविक अभिव्यक्ती होती. किसानांना क्रांतीचा नेमका अर्थ उमगला — शब्द कृतीत आणण्याचे त्यांनी प्रयत्न केले...

वक्ते पुढे म्हणाले. "सध्याच्या घटना साध्या दंगली किंवा "बोल्शेविक

साहस" सूचित करीत नाहीत, तर याउलट खरोखरीचा जनतेचा उठाव झालेला दाखवतात, ज्याचं सबंध देशाकडून सहानुभूतीपूर्वक स्वागत झा-लंय...

"जमीनविषयक प्रश्नाबाबत बोल्शेविकांनी सर्वसाधारणपणं अचूक भूमिका घेतली होती; पण किसानांनी बळाच्या जोरावर जमिनी ताब्यात घ्याव्यात अशी शिफारस करून त्यांनी घोडचूक केली... अगदी पहिल्या दिवसांपासून बोल्शेविकांनी जाहीर केले होते की, "क्रांतिकारक सामूहिक कृतीमार्फत" किसानांनी जमीन ताब्यात घ्यावी. हे दुसरं तिसरं काही नसून शुद्ध अराजक आहे; संघटित पद्धतीनं जमीन ताब्यात घेता येते... क्रांतीच्या समस्या लौकरात लौकरच्या पद्धतीनं सोडवणं बोल्शेविकांच्या दृष्टीनं महत्त्वाचं होतं — पण या समस्या **कशा** सोडवल्या जाव्यात याबाबत बोल्शेविकांना काही स्वारस्य नव्हतं...

"सोविएतांच्या काँग्रेसच्या जमीनविषयक आज्ञापत्रामधली मूलतत्त्वे पहिल्या किसान काँग्रेसच्या निर्णयांशी साधर्म्य दाखवतात. मग त्या काँग्रेसनं आखून दिलेल्या डावपेचांनुसार नवं सरकार का वागत नाही? कारण जन-कमिस्सार मंडळाला जमीनविषयक प्रश्न सोडवण्याची घाई झाली होती. म्हणजे घटनात्मक सभेला त्याच्याबाबत काहीही करायला राहू नये...

"पण व्यवहार्य उपाययोजना अंमलात आणणंही आवश्यक आहे हे सरकारनं पाहिलं, म्हणून त्यावर अधिक विचार न करता, 'भूमी समित्यांचे नियम' त्यानं मंजूर केले व अशा प्रकारं चमत्कारीक परिस्थिती निर्माण केली; जन-कमिस्सारांच्या मंडळाच्या दृष्टीनं जमीनविषयक खाजगी मालमत्ता नष्ट ठरली होती, तर भूमी समित्यांनी आखलेले नियम खाजगी मालमत्तेवर आधारलेले आहेत... अर्थात त्यामुळं काहीही नुकसान झालेलं नाही; कारण भूमी समित्या सोविएत आज्ञापत्रांकडं मुळीच लक्ष न देता आपले स्वतःचे व्यवहार्य निर्णय अंमलात आणत आहेत — बहुसंख्य किसानांच्या इच्छेवर हे निर्णय आधारलेले आहेत...

"जमीनविषयक प्रश्नावर कायदेशीर तोडगा शोधून काढण्याचं काम या भूमी समित्या करीत नाहीत, तो फक्त घटनात्मक सभेचा अधिकार आहे... पण रशियन किसानांची इच्छा घटनात्मक सभा अंमलात आणील का? त्याबद्दल आम्हाला खात्री वाटत नाही... आम्हाला एवढीच खात्री वाटते की, किसानांची क्रांतिकारक निर्धारशक्ती आता जागी झाली आहे आणि किसानांना ज्या पद्धतीनं जमीनविषयक प्रश्न सुटावा असं वाटतं त्याच

पद्धतीनं त्या प्रश्नाचा निर्णय लावणं घटनात्मक सभेला **भाग पडेल...** जनतेची इच्छा डावलण्याचं धाष्टर्य घटनात्मक सभा करू शकणार नाही..."

त्यांच्यानंतर लेनिन बोलले. यावेळी त्यांचे भाषण कमालीच्या एकाग्रतेने ऐकले गेले.

"या क्षणाला आम्ही केवळ जमिनीचा प्रश्न सोडवण्याचा प्रयत्न करीत नाही, तर सामाजिक क्रांतीचा प्रश्न सोडवीत आहोत — आणि तो केवळ इथं रशियातलाच नाही तर सबंध जगभरचा. सामाजिक क्रांतीच्या इतर प्रश्नांना बाजूला सारून जमिनीचा प्रश्न अलगपणं सोडविता येणार नाही... उदाहरणादाखल सांगायचं तर जमिनीच्या मालमत्ता जप्त केल्यामुळं केवळ रशियन जमीनदारांचाच प्रतिकार होणार नाही, तर परकी भांडवलाचासुद्धा प्रतिकार घडेल; कारण मोठ्या जमिनींच्या मालमत्ता दलाली करणाऱ्या बँकांमार्फत परकी भांडवलाशी गुंतलेल्या आहेत...

"रशियामधली जमिनींची मालकी हा जबरदस्त दडपशाहीचा आधार आहे आणि किसानांनी जमिनी आपल्या ताब्यात हिसकावून घेणं हे आमच्या क्रांतीमधलं फार महत्त्वाचं पाऊल आहे. पण क्रांतीला ज्या टप्प्यांमधून पार पडावं लागलं आहे, त्यांनी स्पष्टपणं दाखवून दिलं आहे की, इतर पावलांपासून हे पाऊल वेगळं काढता येत नाही... डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांनी केलेली चूक म्हणजे त्यावेळी त्यांनी तडजोडीच्या धोरणाला विरोध केला नाही, कारण लोकांची जाणीवबुद्धी अद्याप विकसित झालेली नाही या विचारप्रणालीला ते कवटाळून बसले...

"**सर्व जनतेचा बौद्धिक विकास संमती देईल तेव्हाच जर समाजसत्तावाद अंमलात येणं शक्य असेल, तर किमान पाचशे वर्षं तरी आपल्याला समाजसत्तावादाचं दर्शन घडायचं नाही...** समाजसत्तावादी राजकीय पक्ष हे कामगारवर्गाचं अग्रदल आहे; जनसमूहामध्ये शिक्षणाचा अभाव आहे म्हणून त्यानं न थांबता, त्याउलट क्रांतिकारक पुढाकारासाठी सोविएतांचा वापर करून जनतेचं नेतृत्व केलं पाहिजे... पण धरसोडवाद्यांचं नेतृत्व जर डाव्या समाजवादी-क्रांतिकारक कॉम्रेड मंडळींना करायचं असेल, तर प्रथम त्यांनी धरसोडीची प्रवृत्ती सोडली पाहिजे...

"गेल्या जुलैमध्ये सर्वसाधारण जनता आणि तडजोडवादी यांच्यामध्ये अनेक उघड फाटाफुटी झाल्या; पण आता नोव्हेंबरातही, आपल्या करंगळीच्या इशाऱ्यावर लोकांना नाचवू पाहणाऱ्या अव्क्सेन्तियेवसारख्या लोकांशी

डावे समाजवादी-क्रांतिकारक सख्य करू पहात आहेत... जर तडजोडीचं धोरण चालू राहिलं तर क्रांती अदृश्य होते. भांडवलदारवर्गाशी कोणतीही तडजोड करणं नाही ; त्याची सत्ता पूर्णपणं चिरडून टाकली पाहिजे...

"आम्ही बोल्शेविकांनी आमच्या जमीनविषयक कार्यक्रमात बदल केलेला नाही ; जमिनींची खाजगी मालमत्ता नष्ट करण्याचं धोरण आम्ही सोडलेलं नाही आणि तसं करण्याचा आमचा इरादा नाही. आम्ही संमत केलेले 'भूमी समित्यांचे नियम' खाजगी मालमत्तेवर मुळीच आधारलेले **नाहीत**. आम्ही तसं करण्याचं कारण, जनतेला ज्या पद्धतीनं ते साध्य करून पाहिजे होतं त्या मार्गानं आम्हाला ते साध्य करायचं होतं. त्यायोगे सामाजिक क्रांतीसाठी लढणाऱ्या सर्व प्रवृत्तींना अधिक निकट युतीमध्ये एकत्र आणण्याचा आमचा हेतू होता.

"या युतीमध्ये प्रवेश करण्याचं आम्ही डाव्या समाजवादी-क्रांतिकार-कांना निमंत्रण देत आहोत. मात्र आमचा असा आग्रह आहे की, त्यांनी मागे वळून पाहण्याचं थांबवावं आणि आपल्या पक्षातल्या तडजोडवाद्यांशी त्यांनी संबंध तोडावा...

"घटनात्मक सभेच्या बाबतीत बोलायचं तर मागील वक्त्यांनी म्हट-ल्याप्रमाणं हे खरं आहे की, जनतेच्या क्रांतिकारक निर्धारशक्तीवर घट-नात्मक सभेचं काम अवलंबून राहील. मी म्हणतो की, 'त्या क्रांतिकारक निर्धारशक्तीवर जरूर विसंबून रहा, पण आपली बंदूक विसरू नका!'"

त्यानंतर लेनिन यांनी बोल्शेविक ठराव वाचून दाखवला :

> "कामगार आणि सैनिकांच्या सोविएतांच्या दुसऱ्या अखिल रशियन काँग्रेसने शिक्कामोर्तब केलेल्या आणि रशियन प्रजासत्ताकाच्या काम-गार आणि किसानांच्या हंगामी सरकाराच्या स्वरूपातील जन-कमि-स्सारांच्या मंडळाने प्रसिद्ध केलेल्या १९१७ सालच्या जमीनविषयक काय-द्याला (आज्ञापत्राला) किसानांची काँग्रेस सढळ आणि सार्वांगीण पाठिंबा देत आहे. किसान काँग्रेस... सर्व किसानांना आवाहन करीत आहे की, त्यांनी एकमताने हा कायदा मान्य करावा आणि खुद्द स्वतः त्याची ताबडतोब अंमलबजावणी करावी ; त्याचवेळी सर्व किसानांना आवाहन करीत आहे की, केवळ शब्दांनी नव्हे तर कृतींनी, ज्या व्यक्तींनी आपली संपूर्ण निष्ठा शोषित किसानांच्या कल्याणकार्या-साठी वाहिल्याचे सिद्ध झाले आहे, मोठ्या जमीनदारांच्या, भांडवल-

दारांच्या, त्यांच्या कैवाऱ्यांच्या आणि हस्तकांच्या सर्व प्रतिकाराविरुद्ध किसानांच्या हितसंबंधांचे रक्षण करण्याची त्यांची इच्छा आणि पात्रता सिद्ध झाली आहे, अशाच व्यक्तींना त्यांनी जबाबदारीच्या जागांवर आणि पदांवर नेमावे...

"तसेच, किसान काँग्रेस आपला ठाम विश्वास प्रकट करीत आहे की, जमीनविषयक आज्ञापत्रामधील सर्व उपाययोजनांची यशस्वी संपूर्ण अंमलबजावणी, ७ नोव्हेंबर १९१७ रोजी सुरू झालेल्या कामगारांच्या सामाजिक क्रांतीच्या विजयाद्वारेच केवळ शक्य आहे; कारण केवळ सामाजिक क्रांतीच परतीची शक्यता न ठेवता जमिनीची मालकी किसान-कामगारांच्या हवाली करू शकेल, मोठ्या जमीन मालकांची शेतकी यंत्रसामग्री जप्त करू शकेल, वेतनी गुलामगिरी संपूर्ण नष्ट करून शेतकी कामगारांच्या हितसंबंधांचे रक्षण करू शकेल, रशियाच्या सर्व प्रदेशांमध्ये शेतकी आणि औद्योगिक उत्पादनांचे नियमित व पद्धतशीर वाटप करू शकेल, बँका आपल्या ताब्यात घेऊ शकेल (कारण खाजगी मालमत्ता नष्ट केल्यानंतर, सबंध जनतेच्या मालकीची जमीन होणे त्याशिवाय शक्य नाही), आणि कामगारांना राज्याकडून सर्व प्रकारचे साहाय्य करू शकेल...

"या सर्व कारणांसाठी किसान काँग्रेस ७ नोव्हेंबरच्या क्रांतीचे सामाजिक क्रांती म्हणून पूर्ण समर्थन करते... आणि आवश्यक त्या सुधारणा घडवून पण मुळीच न डगमगता, रशियन प्रजासत्ताकाचे सामाजिक स्थित्यंतर घडवण्याचा आपला अपरिवर्तनीय निर्धार व्यक्त करीत आहे.

"सामाजिक क्रांतीच्या विजयासाठी अपरिहार्य अट म्हणजे किसान-कामगारांचे औद्योगिक कामगारवर्गाशी, सर्व प्रगत देशांमधील कामगारवर्गाशी, निकटचे ऐक्य घडवून आणणे होय; केवळ त्यायोगेच जमीनविषयक आज्ञापत्राला चिरंतन यश लाभेल आणि त्याची संपूर्ण अंमलबजावणी होईल. यापुढे, रशियन प्रजासत्ताकात, वरपासून खालपर्यंत राज्याचे सर्व संघटन आणि शासनकारभार, त्या ऐक्यावर आधारला पाहिजे. भांडवलदारवर्गाशी तडजोड करण्याच्या धोरणाकडे परत जाण्याच्या सर्व प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष, उघड किंवा छुप्या प्रयत्नांना चिरडून टाकून — भांडवलदारी राजकारणी नेत्यांबरोबर समझोता करण्याच्या कटु अनुभवाची पुनरुक्ती घडू न देता — त्या ऐक्याच्या आधारेच केवळ

सबंध जगभर समाजसत्तावादाच्या विजयाची हमी निर्माण केली पाहिजे ...”

कार्यकारी समितीमधील प्रतिगाम्यांना इत:पर उघडपणे बाहेर येण्याचे धाडस होत नव्हते. पण चेर्नोव मात्र अनेक वेळा नम्रपणे आणि श्रोत्यांची मने जिंकणाऱ्या नि:पक्षपातीपणे बोलले. त्यांना व्यासपीठावर बसण्याचे आमंत्रण देण्यात आले... काँग्रेसच्या दुसऱ्या रात्री अध्यक्षांच्या हाती एक निनांवी चिठ्ठी देण्यात आली; चेर्नोव यांना मानद अध्यक्ष बनविण्याची तिच्यात विनंती करण्यात आली होती. उस्तीनोव यांनी ती चिठ्ठी मोठ्यां-दा वाचली. ताबडतोब झिनोवियेव ताडकन उभे राहून ओरडले की, काँग्रेसचा मेळावा काबीज करण्याची जुन्या कार्यकारी समितीची ही एक युक्ती आहे; एका क्षणात त्या हॉलचे दोन्ही बाजूंनी मोठमोठ्यांदा ओरडणाऱ्या व संतप्त हातवारे करणाऱ्या मानवी कल्लोळात रूपांतर झाले... तरीही चेर्नोव यांची लोकप्रियता तिळमात्र कमी झाली नाही.

जमीनविषयक प्रश्नावरच्या आणि लेनिन यांच्या ठरावावरच्या वादळी चर्चांमध्ये दोन वेळा बोल्शेविक सभात्याग करण्याच्या बेतात होते, पण दोन्ही वेळा त्यांच्या नेत्यांनी त्यांना आवरून धरले... मला भासत होते की, काँग्रेसमध्ये कायमचा तिढा पडला होता.

पण स्मोल्नीमध्ये डावे समाजवादी-क्रांतिकारक आणि बोल्शेविक यांच्यात अनेक गुप्त बैठका चालल्या होत्या, याची आम्हा कुणालाच माहिती नव्हती. प्रथम डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांनी मागणी केली होती की, सोविएतां-च्या आत आणि बाहेर असलेल्या सर्व समाजवादी पक्षांचे मिळून सरकार असावे, कामगार, सैनिक आणि किसानांच्या संघटनेतील प्रतिनिधी सम-प्रमाणात असलेल्या व नगर दूमा आणि झेम्स्त्वोंमधील प्रतिनिधींनी पूर्णत्व आलेल्या जन-मंडळाला ते सरकार जबाबदार असावे; लेनिन आणि ट्रॉट्स्की यांना त्यातून वगळायचे होते व लष्करी क्रांतिकारक समिती आणि तत्सम दंडयंत्रणा विसर्जित करावयाच्या होत्या.

बुधवारी सकाळी, २८ नोव्हेंबरला, एक अख्खी रात्र जबरदस्त वादंग झाल्यानंतर, अखेरीस एकमत झाले. १०८ सदस्यांच्या केंद्रीय कार्यकारी समितीमध्ये, किसान काँग्रेसमधून प्रमाणबद्धरीत्या निवडलेल्या १०८ सद-स्यांची भर घालून तिची वाढ करण्याचे ठरले; सेना आणि नौदल यांच्या-मधून थेटपणे निवडलेले १०० प्रतिनिधी; आणि ट्रेड युनियनांचे ५० प्रति-

निधी समाविष्ट करण्याचे ठरले (सर्वसाधारण युनियनांचे ३५, १० रेल-कामगारांचे व ५ टपाल आणि तार कामगारांचे). दूमा आणि झेम्स्त्वो बरखास्त करण्यात आल्या. लेनिन व ट्रॉट्स्की सरकारमध्ये राहिले, लष्करी क्रांतिकारक समिती आपले कार्य पुढे चालवीत राहिली.

काँग्रेसच्या बैठकींचे स्थळ आता शाही कायदा विद्यालयाच्या इमारतीत, फॉन्तान्का ६ येथे किसान सोविएतच्या मुख्य कचेरीत हलविण्यात आले. तेथील मोठ्या सभागृहात, बुधवारी दुपारी प्रतिनिधी गोळा झाले. जुनी कार्यकारी समिती काँग्रेसमधून बाहेर पडली होती आणि त्याच इमारतीच्या एका खोलीत तिने आपले वेगळे अवशिष्ट अधिवेशन भरविले होते. सेना समित्यांमधील पळपुटे प्रतिनिधी तिच्यात सामील झाले होते.

चेर्नोव एका सभेकडून दुसऱ्या सभेकडे अशा सारख्या चकरा मारीत होते व कार्यावर बारीक नजर ठेवून होते. बोल्शेविकांबरोबर करार चर्चिला जात आहे याची त्यांना माहिती होती, पण तो करार झाला होता हे त्यांना ठाऊक नव्हते.

अवशिष्ट अधिवेशनात ते बोलले, "सध्या प्रत्येकजण अखिल समाजवादी सरकार स्थापण्याच्या कल्पनेला अनुकूल आहे, पण अनेक लोक पहिले मंत्रिमंडळ विसरतात, जे संमिश्र सरकार **नव्हते** आणि त्यात केवळ एकच समाजवादी होता – केरेन्स्की. ते सरकार आपल्या काळात खूप लोकप्रिय होते. आता लोक केरेन्स्कींना नांवे ठेवतात; पण ते विसरतात की, केरेन्स्कींना सत्तेवर चढविण्यात केवळ सोविएते जबाबदार नव्हती, तर जनताही त्यात सामील होती...

"केरेन्स्कींबाबत लोकमत का बदलले? रानटी लोक ज्यांची प्रार्थना करतात त्यांना देव बनवतात आणि त्यांची जर एखादी प्रार्थना सफल झाली नाही तर त्याच देवांना शिक्षा करतात... या क्षणाला नेमके तेच घडते आहे... काल केरेन्स्की झाले; आज लेनिन आणि ट्रॉट्स्की आहेत; उद्या आणखी कुणी...

"केरेन्स्कींना आणि बोल्शेविकांना, अशा दोघांनाही आम्ही सत्तात्याग करण्याचा प्रस्ताव दिला आहे. केरेन्स्कींनी तो मान्य केला – आज त्यांनी आपल्या भूमीगत स्थळाहून जाहीर केले की, पंतप्रधान म्हणून ते राजिनामा देत आहेत; पण बोल्शेविकांची सत्तेवर राहण्याची इच्छा आहे आणि तिचा वापर कसा करायचा याची त्यांना माहिती नाही...

"बोल्शेविक यशस्वी झाले किंवा अपयशी ठरले, तरी रशियाचे

भवितव्य बदलणार नाही. रशियन खेड्यांना स्वतःला काय पाहिजे त्याची उत्तम जाण आहे आणि ती आपल्या उपाययोजना आता अंमलात आणीत आहेत... अखेरीस ही खेडीच आपल्याला वाचवतील..."

दरम्यान, मोठ्या सभागृहात, किसान काँग्रेस आणि स्मोल्नी यांच्या-मध्ये एकमत झाल्याचे उस्तीनोव यांनी जाहीर केले. त्यांच्या घोषणेचे प्रतिनिधींनी अत्यानंदाने स्वागत केले. अचानक चेर्नोव तेथे हजर झाले व त्यांनी बोलण्याची परवानगी मागितली.

त्यांनी बोलायला आरंभ केला, "किसान काँग्रेस आणि स्मोल्नी यांच्या-मध्ये करार होत असल्याची मला माहिती आहे. पण असा करार बेकाय-देशीर ठरेल, कारण किसान सोविएतांची खरी काँग्रेस पुढील आठवड्या-पर्यंत भरत नाहीय्...

"शिवाय आता मला तुम्हाला सावधगिरीचा इशारा द्यायचाय की, तुमच्या मागण्या बोल्शेविक कधीच मान्य करणार नाहीत..."

एका प्रचंड मोठ्या* हशामुळे त्यांच्या भाषणात व्यत्यय आला; परि-स्थितीची जाणीव होऊन त्यांनी ते व्यासपीठ आणि सभागृह सोडले व आपली लोकप्रियता सांगाती घेऊन निघून गेले...

---

गुरुवारी २९ नोव्हेंबरला, दुपारच्या अखेरच्या प्रहरी, काँग्रेसची एक खास बैठक भरली. वातावरणात उत्सव जाणवत होता; प्रत्येक चेहऱ्यावर हास्य विलसत होते... सभेचे उरलेले कामकाज लौकर लौकर आटपण्यात आले व नंतर समाजवादी-क्रांतिकारकांच्या डाव्या गटाचे वयोवृद्ध नेते, शुभ्र दाढीधारी नातान्सोन कापऱ्या कापऱ्या आवाजात आणि अश्रुभरल्या डोळ्यांनी, किसान सोविएतांच्या कामगार-सैनिक सोविएतांशी घडलेल्या "विवाहा"चा अहवाल वाचू लागले. प्रत्येक "ऐक्य" शब्दागणिक टाळ्यांचा अफाट कडकडाट होत होता... अखेरीस, लाल सेनेच्या प्रतिनिधींसह स्मो-ल्नीहून प्रतिनिधीमंडळाचे आगमन झाले, असे उस्तीनोव यांनी जाहीर केले तेव्हा सभागृहाने उभे राहून टाळ्यांनी स्वागत केले. कामगार, सैनिक, खलाशी – अशा एकामागून एक वक्त्यांनी भाषणे करून त्यांचा गौरव केला.

त्यानंतर अमेरिकन समाजवादी मजूर पक्षाचे प्रतिनिधी बोरीस राई-नस्टाईन बोलले: "किसान काँग्रेस आणि कामगार-सैनिक प्रतिनिधींच्या

सोविएतांच्या ऐक्याचा दिवस, हा क्रांतीच्या महान दिवसांपैकी एक दिवस आहे. त्याचा ध्वनी सबंध जगभर — पॅरिसमध्ये, लंडनमध्ये आणि महासागरापार न्यूयॉर्कमध्येही दुमदुमत राहील. सर्व कष्टकऱ्यांची अंतःकरणं या एकीमुळं आनंदानं दुथडी भरून वाहतील.

"एका महान विचाराचा विजय झालाय. पश्चिमेची आणि अमेरिकेची, रशियापासून, रशियन कामगारवर्गापासून, काहीतरी अफाट अपेक्षा होती... जगातला कामगारवर्ग रशियन क्रांतीची वाट पाहतोय, ती साध्य करीत असलेल्या महान गोष्टींची वाट पाहतोय..."

केंद्रीय कार्यकारी समितीचे अध्यक्ष स्वेर्दलोव यांनी काँग्रेसचे अभिनंदन केले. आणि "यादवी युद्धाची अखेर चिरायू होवो! संयुक्त लोकशाही चिरायू होवो!" अशा घोषणा देत किसानांचे लोंढे इमारतीबाहेर पडले.

एव्हाना अंधार पडला होता आणि बर्फावर चंद्राचे आणि तारकांचे मंद चांदणे चमकत होते. कालव्याच्या किनाऱ्यालगत पाव्‌लोव्‌स्की रेजिमेंटचे सैनिक आपल्या बँडसह संचलनाच्या जय्यत तयारीत उभे होते. त्यांनी 'मार्सेलिए' वाजवायला आरंभ केला. सैनिकांच्या गगनभेदी आरोळ्यांमध्ये, किसान रांगा करून उभे राहिले आणि अखिल रशियन किसान सोविएतांच्या कार्यकारी समितीची प्रचंड लाल ध्वजा त्यांनी फडकावली. तिच्यावर नव्याने सोनेरी अक्षरे विणली होती: "क्रांतिकारक कष्टकरी जनांचे ऐक्य चिरायू होवो!" त्या पाठोपाठ इतर ध्वजा होत्या — विभागीय सोविएतांच्या ध्वजा. पुतिलोव कारखान्याच्या ध्वजेवर लिहिले होते, "सर्व लोकांमध्ये बांधिलकी निर्माण करण्यासाठी आम्ही या ध्वजेपुढे झुकतो!"

कुठूनतरी मशाली अवतरल्या. त्यांची नारिंगी प्रकाश रात्रीला उजळू लागला, हिमकण त्या प्रकाशात सहस्रपटींनी चमकू लागले. फॉन्तान्काच्या किनाऱ्यावरून ती मिरवणूक गाणी गात निघाली तेव्हा जमावाच्या डोक्यावर धूर ओकणाऱ्या मशाली नाचत होत्या व दुतर्फा चकित जनता मुकाटपणे हा सोहळा पहात उभी होती.

"क्रांतिकारक सेना चिरायू होवो! लाल रक्षक चिरायू होवो! किसान चिरायू होवोत!"

अशा प्रकारे सबंध शहरभर ती प्रचंड मिरवणूक फिरत गेली, तिचा आकार वाढत गेला, सोनेरी अक्षरातल्या नवनव्या लाल पताका तिच्यामधून फडकत गेल्या. कष्टांनी झुकलेले दोन म्हातारे किसान हातात हात घालून चालत होते, त्यांच्या चेहऱ्यांवर बालसदृश आनंद विलसत होता.

एकजण म्हणाला, "आपली जमीन आता ते कशी काढून नेतात ते बघतोच!"

स्मोल्नीजवळ रस्त्याच्या दोन्ही बाजूंना आनंदाने बेहोष बनलेले लाल रक्षक रांगांनी उभे होते. दुसरा म्हातारा किसान आपल्या मित्राला म्हणाला, "मी दमलो नाही. सारा रस्ता मी हवेतच चालत होतो!"

स्मोल्नीच्या पायऱ्यांवर सुमारे शंभर कामगार आणि सैनिक प्रतिनिधी आपल्या ध्वजा घेऊन उभे होते. कमानींमधून पडणाऱ्या प्रकाशझोतांच्या पार्श्वभूमीवर त्यांची कृष्णवर्णी मोठी छाया दिसत होती. एखाद्या लाटेसारखे ते पुढे धावले आणि किसानांना बाहुपाशात घेऊन त्यांनी त्यांच्यावर चुंबनांचा वर्षाव केला; आणि एखाद्या महाप्रचंड मेघगर्जनेप्रमाणे आवाज करीत ती मिरवणूक प्रवेशद्वारांमधून पायऱ्या चढून वर आली...

महाप्रचंड शुभ्र स्वागत कक्षामध्ये, इतिहासातल्या महान जाणीवपूर्ण क्षणांना जे पावित्र्य असते त्या पवित्र जाणीवेने, सबंध पेत्रोग्राद सोविएतसह आणि हजार प्रेक्षकांसह, केंद्रीय कार्यकारी समिती तेथे वाट पहात थांबली होती.

झिनोवियेव यांनी किसान काँग्रेसबरोबरच्या कराराची घोषणा केली आणि खालच्या व्हरांड्यात बँडचे सूर कानी पडताच टाळ्यांचा आणि हर्षनिर्भर आरोळ्यांचा गगनभेदी नाद उमटला व त्या विजयदुंदुभी वाजत असतानाच मिरवणुकीचा अग्रभाग आत आला. व्यासपीठावर अध्यक्षमंडळ उठून उभे राहिले आणि किसानांच्या अध्यक्षमंडळाला त्याने जागा करून दिली; दोन्ही अध्यक्षमंडळे एकमेकांना आलिंगने देऊ लागली. त्यांच्या मागे पांढऱ्याशुभ्र भिंतीवर, झारची प्रतिमा फाडलेल्या रिकाम्या चौकटीच्या वरच्या बाजूस, दोन ध्वजा एकमेकींशी तिरप्या करून लावलेल्या होत्या...

मग "विजयी अधिवेशन" सुरू झाले. स्वेर्दलोव यांच्या चार स्वागतपर शब्दांनंतर, कृश शरीरयष्टीच्या, फिकट चेहऱ्याच्या, चष्मा लावलेल्या, केस सरळ विंचरलेल्या आणि न्यू इंग्लंडमधल्या शाळा मास्तरणीसारख्या दिसणाऱ्या, मारीया स्पिरीदोनोवा वक्त्याच्या जागी उभ्या राहिल्या. सबंध रशियातली ती अत्यंत लोकप्रिय आणि सर्वांत प्रभावी महिला होती.

"इतिहासाला कधीही माहीत नसलेली नवी क्षितिजं आता रशियाच्या कामगारांपुढं खुली झाली आहेत... गतकाळातल्या सर्व कामगार चळवळींना मागं टाकण्यात आलंय. पण आताची चळवळ आंतरराष्ट्रीय आहे, म्हणून ती अजिंक्य आहे. क्रांतीचा अग्नी विझवणारी एकही शक्ती जगात अस्ति-

त्वात नाही! जुनं जग कोसळून पडतंय, नव्या जगाचा आरंभ होतोय..."

त्यानंतर आवेशाने पेटलेले ट्रॉट्स्की बोलले: "कॉम्रेड किसानहो, मी तुमचं स्वागत करतो! तुम्ही इथं पाहुणे म्हणून आला नाहीत, तर रशियन क्रांतीचं काळीज जतन करणाऱ्या घराचे मालक म्हणून आला आहात. लक्षावधी कामगारांची इच्छाशक्ती या सभागृहात एकवटली आहे... रशियन भूमीचा आता फक्त एकच मालक आहे: कामगार, सैनिक आणि किसान यांचं ऐक्य..."

त्यावेळपावेतो रशियाच्या शस्त्रसंधीच्या निमंत्रणाची अवहेलना करणाऱ्या, ज्याचा मध्य युरोपने स्वीकार केला होता, दोस्त राष्ट्रांच्या मुत्सद्यांबद्दल ट्रॉट्स्की अत्यंत बोचक उपहासाने बोलले.

"या युद्धामधून एक नवी मानवजात जन्माला येईल... या सभागृहामधून आम्ही सर्व देशांच्या कामगारांपुढं शपथ घेतो की, आमच्या क्रांतिकारक स्थानावर आम्ही कायम राहू. जर आम्ही मोडू तर ते आमच्या ध्वजेचं रक्षण करताना..."

त्यांच्यानंतर क्रीलेन्को बोलले. त्यांनी आघाडीवरची परिस्थिती समजावून सांगितली, ज्या ठिकाणी दुखोनिन जन-कमिस्सार मंडळाला प्रतिकार करण्याची तयारी करीत होते. "दुखोनिनना आणि त्यांच्या बरोबरच्या लोकांना चांगली जाण असू दे की, जे शांततेचा मार्ग अडवतात त्यांच्याशी आम्ही नरमाईनं वागणार नाही!"

नौदलाच्या वतीने दीबेन्को यांनी सभागृहापुढे मुजरा सादर केला आणि विक्झेलचे सदस्य क्रूशिन्स्की म्हणाले, "सर्व खऱ्या समाजवाद्यांची एकजूट आत्ता झाली आहे त्या क्षणापासून रेल-कामगारांची संपूर्ण सेना क्रांतिकारक लोकशाहीच्या चरणांशी तनमनधनाने सेनेला हजर आहे!"

त्यानंतर लुनाचार्स्की साश्रुनयनांनी बोलले, डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांच्या वतीने प्रोश्यान बोलले व अखेरीस मार्तोव आणि गोर्कींच्या गटांमधील सदस्यांनी बनलेल्या संयुक्त सामाजिक-लोकशाहीवादी-आंतरराष्ट्रीयवाद्यांच्या वतीने सहाराश्विली बोलले. ते म्हणाले:

"बोल्शेविकांच्या बिनतडजोडवादी धोरणामुळे आणि सर्व क्रांतिकारक लोकशाहीचे ऐक्य अंमलात येण्यासाठी त्यांना सवलती देणे भाग पडावे यामाठी आम्ही केंद्रीय कार्यकारी समिती सोडली. आता एकी झाली आहे, तेव्हा पुन्हा एकदा केंद्रीय कार्यकारी समितीमध्ये आमच्या जागांवर आम्ही स्थानापन्न होणं हे आमचं पवित्र कर्तव्य समजतो... जे केंद्रीय कार्यकारी

समितीमधून बाहेर पडले होते त्या सर्वांनी परतावं असं आम्ही जाहीर करतो.'

किसान काँग्रेसच्या अध्यक्षमंडळाच्या एका प्रतिष्ठित वयोवृद्ध किसानांनी, स्ताश्कोव यांनी, सभागृहाच्या चारी कोपऱ्यांना उद्देशून झुकून अभिवादन केले. "नव्या रशियन जीवनाच्या आणि स्वातंत्र्याच्या नामाभिधानप्रसंगी मी तुम्हा सर्वांचं स्वागत करतो!"

पोलिश सामाजिक-लोकशाहीच्या वतीने ब्रोन्स्की बोलले; कारखाना समित्यांच्या वतीने स्क्रिप्निक बोलले; सालोनिका येथील रशियन सैनिकांच्या वतीने त्रिफोनोव बोलले; आणि भरल्या अंतःकरणाने, आशा परिपूर्ण झाल्याच्या आनंदमयी उल्हासाने इतर वक्ते अखंड बोलत राहिले...

पुढील ठराव जेव्हा मांडण्यात आला आणि एकमताने संमत झाला तेव्हा रात्रीचा उत्तर प्रहर लोटला होता:

> "पेत्रोग्राद सोविएत आणि किसान काँग्रेस यांच्याशी खास बैठकीत एक झालेली केंद्रीय कार्यकारी समिती, कामगार आणि सैनिक प्रतिनिधींच्या सोविएतांच्या दुसऱ्या काँग्रेसने संमत केलेल्या जमीनविषयक आणि शांततेच्या आज्ञापत्रांना, तसेच केंद्रीय कार्यकारी समिती मार्फत मंजूर केलेल्या कामगारांच्या वर्चस्वासंबंधीच्या आज्ञापत्राला दुजोरा देत आहे.
>
> "केंद्रीय कार्यकारी समिती आणि किसान काँग्रेसची संयुक्त बैठक आपला ठाम विश्वास व्यक्त करीत आहे की, कामगार, सैनिक आणि किसान यांचे ऐक्य, सर्व कामगारांचे आणि सर्व शोषितांचे हे ऐक्य, त्यांनी जिंकलेली सत्ता दृढ करील, इतर देशांमधील कामगारवर्गाच्या हाती लौकर सत्ता जावी यासाठी ती सर्व त्या उपाययोजना अंमलात आणील आणि अशा प्रकारे न्याय्य शांतता आणि समाजसत्तावादाची चिरंतन सिद्धी हस्तगत करण्याची हमी ती देईल..."

# जॉन रीड

यांची

# परिशिष्टे*

---

*जॉन रीड यांनी संकलित केलेली आणि अनुवादित केलेली ही परिशिष्टे या पुस्तकाची अत्यंत महत्त्वाची पुरवणी ठरली आहेत. मूळ रशियनशी ती ताडून पाहिली आहेत आणि काही बाबतीत जेथे ढोबळ चुकीचे अनुवाद झाले आहेत तेथे दुरुस्त्या केल्या आहेत.

# पहिल्या प्रकरणाचे परिशिष्ट

१

अबारोन्त्सी – "संरक्षक". सर्व "नेमस्त" समाजवादी गटांनी हे नांव घेतले होते किंवा त्यांना हे नांव देण्यात आले होते, कारण चालू असलेले युद्ध हे राष्ट्रीय संरक्षक युद्ध होते या सबबीवर, दोस्तांच्या पुढारीपणाखाली युद्ध पुढे चालू ठेवण्यास त्यांनी मान्यता दिली होती.

२

## क्रांतीपूर्वी आणि क्रांतीच्या दरम्यानची मजुरी व जीवनमान

मजुरीचे आणि जीवनमानाचे पुढील तक्ते मॉस्को वाणिज्य मंडळ आणि मजूर खात्याचा मॉस्को विभाग यांच्या संयुक्त समितीने १९१७ च्या ऑक्टोबरात तयार केले आणि २६ ऑक्टोबर १९१७ रोजी 'नोवाया झीझ्न'मध्ये प्रसिद्ध केले :

**रोजची मजुरी**

( रूबल आणि कोपेक )

| व्यवसाय | जुलै १९१४ | जुलै १९१६ | ऑगस्ट १९१७ |
|---|---|---|---|
| सुतार, लाकडी पेटचा बनवणारा | १.६०–२.० | ४.०–६.० | ८.५० |
| बेलदार. . . . . . . . . | १.३०–१.५० | ३.०–३.५० | – |
| गवंडी, गिलावा करणारा . . . | १.७०–२.३५ | ४.०–६.० | ८.० |
| रंगारी, गादीकाम करणारा . . | १.८०–२.२० | ३.०–५.५० | ८.० |
| लोहार . . . . . . . . | १.०–२.२५ | ४.०–५.० | ८.५० |
| चिमण्या साफ करणारा . . . | १.५०–२.० | ४.०–५.५० | ७.५० |
| कुलुपे बनवणारा . . . . . . | ०.९०–२.० | ३.५०–६.० | ९.० |
| मदतनीस . . . . . . . . . | १.०–१.५० | २.५०–४.५० | ८.० |

मार्च १९१७ च्या क्रांतीनंतर मजुरीमध्ये महाप्रचंड वाढी झाल्याच्या असंख्य वार्ता जरी पसरत होत्या, तरी सबंध रशियाभर नक्की परिस्थिती काय होती याचे दर्शन घडविणारे मजूर खात्याने प्रसिद्ध केलेले हे आकडे असे दाखवतात की, क्रांतीनंतर मजुरी ताबडतोब वाढली नाही, तर हळू हळू वाढली. सरासरी ५०० टक्क्यांहून थोडी अधिक वाढ मजुरीमध्ये झाली...

पण त्याचवेळी, रूबलचे मूल्य त्याच्या पूर्वीच्या क्रयशक्तीपेक्षा एक तृतीयांशाने खाली घसरले व जीवनावश्यक वस्तूंच्या किंमती भरमसाट वाढल्या.

पुढील तक्ता मॉस्कोतील नगरपालिकेच्या दूमाने बनविला आहे; पेत्रोग्रादपेक्षा मॉस्कोत खाद्य-वस्तू अधिक स्वस्त आणि अधिक विपुल होत्या:

**खाद्य-वस्तूंची किंमत**

(रूबल आणि कोपेक)

| | ऑगस्ट १९१४ | ऑगस्ट १९१७ | टक्के वाढ |
|---|---|---|---|
| काळा पाव (४१० ग्राम) . . . . | ०.०२ $\frac{१}{२}$ | ०.१२ | ३३० |
| पांढरा पाव . . . . . . . . . | ०.०५ | ०.२० | ३०० |
| गायीचे मांस . . . . . . . . . | ०.२२ | १.१० | ४०० |
| कोकराचे मांस . . . . . . . . | ०.२६ | २.१५ | ७२७ |
| डुकराचे मांस . . . . . . . . . | ०.२३ | २.० | ७७० |
| हेरिंग मासा . . . . . . . . . | ०.०६ | ०.५२ | ७६७ |
| चीज . . . . . . . . . . . | ०.४० | ३.५० | ७५४ |
| लोणी . . . . . . . . . . . | ०.४८ | ३.२० | ५५७ |
| अंडी (डझन) . . . . . . . . | ०.३० | १.६० | ४४३ |
| दूध (अर्धा लिटर) . . . . . | ०.०७ | ०.४० | ४७१ |

खाद्य-वस्तूंच्या किंमतींमध्ये सरासरी ५५६ टक्के वाढ झाली, किंवा मजुरीपेक्षा ५१ टक्के वाढ झाली.

इतर गरजेच्या वस्तूंच्या किंमती तर अफाट महागल्या.

पुढील तक्ता कामगार प्रतिनिधींच्या मॉस्को सोविएतने तयार केला होता आणि हंगामी सरकारच्या पुरवठा खात्याने तो बरोबर असल्याची मान्यता दिली होती.

**इतर आवश्यक वस्तूंच्या किंमती**

(रूबल आणि कोपेक)

| | ऑगस्ट १९१४ | ऑगस्ट १९१७ | टक्के वाढ |
|---|---|---|---|
| कॅलिको (आर्शिन) | ०.११ | १.४० | ११७३ |
| सुती कापड | ०.१५ | २.० | १२३३ |
| तयार कपडे | २.० | ४०.० | १९०० |
| जाडेभरडे लोकरी कापड | ६.० | ८०.० | १२३३ |
| पुरुषांचे बूट (जोडी) | १.२० | १४४.० | १०९७ |
| कातडी तळवा (७१.१२ सें.मी.) | २०.० | ४००.० | १९०० |
| रबरी बूट (जोडी) | २.५० | १५.० | ५०० |
| पुरुषांचे कपडे (सूट) | ४०.० | ४००-४५५ | ९००-११०९ |
| चहा (४१० ग्राम) | ४.५० | १८.० | ३०० |
| काडयापेटया (खोके) | ०.१० | ०.५० | ४०० |
| साबण (१६.३८ किलोग्राम) | ४.५० | ४०.० | ७८० |
| पेट्रोल (१० लिटर) | १.७० | ११.० | ५४७ |
| गोड गोळ्या (खाण्याच्या) (पूड) | ०.५० | १००.० | १०७६ |
| साखरेचा पाक (४१० ग्राम) | ०.३० | ४.५० | १४०० |
| सर्पण (मोळी) | १०.० | १२०.० | ११०० |
| लाकडी कोळसा | ०.८० | १३.० | १५२५ |
| किरकोळ धातूच्या वस्तू | १.० | २०.० | १९०० |

सरासरी, उपरीनिर्दिष्ट आवश्यक वस्तूंच्या किंमतींमध्ये सुमारे १९०९ टक्के वाढ झाली, पगारांमधील वाढीच्या दुप्पट वाढ झाली. अर्थातच हा फरक सट्टेबाजांच्या आणि व्यापाऱ्यांच्या खिशांमध्ये गेला.

१९१७ च्या सप्टेंबरात जेव्हा मी पेत्रोग्रादमध्ये आलो तेव्हा कुशल औद्योगिक कामगाराची रोजची मजुरी—उदाहरणार्थ, पुतिलोव कारखा-

न्यातल्या पोलाद कामगाराची मजुरी — सुमारे ८ रूबल होती. पण त्याच वेळी नफे अफाट होते... पेत्रोग्रादच्या वेशींबाहेर असलेल्या इंग्रजांच्या मालकीच्या थॉर्नटन वूलन मिल्सच्या एका मालकाने मला सांगितले की, त्याच्या गिरणीत मजुरीत ३०० टक्के वाढ झाली होती, तर त्याचे नफे ९०० **टक्क्यांनी** वाढले होते.

## ३

## समाजवादी मंत्री

जुलैमधील हंगामी सरकारच्या समाजवाद्यांनी आपला कार्यक्रम भांडवलदारी मंत्र्यांच्या सहकार्याने अंमलात आणण्यासाठी केलेल्या प्रयत्नांचा इतिहास, म्हणजे राजकारणातील वर्गलढ्याचे ज्वलंत उदाहरण आहे. या परिस्थितीचा खुलासा करताना लेनिन म्हणतात: "भांडवलदारांनी... सरकारचे स्थान डळमळीत आहे असे पाहून, कामगारवर्गाला गोंधळात टाकून, त्याच्यात दुही माजवून आणि अखेरीस त्याच्यावर मात करण्यासाठी, १८४८ पासून दशकानुदशके भांडवलदारांनी वापरात आणलेल्या पद्धतीचा अवलंब केला. ही पद्धत म्हणजे तथाकथित "संमिश्र मंत्रिमंडळ", भांडवलदार आणि समाजवादी छावणीतील फुटीर यांचे मिळून बनलेले.

"ज्या देशांमध्ये राजकीय स्वातंत्र्य आणि लोकशाही कामगारांच्या क्रांतिकारक चळवळीच्या जोडीने नांदत होत्या — उदा. इंग्लंड आणि फ्रान्स — तेथे भांडवलदारांनी या पळवाटेचा उपयोग केला व तो अत्यंत यशस्वीरीत्या केला. "समाजवादी" पुढारी जेव्हा मंत्रिमंडळांमध्ये दाखल होतात तेव्हा अटळपणे ते नामधारी, बाहुली बनतात, भांडवलदार त्यांचा केवळ आडोसा म्हणून वापर करतात, कामगारांना फसविण्यासाठी साधन म्हणून वापर करतात. रशियामधील "लोकशाहीवादी" आणि "प्रजासत्ताकवादी" भांडवलदारांनी नेमकी हीच युक्ती अंमलात आणली. समाजवादी-क्रांतिकारक आणि मेन्शेविक तिला बळी पडले व चेर्नोव, त्सेरेतेली, स्कोबेलियेव, अव्क्सेन्तियेव, साविन्कोव, झारूद्नी आणि निकितिन * यांच्या सहभागाने ६ मे रोजी, "संमिश्र" मंत्रिमंडळ हे एक साध्य सत्य बनले."

---

* मूळ रशियन मजकुरात फक्त चेर्नोव आणि त्सेरेतेली यांचाच उल्लेख आहे. — सं.

## ४

# सप्टेंबरातील मॉस्को नगरपालिकेच्या निवडणुका

१९१७च्या ऑक्टोबरच्या पहिल्या आठवड्यात, निवडणुकांच्या निकालांचा पुढील तुलनात्मक तक्ता 'नोवाया झीझ्न'ने प्रसिद्ध केला व याचा अर्थ म्हणजे मालमत्ताधारी वर्गाबरोबर सहयोग करण्याच्या धोरणाची दिवाळखोरी सिद्ध होत आहे, असे निर्देशित केले होते. "जर अजूनही यादवी युद्ध टाळायचे असेल, तर सर्व क्रांतिकारक लोकशाहीच्या संयुक्त आघाडीमार्फतच केवळ टाळता येईल."

**मॉस्कोतील केंद्रीय आणि**
**वॉर्ड दूमांच्या निवडणुका**

| | जून १९१७ | सप्टेंबर १९१७ |
|---|---|---|
| समाजवादी-क्रांतिकारक | ५८ सदस्य | १४ सदस्य |
| कॅडेट | १७ | ३० |
| मेन्शेविक | १२ | ४ |
| बोल्शेविक | ११ | ४७ |

## ५

# प्रतिगाम्यांचा वाढता उद्धटपणा

१८ सप्टेंबर. कीव्हमधील वर्तमानपत्रात लिहिणारे कॅडेट शूल्गिन म्हणाले की, रशिया हे प्रजासत्ताक आहे असे हंगामी सरकारने जाहीर निवेदन करणे म्हणजे आपल्या सत्तेचा धडधडीत दुरुपयोग करणे होय. "आम्ही प्रजासत्ताक मान्य करू शकत नाही, किंवा सध्याचे प्रजासत्ताकवादी सरकारही मान्य करू शकत नाही... आणि आम्हाला रशियामध्ये प्रजासत्ताक हवे किंवा नको याबाबत आमची अजून निश्चिती नाही."

२३ ऑक्टोबर. न्याझान येथे कॅडेट पक्षाची एक सभा भरली होती. दुखोनिन म्हणाले, "मार्चच्या पहिल्या तारखेच्या दरम्यान आपण घटनात्मक

राजसत्ता स्थापन केली पाहिजे. सिंहासनाच्या कायदेशीर वारसाला, मिखाईल अलेक्सांद्रोविच यांना, आपण नाकारून चालणार नाही..."

२७ ऑक्टोबर. मॉस्कोतील उद्योगपतींच्या परिषदेने एक ठराव मंजूर केला : *

"ही परिषद... आग्रह धरीत आहे की, हंगामी सरकारने सैन्यामध्ये पुढील उपाययोजना ताबडतोब अंमलात आणाव्या :

"१. सर्व राजकीय प्रचाराला मनाई; सैन्य राजकारणापासून दूर ठेवले पाहिजे.

"२. सरकारविरोधी आणि राष्ट्रविरोधी विचारांच्या प्रचाराला आणि त्याचप्रमाणे खुद्द सैन्याच्या आणि लष्करी शिस्तीच्या अस्तित्वाच्या आवश्यकतेला नकार देण्याच्या शिकवणुकीला आळा घालावा आणि असा प्रचार करणाऱ्या लोकांविरुद्ध कारवाई करावी.

"३. सेना समित्यांचे कार्य फक्त आर्थिक प्रश्नांपुरते मर्यादित ठेवावे. त्यांच्या सर्व निर्णयांना त्यांच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांकडून मान्यता मिळणे आवश्यक आहे आणि कोणत्याही वेळी या समित्या बरखास्त करण्याचा त्यांना अधिकार आहे.

"४. सलाम करण्याची प्रथा पुन्हा सुरू करावी आणि ती अत्यावश्यक ठरवावी. अधिकाऱ्यांच्या हाती, शिक्षेच्या फेरविचाराच्या अधिकारासह सर्व शासनाधिकार पुर्णतया पुन्हा दिले जावेत.

"५. अवज्ञा करण्याचे शिक्षण देणाऱ्या सैनिकसमूहांच्या चळवळीत भाग घेऊन कोअरला लांच्छन आणणाऱ्या अधिकाऱ्यांची कोअरमधून हकालपट्टी करावी. त्यासाठी प्रतिष्ठा न्यायालयांची पुनःस्थापना करावी.

"६. समित्यांच्या प्रभावाखाली आणि इतर बेजबाबदार संघटनांच्या प्रभावाखाली अन्यायाने बडतर्फ केलेल्या सेनापतींना आणि इतर अधिकाऱ्यांना सैन्यात परत येता यावे अशा दृष्टीने, हंगामी सरकारने आवश्यक ते उपाय योजावेत."

---

*पुढील कलमे रीड यांनी खूपच त्रोटक दिली आहेत आणि त्यांचा अनुवाद फारसा बरोबर केलेला नाही. शिवाय हा ठराव उद्योगपतींच्या परिषदेने नव्हे, तर सार्वजनिक कार्यकर्त्यांच्या परिषदेने संमत केला होता.— सं.

# दुसऱ्या प्रकरणाचे परिशिष्ट

## १

कोर्निलोव बंडाबाबत मी माझ्या आगामी पुस्तकात, 'कोर्निलोव ते ब्रेस्त-लितोव्स्क'मध्ये तपशीलवार लिहिले आहे. कोर्निलोव यांनी बंडाचा प्रयत्न करण्यास अनुकूल अशी परिस्थिती उद्‌भवण्यास केरेन्स्की जबाबदार ठरले, हे आता स्पष्टपणे सिद्ध झाले आहे. केरेन्स्कींचे अनेक तरफदार म्हणतात की, त्यांना कोर्निलोव यांच्या योजना आधी माहीत झाल्या होत्या, युक्ती करून ठरल्या वेळेआधीच त्यांनी त्याला बाहेर काढले आणि नंतर त्याचा निःपात केला. श्री. सॅक हेसुद्धा 'रशियन लोकशाहीचा जन्म' या आपल्या पुस्तकात म्हणतात :

> "अनेक गोष्टी... जवळ जवळ नक्की आहेत. पहिली म्हणजे आघाडीकडून पेत्रोग्रादकडे अनेक तुकड्या चालल्या होत्या याची केरेन्स्कींना माहिती होती व शक्यता आहे की, पंतप्रधान आणि युद्धमंत्री या नात्याने, बोल्शेविक धोक्याची चाहूल लागून, त्यांनीच त्या तुकड्यांना बोलावले असावे..."

त्या युक्तिवादामधील एकमेव दोष म्हणजे त्या वेळी कोणताही "बोल्शेविक धोका" अस्तित्वात नव्हता, कारण अद्याप सोविएतांमध्ये बोल्शेविक सत्ताहीन अल्पसंख्य होते आणि त्यांचे पुढारी तुरुंगात किंवा भूमिगत होते.

## २

## लोकशाही परिषद

केरेन्स्की यांच्यापुढे जेव्हा लोकशाही परिषद भरविण्याचा प्रस्ताव प्रथम मांडण्यात आला, तेव्हा राष्ट्रामधील सर्व घटकांचा – त्यांच्या भाषेत म्हणजे "जिवंत शक्तींचा"–मेळावा बोलवावा व त्यामध्ये बँकर, कारखानदार, जमीनदार आणि कॅडेट पक्षाचे प्रतिनिधी यांचाही समावेश

असावा, असे त्यांनी सुचविले. सोविएतने नकार दिला आणि प्रतिनिधित्वाचा पुढील तक्ता आखून दिला, ज्याला केरेन्स्कींनी मान्यता दिली :

| | |
|---|---|
| १०० प्रतिनिधी | कामगार आणि सैनिक प्रतिनिधींचे अखिल रशियन सोविएत |
| १०० | किसान प्रतिनिधींचे अखिल रशियन सोविएत |
| ५० | कामगार आणि सैनिक प्रतिनिधींची प्रांतिक सोविएते |
| ५० | किसानांच्या विभागीय भूमी समित्या |
| १०० | ट्रेड युनियना |
| ८४ | आघाडीवरच्या सेना समित्या |
| १५० | कामगार आणि किसान सहकारी संस्था |
| २० | रेल्वे कामगार युनियन |
| १० | टपाल आणि तार कामगार युनियन |
| २० | व्यापारी कारकून |
| १५ | स्वतंत्र व्यवसाय – डॉक्टर, वकील, पत्रकार, इ. |
| ५० | प्रांतिक झेम्स्त्वो |
| ५९ | राष्ट्रवादी संघटना – पोलिश, युक्रेनी, इ. |

या प्रमाणामध्ये दोन किंवा तीन वेळा बदल करण्यात आले. प्रतिनिधींचे अंतिम प्रमाण पुढीलप्रमाणे होते :

| | |
|---|---|
| ३०० प्रतिनिधी | कामगार, सैनिक आणि किसान प्रतिनिधींची अखिल रशियन सोविएते |
| ३०० | सहकारी संस्था |
| ३०० | नगरपालिका |
| १५० | आघाडीवरील सेना समित्या |
| १५० | प्रांतिक झेम्स्त्वो |
| २०० | ट्रेड युनियना |
| १०० | राष्ट्रवादी संघटना |
| २०० | अनेक छोटे गट |

# ३

## सोविएतांचे कार्य संपले

२८ सप्टेंबर १९१७ रोजी, केंद्रीय कार्यकारी समितीचे मुखपत्र 'इझ्वेस्तिया'मध्ये एक लेख प्रकाशित झाला; त्यात गेल्या हंगामी मंत्रि-मंडळाबाबत म्हटले आहे:

"अखेरीस एकदाचे, रशियन जनतेच्या सर्व वर्गांच्या इच्छेमधून जन्माला आलेले खरेखुरे लोकशाहीवादी सरकार स्थापन झाले आहे, भावी स्वतंत्र संसदीय राजवटीचा पहिला कच्चा ढाचा तयार झाला आहे. आपल्यापुढे आता घटनात्मक सभेचे अधिवेशन आहे, त्यात मूलभूत कायद्यांचे सर्व प्रश्न सोडवले जातील आणि त्या कायद्यांची घडण जास्तीत जास्त लोकशाहीवादी असेल. सोविएतांचे कार्य आता संपत आले आहे आणि स्वतंत्र व विजयी जनतेच्या रंगमंचावरून इतर सर्व क्रांतिकारक यंत्रणेबरोबरच त्यांनीही निघून जाण्याची वेळ येऊन ठेपली आहे; यापुढे राजकीय कृतीसाठी ह्या जनतेची अस्त्रे शांतता-वादी असतील."

२५ ऑक्टोबरच्या 'इझ्वेस्तिया'मधील अग्रलेखाचे शीर्षक होते, 'सो-विएत संघटनांमधील अरिष्ट'. त्याच्या आरंभी म्हटले होते की, सर्वत्र स्थानिक सोविएतांच्या कार्यामध्ये ढिलाई आल्याचे प्रवासी सांगत आहेत.

"असे होणे अगदी स्वाभाविक आहे," लेखकाने म्हटले होते. "कारण अधिक कायम स्वरूपाच्या वैधानिक संस्थांमध्ये—नगरपा-लिकेच्या दूमा व झेम्स्त्वो यांच्यामध्ये—लोकांना स्वारस्य वाटू लागले आहे...

"पेत्रोग्राद आणि मॉस्को येथील महत्त्वाच्या केंद्रांमध्ये, जेथे सो-विएतांचे सर्वोत्तम संघटन होते, तेथे सर्व लोकशाहीवादी घटकांना प्रवेश देण्यात आला नाही... बहुसंख्य प्रज्ञावंतांनी त्यांच्या कार्यात

भाग घेतला नाही, तसेच कामगारांनीसुद्धा, काही कामगार राजकीय-दृष्ट्या मागासलेले होते म्हणून, तर इतरांना आपल्या युनियनांचे अधिक आकर्षण होते म्हणून. या संघटना जनतेशी भक्कमपणे एकरूप झालेल्या आहेत आणि जनतेच्या दैनंदिन गरजा त्या अधिक चांगल्या रीतीने पुऱ्या करीत आहेत, हे आम्ही नाकारू शकत नाही...

"स्थानिक लोकशाहीवादी शासनकारभार अत्यंत जोमदारपणे संघटित होत आहेत हे अत्यंत महत्त्वाचे आहे. नगर दूमा सार्वत्रिक मतदानामार्फत निवडलेल्या आहेत आणि विशुद्ध स्थानिक बाबींमध्ये त्यांना सोविएतांपेक्षा अधिक अधिकार आहेत. यात कुणाही लोकशाहीवाद्याला काहीही वावगे दिसणार नाही. नगरपालिकांच्या निवडणुका सोविएतांच्या निवडणुकांपेक्षा अधिक चांगल्या आणि अधिक लोकशाही मार्गाने आयोजित होत आहेत... नगरपालिकांमध्ये सर्व वर्गांचे प्रतिनिधी आहेत... आणि ज्याक्षणी स्थानिक स्वराज्यसंस्था नगरपालिकांच्या जीवनाच्या संघटनाला आरंभ करतील, त्याक्षणी स्थानिक सोविएतांचे कार्य साहजिकच संपेल.

"...सोविएतांबाबतचे स्वारस्य कमी होण्याची दोन कारणे आहेत. पहिले कारण आम्ही असे सांगू शकू की, जनतेमध्ये राजकारणाबाबतचे स्वारस्य कमी झाले आहे, आणि दुसरे कारण, नव्या रशियाच्या उभारणीसाठी शासकीय संस्थांमध्ये वाढते प्रयत्न... दुसऱ्या दिशेने ही प्रवृत्ती जेवढी वाढेल, तेवढ्या लौकर सोविएतांचे महत्त्व विरून जाईल...

"आम्ही आमच्या संघटनेला स्वतःच मुठमाती देणारे आहोत असे म्हटले जाते. प्रत्यक्षात, नव्या रशियाच्या उभारणीत काम करणारे आम्ही स्वतः अत्यंत श्रमिक कामगार आहोत जेव्हा एकतंत्री राजसत्ता आणि सबंध नोकरशाही राजवट कोसळून पडली, तेव्हा सर्व लोकशाहीला तात्पुरता आसरा लाभावा म्हणून आम्ही बराकींप्रमाणे सोविएते स्थापन केली. आता बराकींऐवजी आम्ही नव्या पद्धतीची कायम स्वरूपाची गगनचुंबी इमारत उभारीत आहोत आणि साहजिकच अधिक आरामशीर गाळ्यांमध्ये राहण्यासाठी लोक बराकींना हळूहळू सोडून जातील."

## ४

# रशियन प्रजासत्ताक मंडळामधील ट्रॉट्स्कींचे भाषण *

"कोर्निलोवची जोपासना करणाऱ्या बेजबाबदार वैयक्तिक स्वरूपाच्या सरकारला नाहीसे करणे आणि युद्ध संपवायला व नियोजित वेळी घटनात्मक सभेचे अधिवेशन बोलावण्यास समर्थ असलेल्या जबाबदार सरकारची स्थापना करणे, या हेतूने केंद्रीय कार्यकारी समितीने लोकशाही परिषद बोलावली होती.

"दरम्यान, लोकशाही परिषदेच्या माघारी चलाखी केल्यामुळे, श्री. केरेन्स्की आणि कॅडेट व मेन्शेविक आणि समाजवादी-क्रांतिकारक पक्षांचे पुढारी यांच्यामध्ये करारमदार झाल्यामुळे अधिकृतरीत्या जाहीर केलेल्या हेतूच्या नेमकी उलटी फलनिष्पत्ती आमच्या हाती आली.

"एक अशी सत्ता निर्माण करण्यात आली आहे की, जिच्याभोवती व जिच्यामध्ये, उघड आणि छुपे कोर्निलोव महत्त्वाच्या भूमिका बजावीत आहेत.

"रशियन प्रजासत्ताक मंडळ ही वैधानिक संस्था न राहता सल्लागार म्हणून राहील असे जाहीर करण्यात आले, तेव्हाच सरकारचा बेजबाबदारपणा अधिकृतरीत्या जाहीर झाला आहे. क्रांतीच्या आठव्या महिन्यात, बुलीगिन दूमाच्या या नव्या आवृत्तीच्या रूपाने, बेजबाबदार सरकार स्वतःसाठी एक आडोसा निर्माण करीत आहे.

"सबंध देशभरच्या निवडणुका पाहता असे स्पष्टपणे दिसते की, ज्या प्रमाणात या हंगामी मंडळात मालमत्ताधारी वर्ग घुसले आहेत, त्यांपैकी अनेकांना इथे येण्याचा काहीएक अधिकार नाही.

जो कालपर्यंत श्री. रोद्ज्यान्को यांच्या दूमावर हंगामी सरकारच्या अवलंबित्वाचा हट्ट धरून बसला होता त्याच कॅडेट पक्षाने प्रजासत्ताकाच्या सोविएतच्या परावलंबित्वामधून हंगामी सरकारची मुक्तता केली आहे.

या मंडळापेक्षा, घटनात्मक सभेमध्ये मालमत्ताधारी वर्गांना निःसंशयरी-

---

* हे ट्रॉट्स्कींचे भाषण नव्हे, तर २० ऑक्टोबर १९१७ रोजी, प्रजासत्ताक मंडळात, बोल्शेविक गटातर्फे ट्रॉट्स्की यांनी वाचून दाखवलेले जाहीर निवेदन आहे. — सं.

त्या कमी अनुकूल स्थान असेल आणि घटनात्मक सभेशी बेजबाबदार राहणे त्यांना शक्य होणार नाही...

"आतापासून सहा आठवड्यांच्या अवधीवर असलेल्या घटनात्मक सभेच्या अधिवेशनासाठी जर मालमत्ताधारी वर्ग खरोखरीच सज्ज होत असले, तर या क्षणाला सरकारच्या बेजबाबदारपणाचे समर्थन करण्याचे काही कारण नव्हते. मूळ सत्य असे की, हंगामी सरकारच्या धोरणांचे सूत्रचालन करणाऱ्या भांडवलदारवर्गाचे उद्दिष्ट आहे घटनात्मक सभा **मोडण्याचे**. आमच्या सबंध राष्ट्रीय धोरणावर – परराष्ट्रीय आणि अंतर्गत वर्चस्व ठेवणाऱ्या मालमत्ताधारी वर्गांचा सध्या हा मुख्य हेतू आहे.

"औद्योगिक, शेतकी आणि पुरवठा खात्यांमध्ये, सरकारबरोबर काम करणाऱ्या मालमत्ताधारी वर्गांच्या राजकारणामुळे, युद्धाने निर्माण झालेल्या स्वाभाविक गोंधळात अधिकच भर पडत आहे. मालमत्ताधारी वर्ग किसानांच्या बंडाला चिथावणी देत आहेत! मालमत्ताधारी वर्ग यादवी युद्धाला भडकावीत आहेत, देशाला उघड उघड दुष्काळाच्या खाईकडे लोटत आहेत व अशा रीतीने क्रांतीला उलथून टाकून, घटनात्मक सभेचा निकाल लावण्याचा त्यांचा मनसुबा आहे!

"भांडवलदारांचे आणि त्यांच्या सरकारचे आंतरराष्ट्रीय धोरणही तेवढेच भयानक गुन्हेगारी स्वरूपाचे आहे.

"चाळीस महिन्यांच्या लढाईनंतर, राजधानी मृत्युसंकटात सापडली आहे. त्याला उत्तर म्हणून सरकार मॉस्कोला हलविण्याची योजना निर्माण झाली आहे. राजधानी सोडून जाण्याची कल्पना भांडवलदारवर्गाचा संताप जागा करीत नाही. त्याउलट घडत आहे. प्रतिक्रांतिकारक कटाला उत्तेजना देण्याच्या सार्वत्रिक योजनेचा एक स्वाभाविक भाग म्हणून तिचा स्वीकार झाला...

"शांतता तह करण्यात देशाचे रक्षण सामावले आहे हे जाणून न घेता; मुत्सद्द्यांना आणि साम्राज्यवाद्यांना डावलून सर्व दुःखजर्जर जनतेसमोर तात्काळ शांतता तह करण्याची कल्पना उघडपणे मांडून युद्ध पुढे चालू ठेवणे पूर्णतया अशक्य करून न टाकता – कॅडेट, प्रतिक्रांतिकारक व दोस्त सत्तांचे साम्राज्यवादी यांच्या हुकुमानुसार, कोणत्याही सुजाणतेविना, हेतूविना आणि योजनेविना, हे खुनी युद्ध हंगामी सरकार पुढे फरफटत नेत आहे, लक्षावधी नव्या सैनिकांना आणि खलाशांना मृत्युमुखी धाडीत आहे व क्रांतीचा सर्वनाश करण्यासाठी पेत्रोग्राद सोडून जाण्याची तयारी करीत

आहे. इतरांच्या चुकांमुळे आणि अपराधांमुळे इतर सैनिक आणि खलाशां-बरोबर बोल्शेविक सैनिक व खलाशी मरत असताना, तथाकथित सरसेनापती (केरेन्स्की) बोल्शेविक वर्तमानपत्रांना दाबून टाकण्याचे धोरण पुढे चालू ठेवीत आहेत.

"या धोरणांवर पांघरूण घालण्याचे काम, मंडळातील मुख्य पक्ष मोठ्या स्वेच्छेने करीत आहेत.

"आम्ही, सामाजिक-लोकशाहीवादी बोल्शेविकांचा गट जाहीर करतो की, जनतेशी द्रोह करणाऱ्या या सरकारबरोबर, आमचा काही एक संबंध नाही.* अधिकाऱ्यांच्या पडद्यांआड कृष्णकृत्ये करणाऱ्या या जनतेच्या खुन्यांच्या कार्याशी आमचे काडीमात्र साम्य नाही. या कामावर प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षरीत्या एक दिवसही पांघरूण घालण्याची आमची तयारी नाही.

"विल्हेल्मच्या फौजांचा पेत्रोग्रादला धोका निर्माण झाला आहे अशा क्षणी, केरेन्स्की आणि कोर्निलोव पेत्रोग्रादमधून पळून जाण्याची व मॉस्कोला प्रतिक्रांतीचा अड्डा बनविण्याची तयारी करीत आहेत!

"मॉस्कोतल्या कामगारांनी आणि सैनिकांनी सावध रहावे असा आम्ही इशारा देतो.

"या मंडळामधून बाहेर पडून आम्ही अखिल रशियामधल्या कामगारांच्या, किसानांच्या आणि सैनिकांच्या विरतेला व शहाणपणाला आवाहन करीत आहोत.

"पेत्रोग्राद संकटात आहे! क्रांती संकटात आहे!

"सरकारने संकट वाढवले आहे—सत्ताधारी वर्ग ते तीव्र करीत आहेत.

"केवळ जनताच आता स्वतःचे आणि देशाचे रक्षण करू शकेल.

"आम्ही जनतेला आवाहन करतो. ताबडतोबीचा, प्रामाणिक, लोकशाहीवादी शांतता तह चिरायू होवो!

"सर्व सत्ता सोविएतांच्या हाती!

"सर्व भूमी जनतेच्या हाती!

"घटनात्मक सभा चिरायू होवो!"

---

*इथे जॉन रीड पुढील शब्द गाळतात: "प्रतिक्रांतिकारकतेकडे बुद्धयाच डोळेझाक करणाऱ्या या मंडळाशी..."—सं.

५

# स्कोबेलियेव यांना "आदेश"

( सारांश )

( केंद्रीय कार्यकारी समितीतर्फे संमत झालेला आणि पॅरिस परिषदेतील रशियन क्रांतिकारक लोकशाहीचे प्रतिनिधी स्कोबेलियेव यांना आदेश म्हणून दिलेला. )

शांतता करार पुढील तत्त्वावर आधारीत असावा: "खालसाकरणे करू नयेत, नुकसानभरपाई देण्यात येऊ नये, जनतेला स्वयंनिर्णयाचा हक्क असावा." *

**प्रादेशिक समस्या**

(१) आक्रमण झालेल्या रशियामधून जर्मन फौजा काढून घेण्यात याव्यात. पोलंड, लिथुआनिया आणि लात्विया यांना स्वयंनिर्णयाचा पूर्ण हक्क.

(२) तुर्की आर्मेनियाला स्वायत्तता द्यावी आणि स्थानिक सरकारे स्थापन होताच नंतर संपूर्ण स्वयंनिर्णयाचा हक्क.

(३) सर्व परकी फौजा काढून घेतल्यानंतर, सार्वमताद्वारे एल्सेस-लॉरेंचा प्रश्न सोडवावा.

(४) बेल्जियमची पुन:स्थापना करावी. आंतरराष्ट्रीय निधींमधून त्याच्या नुकसानींची भरपाई करावी.

(५) सेर्बिया आणि मॉन्तेनेग्रो यांची पुन:स्थापना करावी आणि आंतरराष्ट्रीय मदत निधीमधून त्यांना साहाय्य करावे. सेर्बियाला एड्रियाटिक सागरामधून बाहेर जाण्याचा मार्ग खुला करावा. बोस्निया आणि हेर्झेगोविना स्वायत्त करावीत.

---

* या ठिकाणी जॉन रीडनी पुढील शब्द गाळले आहेत: "युद्धाच्या हेतूंबाबतच्या संबंधात नवा करार सार्वजनिकरीत्या जाहीर केला पाहिजे." — सं.

(६) बाल्कनमधील वादग्रस्त प्रांतांना हंगामी स्वायत्तता आणि नंतर सार्वमताने निर्णय.

(७) रूमानिया पुन:स्थापित करावा, पण दोब्रूजाला संपूर्ण स्वयंनिर्णयाचा हक्क द्यायला त्याला भाग पाडावे... ज्यू लोकांसंबंधीची बर्लिन करारामधील कलमे अंमलात आणण्यास आणि त्यांना रूमानियाचे नागरिक म्हणून मान्यता देण्यास रूमानियाला भाग पाडावे.

(८) ऑस्ट्रियामधील इतालिया इरीदेन्ताला हंगामी स्वायत्तता व त्यानंतर कोणत्या राज्यपद्धतीचा स्वीकार करावा यासाठी सार्वमताने निर्णय.

(९) जर्मन वसाहती परत द्याव्यात.

(१०) ग्रीस आणि पर्शिया यांची पुन:स्थापना करावी.

## सागरी स्वातंत्र्य

अंतर्गत सागरांमध्ये खुल्या होणाऱ्या सर्व सामुद्रधुनी, तसेच सुएज व पनामा कालवे तटस्थ ठरवावेत. व्यापारी जलवाहतूक मुक्त असावी. खाजगी लढाऊ जहाजे बाळगण्याचा हक्क नष्ट करावा. व्यापारी जहाजांना सुरुंग लावून बुडविण्यास मनाई करावी.

## नुकसानभरपाई

लढणाऱ्या सर्वांनी कोणत्याही प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष नुकसानभरपाईंची मागणी करू नये — उदा. कैद्यांच्या निर्वाहाचा खर्च. युद्धाच्या दरम्यान वसूल केलेल्या नुकसानभरपाईंना आणि युद्ध-करांना परत दिले पाहिजे.

## आर्थिक अटी

शांतता करारात व्यापारी करारांचा समावेश करू नये. व्यापारी संबंधांबाबत प्रत्येक देश स्वतंत्र असावा आणि शांतता तहामुळे आर्थिक करार करण्याचे त्याच्यावर बंधन पडू नये, किंवा त्याला मनाई होऊ नये. तरीही, सर्व राष्ट्रांनी शांतता कराराद्वारे स्वत:ला बंधन घालून घ्यावे की, युद्धानंतर आर्थिक कोंडी करावयाची नाही, किंवा अलगपणे जकातींच्या निरखनाम्यांचे करार करावयाचे नाहीत. खास अनुग्रहप्राप्त राष्ट्र बनण्याचा अधिकार कोणताही भेद न करता सर्व देशांना देण्यात यावा.

## शांततेच्या हमी

प्रत्येक देशाच्या राष्ट्रीय प्रातिनिधिक संस्थांना निवडलेल्या प्रतिनिधीं-मार्फत शांतता परिषदेमध्ये शांतता तह करावयाचा आहे. या संसदांनी शांततेच्या अटी पक्क्या करावयाच्या आहेत.

गुप्त राजनीतीचा नाश करावा; कोणतेही गुप्त करार न करण्याचे सर्व पक्षांनी स्वतःवर बंधन घालून घ्यावे. असे करार आंतरराष्ट्रीय कायद्यानुसार विरोधी व पोकळ ठरतात. भिन्न देशांच्या संसदांनी मान्यता देईपर्यंत सर्व करार गैरलागू ठरविण्यात येतील.

भूमीवर आणि सागरावर हळूहळू निःशस्त्रीकरणाची अंमलबजावणी व रक्षक पद्धतीची स्थापना.

अध्यक्ष विल्सन यांनी मांडलेली "राष्ट्रसंघा"ची कल्पना आंतरराष्ट्रीय कायदा म्हणून बहुमोल ठरू शकेल. पण त्यासाठी पुढील गोष्टी अंमलात आणाव्या: (अ) सर्व राष्ट्रांनी समान हक्कांसहित त्यात सहभागी झाले पाहिजे, आणि (ब) आंतरराष्ट्रीय राजकारणांचे लोकशाहीकरण केले पाहिजे.

## शांततेचे मार्ग

बळजबरीने विलीनीकरण करण्याच्या सर्व मार्गांचा त्याग करायला शत्रू राष्ट्रांनी मान्यता देताच, आपण शांततेच्या वाटाघाटी सुरू करायला तयार आहोत असे दोस्त राष्ट्रांनी तात्काळ जाहीर करावे.

सर्व तटस्थ देशांच्या प्रतिनिधींच्या सहभागाने भरलेल्या सार्वत्रिक शांतता परिषदेव्यतिरिक्त, इतरत्र कोठेही, कोणत्याही प्रकारच्या शांतता वाटाघाटी सुरू न करण्याचे, कोणतेही शांतता करार न करण्याचे, दोस्त राष्ट्रांनी स्वतःवर बंधन घालून घेतले पाहिजे.

स्टॉकहोम समाजवादी परिषदेमधील सर्व अडथळे बाजूला करावेत आणि ज्या पक्षांना व संघटनांना तिच्यामध्ये सहभागी व्हायची इच्छा आहे त्या सर्वांच्या प्रतिनिधींना ताबडतोब पासपोर्ट द्यावेत.

(किसान सोविएतांच्या कार्यकारी समितीनेही आदेश प्रसृत केला. तो उपरोक्त आदेशापेक्षा फारसा वेगळा नाही.)

६

## रशियाचा बळी देऊन शांतता

ऑस्ट्रियाने फ्रान्सपुढे सादर केलेल्या शांततेच्या तहाचा रिबो * यांच्याकडून रहस्यस्फोट; १९१७ च्या उन्हाळयात, स्वित्झर्लंडमधील बर्न येथे भरलेल्या तथाकथित "शांतता परिषदेत" सर्व युद्धमान राष्ट्रांच्या प्रतिनिधींनी भाग घेतला होता व ते या सर्व देशांच्या प्रचंड आर्थिक हितसंबंधांचे प्रतिनिधित्व करीत होते; एका इंग्लिश एजंटाने बल्गेरियामधील चर्चच्या अधिकाऱ्यांशी वाटाघाटी करण्याचा प्रयत्न केला होता; या सर्व घटना एक वस्तुस्थिती निर्देशित करीत होत्या की, रशियाचा बळी देऊन, शांतता करार करायला दोन्ही बाजू अनुकूल होत्या. 'कोर्निलोव ते ब्रेस्त-लितोव्स्क' या माझ्या आगामी पुस्तकात, या विषयाचा प्रदीर्घ परामर्श घेण्याचा व पेत्रोग्रादमध्ये परराष्ट्र खात्याच्या कचेरीत सापडलेले अनेक गुप्त दस्तऐवज प्रसिद्ध करण्याचा माझा मानस आहे.

७

## फ्रान्समधील रशियन सैनिक

हंगामी सरकारचा अधिकृत अहवाल. **

"रशियन क्रांतीची बातमी पॅरिसला पोचल्याच्या क्षणापासून, अतिरेकी प्रवृत्तींची रशियन वर्तमानपत्रे तात्काळ तेथून प्रसिद्ध होऊ लागली; या वर्तमानपत्रांचा सैनिकांमध्ये मुक्त प्रसार होऊ लागला, तसेच अनेक व्यक्ती सैनिकांमधून फिरत बोल्शेविक प्रचार करू लागल्या, अनेकदा फ्रेंच

---

* रिबो, अलेक्सांदर फेलिक्स जोसेफ – एक फ्रेंच राजकीय पुढारी. १९१७ मध्ये फ्रान्सचे पंतप्रधान. – सं.

** या निवेदनाचा अनुवाद जॉन रीड यांनी थोडासा संक्षिप्त आणि मूळ मजकुरात बदल करून केला आहे. – सं.

नियतकालिकांमधून छापल्या जाणाऱ्या चुकीच्या बातम्या पसरवू लागल्या. अधिकृत बातम्यांच्या व अचूक तपशीलांच्या अभावी, या प्रचार मोहिमेमुळे सैनिकांमध्ये असंतोष भडकला. परिणामी सैनिक रशियाला परत जाण्याची इच्छा करू लागले व आपल्या अधिकाऱ्यांकडे तिरस्काराने पाहू लागले.

"अखेरीस या सर्व गोष्टींचे बंडात पर्यवसान झाले. सैनिकांच्या एका सभेत कवायत करण्याला नकार देण्याचे आवाहन देण्यात आले, कारण इत:पर लढायचे नाही असा त्यांनी निर्णय घेतला होता. बंडखोरांना एकाकी पाडण्याचे ठरविण्यात आले व हंगामी सरकारशी एकनिष्ठ असलेल्या सर्व सैनिकांनी कोर्टिन येथील छावणी सोडून, सोबत सर्व दारूगोळा घेऊन निघावे, असा सेनापती झानकेविच यांनी हुकूम दिला. २५ जूनला या हुकुमाची अंमलबजावणी झाली; हंगामी सरकारला आपण "सशर्त" आधीन होऊ, असे म्हणणारे सैनिक तेवढे तेथे उरले. रशियन सेनांचे विदेशांमधील सरसेनापती, युद्ध खात्याचे कमिस्सार राप्प, आपला प्रभाव पाडू इच्छिणारे अनेक मान्यवर माजी हद्दपार, या सर्वांनी कोर्टिन येथील छावणीमधील सैनिकांना अनेकवेळा भेटी दिल्या होत्या; पण हे सर्व प्रयत्न फोल ठरले आणि अखेरीस कमिस्सार राप्प यांनी आग्रह धरला की, बंडखोरांनी आपली शस्त्रे खाली ठेवावी व आधीनता व्यक्त करण्यासाठी क्लोरावो नांवाच्या स्थळापर्यंत व्यवस्थित संचलन करीत जावे. हा हुकूम फक्त अंशत: पाळला गेला; पहिल्या ५०० बाहेर गेलेल्यांपैकी २२ जणांना अटक करण्यात आली; २४ तासांनंतर सुमारे ६००० बाहेर पडले... सुमारे २००० उरले...

"दबाव वाढविण्याचे ठरवण्यात आले; त्यांचा शिधा कमी करण्यात आला, पगारात कपात करण्यात आली, कोर्टिन खेड्याकडे जाणाऱ्या रस्त्यांवर फ्रेंच सैनिकांचा पहारा बसवण्यात आला. फ्रान्समधून एक रशियन तोफखाना ब्रिगेड जाणार आहे अशी बातमी मिळताच, बंडखोरांची संख्या कमी करण्यासाठी, पायदळ आणि तोफखान्याची संमिश्र तुकडी बनविण्याचा सेनापती झानकेविचनी निर्णय घेतला. बंडखोरांकडे एक प्रतिनिधीमंडळ पाठवण्यात आले; वाटाघाटी व्यर्थ आहेत अशी खात्री पटल्यानंतर ते प्रतिनिधीमंडळ अनेक तासांनंतर परत आले. सप्टेंबरच्या १ तारखेला सेनापती झानकेविच यांनी बंडखोरांना निर्वाणीचा निरोप धाडला की, त्यांनी शस्त्रे खाली ठेवावी आणि जर ३ सप्टेंबरला १० वाजेपर्यंत बंडखोरांनी

शस्त्रे खाली ठेवली नाही, तर त्यांच्यावर तोफखान्याचा मारा केला जाईल, अशी धमकी घातली.

"हुकूम पाळला गेला नाही म्हणून नियोजित वेळेला स्थळावर तोफांचा हलकासा भडिमार करण्यात आला. अठरा तोफगोळे डागण्यात आले आणि बंडखोरांना इशारा देण्यात आला की, भडिमार अधिक तीव्र केला जाईल. ३ सप्टेंबरच्या रात्री १६० लोक शरण आले. ४ सप्टेंबरला पुन्हा तोफखाना आग ओकू लागला व ११ वाजता, ३६ तोफगोळे डागल्यानंतर, बंडखोरांनी दोन पांढरी निशाणे उभारली व शस्त्रांशिवाय छावणी सोडायला आरंभ केला. संध्याकाळपर्यंत ८३०० लोक शरण आले. छावणीत राहिलेल्या १५० लोकांनी त्या रात्री मशिनगनचा भडिमार केला. या प्रकरणाचा अंत करण्यासाठी ५ सप्टेंबरला छावणीवर तोफांची जबरदस्त सरबत्ती करण्यात आली व आमच्या सैनिकांनी हळू हळू ती काबीज केली. बंडखोरांनी मशिनगनची मारगिरी तडाखेबंद चालू ठेवली. ६ सप्टेंबरला, ९ वाजता, छावणी संपूर्ण काबीज करण्यात आली... बंडखोरांचे नि:शस्त्रीकरण केल्यानंतर, ८१ अटका करण्यात आल्या..."

असा हा अहवाल. पण परराष्ट्र खात्यामध्ये सापडलेल्या गुप्त दस्तऐवजांवरून आम्हाला माहीत झाले आहे की, हा तपशील अगदी काटेकोर अचूक नाही. पहिली गडबड उद्भवली जेव्हा रशियातील आपल्या कॉम्रेडांप्रमाणे तेथील सैनिकांनी समित्या स्थापन करायचा प्रयत्न केला. आपल्याला रशियाला परत पाठवावे अशी त्यांनी मागणी केली, ती नाकारण्यात आली; त्यानंतर, फ्रान्समध्ये त्यांच्यापासून धोका निर्माण होण्याचा संभव आहे पाहून, त्यांना सलोनिका येथे जाण्याचा हुकूम देण्यात आला. त्यांनी जायला नकार दिला आणि लढाई झाली... ते बंडखोर होण्यापूर्वी, सुमारे दोन महिने त्यांना अधिकाऱ्यांविना छावणीत ठेवण्यात आले होते व वाईट वागणूक दिली होती, असे आढळून आले. त्यांच्यावर तोफा डागणाऱ्या "रशियन तोफखाना ब्रिगेडचे" नांव शोधण्याचे सर्व प्रयत्न व्यर्थ ठरले; मंत्रालयात सापडलेल्या तारांवरून एकच अर्थ काढता येतो की, फ्रेंच तोफखाना वापरण्यात आला...

शरणागती पत्करल्यानंतर, दोनशेपेक्षा अधिक बंडखोरांना निर्घृणपणे गोळ्या घालण्यात आल्या.

# ८

# तेरेश्चेन्को यांचे भाषण

( सारांश )

"...राष्ट्रीय संरक्षणाच्या प्रश्नांशी परराष्ट्र धोरणाचे प्रश्न निकटपणे संबंधित आहेत... तेव्हा राष्ट्रीय संरक्षणाच्या प्रश्नांबाबत जर गुप्त बैठका घेणे आवश्यक असते असे तुम्हाला वाटत असेल, तर आमच्या परराष्ट्र धोरणातही काही वेळा तशीच गुप्तता राखणे आम्हाला भाग पडते...

"जर्मन राजनीती लोकमतावर प्रभाव पाडण्याचा प्रयत्न करते आहे... त्यामुळे क्रांतिकारक काँग्रेसची मोठमोठ्यांदा भाषा करणाऱ्या आणि आणखी एका हिवाळी मोहीमेची अशक्यता सांगणाऱ्या मोठ्या लोकशाहीवादी संघटनांच्या संचालकांची ज़ाहीर निवेदने धोकेबाज आहेत... या जाहीर निवेदनांपायी अनेक मानवी जीवांचा बळी पडतो...

"राज्याच्या मानाच्या आणि प्रतिष्ठेच्या प्रश्नांना स्पर्श न करता, केवळ शासकीय तर्कशुद्धतेच्या दृष्टिकोनातून बोलण्याची माझी इच्छा आहे. तर्कशास्त्राच्या दृष्टीने, रशियाचे परराष्ट्र धोरण रशियाच्या हितसंबंधांचा खराखुरा सर्वव्यापी विचार करून आधारले पाहिजे... या हितसंबंधांचा अर्थ, आमचा देश एकाकी राहणे अशक्य आहे आणि आमच्या बरोबरीच्या सध्याच्या शक्तींची (दोस्त राष्ट्रांची) रचना समाधानकारक आहे... सारी मानवजात शांततेची इच्छा करते आहे, पण आमच्या पितृभूमीच्या राज्याच्या हितसंबंधांचा भंग करून अपमानास्पद शांतता तह करायला रशियात कुणीही परवानगी देणार नाही!"

वक्त्याने निर्देशित केले की, अशा प्रकारचा शांतता तह जरी शतकानुशतके नाही तरी प्रदीर्घ काळापर्यंत जगातील लोकशाहीवादी तत्त्वांच्या विजयाला बाधा आणील व अपरिहार्यपणे नव्या युद्धांना कारणीभूत होईल.

"मे मधील दिवस सर्वांना आठवत असतील, जेव्हा आमच्या आघाडीवरील बांधिलकीमुळे केवळ लष्करी कारवाया बंद होऊन युद्ध थांबण्याचा व त्यायोगे देशाला लाजिरवाणा अलग शांतता तह करावयास लागण्याचा धोका निर्माण झाला होता... आणि रशियन राज्याने या पद्धतीने युद्ध संपवून आपल्या हितसंबंधांची हमी मिळवणे योग्य नव्हे, ही गोष्ट आघा-

डीवरच्या सैनिकांना पटवून देण्यासाठी किती अफाट प्रयत्न करावे लागले..."

जुलैमधील आक्रमक पवित्र्याचे किती अद्भुत परिणाम घडले याविषयी ते बोलले. त्यामुळे परदेशांमधील रशियन वकीलांच्या शब्दांना वजन प्राप्त झाले, रशियन विजयांमुळे जर्मनीत निराशेचे वातावरण पसरले. तसेच रशियन पराभवापाठोपाठ दोस्त राष्ट्रांमध्ये कसा भ्रमनिरास झाला याबद्दलही ते बोलले...

"रशियन सरकारपुरते बोलायचे तर ते मे मधील सूत्राला घट्ट चिकटून राहिले, 'कोणतीही विलीनीकरणे नाहीत आणि कोणत्याही दंडाई नुकसान-भरपाई नाहीत.' जनतेचा स्वयंनिर्णय जाहीर करणेच केवळ नव्हे, तर साम्राज्यवादी उद्दिष्टे धिक्कारणे आवश्यक आहे, असे आम्ही मानतो..."

शांतता तह करण्याचा जर्मनी सतत प्रयत्न करीत आहे. जर्मनीत सर्वत्र केवळ शांततेची भाषा ऐकू येत आहे; आपण युद्ध जिंकू शकणार नाही याची तिला खात्री पटलीय.

"रशियाचे परराष्ट्र धोरण युद्धाच्या उद्दिष्टांसंबंधी पुरेसे स्पष्टपणे बोलत नाही, अशा आशयाच्या आरोपांचा मी इन्कार करतो...

"दोस्त राष्ट्रे कोणत्या उद्दिष्टांचा पाठपुरावा करीत आहेत असा जर प्रश्न उद्भवला, तर मध्य युरोपीय सत्तांनी कोणत्या उद्दिष्टांबाबत एकमत केले आहे याची मागणी प्रथम करणे अटळ ठरते...

"दोस्तांना एकत्र बांधणाऱ्या करारांचे तपशील आम्ही प्रसिद्ध करावेत, अशा इच्छा प्रकट केलेल्या आम्ही वारंवार ऐकतो; पण लोक हे विसरतात की, अजूनपर्यंत तरी मध्य युरोपीय सत्तांना एकत्र आणणारे कोणते करार आहेत याची आम्हाला माहिती नाही..."

अनेक दुर्बळ राज्ये दरम्यान निर्माण करून रशियाला पश्चिमेपासून अलग करण्याची जर्मनीची इच्छा ठळकपणे जाणवत आहे असे ते म्हणाले.

"रशियाच्या मूलभूत हितसंबंधांवर घाला घालण्याच्या या प्रवृत्तीला आवर घातला पाहिजे...

"राष्ट्रांना स्वयंनिर्णयाचे हक्क असले पाहिजेत, असे शब्द आपल्या ध्वजेवर कोरणारा रशियन लोकशाही पक्ष, अत्यंत सुसंस्कृत लोकांवर (ऑस्ट्रिया-हंगेरीमधील) तशीच चालू राहिलेली दडपशाही शांतपणे पहात राहील?

"आमच्या अवघड परिस्थितीचा दोस्त राष्ट्रे फायदा उठवतील, युद्धाचा

बोजा आमच्या वाट्यापेक्षा आम्हाला अधिक उचलायला लावतील आणि आमचा बळी देऊन शांततेचे प्रश्न सोडवतील, अशी ज्यांना भीती वाटते, त्यांची सपशेल गैरसमजूत झाली आहे... आमचा शत्रू रशियाकडे स्वतःच्या मालाची बाजारपेठ म्हणून पाहतो आहे. युद्ध समाप्त केल्यास आम्ही निर्बल अवस्थेत राहू आणि आमच्या सीमा जर्मन मालाला खुल्या राहिल्यामुळे अनेक वर्षेपर्यंत आमचा औद्योगिक विकास थोपवून धरणे जर्मनांना सहज शक्य होईल. याविरुद्ध रक्षण करण्यासाठी उपाययोजना अंमलात आणल्या पाहिजेत...

"मी उघडपणे आणि प्रांजळपणे सांगतो: दोस्तांबरोबर आम्हाला एकत्र बांधणाऱ्या सुसंवादी शक्ती, **रशियाच्या हितसंबंधांना अनुकूल आहेत.** म्हणून युद्ध आणि शांतता यांबाबतचे आपले विचार, दोस्तांच्या विचारांशी जास्तीत जास्त स्पष्टपणे आणि अचूकपणे सुसंवादी असणे अत्यंत महत्त्वाचे आहे... सर्व प्रकारचे गैरसमज टाळण्यासाठी मी स्पष्टपणे सांगतो की, पॅरिस परिषदेत रशियाने **एकच विचार** मांडला पाहिजे..."

स्कोबेलियेव यांच्या आदेशाबाबत त्यांनी कोणताही शेरा मारला नाही, पण स्टॉकहोममध्ये नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या डच-स्कॅन्डिनेव्हिया समितीच्या जाहीरनाम्याचा त्यांनी उल्लेख केला. लिथुआनिया आणि लात्विया यांना स्वायत्तता द्यावी, असे या जाहीरनाम्यात म्हटले होते; "पण ते अगदी अशक्य आहे," तेरेश्चेन्को म्हणाले, "कारण बाल्टिक सागरावर सबंध वर्षभर खुली असणारी बंदरे रशियाला आवश्यक आहेत...

"या प्रश्नामध्ये परराष्ट्र धोरणाच्या समस्या अंतर्गत राजकारणाशीही निकटपणे संबंधित आहेत; कारण अखिल महान रशियाच्या ऐक्याची भावना जर प्रबळपणे अस्तित्वात असती, तर केंद्रीय सरकारपासून अलग होण्याच्या लोकांच्या इच्छांच्या अभिव्यक्ती आपण वारंवार सर्वत्र पाहिल्या नसत्या... असे अलग होणे रशियाच्या हिताला बाधक आहे आणि रशियन प्रतिनिधी या अलगपणाला पाठिंबा देऊ शकत नाहीत..."

## ९

# ब्रिटिश आरमारी काफला

## ( वगैरे )

रीगाच्या आखातामधील नाविक लढाईच्या वेळी, केवळ बोल्शेविकांचेच नव्हे, तर हंगामी सरकारच्या मंत्र्यांचेही असे मत झाले होते की, ब्रिटिश

आरमारी काफला मुद्दामच बाल्टिक सागरामधून निघून गेला ; त्याची ही क्रुती म्हणजे ब्रिटिश वृत्तपत्रांमधून वारंवार जाहीररीत्या प्रकट होणाऱ्या आणि रशियामधील ब्रिटिश प्रतिनिधींतर्फे खाजगी वर्तुळांमधून व्यक्त केल्या जाणाऱ्या एकाच विचाराची निदर्शक होती : "रशिया संपला ! आता रशियाबाबत कटकट करून घेणे व्यर्थ आहे !"

केरेन्स्कींची मुलाखत पहा (परिशिष्ट १३).

झारच्या राजवटीत, जनरल गूर्को रशियन सेनादलांचे माजी सरसेनापती होते. भ्रष्ट शाही दरबारामधील ते एक वजनदार गृहस्थ होते. क्रांतीनंतर, ज्या काही अगदी थोड्या लोकांना राजकीय आणि वैयक्तिक कारकीर्दीबद्दल हद्दपार करण्यात आले, त्यांच्यात यांचा समावेश होता. रीगाच्या आखातामधील रशियाच्या नाविक पराभवाच्या वेळीच, लंडनमध्ये बादशहा जॉर्ज यांनी जनरल गूर्को यांचे जाहीर स्वागत केले ; ज्या माणसाला रशियन हंगामी सरकारने धोकेबाज जर्मनवादी, तसेच प्रतिगामी मानले होते !

# १०

# उठावाविरुद्ध आवाहने

## कामगारांना आणि सैनिकांना उद्देशून

"कॉम्रेडहो ! पेत्रोग्रादमध्ये आणि इतर शहरांमध्ये **अव्यवस्था आणि दंगेधोपे** माजविण्याचा काळ्या शक्ती वाढत्या प्रमाणात प्रयत्न करीत आहेत. काळ्या शक्तींच्या दृष्टीने अव्यवस्था माजणे आवश्यक आहे, कारण त्यामुळे क्रांतिकारक चळवळीला रक्तात बुडवून नष्ट करण्याची त्यांना संधी मिळेल. अगदी अलिकडेच क्रांतिकारक जनतेने ज्याला दडपून टाकण्यात यश मिळविले त्या कोर्निलोवचे वर्चस्व पुन्हा प्रस्थापित करण्याच्या आशेने, सुव्यवस्था स्थापन करण्याचा आणि नगरजनांचे रक्षण करण्याचा त्या बहाणा करीत आहेत. जर त्यांच्या आशा खऱ्या ठरल्या तर जनतेचे हाल कुत्रा खाणार नाही ! विजयी प्रतिक्रांती सोविएतांना आणि सेना समित्यांना नष्ट करील, घटनात्मक सभा विसर्जित करील, भूमी समित्यांच्या हाती जमीन सोपविण्याचे कार्य थांबवील, त्वरित शांतता प्रस्थापित करण्याच्या जनतेच्या सर्व आशा धुळीला मिळवील आणि क्रांतिकारक सैनिकांनी व कामगारांनी सारे तुरुंग तुडुंब भरून टाकील.

“खाद्यपदार्थांच्या वाटपातील गोंधळ, चालू राहिलेली लढाई आणि एकूण जीवनामधील अडचणी, यांच्यामुळे जनतेच्या अडाणी भागांमध्ये निर्माण झालेल्या गंभीर स्वरूपाच्या असंतोषावर, प्रतिक्रांतिकारक आणि काळे शंभरचे पुढारी आपली भिस्त ठेवून आडाखे बांधत आहेत. सैनिकाच्या आणि कामगारांच्या प्रत्येक मिरवणुकीचे दंग्यात रूपांतर घडवून शांतताप्रेमी जनतेला घाबरावयाचे आणि कायदा व सुव्यवस्था राखणाऱ्यांच्या तावडीत त्यांना द्यायचे, असा त्यांचा मनसुबा आहे.

“अशा परिस्थितीत, कितीही प्रशंसनीय हेतू असला तरी या दिवसात एखादे निदर्शन आयोजित करणे, हा गुन्हा ठरेल. सरकारच्या धोरणाबाबत असंतुष्ट असणारे सर्व सुजाण कामगार आणि सैनिक जर निदर्शने काढण्यात गुंतून राहिले, तर त्यामुळे त्यांचे स्वतःचेच नुकसान ते ओढवून घेतील आणि क्रांतीची हानी करतील.

**“म्हणून केंद्रीय कार्यकारी समिती सर्व कामगारांना आवाहन करीत आहे की, निदर्शनांमध्ये भाग घेण्याच्या कोणत्याही आदेशांचे पालन करू नका.**

**“कामगारांनो आणि सैनिकांनो! चिथावणीला बळी पडू नका! आपल्या देशाबाबतच्या आणि क्रांतीबाबतच्या आपल्या कर्तव्याची आठवण ठेवा! हमखास अयशस्वी होणाऱ्या निदर्शनांमध्ये भाग घेऊन क्रांतिकारक आघाडीच्या ऐक्यात फूट पाडू नका!”**

**कामगार आणि सैनिक**
**प्रतिनिधींच्या सोविएतांची**
**केंद्रीय कार्यकारी समिती.”**

**रशियन सामाजिक लोकशाही मजूर पक्ष**
**धोका जवळ आहे!**

**सर्व कामगारांना आणि**
**सैनिकांना उद्देशून**

(वाचा आणि इतरांना द्या)

“कॉम्रेड कामगारांनो आणि सैनिकांनो!

“आपला देश संकटात आहे. या संकटापायी आपले स्वातंत्र्य आणि आपली क्रांती कठीण काळामधून जात आहेत. शत्रू पेत्रोग्रादच्या वेशींपाशी

येऊन ठेपला आहे. दर तासागणिक गोंधळ वाढत आहे. पेत्रोग्रादसाठी पाव मिळविणे अधिकाधिक अवघड होत आहे. सर्वांनी, लहानांपासून थोरांपर्यंत सर्वांनी, आपले प्रयत्न दुपटींनी वाढवले पाहिजेत, गोष्टी सुरळीत व्हाव्यात म्हणून खटपटी केल्या पाहिजेत... आपण आपला देश वाचवला पाहिजे, स्वातंत्र्याचे रक्षण केले पाहिजे... सैन्यासाठी अधिक शस्त्रे आणि रसद पुरवा! मोठ्या शहरांना पावाचा पुरवठा करा. देशात सुव्यवस्था आणि संघटन स्थापन करा...

"आणि अशा या भयंकर कसोटीच्या दिवसांमध्ये, कुठेतरी निदर्शनाची तयारी होत आहे, क्रांतिकारक शांतता आणि सुव्यवस्था नष्ट करून टाकण्याचे कुणीतरी सैनिकांना आणि कामगारांना आवाहन करीत आहे, अशा अफवा पसरत आहेत... 'राबोची पूत' हे बोल्शेविकांचे वर्तमानपत्र पेटत्या आगीत तेल ओतत आहे; अडाणी जनतेची खुशामत करते आहे, कामगारांना आणि सैनिकांना लालूच दाखवीत आहे, सरकारविरुद्ध कारवाया करण्याची त्यांना चिथावणी देत आहे, ढोंगभर आश्वासने देत आहे... भोळेभाबडे, अडाणी लोक त्यांच्यावर विश्वास टाकतात, त्याबाबत कारणमीमांसा करीत बसत नाहीत... आणि दुसऱ्या बाजूनेही अफवा येत आहेत – काळ्या शक्ती, झारचे मित्र, जर्मन हेर, अत्यानंदाने बागडत आहेत. बोल्शेविकांबरोबर सामील होऊन सध्याच्या अव्यवस्थेमधून यादवी युद्ध भडकावून देण्याची त्यांची तयारी आहे.

"त्यांनी भ्रष्ट केलेले बोल्शेविक आणि अडाणी सैनिक व कामगार मूर्खाप्रमाणे ओरडत आहेत: 'सरकार मुर्दाबाद! सर्व सत्ता सोविएतांच्या हाती!' आणि झारचे कृष्णकारस्थानी सेवक व विल्हेल्मचे हेर त्यांना चिथावणी देत राहतील; 'ज्यू लोकांना चोपा, दुकानदारांना बडवा, बाजारपेठा लुटा, कारखाने दुकाने उध्वस्त करा, दारूची दुकाने फोडा! कापा, जाळा, लुटा!'

"आणि मग महाभयानक गोंधळ माजेल, जनतेच्या एका भागाचे दुसऱ्या भागाशी युद्ध सुरू होईल. सर्व गोष्टींमध्ये अधिकच गोंधळ निर्माण होईल आणि कदाचित पुन्हा एकदा राजधानीचे रस्ते रक्ताने न्हाऊन निघतील. आणि मग – मग काय?

"मग पेत्रोग्रादचा रस्ता विल्हेल्मला खुला होईल. मग पेत्रोग्रादला अजिबात पाव मिळणार नाही, लहान मुले उपासमारीने मरतील. मग आघाडीवरच्या सैन्याला पाठबळ राहणार नाही, खंदकांमध्ये लढणारे

आमचे बांधव शत्रूच्या आगीला बळी दिले जातील. मग रशियाची सर्व देशांमध्ये नाचक्की होईल, आमच्या पैशाचे मोल घसरेल; सर्व गोष्टी एवढ्या भयंकर महाग होतील की, जगणे अशक्य होईल. मग, जिची दीर्घ काळ प्रतीक्षा केली जात आहे ती घटनात्मक सभा आणखी लांबणीवर टाकण्यात येईल – ठरल्या वेळी तिचे अधिवेशन भरविणे अशक्य ठरेल. आणि मग – क्रांतीचा मृत्यू, आमच्या स्वातंत्र्याचा मृत्यू...

"कामगारांनो आणि सैनिकांनो, हेच तुम्हाला पाहिजे काय? नाही तुम्हाला हे नको असेल तर जा, विश्वासघातक्यांनी भ्रष्ट केलेल्या अडाणी जनतेकडे जा आणि आम्ही तुम्हाला सांगितले ते सारे सारे सत्य तिला सांगा!

**या भयंकर दिवसांमध्ये, सरकारविरुद्ध रस्त्यांवर येण्याचे तुम्हाला आवाहन करणारा प्रत्येक माणूस हा झारचा गुप्त सेवक आहे, चिथावणीखोर आहे, किंवा जनतेच्या शत्रूंचा अविचारी मदतनीस आहे, किंवा विल्हेल्मचा पगारी हेर आहे, याची सर्वांना माहिती होऊ दे!**

"प्रत्येक सुजाण कामगार क्रांतिकारकाने, प्रत्येक सुजाण किसानाने, प्रत्येक क्रांतिकारक सैनिकाने, सरकारविरुद्ध निदर्शन किंवा बंड केल्यास जनतेचे किती नुकसान होईल याची जाणीव असलेल्या सर्वांनी, एकत्र आले पाहिजे आणि जनतेच्या शत्रूंना आमच्या स्वातंत्र्याचा नाश करण्यास प्रतिबंध केला पाहिजे."

**मेन्शेविक-अबारोन्त्सींची पेत्रोग्राद नियुक्त समिती.**

## ११

## लेनिन यांचे 'कॉम्रेडांना पत्र'

१९१७ सालाच्या ऑक्टोबरच्या उत्तरार्धात 'राबोची पूत'मध्ये क्रमशः प्रसिद्ध झालेली ही लेखमाला आहे. त्यांपैकी दोन लेखांमधील काही उतारे प्रस्तुत ठिकाणी दिले आहेत.

> "आम्हाला जनतेमध्ये बहुमत नाही आणि अशा परिस्थितीविना उठाव करणे व्यर्थ आहे..."

असे म्हणणारे लोक एक तर सत्याचा विपर्यास करणारे असतात किंवा

क्रांतीमधील घटनांचा खरा आढावा अजिबात न घेता, सदासर्वकाळ बोल्शेविक पक्षाला सबंध देशभर निम्म्या मतांपेक्षा एक मत अधिक मिळेल अशी आधीच हमी हवी असलेले पंडितंमन्य तरी असतात...

अखेरची परंतु तेवढीच महत्त्वाची बाब म्हणजे रशियातील आजच्या जीवनामध्ये **किसानांचे बंड** ही सर्वश्रेष्ठ वस्तुस्थिती आहे... ताम्बोव गुबेर्नियामधील किसान चळवळ म्हणजे भौतिक आणि राजकीय अशा दोन्ही दृष्टींनी तो उठाव घडला होता; त्या उठावामुळे अतिशय सुरेख राजकीय फलनिष्पत्ती मिळाल्या; त्यातील सर्वप्रथम म्हणजे किसानांच्या ताब्यात जमिनी देण्याला मान्यता. उठावाला घाबरलेले 'देलो नरोदा'सह सर्व सामाजिक क्रांतिकारक बाजारबुणगे, जमिनी किसानांच्या ताब्यात देण्याची गरज आहे असा आता **ओरडा करतात** तो काही उगाच नव्हे...

किसानांच्या उठावामुळे राजकीयदृष्टचा आणि क्रांतिकारकदृष्टचा घडलेला आणखी एक सुखद परिणाम म्हणजे ताम्बोव गुबेर्नियामधील रेल्वे स्टेशनांना झालेला धान्याचा पुरवठा...

अन्नाचा प्रश्न सोडविण्यासाठी **अशा** उपायाच्या (एकमेव खऱ्या उपायाच्या) अशा सुरेख निष्पत्ती मिळाल्याचे, **भांडवलदारी** वर्तमानपत्रांनाही, अगदी 'रूस्काया वोल्या'ला सुद्धा मान्य करावे लागले व ताम्बोव गुबेर्नियामधील रेल्वे स्टेशने धान्यमय झाल्याची बातमी त्यांनी प्रसिद्ध केली... **आणि हे घडले किसानांनी बंड केल्यानंतर!..**

---

"...सत्ता काबीज करण्याइतके आम्ही समर्थ नाही आणि घटनात्मक सभेच्या अधिवेशनात अडथळा आणण्याइतके भांडवलदारांमध्ये बळ नाही..."

या युक्तिवादामधील पहिला भाग म्हणजे त्या आधीच्या युक्तिवादाचा सोप्या भाषेतील गोषवारा आहे. त्याचे लेखक जेव्हा आपला गोंधळ आणि भांडवलदारवर्गाबाबतची भीती कामगारांच्या संदर्भात निराशावादी भाषेने आणि भांडवलदारांच्या संदर्भात आशावादी भाषेने व्यक्त करतात, तेव्हा या युक्तिवादाला वजन लाभत नाही किंवा तो खात्रीपूर्वक पटू शकत नाही. जेव्हा कॅडेट अधिकारी आणि कझाक म्हणतात की, रक्ताचा शेवटचा थेंब सांडेपर्यंत ते बोल्शेविकांविरुद्ध लढत राहतील, तेव्हा मात्र त्यांच्यावर पूर्ण

विश्वास ठेवायचा; आणि जेव्हा शेकडो सभांमधून कामगार व सैनिक बोल्शेविकांबाबत आपला संपूर्ण विश्वास व्यक्त करतात आणि सोविएतांच्या हाती सत्ता देण्याची आपली तयारी असल्याचे खंबीरपणे जाहीर करतात, तेव्हा मात्र आठवण करून देणे "समयोचित" मानले जाते की, मतदान वेगळे आणि प्रत्यक्ष लढाई वेगळी!

अर्थात तुम्ही तसा युक्तिवाद केला तर उठावाची शक्यता "खंडन" करता येते. पण मग आम्ही असे विचारू की, हा खास विशिष्ट दिशेचा आणि विशिष्ट प्रेरणेचा "निराशावाद", भांडवलदारवर्गाच्या बाजूला राजकीय मतांतर होण्याहून कोणत्या बाबतीत वेगळा आहे?..

आणि कोर्निलोव बंडाने काय सिद्ध केले? त्याने सिद्ध केले की सोविएते हीच खरी शक्ती आहे...

घटनात्मक सभेच्या अधिवेशनाला अडथळा करण्याइतके भांडवलदार प्रबळ नाहीत हे कसे सिद्ध करता येईल?

जर भांडवलदारांना* उलथून टाकण्याचे सोविएतांमध्ये **बळ नाही**, तर **त्याचा अर्थ** घटनात्मक सभेचे अधिवेशन थोपवण्यास भांडवलदार पुरेसे समर्थ आहेत, कारण त्यांना थांबवणारे दुसरे कुणीही नाही. केरेन्स्की आणि मंडळीच्या आश्वासनांवर विश्वास टाकणे, लाळघोटचा पूर्व-संसदेच्या ठरावांवर विश्वास टाकणे – कामगारवर्गीय पक्षाच्या सदस्याला आणि क्रांतिकारकाला हे शोभते का?

जर सध्याचे सरकार उलथून टाकले नाही तर घटनात्मक सभेच्या अधिवेशनाला अडथळा करण्याइतपतच भांडवलदारांच्या अंगी **बळ आहे** असे नव्हे, तर **अप्रत्यक्षरीत्या** पेत्रोग्राद जर्मनांच्या हवाली करून, आघाडी खुली करून, टाळेबंद्या वाढवून आणि अन्नपुरवठ्यात घातपात घडवून ही फलश्रुती ते साध्य करू शकतील...

---

> "...घटनात्मक सभेचे अधिवेशन बोलावण्याची आणि सर्व कोर्निलोववादी कारस्थाने बंद करण्याची मागणी करणारे, सरकारच्या मस्तकाला भिडवलेले पिस्तूल म्हणजे सोविएते बनली पाहिजेत..."

उठावाला नकार देणे म्हणजे 'सर्व सत्ता सोविएतांच्या हाती' या घोषणेला नकार देण्यासारखेच **आहे...** सप्टेंबरपासून पक्ष उठाव करण्याच्या प्रश्नाची चर्चा करतोय...

उठावाचा त्याग म्हणजे सोविएतांच्या हाती सत्ता देण्याचा त्याग आणि घटनात्मक सभेचे अधिवेशन बोलावण्याचे "आश्वासन" देणाऱ्या दयाळू भांडवलदारांच्या हाती सर्व आशा-आकांक्षा "सोपविणे" होय... सोविएतांच्या हाती एकदा **सत्ता आली** म्हणजे घटनात्मक सभेचे अधिवेशन भरण्याची आणि ते यशस्वी होण्याची **निश्चिती झाली...**

उठावाचा त्याग याचा अर्थ लीबेर-दान यांच्या बाजूला सरळ सरळ जाण्यासारखे आहे...

एक तर लीबेर-दान यांच्या बाजूला जा व 'सर्व सत्ता सोविएतांच्या हाती' या घोषणेचा **उघडपणे** त्याग करा, किंवा उठावाला आरंभ करा. मधला मार्ग उरलेला नाही.

---

> "भांडवलदार पेत्रोग्रादला जर्मनांच्या ताब्यात देऊ शकत नाहीत, जरी तसे करण्याची रोद्झिआन्को यांची इच्छा आहे; कारण भांडवलदार प्रत्यक्ष लढत नाहीत, तर आमचे शूर खलाशी लढताहेत..."

रणांगणावरील लष्करी मुख्य कचेरीत सुधारणा घडवलेल्या नाहीत आणि अधिकारी मंडळाची रचना कोर्निलोववादी आहे हे एक निर्विवाद सत्य आहे.

जर कोर्निलोववादी (त्यांच्या मूर्धस्थानी केरेन्स्की, कारण ते सुद्धा एक कोर्निलोववादी आहेत) पेत्रोग्रादला जर्मनांच्या हवाली करू **इच्छित असतील**, तर ते ही गोष्ट दोन किंवा फारतर तीन मार्गांनी करू शकतील.

प्रथम म्हणजे कोर्निलोववादी अधिकाऱ्यांमार्फत विश्वासघात घडवून ते उत्तर आघाडी खुली करू शकतात.

दुसरे म्हणजे आमच्यापेक्षा **अधिक समर्थ असलेल्या** जर्मन आरमाराच्या संपूर्ण स्वैर कारवाईशी "सहमत" होऊ शकतील; जर्मन आणि ब्रिटिश अशा दोन्ही साम्राज्यवाद्यांशी ते सहमत होऊ शकतील. शिवाय, "बेपत्ता झालेले नौदल अधिकारी" **आमच्या योजना** जर्मनांच्या हवाली करणे शक्य आहे.

तिसरे म्हणजे टाळेबंद्या घडवून आणि अन्नपुरवठ्यामध्ये घातपात घडवून, आमच्या शिपायांना **संपूर्ण** निराशेच्या टोकाला नेऊन त्यांना हतवीर्य बनविणे, या लोकांना शक्य आहे.

या तीन मार्गांपैकी एकाचीही शक्यता नाकारता येणार नाही. वस्तु-

स्थितींनी सिद्ध केले आहे की, रशियातील भांडवलदारी-कझाक पक्षाने या तीनही दारांवर ठोठावले आहे आणि त्यातले प्रत्येक दार बळाने उघडण्याचा प्रयत्न केला आहे...

भांडवलदारांनी क्रांतीचा गळा दाबून प्राण घेईपर्यंत **थांबून राहण्याचा** आम्हाला हक्क नाही...

रोद्झिआन्को हा कामाचा माणूस आहे... **दशकानुदशके,** रोद्झिआन्को यांनी भांडवलदारांच्या धोरणांना प्रामाणिकपणे आणि निष्ठेने अंमलात आणले आहे.

त्यावरून काय अनुमान निघते? असे अनुमान निघते की, क्रांतीला वाचविण्याचे एकमात्र साधन असलेल्या उठावाच्या प्रश्नावर संभ्रमित होणे म्हणजे भांडवलदारांबाबत भित्रट भोळसटपणाने श्रद्धा बाळगून आत्मनाश करणे होय; जिच्याविरुद्ध सदासर्वकाळ बोल्शेविक लढा देत आहेत अशी ही श्रद्धा अर्धी लीबेर-दानवादी आहे, समाजवादी-क्रांतिकारक-मेन्शेविकवादी आहे, तर अर्धी "किसानसदृश" निर्विवाद भोळसट श्रद्धा आहे...

---

"प्रतिदिनी आम्ही अधिक समर्थ बनत आहोत. जबरदस्त विरोधक म्हणून आम्ही घटनात्मक सभेत प्रवेश करू; कशाला आपण सारे पणाला लावायचे?.."

हे विधान क्षुद्रद्धीबु माणसाचे आहे ज्याने "वाचले" आहे की, घटनात्मक सभेचे अधिवेशन बोलावले जात आहे व अत्यंत कायदेशीर, अत्यंत नेक, अत्यंत वैध मार्गाने जाणे जो श्रद्धापूर्वक मान्य करतो.

पण दुर्दैवाने, या घटनात्मक सभेच्या अधिवेशनाची **वाट पाहण्याने** दुष्काळाचा प्रश्न सुटणार नाही किंवा पेत्रोग्राद जर्मनांच्या हवाली करण्याचा प्रश्नही सुटणार नाही. जे भोळसट आहेत किंवा गोंधळलेले आहेत किंवा ज्यांनी स्वतःला भीतीग्रस्त होऊ दिले आहे, असे लोक ही "क्षुल्लक बाब" विसरून गेले आहेत.

दुष्काळ वाट पहात थांबणार नाही. किसानांचे बंड वाट पहात थांबले नाही. युद्ध पहात थांबणार नाही. बेपत्ता झालेले नौदल अधिकारी थांबून राहिले नाहीत...

आणि आंधळे लोक अजूनही नवल करीत बसलेत की, सेनापतींनी आणि नौदल अधिकाऱ्यांनी ज्यांचा विश्वासघात केलाय असे भुकेले लोक व सैनिक निवडणुकांविषयी एवढे उदास का आहेत? वा रे अकलेचे खंदक!

---

> "कोर्निलोववाद्यांनी जर पुन्हा दंगा सुरुवात केली असती तर आम्ही त्यांना इंगा दाखवला असता! पण आपण धोके अंगावर घेऊन कशाला सुरुवात करायची? .."

इतिहासाची आपोआप पुनरावृत्ती घडत नाही, पण आपण जर त्याच्याकडे **आपल्या पाठी** फिरवल्या, पहिल्या कोर्निलोव बंडाचा विचार करीत बसलो आणि पुन:पुन्हा म्हणत राहिलो: "जर कोर्निलोववाद्यांनी पुन्हा दंगा सुरू केला–" जर आपण असे केले तर काय झकास क्रांतिकारक व्यूहनीती ठरेल ती..." कामगारवर्गीय धोरणाला हा कुठल्या प्रकारचा खरा आधार ठरतो?

आणि जर कोर्निलोववाद्यांनी... उपासमारीमुळे दंगली सुरू व्हायची, आघाडी मोडून पडण्याची, पेत्रोग्रादला शत्रूच्या हवाली करण्याची, त्यांनी **आरंभ करण्यापूर्वी, वाट पहायची**? मग काय होईल?

कोर्निलोववादी त्यांची एखादी जुनी चूक पुन्हा करतील, या शक्यतेवर कामगारवर्गीय पक्षाने आपले डावपेच आधारावेत असा एक प्रस्ताव मांडण्यात आला आहे!

बोल्शेविकांनी शंभर वेळा जे दाखवून दिले होते व ते जे **दाखवून देत आहेत** ते सर्व विसरून जाऊ, आपल्या क्रांतीच्या सहा महिन्यांच्या इतिहासाने सिद्ध केलेले सर्व काही विसरून जाऊ; उदाहरणार्थ, कोर्निलोववाद्यांची हुकूमशाही किंवा कामगारवर्गाची अधिसत्ता **यांच्याशिवाय** दुसरा पर्याय **नाही**, त्यातून दुसरा वस्तुनिष्ठ मार्ग नाही आणि त्याव्यतिरिक्त दुसरा मार्ग असू शकत नाही. हे विसरून जाऊ या, सर्वाचा त्याग करू या आणि वाट पहात थांबू या! कशाची वाट पहात थांबायचे! चमत्काराची वाट पहात थांबायचे..."

# १२

# मिल्यूकोव यांचे भाषण

( सारांश )

"असे वाटते की, देशाचे संरक्षण करणे हे आपले मुख्य काम आहे व त्या संरक्षणाची खात्री निर्माण करण्यासाठी आपण सैन्यात शिस्त बाणवली पाहिजे आणि पिछाडीला सुव्यवस्था स्थापन केली पाहिजे, हे प्रत्येक व्यक्तीला मान्य आहे. हे साध्य करण्यासाठी केवळ मतपरिवर्तनाचा नव्हे, तर प्रसंगी बळाचा वापर करण्याचे धाडस असलेली सत्ता पाहिजे... आमच्या सर्व वाईट गोष्टींचे मूळ त्या अभिजात, खऱ्या अर्थाने रशियन असलेल्या परराष्ट्र धोरणाविषयीच्या दृष्टिकोनात आहे, ज्याला आंतरराष्ट्रीयवादी दृष्टिकोन म्हणून ओळखले जाते.

"थोर लेनिन थोर* केरेन्स्की यांची केवळ नक्कल करतात, जेव्हा ते असे मानतात की, रशियामधून नव्या जगाचा जन्म होईल व ते जराजर्जर पश्चिमेचा कायापालट घडवील, पोथीनिष्ठ समाजवादाच्या जुन्या ध्वजेजागी भुकेकंगाल जनतेची नवी थेट कृती घडवून आणील – आणि ती मानवजातीला पुढे ढकलील व समाजवादी स्वर्गाची दारे तिच्याकडून जबरदस्तीने उघडवून घेईल...

"या लोकांनी प्रामाणिकपणे विश्वास ठेवला की, रशियाचे विघटन सबंध भांडवलदारी राजवटीचे विघटन घडवून आणील. या दृष्टिकोनापासून आरंभ करून, युद्धकाळात ते अजाणता देशद्रोह करू शकले आणि शांतपणे त्यांनी सैनिकांना खंदक सोडून जायला सांगितले; आणि बाहेरच्या शत्रूविरुद्ध लढायचे सोडून, अंतर्गत यादवी युद्ध सुरू केले व मालकांवर आणि भांडवलदारांवर हल्ले चढवून..."

या ठिकाणी मिल्यूकोव यांच्या भाषणात डाव्यांनी संतापजनक ओरडा करून अडथळे आणले आणि कोणत्या समाजवाद्याने कधी असली कृती करण्याचा सल्ला दिला होता अशी विचारणा केली...

"मार्तोव म्हणतात की, केवळ कामगारवर्गाचा क्रांतिकारक दबावच साम्राज्यवादी कंपूंच्या दुष्ट इच्छेचा निषेध करून तिच्यावर मात करू शकेल आणि या कंपूंची हुकूमशाही मोडून टाकू शकेल... शस्त्रास्त्रांवर मर्यादा घालण्याच्या या सरकारांमधील कराराने नव्हे, तर या सरकारांना निः-

शस्त्र बनवून आणि लष्करी पद्धतीत संपूर्ण लोकशाहीकरण घडवून..."

त्यांनी मार्तोव यांच्यावर भयंकर आग पाखडली आणि नंतर मेन्शेविकांवर व समाजवादी-क्रांतिकारकांवर ते तुटून पडले. वर्गलढा चालविण्याच्या उघड हेतूने मंत्री म्हणून सरकारमध्ये त्यांनी प्रवेश केल्याचा मिल्यूकोवनी आरोप केला!

"जर्मनीमधील आणि दोस्त राष्ट्रांमधील समाजवादी या सद्गृहस्थांकडे उघड उघड तिटकाऱ्याने पहात होते, पण त्यांनी ठरवले की ही बाब रशियाची आहे आणि जागतिक संघर्षाचे काही प्रचारक त्यांनी आमच्याकडे धाडून दिले...

"आमच्या लोकशाहीचे सूत्र अगदी साधे आहे; परराष्ट्र धोरण नाही, राजनीतीची कला नाही, तात्काळ लोकशाहीवादी शांतता तह व दोस्तांना उद्देशून घोषणा–'आम्हाला काहीही नको, लढायला आमच्यापाशी काही उरलेच नाही!' मग आमचे प्रतिपक्षीसुद्धा अशीच घोषणा करतील आणि लोकांची बांधिलकी साध्य होईल!"

मिल्यूकोव यांनी झिम्मेरवाल्ड जाहीरनाम्यावरही प्रहार केला आणि ते म्हणाले की, "तुमच्या अपराधाची सदैव आठवण करून देणाऱ्या त्या अप्रिय दस्तऐवजाच्या" प्रभावामधून केरेन्स्कीसुद्धा सुटू शकले नाही. मग त्यांनी स्कोबेलियेव यांच्यावर हल्ला चढवला. आपल्या स्वतःच्या सरकारच्या परराष्ट्र धोरणाला ज्या माणसाचा विरोध आहे, तो जेव्हा रशियन प्रतिनिधी म्हणून परदेशी सभागृहांमध्ये दाखल होईल तेव्हा त्याची परिस्थिती किती विचित्र बनेल आणि लोक म्हणतील, "हे सद्गृहस्थ आपल्याबरोबर काय घेऊन आले आहेत आणि आम्ही त्यांच्याशी कशावर बोलायचे?" आदेशाबाबत मिल्यूकोव म्हणाले की, ते स्वतः शांततावादी होते; तसेच आंतरराष्ट्रीय मध्यस्थी मंडळ निर्माण करण्यावर, शस्त्रास्त्रांवर मर्यादा घालण्याच्या आवश्यकतेवर व गुप्त राजनीतीवर संसदेचे नियंत्रण असण्यावर त्यांचा विश्वास होता; पण याचा अर्थ गुप्त राजनीती संपूर्ण नष्ट करावी, असे मात्र त्यांचे मत नव्हते.

आदेशामधील समाजवादी विचारांना त्यांनी 'स्टॉकहोम विचार' नांव दिले–हे विचार म्हणजे विजयाविना शांतता, जनतेचा स्वयंनिर्णयाचा हक्क आणि आर्थिक युद्धाचा त्याग–यांच्याबाबत ते म्हणाले:

"जर्मनांच्या यशःसिद्धी सरळसरळ तेवढ्याच प्रमाणात आहेत जेवढ्या यशःसिद्धी स्वतःला क्रांतिकारक लोकशाही म्हणविणाऱ्यांनी मिळविल्या

आहेत. "क्रांतीच्या यश:सिद्धींच्या प्रमाणात" असे म्हणण्याची माझी इच्छा नाही, कारण क्रांतिकारक लोकशाहीचे पराभव म्हणजे क्रांतीचे विजय आहेत. असा माझा विश्वास आहे...

"सोविएत पुढाऱ्यांचा परदेशांमधील प्रभाव कमी महत्त्वाचा नाही. या सभागृहात, परराष्ट्र धोरणावरील क्रांतिकारक लोकशाहीचा प्रभाव एवढा दांडगा आहे की, रशियाच्या मानाच्या आणि प्रतिष्ठेच्या बाबतीत त्याच्या समोरासमोर बोलण्याचे मंत्रीमहाशयांचे धाडस होत नाही, याची खात्री पटवून घ्यायला एखाद्याने फक्त परराष्ट्रमंत्री महोदयांचे भाषण ऐकले तरी पुरे!

"सोविएतांच्या आदेशामध्ये आपल्याला असे आढळून येते की स्टॉक-होम जाहीरनाम्यामधील विचार दोन दिशांनी विशद केले आहेत – एक कल्पनावादाच्या दिशेने आणि दुसरा जर्मन हितसंबंधांच्या दिशेने..."

डाव्यांच्या संतप्त आरोळ्यांनी अडथळे होत असूनही आणि अध्यक्ष-महाशयांकडून तंबी मिळूनही, मिल्यूकोव यांनी प्रतिपादन केले की, मुत्स-द्द्यांच्या वतीने शांतता तह न करता जनता-मेळाव्यांतर्फे केला जावा हा ठराव आणि शत्रूने विलीनीकरणाच्या धोरणाचा त्याग करताच ताबडतोब शांतता-वाटाघाटी सुरू कराव्यात हा ठराव, हे ठराव जर्मनांना अनुकूल होते. अलिकडेच कूलमान म्हणाले होते की, वैयक्तिकरीत्या जो घोषणा करतो ती घोषणा फक्त त्यालाच बंधनकारक असते... "काहीही असले तरी, कामगारांच्या आणि सैनिकांच्या प्रतिनिधींच्या सोविएतची नक्कल करण्यापूर्वी आम्ही जर्मनांची नक्कल करू..."

मिल्यूकोव म्हणाले की, लिथुआनिया आणि लात्विया यांच्या स्वातंत्र्याचा पुरस्कार करणारे विभाग, म्हणजे रशियाच्या विविध भागांमध्ये जर्मन पैशाच्या आधारावर घडवून आणण्यात येणाऱ्या राष्ट्रवादी चळवळीची लक्षणे आहेत...

डाव्यांकडून प्रचंड दंगा होत असताना, एल्सस-लॉरें, रूमानिया आणि सेर्बिया यांच्या संबंधी आदेशामधील कलमे व जर्मनी आणि ऑस्ट्रिया यां-मधील राष्ट्रजमातींविषयीची कलमे, यांच्यातील तुलना त्यांनी केली. आदेशाने जर्मन आणि ऑस्ट्रियन दृष्टिकोन अंगीकारला आहे, असे मिल्यूकोव म्हणाले.

तेरेश्चेन्को यांच्या भाषणाचा समाचार घेताना, आपल्या मनातील विचार उघडपणे व्यक्त करायला ते घाबरले असा मिल्यूकोव यांनी त्यां-च्यावर संतापून आरोप केला. तसेच रशियाचा मोठेपणा लक्षात घेऊन

विचार करायलाही तेरेश्चेन्को घाबरले असा त्यांनी आरोप केला. दार्दनेले रशियाच्या मालकीचेच असले पाहिजे...

"तुम्ही सतत म्हणत आहात की, आपण कशासाठी लढत आहोत हे सैनिकाला माहीत नाही आणि जेव्हा त्याला माहीत होईल तेव्हा तो लढेल... आपण कशासाठी लढतो हे सैनिकाला माहीत नसते हे खरे आहे, पण आता तुम्ही त्याला सांगून टाकलेय की, लढायचे त्याला कारणच नाही, आपले राष्ट्रीय हितसंबंध या लढाईत नाहीत आणि परक्यांच्या फायद्यांसाठी आपण लढतो आहोत..."

दोस्तांचा त्यांनी गौरव केला आणि म्हणाले की, अमेरिकेच्या साहाय्याने ही राष्ट्रे "अजूनही मानवतेच्या उद्दिष्टाचे रक्षण करतील." अखेरीस ते म्हणाले:

"मानवतेचे दीपस्तंभ, पश्चिमेतील प्रगत लोकशाही राष्ट्रे चिरायू होवोत! ज्या मार्गावरून ती प्रदीर्घ काळ प्रवास करीत आहेत त्या मार्गावर आम्ही आत्ता कुठे पाऊल ठेवतो आहोत, ते सुद्धा बिचकत आणि अडखळत! आमची शूर दोस्त राष्ट्रे चिरायू होवोत!"

## १३

## केरेन्स्कींची मुलाखत

'असोसिएटेड प्रेस'च्या वार्ताहराने प्रश्न टाकला. "श्रीमान केरेन्स्की," त्याने बोलायला सुरुवात केली, "इंग्लंड आणि फ्रान्समधल्या माणसांची क्रांतीनं निराशा केलीय–"

केरेन्स्कींनी त्याचे बोलणे मध्येच थांबवून थट्टेने म्हटले, "मला माहीत आहे. परदेशांमध्ये क्रांती आता भपकेबाज राहिली नाही!"

"रशियन लढायचे का थांबले, याबाबत तुमचा खुलासा काय आहे?"

"हा प्रश्न विचारणं मूर्खपणाचं आहे," केरेन्स्की संतापून म्हणाले. "रशिया दोस्त राष्ट्रांच्या आधी युद्धात दाखल झाला आणि बराच काळपर्यंत या युद्धाचा सबंध बोजा तो सहन करीत राहिला. त्याचे एवढे भयंकर नुकसान झाले आहे की त्या नुकसानीची कल्पना करता येणार नाही. इतर सर्व राष्ट्रांची नुकसानी एकत्र केली तरी तिच्यापेक्षा रशियाची नुकसानी अधिक भरेल. दोस्तांनी आता युद्धात अधिक शस्त्रबळ वापरावे, अशी

मागणी करण्याचा रशियाला हक्क आहे." क्षणभर ते थांबले आणि प्रश्न विचारणाऱ्या वार्ताहराकडे त्यांनी टक लावून पाहिले. "रशियन लढायचे का थांबले म्हणून तुम्ही विचारता आणि रशियन विचारताहेत की, रीगाच्या आखातामध्ये जर्मन युद्धनौका आलेल्या असताना ब्रिटिश आरमारी काफला कुठं गेला?" पुन्हा ते अचानक गप्प झाले आणि एकदम चिडून बोलू लागले. "रशियन क्रांती अपयशी झालेली नाही आणि क्रांतिकारक सेनाही अपयशी झालेली नाही. क्रांतीमुळे सैन्यात बेदिली माजली हे खोटे आहे–जुन्या राजवटीने कित्येक वर्षांपूर्वीच हा गोंधळ निर्माण करून ठेवलाय. रशियन का लढत नाहीत? मी तुम्हाला सांगतो. कारण सर्वसामान्य जनता आर्थिकदृष्टया कंगाल बनलीय–आणि दोस्तांबाबत तिचा भ्रमनिरास झालाय!"

हा उतारा ज्यातून उद्धृत केला ती मुलाखत अमेरिकेला केबलने पाठवण्यात आली. पण काही दिवसातच अमेरिकेच्या राज्य विभागाने तिला परत पाठवले व "बदल" करण्याची मागणी केली. त्याला केरेन्स्कींनी नकार दिला; पण त्यांचे चिटणीस डॉ. डेव्हिड सोस्कीस यांनी आवश्यक ते फेरफार करून दिले–आणि अशाप्रकारे दोस्तांबद्दलचे सर्व अनुद्गार गाळून ती मुलाखत जगभर प्रसिद्ध करण्यात आली...

# तिसऱ्या प्रकरणाचे परिशिष्ट

## १

## कारखाना समित्यांचा ठराव

### १

१. राजकीय क्षेत्रामधील झारची एकतंत्री राजवट उलथून टाकल्यानंतर, उत्पादनाच्या क्षेत्रातही लोकशाही पद्धतीच्या विजयाला उत्तेजना देण्याचा कामगारवर्ग प्रयत्न करीत आहे. कामगारांच्या वर्चस्वाच्या विचारामधून हा प्रयत्न व्यक्त करण्यात आला आहे व हा विचार स्वाभाविकपणे सत्ताधारी वर्गांच्या गुन्हेगारी धोरणामधून निर्माण झालेल्या आर्थिक विस्कळीतपणामधून उद्भवला होता.

२. कामगारांच्या वर्चस्वाचे संघटन म्हणजे औद्योगिक उत्पादनाच्या क्षेत्रातील त्याच प्रकारच्या निकोप कार्याची अभिव्यक्ती आहे, ज्या प्रकारचे कार्य पक्षाच्या संघटना राजकारणाच्या क्षेत्रात करतात, नोकऱ्यांच्या क्षेत्रात ट्रेड युनियना करतात, सहकारी संस्था उपभोगाच्या क्षेत्रात करतात आणि साहित्य मंडळे सांस्कृतिक क्षेत्रात करतात.

३. कारखान्यांमध्ये योग्य आणि विनाअडथळा कामे होण्यात कामगार-वर्गाला भांडवलदारवर्गापेक्षा खूप स्वारस्य आहे. आपल्या भौतिक नफ्यांच्या किंवा राजकीय खास हक्कांच्या प्राप्तीच्या स्वार्थी उद्दिष्टानेच केवळ चाल-णाऱ्या मालकांच्या लहरी इच्छेपेक्षा, कामगारांचे वर्चस्व असणे हे आधुनिक समाजाच्या, एकूण जनतेच्या हिताच्या दृष्टीने अधिक सुरक्षित आहे. म्हणून केवळ आपल्या स्वतःच्या हितासाठी नव्हे, तर सबंध देशाच्या हितासाठी कामगारवर्ग कामगारांच्या वर्चस्वाची मागणी करतो आणि या मागणीला क्रांतिकारक किसानवर्गाने, तसेच क्रांतिकारक सैन्याने पाठिंबा दिला पाहिजे.

## २

४. बहुसंख्य भांडवलदारवर्गीयांचा क्रांतीकडे पाहण्याचा विरोधी दृष्टि-कोन विचारात घेता, कच्चा माल आणि इंधन यांचे योग्य वाटप होणे, तसेच कारखान्यांचे अत्यंत कार्यक्षमतेने व्यवस्थापन होणे, कामगारांच्या वर्चस्वाविना अशक्य आहे, असे अनुभवाने दिसून आले आहे.

५. कामाकडे पाहण्याची कामगारांच्या जाणीवपूर्ण दृष्टिकोनाची जो-पासना घडवून आणि त्याचा सामाजिक अर्थ स्पष्ट करून, भांडवलदारी कारखान्यांवर कामगारांचे वर्चस्व प्रस्थापित केले तरच, श्रमामध्ये कडक स्वयंशिस्तीचा विकास घडण्यास आणि सर्व श्रमांच्या संभाव्य उत्पादकतेचा विकास घडविण्यास अनुकूल परिस्थिती निर्माण होऊ शकेल.

६. खुद्द कामगारांच्या लोकशाही स्वयंशासनामार्फतच, फार मोठे गोंधळ न होता, उद्योगधंद्यांचे युद्धाधिष्ठित पायावरून शांतताधिष्ठित पायावर नजीक येऊन ठेपलेले स्थित्यंतर घडविणे, तसेच सबंध देशभर श्रमाची फेरवाटणी करणे आणि भिन्न कारखान्यांमध्ये श्रमाची फेरवाटणी करणे शक्य आहे. म्हणून कामगारांचे वर्चस्व अंमलात येणे ही शांततेवर आधारलेल्या उद्योग-धंद्यांची अपरिहार्य पूर्वावस्था आहे.

## ३

७. रशियन सामाजिक-लोकशाही मजूर पक्षाने ( बोल्शेविक ) दिलेल्या घोषणेनुसार, फलश्रुती प्राप्त करण्यासाठी, राष्ट्रीय प्रमाणावरील कामगारांच्या वर्चस्वाची व्याप्ती सर्व भांडवलदारी संस्थांपर्यंत वाढविली पाहिजे आणि अव्यवस्थितरीत्या त्याचे संघटन न करता, पद्धतशीरपणे अंमलबजावणी केली पाहिजे; ते सुनियोजित पाहिजे आणि एकूण देशाच्या औद्योगिक जीवनापासून अलग नसावे.

८. देशाचे आर्थिक जीवन – शेती, उद्योगधंदे, व्यापार आणि वाहतूक – एकच एक योजनेनुसार चालवले पाहिजे व विस्तृत जनतेच्या वैयक्तिक आणि सामाजिक गरजा भागवू शकेल अशी तिची रचना केली पाहिजे; जनतेच्या नियुक्त प्रतिनिधींनी तिला संमती दिली पाहिजे आणि राष्ट्रीय व स्थानिक संघटनांच्या साहाय्याने, या प्रतिनिधींच्या मार्गदर्शनाखाली तिची अंमलबजावणी झाली पाहिजे.

९. योजनेचा जो भाग शेतकी श्रमांशी निगडित आहे त्याची किसानांच्या व शेतमजूर संघटनांच्या देखरेखीखाली अंमलबजावणी झाली पाहिजे; वेतनी कामगारांतर्फे चालविल्या जाणाऱ्या उद्योगधंद्यांच्या, व्यापाराच्या आणि वाहतुकीच्या संबंधातील भागाची कामगारांच्या नियंत्रणाच्या साह्याने अंमलबजावणी झाली पाहिजे; औद्योगिक कारखान्याच्या आतमध्ये कामगारांच्या वर्चस्वाच्या स्वाभाविक संस्था म्हणून कारखाना आणि तत्सम समित्या राहतील; आणि श्रमाच्या बाजारपेठेत ट्रेड युनियना राहतील.

## ४

१०. श्रमाच्या कोणत्याही शाखेतील बहुसंख्य कामगारांसाठी ट्रेड युनियनांनी ठरवून दिलेल्या सामुदायिक वेतन व्यवस्था, एखाद्या विशिष्ट विभागात त्याच प्रकारच्या श्रमाचा वापर करणाऱ्या कारखान्यांच्या मालकांना बंधनकारक राहिल्या पाहिजेत.

११. सबंध औद्योगिक योजनेच्या सीमारेषांमध्ये आणि त्या योजनेनुसार काम करणाऱ्या वर्ग संघटना म्हणून, नोकऱ्या-मंडळांना ट्रेड युनियनांच्या नियंत्रणाखाली व व्यवस्थापनाखाली ठेवले पाहिजे.

१२. मजूरविषयक करारांचा किंवा मजूरविषयक कायद्यांचा भंग करणाऱ्या सर्व मालकांविरुद्ध, स्वतः पुढाकार घेऊन कायदेशीर कारवाई करण्यास आरंभ करण्याचा, तसेच कोणत्याही मजूर शाखेमधील कोणत्याही एखाद्या

कामगाराच्या वतीने वैयक्तिकरीत्या कायदेशीर कारवाई करण्याचा, ट्रेड युनियनांना हक्क असला पाहिजे.

१३. उत्पादन, वितरण आणि नोकऱ्या यांच्यावर कामगारांचे नियंत्रण असण्याबाबतच्या संदर्भातील सर्व प्रश्नांचा, वेगवेगळ्या कारखान्यांमधील कामगारांशी त्यांच्या कारखाना समित्यांमार्फत ट्रेड युनियनांनी परामर्श घ्यावा.

१४. नोकरीवर घेण्याच्या आणि नोकरीवरून काढून टाकण्याच्या बाबी, मुट्टया, वेतनश्रेणी, काम देण्यास नकार, उत्पादकतेची आणि कौशल्याची प्रत, करार मोडण्याची कारणे, व्यवस्थापनाशी भांडणे, तसेच कारखान्याच्या अंतर्गत जीवनातील तत्सम समस्यांची उकल केवळ कारखाना समितीच्या चौकशांमधून निघालेल्या निर्णयांनुसारच करावी व कारखान्याच्या व्यवस्थापनामधील कुणाही सदस्याला बडतर्फ करण्याचा या कारखाना समितीला हक्क आहे.

१५. कारखान्याला कच्च्या मालाचा, इंधनाचा, मालाच्या मागण्यांच्या नोंदींचा, श्रमशक्तीचा आणि तांत्रिक कर्मकारीवर्गाचा (सामग्रीसह) पुरवठा करण्यावर नियंत्रण ठेवण्यासाठी, इतर सर्व पुरवठे आणि व्यवस्था करण्यासाठी, तसेच सार्वत्रिक औद्योगिक योजनेशी कारखान्याचे काम मिळतेजुळते ठेवण्यासाठी, कारखाना समिती एक आयोग स्थापन करते. कामगारांचे वर्चस्व असलेल्या संस्थांनी आपल्या नियंत्रणासाठी आणि माहितीसाठी, व्यवसायाच्या सर्व तपशीलाची मागणी कारखान्याच्या व्यवस्थापन विभागाकडे केल्यास ती द्यावी; त्या तपशीलाची सत्यता पडताळून पाहणे त्यांना शक्य करावे आणि कारखाना समित्यांनी मागणी केल्यास कंपनीच्या चोपड्या त्यांच्या हवाली कराव्या.

१६. व्यवस्थापन विभागाच्या कोणत्याही बेकायदेशीर कृत्यांचा कारखाना समित्यांना शोध लागल्यास, किंवा अशा बेकायदेशीर कृत्यांची कोणतीही शंका आल्यास, ज्यांची केवळ कामगारांतर्फे चौकशी होणे अथवा ज्यांच्यावर उपाय करणे शक्य नाही, त्या गोष्टी ज्या विशिष्ट श्रम-शाखेशी संबंधित आहेत अशा कारखाना समित्यांच्या विभागीय केंद्रीय संघटनेकडे सोपवाव्या; म्हणजे त्या संघटना सदर बाबींबाबत सार्वत्रिक औद्योगिक योजनेची अंमलबजावणी करणाऱ्या संस्थांशी चर्चा करतील व त्यावर उपाययोजना शोधून काढतील आणि आवश्यकता भासल्यास कारखाना जप्त करण्यापर्यंतसुद्धा कारवाई करतील.

१७. भिन्न व्यावसायिक संस्थांच्या कारखाना समित्यांची युनियन ही भिन्न व्यवसायांच्या आधारावर स्थापन केली पाहिजे; त्यामुळे उद्यमाच्या सबंध शाखेवर नियंत्रण ठेवणे सोपे जाईल व सार्वत्रिक औद्योगिक योजनेत तिचा समावेश करता येईल; तसेच भिन्न कारखान्यांमध्ये मालाच्या मागण्यांच्या नोंदी, कच्चा माल, इंधन, तांत्रिक आणि श्रमिक शक्ती यांच्या वाटपाची प्रभावी योजना निर्माण करता येईल; आणि उद्यमांनी संघटित केलेल्या ट्रेड युनियनांशी सहकार्य करणे सुलभ जाईल.

१८. ट्रेड युनियनांची आणि कारखाना समित्यांची मध्यवर्ती नगर मंडळे, सार्वत्रिक औद्योगिक योजना तयार करून तिची अंमलबजावणी करण्यासाठी आणि शहरे व खेडी (कामगार व किसान) यांच्यामध्ये आर्थिक संबंध संघटित करण्यासाठी स्थापन झालेल्या संबंधित प्रांतिक आणि स्थानिक संस्थांमध्ये कामगारवर्गाचे प्रतिनिधित्व करतात. त्यांच्या विभागामधील कामगारांच्या वर्चस्वापुरते बोलायचे झाल्यास, कारखाना समित्यांच्या व ट्रेड युनियनांच्या व्यवस्थापनाबाबतचे अंतिम अधिकार त्यांच्याच हाती आहेत व उत्पादनाच्या दैनंदिन क्रमातील कामगारांच्या शिस्तीसंबंधीचे आज्ञापालन करावयाचे नियम त्या जाहीर करतील – मात्र हे नियम खुद्द कामगारांच्या मतदानाने संमत करून घेतले पाहिजेत.*

## २

## बोल्शेविकांबाबत भांडवलदारी वर्तमानपत्रांची मते

**'रूस्काया वोल्या'**, २८ ऑक्टोबर. "निर्णायक क्षण येत आहे... बोल्शेविकांच्या दृष्टीने तो निर्णायक आहे. एक तर ते आमच्यापुढे १६-१८ जुलैच्या घटनांची दुसरी आवृत्ती सादर करतील,

---

*जॉन रीड यांनी १९ वा परिच्छेद गाळला आहे: "देशव्यापी प्रमाणावर कामगारांचे वर्चस्व स्थापन झाले पाहिजे अशी मागणी ही परिषद करते आहे आणि कामगारांना आवाहन करते आहे की, शक्य आहे त्या प्रत्येक ठिकाणी शक्तींच्या वाटपाबाबत कामगारांच्या नियंत्रणाची आत्तासुद्धा अंमलबजावणी करावी; तसेच जाहीर करीत आहे की, स्वार्थासाठी कामगारांनी कारखान्यांना आपल्या ताब्यात घेणे हे कामगारांच्या वर्चस्वाच्या उद्दिष्टांशी विसंगत आहे." – सं.

किंवा त्यांना मान्य करावे लागेल की त्यांच्या योजनांमुळे आणि हेतूंमुळे, राष्ट्रीय स्वरूपाच्या प्रत्येक बाबीपासून जाणीवपूर्णरीत्या अलग राहण्याच्या त्यांच्या उद्धट धोरणामुळे, त्यांचा निखालस पराभव झाला आहे...

"बोल्शेविकांना यश मिळण्याच्या कितपत शक्यता आहेत?

"त्या प्रश्नाला उत्तर देणे अवघड आहे, कारण जनतेचे अज्ञान हाच त्यांचा मुख्य आधार आहे. त्यावर त्यांचे सारे आडाखे आधारलेले आहेत आणि त्यावर ते एवढी अफाट भाषणबाजी करतात की, कोणतीही गोष्ट तिला थांबवू शकत नाही...

"या बाबतीत सरकारने आपली भूमिका बजावली पाहिजे. प्रजासत्ताक मंडळाचा नैतिक पाठिंबा घेऊन, बोल्शेविकांबाबत स्पष्ट भूमिका स्वीकारणे सरकारला भाग आहे...

"आणि जर बोल्शेविकांनी वैध सत्तेविरुद्ध बंडाची चिथावणी दिली व अशा प्रकारे जर्मन आक्रमणाला सुलभता मिळवून दिली, तर त्यांचा बंडखोर आणि देशद्रोही म्हणून समाचार घेतला पाहिजे..."

'**बिर्झेवियें वेदोमोस्ती**', २८ ऑक्टोबर. "बाकीच्या लोकशाहीवादी पक्षांपासून आता बोल्शेविक अलग झाले असल्याने, त्यांच्याविरुद्ध संघर्ष करणे अगदीच सोपे झाले आहे—आणि जोपर्यंत ते आपली अभिव्यक्ती करीत नाहीत तोपर्यंत गप्प बसून वाट पाहणे, हे त्यांच्या विरुद्ध लढण्याच्या दृष्टीने तर्कसंगत ठरणार नाही. सरकारने त्यांना निदर्शने करायला सुद्धा परवानगी देऊ नये...

"बोल्शेविकांनी केलेली उठावाची आणि अराजकाची आवाहने ही फौजदारी न्यायालयांच्या दृष्टीने दंडार्ह कृत्ये आहेत व अगदी कमाल स्वतंत्र देशांमध्ये सुद्धा या आवाहनांच्या लेखकांना अत्यंत कडक शिक्षा होतील. कारण बोल्शेविक जे काही करीत आहेत तो सरकारविरुद्धचा लढा नाही किंवा सत्तेसाठी दिलेला लढा सुद्धा नव्हे; तो आहे निव्वळ प्रचार—अराजक माजवण्याचा, कत्तली करण्याचा आणि यादवी युद्ध पुकारण्याचा. या प्रचाराचा पार मूळांपासून उच्छेद केला पाहिजे; गुंडगिरी प्रत्यक्ष घडेपर्यंत, गुंडगिरीच्या चळवळीविरुद्ध कारवाई करण्याचे थांबून राहणे अगदी चमत्कारीक ठरेल..."

'**नोवोये व्रेम्या**', १ नोव्हेंबर. "...नोव्हेंबरच्या २ तारखेबाबत

( सोविएतांची काँग्रेस भरविण्याची तारीख ) सरकार एवढे का उत्तेजित बनले आहे, आणि १२ सप्टेंबर किंवा ३ ऑक्टोबरबाबत तसे का नव्हते ?

"रशिया जळून भस्मसात होण्याची ही काही पहिलीच वेळ नाही आणि या भयानक अग्निकांडाच्या धुराने आमच्या दोस्तांचे डोळे चुरचुरत आहेत...

"सत्तेवर आल्यापासून, अराजक थोपविण्याच्या उद्देशाने सरकारने एक तरी हुकूम जाहीर केला आहे काय, किंवा रशियामधील अग्निकांडाला विझविण्याचा कुणी तरी प्रयत्न केला आहे काय ?

"आणखी अनेक गोष्टी करायच्या होत्या...

"सरकारने अधिक तातडीच्या समस्यांकडे आपले लक्ष दिले. त्याने बंड चिरडले ( कोर्निलोव यांचा प्रयत्न ), ज्याबाबत प्रत्येक जण आता विचारतो आहे, "मुळात ते घडले होते ?"

३

## नेमस्त समाजवादी वर्तमानपत्रांची बोल्शेविकांबाबतची मते

**'देलो नरोदा'**, २८ ऑक्टोबर ( समाजवादी-क्रांतिकारक ). "क्रांतीविरुद्ध बोल्शेविकांचा सर्वात घोर अपराध म्हणजे, सध्या जनता सोसत असलेल्या सर्व संकटांना क्रांतिकारक सरकारचे वाईट धोरण सर्वस्वी कारणीभूत ठरले आहे असा त्यांनी केलेला आरोप ; प्रत्यक्षात ही संकटपरंपरा वस्तुनिष्ठ कारणांमुळे उद्‌भवली आहे.

"एकही आश्वासन पूर्ण करणे आपल्याला शक्य नाही हे आधी माहीत असूनही, जनतेला ते मोठमोठी आश्वासने देतात ; जनतेला ते चुकीच्या दिशेने वाहवत नेतात आणि तिच्या संकटांचे मूळ कुठे आहे याबाबत तिची फसवणूक करतात...

"बोल्शेविक हे क्रांतीचे सर्वांत धोकेबाज शत्रू आहेत..."

**'देन'**, ३० ऑक्टोबर ( मेन्शेविक ). "हे खरेच "वृत्तपत्रस्वातंत्र्य" आहे काय ? प्रत्येक दिवशी 'नोवाया रूस' आणि 'राबोची पूत' उघडपणे बंडाची चिथावणी देत आहेत. दररोज ही दोन वृत्तपत्रे

आपल्या स्तंभांमधून प्रत्यक्ष गुन्हे करीत आहेत. दररोज ती गुडगिरी करण्याचा आग्रह धरीत आहेत... यालाच "वृत्तपत्रस्वातंत्र्य" म्हणतात काय?

"सरकारने स्वतःचे रक्षण केले पाहिजे आणि आमचेही रक्षण केले पाहिजे. नागरिकांच्या जीवितांना रक्तपाती दंग्यांचा धोका निर्माण झालेला असताना सरकारी यंत्रणेने गप्प राहू नये असा आग्रह धरण्याचा आम्हाला हक्क आहे..."

४

## 'येदिन्स्त्वो'

बोल्शेविकांनी सत्ताग्रहण केल्यानंतर काही आठवड्यांनी, प्लेखानोव यांच्या 'येदिन्स्त्वो' वर्तमानपत्राने आपले प्रकाशन थांबवले. सोविएत सरकारने 'येदिन्स्त्वो' बंद पाडले असा प्रवाद होता, पण ते मुळीच खरे नव्हते; त्याच्या शेवटच्या अंकात जाहीर केले होते की, वर्गणीदारांच्या अभावी आपले प्रकाशन पुढे चालू ठेवणे अशक्य ठरले आहे...

५

## बोल्शेविक कारस्थानी होते काय?

'एन्टॉन्ट' नांवाच्या पेत्रोग्रादमधील फ्रेंच वृत्तपत्राने १५ नोव्हेंबर रोजी प्रसिद्ध केलेल्या लेखामधून पुढील भाग उद्धृत केला आहे:

"केरेन्स्कींचे सरकार चर्चा करते आणि घुटमळत राहते. लेनिन आणि ट्रॉट्स्की यांचे सरकार हल्ला चढवते आणि कृती करते.

"या शेवटच्या सरकारला कारस्थान्यांचे सरकार म्हणतात, पण ते खोटे आहे. बळाने सत्ता काबीज करणाऱ्यांचे हे सरकार आहे यात काही शंका नाही; सर्व क्रांतिकारक सरकारे याच प्रकारे आपल्या विरोधकांवर मात करतात. पण ते कारस्थानी नक्कीच नाहीत!

"नाही! त्यांनी कारस्थान केले नाही. उलट उघडपणे, धाडसाने शाब्दिक घोळ न घालता, आपल्या हेतूंना लपवून न ठेवता, त्यांनी आपली चळवळ वाढवली, कारखान्यांमध्ये, बराकींमध्ये, आघाडीवर,

देशात, सर्वत्र, आपला प्रचार तीव्र केला, एवढेच नव्हे तर हाती शस्त्रे घेण्याची तारीख, सत्ता काबीज करण्याची तारीख त्यांनी आधीच जाहीर केली...

"ते – आणि कारस्थानी? कधीही नाही..."

## ६

## उठावाविरुद्ध आवाहन

### मध्यवर्ती सेना समितीतर्फे

"...आमचा सर्वांत पहिला आग्रह असा आहे की, प्रजासत्ताक मंडळ आणि केंद्रीय कार्यकारी समिती यांच्या साहाय्याने, जनतेच्या सत्तेची संस्था या नात्याने, हंगामी सरकारने बहुसंख्य लोकांच्या संघटित इच्छाशक्तीची खंबीरपणे अंमलबजावणी करावी...

"सरकारमध्ये अरिष्ट निर्माण झाल्यास या क्षणाला हमखासपणे गोंधळ माजण्याची, देशाचा नाश घडण्याची आणि यादवी युद्ध पेटण्याची शक्यता असताना, जर कुणी हिंसक मार्गाने या सत्तेला पदभ्रष्ट करण्याचा प्रयत्न केला, तर ते प्रतिक्रांतिकारक कृत्य आहे असे सेना मानील आणि शस्त्र-बळावर ते दडपून टाकील...

"खाजगी गटांनी आणि वर्गांनी एकच एक उद्दिष्ट बाळगले पाहिजे – औद्योगिक उत्पादनात वाढ करणे आणि जीवनावश्यक वस्तूंचे अधिक चांगल्या तऱ्हेने वाटप करणे...

"जे लोक घातपात, गोंधळ करू शकतील किंवा अव्यवस्था माजवू शकतील अशा सर्वांना, सर्व पळपुट्यांना, सर्व कामचुकारांना, सर्व लुटारूंना, सैन्याच्या पिछाडीला साहाय्यक कामे करायला वेठीला लावले पाहिजे...

"आम्ही हंगामी सरकारला आवाहन करतो की, या जनतेच्या इच्छाशक्तीला विरोध करणाऱ्या लोकांच्या, या क्रांतीच्या शत्रूंच्या, मजूर तुकड्या पिछाडीला, आघाडीवर, शत्रू आग ओकीत असताना खंदकांमध्ये, कामे करण्यासाठी बनवून पाठवाव्या..."

## ७

## ६ नोव्हेंबरच्या रात्रीमधील घटना

संध्याकाळच्या सुमाराला लाल रक्षकांच्या तुकडयांनी भांडवलदारी वर्तमानपत्रांचे छापखाने ताब्यात घ्यायला आरंभ केला व तेथे 'राबोची पूत', 'सोल्दात' या वृत्तपत्रांची व वेगवेगळ्या घोषणांची लाखो पत्रके छापली. नगर रक्षकांना या ठिकाणांना मोकळे करण्याचे हुकूम देण्यात आले, पण या कचेऱ्यांसमोर अडथळे उभारल्याचे व सशस्त्र माणसे त्यांचे रक्षण करीत असल्याचे आढळून आले. या छापखान्यांवर हल्ला चढविण्याचा सैनिकांना हुकूम दिला तेव्हा सैनिकांनी तसे करण्याचे नाकारले.

मध्यरात्रीच्या सुमाराला, 'राबोची पूत'च्या संपादकाला अटक करण्याचे वॉरंट घेऊन, युंकरांच्या तुकडीसह एक कर्नल 'मुक्त मन' नांवाच्या क्लबात आले. तात्काळ बाहेर रस्त्यावर लोकांचा महाप्रचंड जमाव एकत्र झाला आणि युंकरांना जिवे मारण्याची त्याने धमकी घातली. तेव्हा कर्नलनी विनवणी केली की, त्यांना स्वतःला आणि युंकरांना अटक करावी व सुरक्षिततेसाठी पीटर-पॉल तुरुंगात न्यावे. त्यांची विनंती मान्य करण्यात आली.

रात्री १ वाजता, स्मोल्नीमधील सैनिकांच्या आणि खलाशांच्या तुकडीने तारकचेरीचा ताबा घेतला.* रात्री १ वाजून ३५ मिनिटांनी टपाल कचेरी ताब्यात घेण्यात आली. पहाटेच्या सुमाराला लष्करी हॉटेल घेण्यात आले व ५ वाजता टेलिफोन एक्श्चेंज घेण्यात आले.** सकाळी १० वाजता हेमंत प्रासादाभोवती शिपायांचे कडे उभे करण्यात आले.

# चौथ्या प्रकरणाचे परिशिष्ट

## १

## ७ नोव्हेंबरच्या घटना

पहाटे ४ वाजल्यापासून ते उजाडेपर्यंत पेत्रोग्रादच्या सेनाधिकाऱ्यांच्या मुख्य कचेरीत केरेन्स्की थांबले होते व कझाकांना आणि पेत्रोग्रादमधील

---

*तारकचेरी रात्री २ वाजता घेण्यात आली.—सं.

**टेलिफोन एक्श्चेंज सकाळी ७ वाजता घेण्यात आले.—सं.

आणि भोवतीच्या सेनाधिकारी विद्यालयांमधील युंकरांना आज्ञा धाडीत होते – पण त्या सर्वांनी उत्तर दिले की, त्यांना हलणे शक्य नाही.

नगराचे प्रमुख सेनाधिकारी कर्नल पाल्कोव्निकोव हाती कोणतीही योजना नसल्याने सेनाधिकारी कचेरीपासून हेमंत प्रासादापर्यंत धावपळ करीत होते. पूल वर उचलून घेण्याचा हुकूम केरेन्स्कींनी दिला; त्यानंतर तीन तास तसेच कोणत्याही कृतीविना गेले. मग स्वतःच पुढाकार घेऊन एक अधिकारी आणि पाच माणसे गेली व तेथे उभ्या असलेल्या लाल रक्षकांना पळवून लावून त्यांनी निकोलाय पूल वर उचलून घेतला. पण ते तेथून निघून जाताच काही खलाशांनी तो परत जोडला.

'राबोची पूत' जेथे छापत तो छापखाना ताब्यात घेण्याची केरेन्स्कींनी आज्ञा केली. ज्या अधिकाऱ्यावर ही कामगिरी सोपविली होती त्याला सैनिकांची एक अख्खी तुकडी सोबत देण्याचे आश्वासन देण्यात आले होते; त्यानंतर दोन तासांनी त्याच्याबरोबर काही युंकर देण्यात येतील असे आश्वासन देण्यात आले; नंतर ती आज्ञाच विसरली गेली.

टपाल कचेरी आणि तार कचेरी परत काबीज करण्याचा प्रयत्न झाला; काही बार उडाले आणि सरकारी सैनिकांनी सांगितले की, त्या-पुढे ते सोविएतांना विरोध करणार नाहीत.

युंकरांच्या एका प्रतिनिधीमंडळाला केरेन्स्की म्हणाले, "हंगामी सरकारचा प्रमुख या नात्यानं आणि सरसेनापती या नात्यानं मला काहीही माहीत नाही, मी तुम्हाला सल्ला देऊ शकत नाही; पण एक अनुभवी क्रांतिकारक म्हणून मी तुम्हाला आवाहन करतो की, तरुण क्रांतिकारकांनो, आपापल्या जागीच रहा आणि क्रांतीच्या विजयांचे रक्षण करा."

## किश्किन यांच्या आज्ञा, ७ नोव्हेंबर:

"हंगामी सरकारच्या आज्ञापत्रानुसार... पेत्रोग्रादमध्ये सुव्यवस्था पुनःप्रस्थापित करण्यासाठी माझ्या हाती खास अधिकार देण्यात आले आहेत, सर्व नागरी आणि लष्करी अधिकार देण्यात आले आहेत."

"हंगामी सरकारने माझ्या हाती दिलेल्या अधिकारांनुसार, कर्नल गेओर्गी पाल्कोव्निकोव यांना पेत्रोग्राद लष्करी विभागाच्या प्रमुखपदावरून मी दूर करीत आहे."

## उपपंतप्रधान कोनोवालोव यांच्या सहीचे जनतेला उद्देशून आवाहन, ७ नोव्हेंबर

"नागरिकहो! पितृभूमीचे, प्रजासत्ताकाचे आणि तुमच्या स्वातंत्र्याचे रक्षण करा! जनतेने निवडलेल्या एकमेव सरकारविरोधी, हंगामी सरकार-विरोधी पिसाट लोकांनी बंड उभारले आहे. हंगामी सरकारचे सदस्य आपापली कर्तव्ये पार पाडीत आहेत, आपापल्या जागी राहिले आहेत आणि पितृभूमीच्या कल्याणासाठी, सुव्यवस्था पुनःप्रस्थापित करण्यासाठी व रशियाची आणि सर्व रशियन जनतेची भावी सार्वभौम सत्ता असणाऱ्या घटनात्मक सभेच्या अधिवेशनासाठी पुढे कार्य चालू ठेवीत आहेत...

"नागरिकहो, तुम्ही हंगामी सरकारला पाठिंबा दिला पाहिजे. त्याच्या अधिकाराला तुम्ही बळकट केले पाहिजे. घटनात्मक सभा उधळून लावण्यासाठी, क्रांतीचे विजय नष्ट करण्यासाठी आणि आपल्या प्रिय पितृभूमीच्या भविष्याचा चुराडा करण्यासाठी, स्वातंत्र्याचे व सुव्यवस्थेचे सर्व शत्रू ज्यांना जाऊन मिळाले आहेत, झारशाही राजवटीचे अनुयायी ज्यांना सामील झाले आहेत, अशा पिसाटांना तुम्ही विरोध केला पाहिजे...

"नागरिकहो! सुव्यवस्था राखण्यासाठी आणि अखिल जनतेच्या सुखासाठी, हंगामी सरकारच्या तात्पुरत्या अधिकाराच्या रक्षणासाठी, त्याभोवती संघटित व्हा..."

## हंगामी सरकारचे जाहीर निवेदन

"पेत्रोग्राद सोविएतने... हंगामी सरकार उलथून टाकल्याचे जाहीर केले आहे आणि पीटर-पॉल किल्ल्यामधील तोफांमधून व नेवा नदीत नांगरून ठेवलेल्या 'आव्रोरा' युद्धनौकेवरून हेंमत प्रासादावर भडिमार करू अशी धमकी देऊन, सरकारी सत्ता आपल्या हाती देण्यात यावी अशी मागणी केली आहे.

"फक्त घटनात्मक सभेपुढेच सरकार आपले अधिकार परत देऊ शकेल; म्हणून या धमकीला भीक न घालण्याचे सरकारने ठरविले आहे व जनतेकडून आणि सैन्याकडून मदत घेण्याचे ठरविले आहे. मुख्य लष्करी ठाण्याला तार पाठवण्यात आली आहे; आणि तेथून मिळालेल्या उत्तरात म्हटले आहे की, कडव्या शिपायांची तुकडी पाठविण्यात येत आहे...

"पिछाडीला बंड निर्माण करण्याच्या बोल्शेविकांच्या बेजबाबदार प्रयत्नांचा सेनेने आणि जनतेने धिक्कार करावा..."

सकाळी सुमारे ९ वाजता केरेन्स्की युद्ध आघाडीकडे जायला निघाले . . . *

सायंकाळच्या सुमारास सेनाधिकारी मुख्य कचेरीत दोन सैनिक सायकलींवरून आले व पीटर-पॉल किल्ल्यामधील ठाणबंद फौजेचे आपण प्रतिनिधी आहोत असे त्यांनी सांगितले. सेनाधिकाऱ्यांच्या बैठकीच्या खोलीत प्रवेश करून – जेथे किश्किन, रूटनबर्ग, पाल्चिन्स्की, जनरल बग्रातूनी, कर्नल पारादेलोव आणि काऊंट तल्स्तोय जमले होते – त्यांनी मागणी केली की, सेनाधिकाऱ्यांनी ताबडतोब शरण यावे; जर नकार दिला तर मुख्य कचेरीवर तोफा डागू अशी धमकी घातली . . . दोन घाबरलेल्या वातावरणातील बैठकींनंतर, सेनाधिकाऱ्यांनी हेमंत प्रासादात माघार घेतली आणि मुख्य कचेरीचा लाल रक्षकांनी ताबा घेतला . . .

दुपारच्या उत्तरप्रहरी अनेक बोल्शेविक चिलखती गाड्या राजवाड्याच्या चौकाभोवती घिरट्या घालीत होत्या आणि युंकरांबरोबर वाटाघाटी करण्याचा सोविएतांना पाठिंबा देणाऱ्या सैनिकांनी अयशस्वी प्रयत्न केला . . .

संध्याकाळी सातच्या सुमाराला प्रासादावर भडिमार चालू झाला . . .

रात्री १० वाजता तीन बाजूंनी तोफांचा भडिमार चालू करण्यात आला; त्यातील बहुतेक तोफगोळे फुसके होते, फक्त तीन छोट्या कुलपी गोळयांचा प्रासादाच्या दर्शनी भागावर मार बसला . . .

## २

## हेमंत प्रासादामधील लुटालूट

हेमंत प्रासादात अजिबात लुटालूट झालीच नाही, असे सांगण्याचा माझा मुळीच इरादा नाही. हेमंत प्रासादाचा पाडाव होण्यापूर्वी आणि पाडाव झाल्यानंतर, अशा दोन्ही वेळी बरीच पळवापळवी झाली. पण सुमारे ५००,०००,००० रूबल किंमतीच्या मौल्यवान वस्तू पळविण्यात आल्या, असे समाजवादी-क्रांतिकारकांच्या 'नरोद' वर्तमानपत्राने आणि नगर दूमाच्या सदस्यांनी केलेले विधान मात्र धडधडीत अतिशयोक्तीपूर्ण होते.

राजवाड्यामधील अत्यंत महत्त्वाच्या कला-वस्तू – तैलचित्रे, पुतळे,

---

*केरेन्स्की यांनी बोलावलेल्या फौजांना "भेटण्यासाठी" ते पेत्रोग्रादहून सकाळी ११.३० वाजता गेले. – सं.

वेलबुट्टीदार पडदे, दुर्मीळ चिनी मातीची भांडी व शस्त्रास्त्रे – सप्टेंबर महिन्यातच मॉस्कोला हलविण्यात आल्या होत्या; आणि बोल्शेविक फौजांनी क्रेमलिनचा ताबा घेऊन दहा दिवस लोटल्यानंतरही, शाही राजवाड्याच्या तळघरात त्या सर्व वस्तू सुरक्षित होत्या. मी वैयक्तिकरीत्या याचा हवाला देऊ शकतो...

पण हेमंत प्रासाद काबीज केल्यानंतर अनेक दिवसपर्यंत आम जनतेला तेथे स्वैर संचाराची परवानगी देण्यात आली होती व त्या काळात काही व्यक्तींनी मात्र चांदीचे काटे-चमचे, घड्याळे, बिछाने, आरसे, बहुमोल चिनी मातीच्या व रत्नजडित फुलदाण्या लंपास केल्या. त्यांची किंमत सुमारे ५०,००० रूबल भरेल.

चोरीला गेलेल्या वस्तू परत मिळविण्यासाठी, चित्रकार आणि पुराण-वस्तुतज्ज्ञ यांचा एक खास आयोग सोविएत सरकारने ताबडतोब स्थापन केला. १४ नोव्हेंबरला दोन घोषणा करण्यात आल्या:

**"पेत्रोग्रादच्या नागरिकांनो!**

नोव्हेंबरच्या ७-८ तारखेच्या रात्री, हेमंत प्रासादामधून चोरीला गेलेल्या वस्तू शोधून काढण्यासाठी सर्व प्रयत्न करण्याचे आम्ही सर्व नागरिकांना तातडीचे आवाहन करतो आणि अशा वस्तू मिळाल्यास त्या हेमंत प्रासादाच्या मुख्य अधिकाऱ्याकडे नेऊन द्याव्या अशी विनंती करतो.

"ज्यांच्याकडे चोरलेल्या वस्तू, दुर्मीळ पुराणवस्तू सापडतील आणि अशा वस्तू लपवून ठेवल्याचा आरोप ज्यांच्यावर सिद्ध होईल, अशा सर्वांना दोषी ठरवून अत्यंत कडक शासन केले जाईल.

म्युझियम आणि कला-संग्रहांच्या संरक्षण
विभागाचे कमिस्सार,
**यात्मानोव, मान्देलबाऊम."**

**"रेजिमेंटच्या आणि नौदलाच्या समित्यांनो!**

नोव्हेंबर ७-८ च्या रात्री, रशियन जनतेची अविभाज्य मालमत्ता असलेल्या हेमंत प्रासादामधून अत्यंत मौल्यवान कला-वस्तू चोरीला गेल्या आहेत.

"चोरलेल्या वस्तू हेमंत प्रासादात परत आणून देण्यासाठी सर्वांनी प्रयत्नांची शिकस्त करावी, असे आम्ही तातडीचे आवाहन करतो.

कमिस्सार

**यात्मानोव, मान्देलबाऊम.**"

चोरीला गेलेल्या वस्तूपैकी निम्म्या वस्तू परत मिळविण्यात आल्या. त्यांपैकी काही वस्तू रशिया सोडून जाणाऱ्या परदेशी लोकांच्या सामानात सापडल्या.

स्मोल्नीच्या सूचनेवरून भरलेल्या चित्रकारांच्या आणि पुराणवस्तुतज्ज्ञांच्या परिषदेने, हेमंत प्रासादामधील भांडारांची सूची तयार करण्यासाठी एक आयोग स्थापन केला; राजवाड्याचा आणि पेत्रोग्रादमधील सर्व कला-संग्रहांचा व सरकारी वस्तुसंग्रहालयांचा संपूर्ण ताबा या आयोगाकडे सोपविण्यात आला होता.

सूची तयार करण्याचे काम चालू झाले तेव्हा १६ नोव्हेंबरला हेमंत प्रासाद आम जनतेसाठी बंद करण्यात आला...

नोव्हेंबरच्या शेवटच्या आठवड्यात, हेमंत प्रासादाचे नांव बदलून त्याला 'जनतेचे वस्तुसंग्रहालय' असे नवे नांव देणारे, त्याचा संपूर्ण ताबा कला-पुराणवस्तुतज्ज्ञ आयोगाकडे सोपविणारे आणि इतःपर त्याच्या आवारात सर्व सरकारी कार्यांना मनाई करणारे आज्ञापत्र जन-कमिस्सारांच्या मंडळाने प्रसृत केले...

## ३

## महिला पलटणीवरील बलात्कार

बोल्शेविकांनी हेमंत प्रासाद ताब्यात घेतल्यानंतर, प्रासादाचे रक्षण करणाऱ्या महिला पलटणीविषयी तऱ्हेतऱ्हेच्या सनसनाटी बातम्या बोल्शेविक-विरोधी वृत्तपत्रांमधून ताबडतोब छापून येऊ लागल्या. तसेच या महिला पलटणीच्या भवितव्याबाबत नगर दूमामध्येही चिंता व्यक्त करण्यात येऊ लागल्या. असे सांगण्यात येत होते की, काही महिला सैनिकांना खिडक्यांमधून रस्त्यावर फेकून देण्यात आले, उरलेल्या बहुतेकींवर बलात्कार करण्यात आले व भोगाव्या लागलेल्या महाभयंकर यातनांमुळे त्यांच्यापैकी अनेकींनी आत्म-हत्या केल्या.

या प्रकरणी चौकशी करण्यासाठी नगर दूमाने एक आयोग नेमला. महिला पलटणीचे मुख्य ठाणे असलेल्या लेवाशोवो येथून चौकशी करून आयोगाचे सदस्य १६ नोव्हेंबरला परतले. मादाम तिर्कोवा यांनी अहवाल सादर केला की, मुलींना प्रथम पाव्लोव्स्की रेजिमेंटच्या बराकींमध्ये नेण्यात आले आणि तिथे त्यांच्यापैकी काहीजणींना वाईट वर्तणूक देण्यात आली; पण सध्या त्यांच्यापैकी बहुतेकजणी लेवाशोवो येथे आहेत आणि उरलेल्या शहरातल्या खाजगी घरांमधून विखुरल्या आहेत. आयोगामधील डॉ. मान्देलबाऊम यांनी शुष्कपणे सांगितले की, हेमंत प्रासादाच्या खिडक्यांमधून **एकाही** महिलेला रस्त्यावर फेकण्यात आले **नाही**, तिघींवर बलात्कार झाला आणि "आपल्या आदर्शांबाबत निराशा झाली," अशी चिठ्ठी ठेवून एकीने आत्महत्या केली.

नोव्हेंबरमध्ये मुलींनी स्वतःच केलेल्या विनंतीनुसार, लष्करी क्रांतिकारक समितीने महिला पलटण अधिकृतरीत्या विसर्जित केली व त्या मुली पुन्हा नागरी वेषात वावरू लागल्या.

लुईस ब्रयांट यांच्या 'रशियातील सहा लाल महिने' नांवाच्या पुस्तकात, या काळामधील महिला सैनिकांबाबत मोठे रंजक वर्णन आहे.

# पाचव्या प्रकरणाचे परिशिष्ट

## १

## आवाहने आणि घोषणा

**लष्करी क्रांतिकारक समितीकडून, ८ नोव्हेंबर:**

**"सर्व सेना समित्या आणि सैनिक प्रतिनिधींची सर्व सोविएते यांना उद्देशून:**

"क्रांतीविरुद्ध आणि जनतेविरुद्ध उठलेल्या केरेन्स्की सरकारला पेत्रोग्रादच्या शिबंदीने उलथून टाकले आहे...

"आघाडीवर आणि देशभर ही बातमी पाठवीत असताना लष्करी क्रांतिकारक समिती सर्व सैनिकांना विनंती करीत आहे की, त्यांनी आपल्या अधिकाऱ्यांच्या वर्तनावर अत्यंत दक्ष नजर ठेवावी. जे अधिकारी मोकळेपणाने आणि उघडपणाने क्रांतीचा कैवार घेणार नाहीत त्यांना शत्रू समजून ताबडतोब अटक करावी.

"पेत्रोग्राद सोविएत नव्या सरकारच्या कार्यक्रमाचा पुढीलप्रमाणे अर्थ लावते आहे: सार्वत्रिक लोकशाहीवादी शांतता तहाची तात्काळ बोलणी करणे, मोठ्या जमीनविषयक मालमत्ता ताबडतोब किसानांच्या हाती सोपवणे, सर्व सत्ता सोविएतांच्या हाती देणे आणि घटनात्मक सभेचे प्रामाणिकपणे अधिवेशन भरविणे. ज्या लष्करी तुकड्यांचे नीतीधैर्य शंकास्पद आहे अशांना जनतेच्या क्रांतिकारक सेनेने पेत्रोग्रादला पाठवू नये. युक्तिवादाने पटवायचा प्रयत्न करा, नैतिक आग्रह धरून पहा – पण हे प्रयत्न फसले तर कठोरपणे **बळाचा वापर करून** सैनिकांच्या हालचालींना प्रतिबंध करा.

"सेनादलाच्या प्रत्येक शाखेतील सर्व लष्करी तुकड्यांमध्ये हा हुकूम ताबडतोब वाचून दाखवण्यात यावा. हा हुकूम जो कोणी सैनिकांपासून लपवून ठेवील तो क्रांतीविरुद्ध अत्यंत गंभीर गुन्हा करीत आहे आणि त्याला क्रांतिकारक कायद्यानुसार अत्यंत कडक शासन करण्यात येईल.

"सैनिकहो! शांतता, भाकरी, जमीन आणि जनतेच्या सरकारसाठी उभे रहा!

**लष्करी क्रांतिकारक समिती."**

**"आघाडीवरील आणि पिछाडीवरील सर्व सेनांच्या, कोअरच्या, डिव्हिजनच्या, रेजिमेंटच्या, कंपन्यांच्या समित्या, आणि कामगार, सैनिक व किसान प्रतिनिधींची सर्व सोविएते यांना उद्देशून:**

सैनिकहो आणि क्रांतिकारक अधिकाऱ्यांनो!

बहुसंख्य कामगारांच्या, सैनिकांच्या आणि किसानांच्या संमतीने लष्करी क्रांतिकारक समितीने हुकूम काढला आहे की, जनरल कोर्निलोव आणि त्यांच्या कटात सामील झालेले त्यांचे सर्व हस्तक यांना पीटर-पॉल किल्ल्यात कैद करून ठेवण्यासाठी आणि लष्करी क्रांतिकारक न्यायालयासमोर त्यांचा गुन्हा शाबित करण्यासाठी ताबडतोब पेत्रोग्रादला आणण्यात यावे...

"या आज्ञेची अंमलबजावणी करण्यास जे कुणी विरोध करतील त्यांना समिती क्रांतीचे द्रोही ठरवीत आहे आणि इत:पर त्यांचे हुकूम रद्दबातल ठरविण्यात येतील.

**कामगार आणि सैनिक प्रतिनिधींच्या पेत्रोग्राद सोविएतला जोडलेली लष्करी क्रांतिकारक समिती."**

**"कामगारांच्या, सैनिकांच्या आणि किसानांच्या प्रतिनिधींच्या सर्व प्रांतिक आणि विभागीय सोविएतांना उद्देशून :**

सोविएतांच्या अखिल रशियन काँग्रेसच्या ठरावान्वये, भूमी समित्यांच्या अटक केलेल्या सर्व सदस्यांना ताबडतोब मुक्त करण्यात येत आहे. ज्या कमिस्सारांनी त्यांना अटक केली होती, त्यांनाच अटक करण्यात यावी. या क्षणापासून सर्व सत्ता सोविएतांच्या हाती आहे. हंगामी सरकारच्या कमिस्सारांना त्यांच्या अधिकारावरून दूर करण्यात आले आहे. वेगवेगळ्या स्थानिक सोविएतांच्या अध्यक्षांनी क्रांतिकारक सरकारशी थेट संपर्क साधावा.

**लष्करी क्रांतिकारक समिती."**

## २

## नगरपालिकेच्या दूमातर्फे निषेध

"आत्यंतिक लोकशाहीवादी तत्त्वांनुसार निवडल्या गेलेल्या मध्यवर्ती नगर दूमाने, **कमालीचा** गोंधळ माजलेल्या या काळामध्ये, नगरपालिकेचा कारभार हाकण्याचा व अन्नपुरवठा करण्याचा भार आपल्या शिरावर घेतला आहे. या क्षणाला, घटनात्मक सभेच्या निवडणुकांना अवघा तीन आठवड्यांचा अवधी उरला असताना, आणि बाहेरील शत्रूचा जबरदस्त धोका असताना, शस्त्रबळाच्या जोरावर एकमेव वैध क्रांतिकारक सत्तेला बाजूला सारून, नगरपालिकेच्या स्वयंशासनाच्या हक्कांविरुद्ध आणि स्वातंत्र्याविरुद्ध बोल्शेविक पक्ष कारवाया करू पहात आहे व त्याच्या कमिस्सारांच्या आणि अवैध सत्तेच्या आधीन व्हावे अशी मागणी करीत आहे.

"या अत्यंत भयानक आणि दारुण क्षणी, पेत्रोग्राद नगर दूमा आपल्या मतदारांसमोर आणि अखिल रशियासमोर जोरदारपणे जाहीर करीत आहे की, तिच्या हक्कांवर आणि स्वातंत्र्यावर कोणत्याही प्रकारचे आक्रमण ती कधीही सहन करणार नाही व राजधानीमधील जनतेच्या इच्छेनुसार ज्या पदावर तिला पाचारण करण्यात आले त्या जबाबदारीच्या पदावर ती कायम राहील.

"पेत्रोग्रादची मध्यवर्ती नगर दूमा रशियन प्रजासत्ताकामधील सर्व दूमांना आणि झेम्स्त्वोंना आवाहन करते आहे की, रशियन क्रांतीच्या एका महान विजयाच्या – जनतेच्या स्वयंशासनाच्या स्वातंत्र्याच्या आणि अभंगत्वाच्या – रक्षणासाठी त्यांनी एकवटावे."

३

# “भूमीविषयक आज्ञापत्र

( किसानांचे आदेशपत्रक )

“जमिनीचा प्रश्न कायमचा निकालात काढणे फक्त सार्वत्रिक घटनात्मक सभेलाच शक्य आहे.

जमिनीच्या प्रश्नाची अत्यंत न्याय्य सोडवणूक पुढीलप्रमाणे व्हावी:

१. **जमिनीची खाजगी मालकी असण्याचा हक्क कायमचा नष्ट करण्यात आला आहे;** जमीन विकता येणार नाही, कराराने देता येणार नाही, गहाण टाकता येणार नाही किंवा अन्य स्वरूपात तिला दुसऱ्याच्या मालकीची करता येणार नाही. राज्याच्या मालकीच्या सर्व जमिनी, **सम्राटाच्या परिवारातील लोकांच्या जमिनी, मठांच्या, प्रार्थनामंदिरांच्या मालकीच्या जमिनी, वंशपरंपरेच्या जमिनी, खाजगी इस्टेटी, सार्वजनिक जमिनी, किसानांच्या जमिनी आणि इतर सर्व प्रकारच्या जमिनी कोणतीही नुकसानभरपाई न देता जप्त करण्यात येत आहेत** व त्या आता राष्ट्राची मालमत्ता बनल्या असून त्यांना कसणाऱ्यांच्या ताब्यात देण्यात आल्या आहेत.

मालमत्तेच्या हक्कांच्या या सामाजिक स्थित्यंतरामुळे ज्यांचे नुकसान झाले आहे अशा लोकांना, नव्या परिस्थितीशी जुळवून घेण्यास आवश्यक तो अवधी लागेपर्यंत, सार्वजनिक मदत मिळू शकेल.

२. जमिनीच्या गर्भामधील सर्व संपत्ती – कच्चे धातू, तेल, कोळसा, मीठ, इ. – तसेच राष्ट्रीय महत्त्वाची जंगले आणि जलाशय, पूर्णतया राज्याच्या मालकीची बनली आहेत. सर्व छोटे ओढे-नाले, तळी आणि छोटी जंगले, सरकारच्या स्थानिक संस्थांकडून सांभाळली जाण्याच्या अटीवर सामुदायिक वापरासाठी देण्यात येत आहेत.

३. **शास्त्रशुद्धरीत्या लागवड केलेले** जमिनीचे सर्व तुकडे – उद्याने, मळे, रोपट्यांच्या व बियाण्यांच्या पैदाशी, वनस्पतीगृहे व इतर – **विभागले जाणार नाहीत तर त्यांचे आदर्श शेतांमध्ये रूपांतर करण्यात येईल** व त्यांच्या आकारमानानुसार आणि महत्त्वानुसार **राज्याच्या किंवा सामुदायिकाच्या** हाती सोपविण्यात येतील.

इमारतींलगतचे, सामुदायिक जमिनींलगतचे आणि खेड्यांमधील खाजगी मालकीचे वाफे व फळबागा त्यांच्या सध्याच्याच मालकांच्या ताब्यात राह-

तील ; या वाफ्यांचा आकार व त्यांच्यावरील कर-आकारणी कायद्याने निर्णित करण्यात येईल.

४. सर्व घोड्यांचे तबेले, सरकारी व खाजगी पशुसंवर्धन आणि पक्षी-संवर्धन केंद्रे व इतर केंद्रे जप्त करून त्यांना राष्ट्रीय मालमत्ता बनविण्यात आली आहे आणि त्यांच्या आकारमानानुसार व महत्त्वानुसार त्यांना एक तर सरकारच्या किंवा सामुदायिकाच्या ताब्यात देण्यात येत आहे.

उपरोक्त गोष्टींच्या नुकसानभरपाईसंबंधीचे सर्व प्रश्न घटनात्मक सभेच्या कक्षेत येतात.

५. जप्त केलेल्या जमिनींवरील सर्व शेतकी मालमत्ता, यंत्रसामग्री व गुरेढोरे, कोणतीही नुकसानभरपाई न देता, त्यांच्या आकारमानानुसार आणि महत्त्वानुसार सरकारच्या किंवा सामुदायिकांच्या ताब्यात देण्यात येतील.

किसानांच्या छोट्या मालमत्तांवर अशी यंत्रसामग्री किंवा गुरेढोरे जप्त करण्याचा कायदा लागू करण्यात येणार नाही.

६. जे लोक आपल्या कुटुंबियांच्या साहाय्याने स्वतः जमिनी कसू इच्छितात किंवा भागीदारीत कसू इच्छितात अशा सर्व नागरिकांना, कोणत्याही प्रकारचा लिंगभेद न करता, जोपर्यंत ते कार्यक्षम आहेत तोपर्यंत जमिनीचा वापर करण्याचा हक्क मंजूर करण्यात आला आहे. भाडोत्री मजूर घेण्यास मात्र परवानगी नाही.

एखाद्या कम्यूनचा सदस्य जर दोन वर्षांच्या अवधीपर्यंत काम करण्यास अक्षम ठरला, तर त्या काळात त्याची जमीन सामुदायिकरीत्या कसून त्याला साहाय्य करणे कम्यूनवर बंधनकारक राहील.

जे शेतकरी वार्धक्यामुळे किंवा आजारपणामुळे काम करण्यास कायमचे अक्षम ठरतील, त्यांनी आपल्या जमिनी सरकारच्या ताब्यात द्याव्यात व त्याबदली सरकारी पेन्शन घ्यावे.

७. जमिनीच्या वापराचे समानीकरण करण्यात यावे — म्हणजे स्थानिक परिस्थितीनुसार, श्रमाच्या प्रमाणानुसार आणि व्यक्तीच्या गरजांनुसार, कामगारांमध्ये जमिनीचे वाटप करण्यात यावे.

जमिनीचा वापर कसा करावयाचा ते वैयक्तिकरीत्या ठरविले जाईल : घरगोठे करायचे, शेतमळे करायचे, कम्यूनद्वारा जमीन कसायची अथवा भागीदारीत कसायची, याचे निर्णय खेडी व वस्त्या आपापल्या मगदुरानुसार घेतील.

८. जप्त केलेली सर्व जमीन सार्वत्रिक जनता भूमी निधीमध्ये एकत्रित केलेली आहे. तिचे कामगारांमध्ये वाटप करण्याचे काम शासनाच्या स्थानिक व केंद्रीय संस्थांतर्फे केले जाते; खेड्यातील लोकशाहीवादी संघटनांपासून त्यांचा आरंभ होतो व केंद्रीय प्रांतिक संस्थांमध्ये त्यांची अखेर होते.

जनसंख्येमधील वाढीनुसार आणि उत्पादकतेच्या व ग्रामीण अर्थव्यवस्थेच्या विकासानुसार, भूमी निधीचे मधून मधून फेरवाटप करण्यात येईल.

ज्यावेळी दिलेल्या जमिनींच्या सीमांची फेरआखणी करण्याची वेळ येईल, त्यावेळी त्या जमिनींचे मूळ केंद्र कायम राहील.

सामुदायिकामधून निवृत्त होणाऱ्या लोकांची जमीन भूमी निधीकडे परत जाते; त्या निवृत्त लोकांच्या नजीकच्या नातेवाईकांचा किंवा त्या लोकांनी नियुक्त केलेल्यांचा त्या जमिनींच्या फेरवाटपात प्राधान्याने हक्क राहील.

जमिनी भूमी निधीकडे परत देण्याच्या वेळी जर त्या जमिनींमध्ये खतांसाठी किंवा जमिनींचा कस सुधारण्यासाठी काही पैसे खर्च केले असतील आणि त्या सुधारीत अंशाचा पूर्ण उपभोग न घेता तो कस जर जमिनीत उरला असेल, तर त्या प्रमाणात पैसे परत दिले जातील.

जर काही स्थळी स्थानिक जनतेच्या गरजा भागविण्यास भूमी निधी अपुरा पडत असेल, तर जादा लोकसंख्येने स्थलांतर करावे.

स्थलांतराची व्यवस्था, त्यासाठी होणारे खर्च, स्थलांतरितांना आवश्यक यंत्रसामग्री व गुरेढोरे पुरविण्याचे काम, ही राज्याची जबाबदारी राहील.

स्थलांतर पुढील क्रमाने अंमलात आणले जाईल: प्रथम, स्थलांतराची इच्छा प्रकट करणारे भूमीहीन शेतकरी; नंतर सामुदायिकातील नको असलेल्या व्यक्ती, सैन्यातून पळून आलेले लोक इ., आणि अखेरीस, आपापसात चिठ्ठ्या टाकून.

या आदेशपत्रकामध्ये ज्या गोष्टींचा समावेश आहे त्या म्हणजे रशियातील प्रचंड बहुसंख्य सुजाण किसानांच्या इच्छेची अभिव्यक्ती असल्याने, हा तात्पुरता कायदा म्हणून जाहीर करण्यात येत आहे व घटनात्मक सभेचे अधिवेशन सुरू होईपर्यंत, किसान प्रतिनिधींची विभागीय सोविएते ठरवतील त्यानुसार, जास्तीत जास्त लौकर हा कायदा अंमलात आणण्यात येईल आणि कायद्याचे काही भाग हळूहळू अंमलात आणले जातील."

## ४

## जमीन आणि पळपुटे

सैन्यातून पळून गेलेल्या लोकांच्या जमिनीवरील हक्कांबाबत काही निर्णय घेण्याची सरकारवर पाळी आली नाही. युद्ध संपल्यामुळे आणि सेना विघटित केल्यामुळे पळपुट्यांचा प्रश्न आपोआपच सुटला...

## ५

## जन-कमिस्सार मंडळ

सुरुवातीला जन-कमिस्सार मंडळात फक्त बोल्शेविक होते. पण हा काही सर्वस्वी बोल्शेविकांचा दोष नव्हता. ८ नोव्हेंबरला त्यांनी काही खाती डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांच्या सदस्यांना देऊ केली होती, पण त्यांनी नाकारली.

# सहाव्या प्रकरणाचे परिशिष्ट

## १

## आवाहने आणि दोषारोप

**सर्व नागरिकांना आणि समाजवादी-क्रांतिकारक पक्षाच्या लष्करी संघटनांना आवाहन :**

"बोल्शेविकांचे अर्थहीन प्रयत्न संपूर्ण फसण्याच्या मार्गावर आहे. शिबंदीमध्ये असंतोष आहे... मंत्रालये थंड पडलीत, पावाचा तुटवडा आहे. मूठभर बोल्शेविक सोडता सर्व गटांनी सोविएतांच्या काँग्रेसचा त्याग केलाय. बोल्शेविक एकाकी आहेत! मध्यवर्ती समितीच्या छापखान्याविरुद्ध करण्यात आलेली दडपशाही, मास्लोव, त्सिओन आणि पक्षाच्या इतर सदस्यांना करण्यात आलेली अटक, हेमंत प्रासाद ताब्यात घेताना करण्यात आलेली लुटालूट आणि जबरदस्ती यामुळे बहुसंख्य खलाशांच्या आणि सैनिकांच्या मनांमध्ये अधिकच तिटकारा निर्माण झाला. त्सेंत्रोफ्लोतने बोल्शेविकांचे हुकूम पाळण्यास नकार दिला आहे...

"देशाच्या आणि क्रांतीच्या संरक्षणासाठी स्थापलेल्या रक्षक समितीभोवती सर्व सुजाण समाजघटकांनी एकत्रित यावे, असे आम्ही आवाहन

करतो ; पक्षाच्या मध्यवर्ती समितीने पहिली हाक देताच सज्ज होण्यासाठी गंभीर उपाययोजना करण्याचे, बोल्शेविकांच्या या साहसामुळे उद्‌भवलेल्या संकटांचा हमखास फायदा करून घेण्यासाठी टपलेल्या प्रतिक्रांतिकारकांविरुद्ध कारवाया करण्याचे, आणि आघाडी दुर्बल बनली आहे अशा संधीचा क्षण साधून आपला फायदा करून घेण्याची शक्यता असलेल्या बाहेरच्या शत्रूवर बारीक नजर ठेवण्याचे, आम्ही आवाहन करीत आहोत...

**समाजवादी-क्रांतिकारक पक्षाच्या**
**मध्यवर्ती समितीचा लष्करी विभाग.**"

**'प्रावदा'मधून :**

"केरेन्स्की कोण आहे?

"**सत्ता बळकावण्यासाठी टपलेला**, ज्याची जागा पीटर-पॉल तुरुंगात कोर्निलोव आणि किश्किन यांच्या शेजारी आहे.

"त्याच्यावर विश्वास ठेवलेल्या कामगारांचा, सैनिकांचा आणि किसानांचा **अपराधी आणि द्रोही**.

"केरेन्स्की? सैनिकांचा खुनी!

"केरेन्स्की? किसानांचा सार्वजनिक ठिकाणी वध करणारा चांडाळ!

"केरेन्स्की? कामगारांना फास लावणारा!

"स्वातंत्र्याची आता कत्तल करू इच्छिणारा दुसरा कोर्निलोव हा असा आहे?"

# सातव्या प्रकरणाचे परिशिष्ट

## १

## दोन आज्ञापत्रे

**वृत्तपत्रविषयक**

"क्रांतीच्या गंभीर निर्णायक वेळी आणि क्रांतीनंतरच्या लगोलगच्या दिवसांमध्ये, सर्व छटांच्या प्रतिक्रांतिकारक वृत्तपत्रांविरोधी, हंगामी क्रांतिकारक समितीला अनेक उपाययोजना अंमलात आणणे भाग पडले.

ताबडतोब सर्व बाजूंनी ओरडा चालू झाला आहे की, वृत्तपत्रस्वातंत्र्याविरोधी कारवाई करून हे नवे समाजसत्तावादी सरकार आपल्या स्वतः-च्याच कार्यक्रमामधील आवश्यक तत्त्वांचे उल्लंघन करीत आहे.

कामगार आणि किसानांचे सरकार जनतेचे एका वस्तुस्थितीकडे लक्ष वेधू इच्छिते की, आपल्या देशामध्ये, या उदारमतवादाच्या ढालीमागे, सबंध वृत्तपत्रसृष्टीचा सिंहाचा वाटा फस्त करण्याची सधन वर्गांची संधी दडलेली आहे व त्यायोगे जनतेची मने कलुषित करून लोकांच्या जाणीव-बुद्धीत गोंधळ माजविण्याचा त्यांचा इरादा आहे.

भांडवलदारी वृत्तपत्रे हे भांडवलदारवर्गाच्या हातामधील एक अत्यंत प्रभावी शस्त्र आहे याची प्रत्येकाला माहिती आहे. विशेषतः या कसोटी-च्या क्षणी, जेव्हा कामगार आणि किसानांचे नवे सरकार दृढीकरणाच्या कार्यात गुंतलेले आहे, तेव्हा बाँब आणि मशिनगन यांच्या एवढ्याच या काळात धोकादायी असलेल्या या शस्त्राला, शत्रूच्या हाती राहू देणे अशक्य आहे. म्हणून, जनतेच्या नव्या विजयाला आपल्या स्तंभांमधील निंदाव्यंजक गटारगंगेत बुडवून नष्ट करण्यात आनंद मानतील, अशा घाणेरड्या वृत्तपत्रांना थोपविण्यासाठी, ही तात्पुरती व खास स्वरूपाची उपाययोजना अंमलात आणण्यात आली आहे.

नवी सुव्यवस्था सुस्थिर होताच, वृत्तपत्रांविरोधीच्या सर्व शासकीय उपाययोजना स्थगित करण्यात येतील; कायद्याला जबाबदार राहतील अशा कक्षेत, विस्तृत आणि अत्यंत पुरोगामी नियमांना अनुसरून, त्यांना पूर्ण स्वातंत्र्य देण्यात येईल.

अगदी कसोटीच्या क्षणीसुद्धा, वृत्तपत्रांच्या स्वातंत्र्यावर कोणत्याही प्रकारची बंधने लादणे हे केवळ आवश्यकतेच्या सीमांपुरतेच मंजूर असते ही वस्तुस्थिती लक्षात घेऊन, जन-कमिस्सारांचे मंडळ पुढील आज्ञापत्र जाहीर करीत आहे:

१. पुढील वर्गांमधील वृत्तपत्रे बंद करण्यात येतील: (अ) कामगारां-च्या आणि किसानांच्या सरकारविरुद्ध उघड प्रतिकार करण्याची किंवा काय-देभंग करण्याची चिथावणी देणारी; (ब) बातमीला बुद्ध्याच आणि उघडपणे विकृत रूप देऊन गोंधळ उडविणारी; (क) कायद्याने दंडार्ह ठरविलेल्या गुन्हेगारी कृत्यांना चिथावणी देणारी.

२. कोणतेही वृत्तपत्र तात्पुरते अगर कायमचे बंद करण्याची कायदेशीर अंमलबजावणी फक्त जन-कमिस्सार मंडळामार्फतच केली जाईल.

३. प्रस्तुत आज्ञापत्र तात्पुरत्या स्वरूपाचे आहे व सार्वजनिक जीवन जेव्हा सुरळीतरीत्या पुन:स्थापित होईल तेव्हा खास आदेश काढून ते रद्द करण्यात येईल.

जन-कमिस्सार मंडळाचे अध्यक्ष,
**व्लादीमिर उल्यानोव (लेनिन).**"

**कामगारांच्या रक्षकांबाबत**

"१. कामगार आणि सैनिक प्रतिनिधींची सर्व सोविएते कामगारांचे रक्षक स्थापन करतील.

२. हे कामगारांचे रक्षक पूर्णतया कामगार व सैनिक प्रतिनिधींच्या सोविएतांच्या आज्ञेत राहतील.

३. कामगारांना शस्त्रसज्ज बनविण्याच्या आणि त्यांना तांत्रिक सामग्री पुरविण्याच्या कामी लष्करी व नागरी अधिकाऱ्यांनी सर्वतोपरी साहाय्य करावे; इतकेच नव्हे तर प्रसंगी सरकारच्या युद्ध खात्यामधील शस्त्रास्त्रे आपल्या ताब्यात घ्यावीत.

४. हे आज्ञापत्र तारेद्वारे प्रसारीत करण्यात यावे.

गृहखात्याचे जन-कमिस्सार,
**रीकोव**

पेत्रोग्राद, १० नोव्हेंबर, १९१७

या आज्ञापत्रामुळे सबंध रशियाभर लाल रक्षकांच्या तुकड्या स्थापन होण्यास उत्तेजना मिळाली व आगामी यादवी युद्धात सोविएत सरकारला त्यांचा बहुमोल उपयोग झाला.

## २

## संप-निधी

संपावर असलेल्या सरकारी कर्मचाऱ्यांच्या आणि बँक कारकूनांच्या निधीला, पेत्रोग्रादमधील आणि इतर शहरांमधील बँकांनी आणि व्यापारी संस्थांनी, तसेच रशियामध्ये व्यापार करणाऱ्या परकी महामंडळांनी, सढळ हाताने मदत केली. बोल्शेविकांविरुद्ध संप करणाऱ्या सर्वांना पूर्ण पगार देण्याचे मान्य करण्यात आले होते व काहीजणांचे तर पगार वाढविण्यात

आले होते. बोल्शेविकांची सत्ता ठामपणे प्रस्थापित झाली आहे हे जेव्हा संप-निधीला मदत करणाऱ्यांना कळून चुकले, तेव्हा त्यांनी संप करण्याबद्दल आर्थिक मदत देण्याचे बंद केले व त्यामुळे अखेरीस संप कोसळला.

# आठव्या प्रकरणाचे परिशिष्ट

## १

## लष्करी क्रांतिकारक समितीच्या घोषणा

**"सोविएतांची अखिल-रशियन काँग्रेस आज्ञा करीत आहे:**

केरेन्स्कींनी पुन्हा चालू केलेली मृत्युदंडाची सजा आघाडीवर रद्द करण्यात यावी. आघाडीवर संपूर्ण प्रचार-स्वातंत्र्य पुन्हा प्रस्थापित करण्यात यावे. तथाकथित "राजकीय" गुन्ह्यांसाठी अटकेत असलेल्या सर्व सैनिकांची आणि क्रांतिकारक अधिकाऱ्यांची तात्काळ मुक्तता करण्यात यावी."

**"सर्व जनतेला उद्देशून:**

"लोकांनी पदभ्रष्ट केलेले माजी पंतप्रधान केरेन्स्की सोविएतांच्या काँग्रेसच्या आधीन होण्यास नकार देत आहेत आणि अखिल रशियन काँग्रेसने निवडलेल्या वैध सरकारविरुद्ध – जन-कमिस्सारांच्या मंडळाविरुद्ध – लढा देण्याचा प्रयत्न करीत आहेत. आघाडीने केरेन्स्कींना मदत करण्यास नकार दिला आहे. मॉस्को नव्या सरकारभोवती उभे राहिले आहे. अनेक शहरांमध्ये (मिन्स्क, मोगीलेव, खार्कोव) सोविएतांच्या हाती सत्ता आहे. सेनेच्या आणि जनतेच्या दृढ इच्छेनुसार, शांततेच्या वाटाघाटी सुरू करणाऱ्या आणि किसानांना जमिनी देणाऱ्या कामगार-किसानांच्या सरकारविरुद्ध चाल करून जाण्यास एकही पायदळ तुकडी तयार नाही...

"आम्ही जाहीर इशारा देत आहोत की, ज्यांना केरेन्स्कींनी फसविले आहे व पेत्रोग्रादविरुद्ध चाल करायला लावली आहे त्या कझाकांनी जर केरेन्स्कींना थांबवले नाही, तर क्रांतीच्या बहुमोल विजयांच्या – शांतता आणि जमीन यांच्या – रक्षणार्थ क्रांतिकारक शक्ती आपल्या सर्व सामर्थ्यानिशी उठून उभ्या राहतील.

"पेत्रोग्रादच्या नागरिकांनो! राजधानीला जर्मनांच्या हवाली करू इच्छिणाऱ्या किश्किन यांच्या, नगरपालिकेच्या अन्नपुरवठा पद्धतीत घातपात घडवणाऱ्या काळया टोळीच्या रूटेनबर्ग यांच्या आणि ज्यांचा सबंध लोकशाहीने तिटकारा केला त्या पाल्चिन्स्की यांच्या ताब्यामध्ये अधिकार सोडून केरेन्स्की शहरामधून पसार झाले! तुम्हाला जर्मनांच्या, दुष्काळाच्या, रक्तपाती कत्तलींच्या तावडीत देऊन केरेन्स्की पळून गेले. बंड करून उठलेल्या जनतेने केरेन्स्कींच्या मंत्र्यांना पकडले व पेत्रोग्रादच्या सुव्यवस्थेत आणि पुरवठ्यात एकदम सुधारणा झाल्याचे तुम्ही पाहिले आहे. जमीनदारांना जमिनी परत देण्याच्या हेतूने आणि तिरस्करणीय व सर्वनाशी युद्ध चालू ठेवण्याच्या इच्छेने, उच्चभ्रू कारखानदारांच्या, भांडवलदारांच्या, सट्टेबाजांच्या मागणीनुसार, केरेन्स्की तुमच्या विरुद्ध चाल करून येत आहेत.

"पेत्रोग्रादच्या नागरिकांनो! तुमच्यापैकी बहुसंख्य लोक जनतेच्या क्रांतिकारक सत्तेच्या बाजूचे आहेत, केरेन्स्की नेतृत्वाखालील कोर्निलोववाद्यांच्या विरोधी आहेत, हे आम्हाला माहीत आहे. दुर्बळ भांडवलदारी कारस्थान्यांच्या खोटया निवेदनांना बळी पडू नका, त्यांचा दयामाया न ठेवता चुराडा केला जाईल.

"कामगारांनो, सैनिकांनो, किसानांनो! क्रांतिकारक निष्ठेचे आणि शिस्तीचे पालन करा, असे आम्ही तुम्हाला आवाहन करतो.

"लक्षावधी किसान आणि सैनिक आमच्या बाजूचे आहेत.

"जनतेच्या क्रांतीचा नक्की विजय होणार!

**कामगार आणि सैनिक प्रतिनिधींच्या पेत्रोग्राद सोविएतची लष्करी क्रांतिकारक समिती.**

पेत्रोग्राद, २८ ऑक्टोबर, १९१७."

## २

## जन-कमिस्सार मंडळाचे कायदे

माझ्या मते बोल्शेविकांच्या सत्ताग्रहणाशी संबंधित अशी आज्ञापत्रेच तेवढी मी या पुस्तकात देत आहे. बाकीची आज्ञापत्रे सोविएत राज्याच्या रचनेची तपशीलवार माहिती देणारी आहेत. त्यांचा परामर्श सध्या तयार होत असलेल्या 'कोर्निलोव ते ब्रेस्त-लितोव्स्क' या दुसऱ्या पुस्तकात पूर्णत्वाने घेतला जाईल.

## राहण्याच्या जागांसंबंधी

"१. स्वतंत्र नगरपालिकेच्या स्वयंशासनांना मोकळी किंवा वस्ती नसलेली राहती घरे तात्पुरती आपल्या ताब्यात घेण्याचा अधिकार आहे.

२. ज्या नागरिकांना रहावयास जागा नाही, किंवा जे कोंदट किंवा आरोग्याला अपायकारक अशा घरांमध्ये रहात आहेत, त्यांना उपलब्ध घरांमध्ये, आपल्या प्रस्थापित कायद्यांनुसार आणि तरतुदींनुसार, नगरपालिका रहायला जागा देऊ शकतात.

३. राहत्या घरांची तपासणी करण्यासाठी नगरपालिका एक खाते स्थापन करू शकतील, त्याचे संयोजन करून त्याचे अधिकार निश्चित करू शकतील.

४. घर-समितींच्या संस्थेबाबत नगरपालिका हुकूम काढू शकतील, त्यांचे संघटन, त्यांचे अधिकार निश्चित करू शकतील आणि त्यांना कायदेशीर सत्ता देऊ शकतील.

५. नगरपालिकांनी घरांविषयीचे प्रश्न सोडविणारी न्यायालये निर्माण करावी, त्यांचे अधिकार आणि त्यांची सत्ता निर्णित करून द्यावी.

६. हे आज्ञापत्र तारेने प्रसारीत करावे.

गृहखात्याचे जन-कमिस्सार,
**रीकोव."**

## सामाजिक विम्याविषयी

"वेतनी कामगारांना, तसेच शहरामधील आणि खेड्यातील गरीबांना, संपूर्ण सामाजिक विमा देण्याचे आश्वासन रशियन कामगारवर्गाने आपल्या पताकांवर कोरलेले आहे. सामाजिक विम्यासंबंधीच्या कामगारांच्या अपेक्षा पुऱ्या करण्यात झारचे सरकार, कारखानदार आणि भांडवलदार, तसेच संमिश्र आणि तडजोडवादी सरकार यांना अपयश आले.

कामगार, सैनिक आणि किसान प्रतिनिधींच्या सोविएतांच्या पाठिंब्यावर विसंबून, कामगार आणि किसानांचे सरकार रशियातील कामगारवर्गाला व शहरातील आणि खेड्यातील गरीबांना उद्देशून जाहीर करीत आहे की, मजूर संघटनांनी सुचविलेल्या सूत्रांवर आधारीत असे सामाजिक विम्याचे कायदे ते ताबडतोब तयार करील:

१. कोणताही अपवाद न ठेवता सर्व कामगारांचा, तसेच सर्व शहरी आणि ग्रामीण गरीबांचा विमा उतरविणे.

२. आजारपण, अपंगता, म्हातारपण, बाळंतपण, वैधव्य, पोरकेपण आणि बेकारी, अशा कार्यक्षमता नष्ट करणाऱ्या सर्व प्रकारच्या कारणांसाठी विमा.

३. विम्याचा सर्व खर्च मालकांनी सोसावा.

४. कार्यक्षमता पूर्ण नष्ट होण्याच्या आणि बेकारीच्या बाबतीत किमान पूर्ण वेतनाएवढी नुकसानभरपाई.

५. सर्व विमा संस्थांचे कामगारांतर्फे संपूर्ण स्वयंशासन.

रशियन प्रजासत्ताकाच्या सरकारच्या वतीने,
मजूर खात्याचे जन-कमिस्सार,
**अलेक्सांदर श्ल्याप्निकोव.**"

### जनता-शिक्षणासंबंधी

"रशियातील नागरिकांनो!

७ नोव्हेंबरच्या उठावामुळे कामकरी जनतेने पहिल्या प्रथमच खरी सत्ता जिंकली आहे.

सोविएतांच्या अखिल रशियन काँग्रेसने ही सत्ता तात्पुरती आपल्या कार्यकारी समितीच्या आणि जन-कमिस्सार मंडळाच्या हाती सोपवली आहे.

क्रांतिकारक जनतेच्या इच्छेनुसार, माझी शिक्षण खात्याचा जन-कमिस्सार म्हणून नेमणूक झाली आहे.

जनतेच्या ज्ञानाबाबत आणि शिक्षणाबाबत सर्वसामान्य मार्गदर्शन करण्याचे कार्य जोपर्यंत केंद्र सरकारच्या कक्षेत आहे तोपर्यंत, घटनात्मक सभेचे अधिवेशन भरेपर्यंत, जन-शिक्षणविषयक आयोगावर सोपविले आहे व त्या आयोगाचे अध्यक्षपद आणि कार्यकारीपद जन-कमिस्सारकडे आहे.

हा सरकारी आयोग कोणत्या मूलभूत ठरावांवर आधारीत असेल? त्याचे अधिकारक्षेत्र कसे ठरविण्यात येते?

**शैक्षणिक कार्याची सार्वसाधारण रूपरेषा:** ज्या देशात अज्ञान आणि निरक्षरतेचे अधिराज्य नांदते आहे अशा देशात, प्रत्येक खऱ्याखुऱ्या लोकशाहीवादी सत्तेने सर्वप्रथम या अंधकाराविरुद्ध संघर्ष करण्याचे उद्दिष्ट बाळगले पाहिजे. आधुनिक अध्यापनशास्त्राच्या गरजा पुऱ्या करू शकतील अशा

शाळांचे जाळे निर्माण करून अत्यंत अल्पावधीत तिने **सार्वत्रिक साक्षरता** प्राप्त केली पाहिजे; तिने सर्वांसाठी सार्वत्रिक, सक्तीचे आणि मोफत शिक्षण सुरू केले पाहिजे व त्याच वेळी अध्यापक संस्थांचे आणि विद्यालयांचे एक जाळे निर्माण केले पाहिजे; म्हणजे आपल्या असीम रशियामधील जनतेला सार्वत्रिक ज्ञान देण्यासाठी आवश्यक असलेली प्रभावी शिक्षक सेना लौकरात लौकर उपलब्ध होऊ शकेल...

**विकेंद्रीकरण :** जनतेच्या शिक्षणाविषयीचा सरकारी आयोग म्हणजे ज्ञान देणाऱ्या व शैक्षणिक संस्थांवर अधिकार गाजविणारी केंद्रीय सत्ता नव्हे. उलट संपूर्ण शालेय कार्य स्थानिक स्वयंशासनाच्या संस्थांच्या हाती सोपविण्यात आले पाहिजे. कामगारांनी, सैनिकांनी आणि किसानांनी आपल्या स्वतःच्या पुढाकाराने स्वतंत्रपणे स्थापलेल्या सांस्कृतिक शैक्षणिक संघटनांना, सरकारी केंद्राकडून आणि नगरपालिकेच्या केंद्रांकडून अशा दोन्हीकडून, संपूर्ण स्वायत्तता देण्यात आली पाहिजे.

नगरपालिकेच्या आणि खाजगी संस्थांना, विशेषतः श्रम शिक्षण देणाऱ्या आणि वर्गीय ज्ञान देणाऱ्या संस्थांना, भौतिक आणि नैतिक पाठबळ देणारी साधनसामग्री पुरविणारा दुवा आणि मदतनीस म्हणून सरकारी आयोगाचे कार्य उपयोगी पडते.

**जनतेच्या शिक्षणासाठी सरकारी समिती :** क्रांतीच्या आरंभापासून, जनतेच्या शिक्षणविषयक सरकारी समितीने – रचनेच्या दृष्टीने बव्हंशी लोकशाहीवादी आणि तज्ज्ञांच्या दृष्टीने संपन्न – बहुमोल कायदेविषयक प्रकल्प तयार केले. या समितीच्या सहकार्याची सरकारी आयोगाला मनोमन अपेक्षा आहे.

आयोग स्वतः समितीच्या ब्यूरोला विनंती करेल की, पुढील कार्यक्रम अंमलात आणण्यासाठी ताबडतोब समितीची खास बैठक बोलावण्यात यावी :

१. अधिक लोकशाहीकरण करण्याच्या दृष्टीने प्रतिनिधित्वाच्या नियमांची उजळणी.

२. समितीच्या अधिकारांचा विस्तार करण्याच्या दृष्टीने आणि लोकशाहीवादी तत्त्वांवर रशियातील सार्वजनिक आदेश व शिक्षणाचे पुनर्संघटन करण्याच्या उद्दिष्टाने समितीचे मूलभूत सरकारी संस्थेत रूपांतर करण्यासाठी कायदेविषयक प्रकल्पांची निर्मिती करण्याच्या दृष्टीने, समितीच्या हक्कांची उजळणी.

३. समितीने आधीच निर्माण केलेल्या कायद्यांची नव्या सरकारी आयोगासह संयुक्तपणे उजळणी; ही उजळणी करण्याचे कारण, त्या कायद्यांच्या

अत्यंत मर्यादित स्वरूपातही, त्यांचे संपादन करीत असताना, पूर्वीच्या मंत्रालयांच्या भांडवलदारी भावनेचा समितीला विचार करावा लागला होता व त्याचा अडथळा झाला होता.

ही उजळणी संपल्यानंतर, कोणतीही लाल फितीची दिरंगाई न करता, क्रांतिकारक पद्धतीने हे कायदे अंमलात आणले जातील.

**अध्यापक आणि समाजशास्त्रज्ञ :** जनतेला, देशाच्या स्वामींना शिक्षण देण्याचे तेजस्वी आणि सन्मान्य काम करण्यासाठी, सरकारी आयोग अध्यापकांना निमंत्रण देत आहे.

अध्यापकांचे प्रतिनिधित्व करणाऱ्यांनी लक्षपूर्वक छाननी केल्याविना, जनतेच्या शैक्षणिक क्षेत्रात कोणताही बदल कोणत्याही सत्तेने कधीही करू नये.

दुसरीकडून, केवळ तज्ज्ञांच्या सहकार्याने कोणत्याही परिस्थितीत अंतिम निर्णय घेतला जाऊ नये. सार्वत्रिक शिक्षणाच्या संस्थांमध्ये सुधारणा घडविण्याच्या संदर्भातही हे लागू पडते.

अध्यापकांचे सामाजिक शक्तींबरोबर सहकार्य घडविणे – आयोग अशा प्रकारे आपल्या स्वतःच्या क्षेत्रात, सरकारी समितीत, आणि आपल्या सर्व कार्यांमध्ये काम करील.

शिक्षकांच्या दर्जामध्ये सुधारणा घडविणे हे आपले पहिले कार्य आहे असे आयोग मानतो. त्यातल्या त्यात सर्वप्रथम सर्वात गरीब शिक्षकांच्या – प्राथमिक शाळांमधील शिक्षकांच्या – दर्जात सुधारणा घडविणे आवश्यक आहे असे तो मानतो; कारण सांस्कृतिक कार्यात ते फार मोठी महत्त्वाची कामगिरी बजावतात. त्यांच्या न्याय्य मागण्या ताबडतोब आणि कोणत्याही परिस्थितीत पुऱ्या केल्या पाहिजेत. शाळांमधील कामगारवर्गाने दरमहा शंभर रूबल पगाराची मागणी केली होती, पण ती पुरी केली गेली नाही. बहुसंख्य रशियन जनतेच्या शिक्षकांना इतःपर गरीबीत ठेवणे लांच्छनास्पद ठरेल.

**घटनात्मक सभा :** निःसंशयपणे ती लौकरच आपल्या कार्याला आरंभ करील. आपल्या देशामधील राष्ट्रीय आणि सामाजिक जीवनाची कायम स्वरूपाची घडी बसविण्याचे ती कार्य करू शकेल व त्याच वेळी जनतेच्या शिक्षणाबाबतचे सर्वसाधारण स्वरूप निश्चित करू शकेल.

आता सोविएतांच्या हाती सत्ता आली असल्यामुळे, घटनात्मक सभेच्या खऱ्याखुऱ्या लोकशाही स्वरूपाची हमी निर्माण झाली आहे, सरकारी समि-

तीवर विसंबून सरकारी आयोग जे धोरण ठरवील, त्याच्यामध्ये घटनात्मक सभेकडून ढवळाढवळ होण्याची फारशी शक्यता नाही. देशाचे आत्मिक जीवन लौकरात लौकर संपन्न आणि सुजाण बनविण्याच्या दृष्टीने या क्षेत्रात पूर्व-निर्णय न करता अनेक उपाययोजना अंमलात आणण्याचा आपला अधिकार आहे, असे जनतेचे नवे सरकार मानते.

**मंत्रालय:** दरम्यानच्या काळात हे कार्य जनशिक्षणाच्या खात्यामार्फतच पुढे चालवले पाहिजे. सोविएतांच्या कार्यकारी समितीने निवडलेल्या सरकारी आयोगाला आणि सरकारी समितीला शैक्षणिक घडणीमध्ये आणि रचनेमध्ये आवश्यक ते बदल करण्याचे हक्क राहतील. अर्थात जनतेच्या शिक्षणाबाबतची सरकारी व्यवस्था घटनात्मक सभेमार्फतच स्थापन केली जाईल. तोपर्यंत जनतेच्या शिक्षणाच्या सरकारी समितीची व सरकारी आयोगाची, अशी दोन्हींची शासन-यंत्रणा म्हणून मंत्रालय काम पाहील.

देशाच्या सर्व महत्त्वाच्या आणि खऱ्याखुऱ्या लोकशाहीवादी शक्तींनी सहकार्य करण्यातच त्याची सुरक्षितता सामावली आहे.

आम्हाला असा विश्वास वाटतो की, कामकरी जनतेचा आणि प्रामाणिक सुशिक्षित प्रज्ञावंतांचा जोमदार प्रयत्न देशाला सध्याच्या कष्टदायी अरिष्टामधून बाहेर काढील व संपूर्ण लोकशाहीमधून समाजसत्तावादाच्या क्षेत्राकडे आणि राष्ट्रांच्या बांधिलकीकडे घेऊन जाईल.

शिक्षण खात्याचे जन-कमिस्सार
**लुनाचार्स्की.**"

### कायदे मंजूर करून ते प्रकाशित करण्याच्या क्रमाविषयी

१. घटनात्मक सभेचे अधिवेशन भरेपर्यंत, कायदे करण्याचे आणि ते प्रकाशित करण्याचे काम, कामगारांच्या, किसानांच्या, सैनिकांच्या प्रतिनिधींच्या अखिल रशियन काँग्रेसने निवडलेल्या सध्याच्या हंगामी कामगारांच्या आणि किसानांच्या सरकारच्या आज्ञापत्रातील क्रमानुसार पार पाडण्यात येईल.

२. अधिकृत जन-कमिस्सारच्या सहीने, संबंधित मंत्रालयाकडून प्रत्येक कायदा सरकारच्या विचारासाठी सादर करण्यात येतो; किंवा विभागाच्या प्रमुखाच्या सहीने सरकारशी संलग्न असलेल्या कायदे विभागाला सादर करण्यात येतो.

३. सरकारने मंजूर केल्यानंतर आज्ञापत्राच्या अंतिम आवृत्तीवर, रशियन प्रजासत्ताकाच्या वतीने जन-कमिस्सार मंडळाचे अध्यक्ष सही करतात किंवा ज्या जन-कमिस्साराने तो कायदा सरकारपुढे विचारार्थ ठेवलेला असतो तो जन-कमिस्सार अध्यक्षांच्या वतीने त्या आज्ञापत्रावर सही करतो आणि मग ते प्रकाशित होते.

४. ज्या तारखेला तो अधिकृत 'हंगामी कामगार-किसान सरकारच्या वर्तमानपत्रा' मध्ये प्रसिद्ध होतो, त्या तारखेपासून तो कायदा बनतो.

५. आज्ञापत्रामध्ये तो कायदा केव्हापासून बनेल त्याची तारीख प्रकाशनाच्या तारखेव्यतिरिक्त नमूद केली असेल तर त्या तारखेला किंवा तारेद्वारे तो कायदा जारी करण्यात आला असेल तर प्रत्येक स्थळी ती तार प्रसिद्ध झाल्याच्या तारखेला तो कायदा अंमलात आल्याचे समजावे.

६. सरकारी सेनेटतर्फे सरकारच्या कायद्यांचे प्रसिद्धीकरण करणे बंद केले आहे. ठराविक काळानंतर, जन-कमिस्सार मंडळाशी संलग्न कायदे विभाग सरकारच्या नियमांचा व हुकुमांचा संग्रह प्रकाशित करीत आहे, ज्यांना कायद्याचे अधिकार आहेत.

७. कोणत्याही वेळेला सरकारी आज्ञापत्रे रद्द करण्याचा, बदलण्याचा किंवा बेकायदेशीर ठरविण्याचा कामगारांच्या, किसानांच्या आणि सैनिकांच्या प्रतिनिधींच्या सोविएतांच्या केंद्रीय कार्यकारी समितीला हक्क आहे.

रशियन प्रजासत्ताकाच्या वतीने,
जन-कमिस्सार मंडळाचे अध्यक्ष,
**व्ला. उल्यानोव-लेनिन."**

३

## लष्करी क्रांतिकारक समितीचा हुकूम :

१. पुढील हुकूम देईपर्यंत मद्यार्काचे आणि मद्यार्कयुक्त पेयांचे उत्पादन करण्यास मनाई आहे.

२. मद्यार्काचे आणि मद्यार्कयुक्त पेयांचे उत्पादन करणाऱ्यांनी २७ तारखेच्या आत आपल्या गुदामांची निश्चित ठिकाणे कळवावीत, असा हुकूम देण्यात येत आहे.

३. या हुकुमाचा भंग करणाऱ्या सर्व अपराध्यांना लष्करी क्रांतिकारक न्यायालयासमोर दाखल करण्यात येईल.

**लष्करी क्रांतिकारक समिती."**

## ४

## हुकूम क्र. २

**फिन्लंड रक्षक राखीव रेजिमेंटच्या समितीतर्फे वासिली अस्त्रोवच्या सर्व घर समित्यांना आणि नागरिकांना उद्देशून :**

कामगारवर्गाविरुद्ध लढण्यासाठी भांडवलदारवर्गाने एका अत्यंत निंद्य पद्धतीचा अवलंब केला आहे ; शहराच्या वेगवेगळ्या भागांमध्ये त्याने दारूचे गुत्ते स्थापन केलेत आणि सैनिकांना मद्य वाटण्यात येत आहे. अशा प्रकारे क्रांतिकारक सेनेच्या सैनिकांमध्ये असंतोष फैलावण्याचा प्रयत्न केला जात आहे.

सर्व घर समित्यांना हुकूम देण्यात येत आहे की, हा आदेश चिकटवल्यापासून तीन तासांच्या आत, आपल्या आवारात किती मद्य आहे त्याबद्दलची माहिती त्यांनी फिन्लंड रक्षक रेजिमेंटच्या समितीच्या अध्यक्षांकडे स्वत: येऊन गुप्तपणे कळवावी.

जे या हुकुमाचे उल्लंघन करतील **त्यांना अटक करण्यात येईल व निष्ठुर न्यायालयासमोर त्यांच्याविरुद्ध खटला चालविण्यात येईल आणि त्यांची मालमत्ता जप्त करण्यात येईल** व मद्याचा साठा सापडल्यास या इशाऱ्यानंतर २ तासांनी **सुरुंग लावून उडविण्यात येईल,** कारण अनुभवाने असे कळून चुकले आहे की, याहून नरम उपाय अपेक्षित परिणाम घडवून आणत नाहीत.

**स्फोटांआधी कोणताही दुसरा इशारा देण्यात येणार नाही याची आठवण ठेवा.**

**फिन्लंड रक्षक रेजिमेंटची समिती.**"

# नवव्या प्रकरणाचे परिशिष्ट

## २

## लष्करी क्रांतिकारक समितीचे वार्तापत्र क्र. २

१२ नोव्हेंबरच्या संध्याकाळी केरेन्स्की यांनी क्रांतिकारक फौजांना एक प्रस्ताव धाडला – "आपली शस्त्रे खाली ठेवावी." केरेन्स्कींच्या लोकांनी तोफखान्याची सरबत्ती चालू केली. आमच्या तोफखान्याने त्या सरबत्तीला

चोख उत्तर दिले व शत्रूला गप्प बसविले. कझाकांनी आक्रमक चढाई केली. खलाशांनी, लाल रक्षकांनी आणि सैनिकांनी तुफानी आगीचा वर्षाव करून कझाकांना माघार घ्यायला लावली. आमच्या चिलखती गाड्या शत्रूच्या फळयांमध्ये घुसल्या. शत्रू पळत सुटला आहे. आमचे सैनिक त्याचा पाठलाग करताहेत. केरेन्स्की यांना अटक करण्याचा हुकूम देण्यात आला आहे. त्सार-स्कोये सेलो क्रांतिकारक फौजांनी घेतले आहे.

**लात्वियाचे बंदूकधारी:** लष्करी क्रांतिकारक समितीला अचूक माहिती मिळाली आहे की, शूर लात्वियाचे बंदूकधारी आघाडीवरून आले आहेत आणि केरेन्स्कींच्या टोळयांच्या पिछाडीला त्यांनी मोर्चा धरला आहे.

## लष्करी क्रांतिकारक समितीच्या कर्मचाऱ्यांकडून

गात्चिना आणि त्सारस्कोये सेलो यांच्यावर केरेन्स्कींच्या फौजा कबजा करू शकल्या, कारण त्या ठिकाणी तोफखाना व मशिनगन यांचा पूर्ण अभाव होता, तर केरेन्स्कींच्या घोडदळाला प्रथमपासूनच तोफखान्याचा आधार मिळाला होता.

गेले दोन दिवस क्रांतिकारक सैनिकांना आवश्यक त्या तोफा, मशिनगन, रणांगणावरील टेलिफोन-यंत्रणा इत्यादींचा पुरवठा करण्यासाठी आमच्या कर्मचारीवर्गाला खूप काम करावे लागले. विभागीय सोविएते आणि कार-खाने (पुतिलोव कारखाना, ओबुखोव व इतर) यांच्या जोमदार साहा-य्याने हे काम जेव्हा पुरे करण्यात आले तेव्हा अपेक्षित लढाईच्या परिणामा-विषयी कोणताही संशय उरला नाही. क्रांतिकारक सैनिकांच्या बाजूने अति-रिक्त युद्धसामग्री आणि पेत्रोग्रादसारखा प्रभावी भौतिक तळ होता एवढेच नव्हे, तर प्रचंड नैतिक श्रेष्ठताही होती. पेत्रोग्रादच्या सर्व रेजिमेंट आपापल्या मोर्चांकडे अत्यंत उत्साहाने गेल्या. शिबंदीच्या परिषदेत पाच सैनिकांचा एक नियंत्रण आयोग स्थापन करण्यात आला व अशा रीतीने सरसेनापती व शिबंदी यांच्यामध्ये संपूर्ण ऐक्य निर्माण करण्यात आले. निर्णायक कारवाईला आरंभ करण्याविषयी शिबंदीच्या परिषदेत एकमताने ठरविण्यात आले.

१२ नोव्हेंबरला दुपारी ३ वाजण्याच्या सुमारास तोफखान्याचा भडिमार जोरदार करण्यात आला. कझाकांचे नीतीधैर्य पूर्णतः गळून गेले. त्यांचा एक दूत क्रास्नोये सेलो येथील तुकडीच्या अधिकाऱ्यांकडे आला व तोफांचा भडिमार थांबविण्यात यावा असा त्याने प्रस्ताव मांडला; अन्यथा "नि-

र्णायक" उपायांचा अवलंब केला जाईल अशी त्याने धमकीही घातली. केरेन्स्की जेव्हा शस्त्रे खाली ठेवतील तेव्हाच तोफा बंद होतील, असे त्याला उत्तर देण्यात आले.

या लढाईमध्ये फौजांच्या सर्व विभागांनी – खलाशी, सैनिक आणि लाल रक्षक – अपरिमित धैर्य दाखवले. आपली सर्व काडतुसे संपेपर्यंत खलाशी पुढे घुसत राहिले. जीवितहानीचा नक्की आकडा अद्याप माहीत झालेला नाही, पण आमच्या एका चिलखती गाडीमुळे अतोनात मार खाल्लेल्या प्रतिक्रांतिकारक फौजांची हानी अधिक झालेली आहे.

आपल्याला घेरा घातला जाईल अशा भीतीने केरेन्स्कींच्या सेनाधिकाऱ्यांनी माघारीचा हुकूम दिला; या माघारीला लौकरच विलक्षण गोंधळाचे स्वरूप प्राप्त झाले. ११ ते १२ वाजण्याच्या दरम्यान, रेडिओ स्टेशनसह त्सारस्कोये सेलो सोविएत फौजांनी संपूर्ण काबीज केले. कझाकांनी गात्चिना आणि कोल्पिनोच्या दिशेने माघार घेतली.

सैनिकांच्या मनोधैर्याची स्तुती करावी तेवढी थोडीच आहे. माघार घेणाऱ्या कझाकांचा पाठलाग करण्याचा हुकूम देण्यात आला आहे. त्सारस्कोये सेलो स्टेशनवरून रेडिओतारेद्वारे आघाडीवर आणि सबंध रशियामधील स्थानिक सोविएतांना संदेश पाठविण्यात आला आहे.

(पुढील तपशील कळविण्यात येईल.)"

## २

## पेत्रोग्रादमधील १३ तारखेच्या घटना

पेत्रोग्राद सोविएतच्या बैठकीत झिनोवियेव म्हणाले, "केवळ सामर्थ्याच्या जोरावरच शत्रूचा बीमोड करता येईल. भीती ही आहे की लढा संपल्याच्या भ्रमात आपण राहू. तरीही, कझाकांना आपल्या बाजूने वळवून घेण्यासाठी सर्व शांततापूर्ण मार्गांचा प्रयत्न आपण केला नाही तर तो अपराध ठरेल... आपल्याला लष्करी विजयाची गरज आहे... शस्त्रसंधीची बातमी खरी नाही. शत्रू जेव्हा अधिक अपाय करू शकणार नाही अशी परिस्थिती निर्माण होईल तेव्हाच आमचे सेनाधिकारी शस्त्रसंधी करतील...

"सध्या आपल्या विजयाच्या प्रभावामुळे नवी राजकीय अट निर्माण होत आहे... आज बोल्शेविकांना नव्या सरकारमध्ये सामील करून घेण्याला समाजवादी-क्रांतिकारक अनुकूल आहेत..."

नगर दूमामध्ये नव्या सरकारच्या स्थापनेवर सर्व लक्ष एकवटण्यात आले होते.

कॅडेट पक्षाचे शिन्गाऱ्योव म्हणाले की, नगरपालिकेने बोल्शेविकांबरोबर कोणताही समझोता करू नये... "हे माथेफिरू जोपर्यंत शस्त्रे खाली ठेवीत नाहीत आणि स्वतंत्र न्यायालयांचा अधिकार मान्य करीत नाहीत तोपर्यंत त्यांच्याशी कोणताही समझोता घडू शकत नाही..."

'येदिन्स्त्वो' गटाचे यार्त्सेव म्हणाले की, बोल्शेविकांबरोबर कोणताही समझोता करणे म्हणजे बोल्शेविकांच्या विजयाला मान्यता देण्यासारखे आहे...

समाजवादी-क्रांतिकारकांच्या वतीने महापौर श्रायडर यांनी निवेदन केले की, बोल्शेविकांशी कोणताही समझोता करण्यास त्यांचा विरोध होता... "सरकारबाबत बोलायचे तर ते लोकांच्या इच्छेमधून निर्माण झाले पाहिजे; आणि लोकांची इच्छा नगरपालिकेच्या निवडणुकांमधून व्यक्त झाली असल्यामुळे, सरकार निर्माण करू शकणारी लोकांची इच्छा प्रत्यक्षात दूमामध्ये एकवटलेली आहे..."

त्यानंतर इतर वक्ते बोलले. नव्या सरकारमध्ये बोल्शेविकांना प्रवेश देण्याबाबत विचार करण्यास फक्त मेन्शेविक-आंतरराष्ट्रीयवादी पक्षाचे प्रतिनिधी अनुकूल होते. विक्झेलच्या परिषदेत आपले प्रतिनिधित्व चालू ठेवण्याचा दूमाने निर्णय घेतला, पण सर्वांआधी हंगामी सरकारची पुन:स्थापना करण्याचा आग्रह धरण्याचे व नव्या सत्तेमध्ये बोल्शेविकांना वगळण्याचे तिने ठरवले...

३

## युद्धविराम. रक्षक समितीला क्रास्नोव यांचे उत्तर

"तात्काळ शस्त्रसंधी करण्याचा प्रस्ताव देणाऱ्या तुमच्या तारेला उत्तर म्हणून, अधिक रक्तपात घडविण्याची इच्छा नसलेले सरसेनापती, सरकारच्या आणि बंडखोराच्या सैन्यांमध्ये संबंध प्रस्थापित करण्यास मान्यता देत आहेत. बंडखोरांच्या सेनाधिकारीवर्गाला ते सुचवीत आहेत की, त्यांनी आपल्या रेजिमेंटा पेत्रोग्रादला परत बोलवाव्या, लीगोवो-पूलकवो-कोल्पिनो हा भाग तटस्थ घोषित करावा आणि सुव्यवस्था प्रस्थापित करण्याच्या हेतूने सरकारी घोडदळाच्या अग्रदलाला त्सारस्कोये सेलोमध्ये प्रवेश करण्यास

परवानगी द्यावी. या प्रस्तावाचे उत्तर उद्या सकाळी आठ वाजण्यापूर्वी आमच्या संदेशवाहकांच्या हाती देण्यात यावे.

**क्रास्नोव.**"

४

## त्सारस्कोये सेलोमधील घटना

ज्या संध्याकाळी केरेन्स्कींच्या फौजांनी त्सारस्कोये सेलोमधून माघार घेतली त्या संध्याकाळी काही धर्मगुरूंनी गावातल्या रस्त्यांवरून एक धार्मिक मिरवणूक काढली, नागरिकांसमोर भाषणे करून त्यांनी सांगितले की, लोकांनी न्याय्य सत्तेला, हंगामी सरकारला, पाठिंबा द्यावा. कझाकांनी जेव्हा माघार घेतली आणि पहिले लाल रक्षक गावात शिरले तेव्हा प्रत्यक्ष डोळयांनी घटना पाहणाऱ्यांनी सांगितले की, धर्मगुरूंनी लोकांना सोविएतांविरुद्ध भडकवण्याचा प्रयत्न केला आणि शाही राजवाडयाच्या मागील बाजूस असलेल्या रासपुतिनच्या थडग्यापाशी प्रार्थना म्हटल्या. त्यांच्यापैकी एका धर्मगुरूला, फादर इवान कुचुरोव यांना, संतापलेल्या लाल रक्षकांनी अटक केली व गोळया घालून ठार मारले.

लाल रक्षकांनी शहरात प्रवेश करताच विजेचे दिवे बंद करण्यात आले आणि रस्ते अंधारात पूर्णपणे बुडून गेले. वीजघराचे संचालक लुबोविच यांना सोविएत फौजांनी अटक केली आणि दिवे बंद का केले अशी त्यांना विचारणा केली. ज्या खोलीत त्यांना अटक करून ठेवण्यात आले होते तेथे हातात रिवॉल्वर व कपाळावर गोळीची खूण अशा अवस्थेत ते नंतर मरून पडलेले आढळले.

दुसऱ्या दिवशी पेत्रोग्रादमधील बोल्शेविकविरोधी वृत्तपत्रांमधून ठळक मथळे छापून आले, "प्लेखानोव यांना ३९ अंश सेंटीग्रेड ताप!" प्लेखानोव त्सारस्कोये सेलो येथे रहात होते व आजारपणाने अंथरुणात पडून होते. लाल रक्षकांनी त्यांच्या घराची शस्त्रास्त्रांसाठी झडती घेतली व त्या वृद्ध गृहस्थाला प्रश्न विचारले.

"समाजाच्या कोणत्या वर्गात तुम्ही आहात?" त्यांनी प्लेखानोवना विचारले.

"मी क्रांतिकारक आहे, ज्यानं स्वातंत्र्यासाठी आयुष्याची चाळीस वर्षे वेचली आहेत!" प्लेखानोव उत्तरले.

"ते काही असलं तरी आता तुम्ही स्वतःला भांडवलदारांना विकलं आहे!" एक कामगार म्हणाला.

रशियन सामाजिक लोकशाहीचे संस्थापक असलेल्या प्लेखानोवना कामगार इतःपर ओळखत नव्हते!

## ५

## सोविएत सरकारचे आवाहन

"केरेन्स्की यांच्याकडून फसविल्या गेलेल्या गात्चिनामधील तुकडयांनी शस्त्रे खाली ठेवली आणि केरेन्स्कींना अटक करण्याचे ठरविले. प्रतिक्रांतिकारक मोहीमेचे प्रमुख केरेन्स्की पळून गेले आहेत. सैन्याने बहुसंख्य मतांनी, सोविएतांच्या दुसऱ्या अखिल रशियन काँग्रेसला व तिने निर्माण केलेल्या सरकारला आपला पाठिंबा जाहीर केला आहे. सेनेची सोविएत सरकारबद्दलची निष्ठा व्यक्त करण्यासाठी आघाडीवरून अनेक प्रतिनिधी घाईघाईने पेत्रोग्रादला येत आहेत. सत्याचा कितीही विपर्यास घडविण्यात आला तरी, क्रांतिकारक कामगार-सैनिक-किसान यांच्याविरुद्ध कितीही गरळ ओकले तरी, जनतेवर त्याचा परिणाम झाला नाही. कामगारांची आणि सैनिकांची क्रांती विजयी ठरली आहे...

"प्रतिक्रांतीच्या झेंडयाखाली चालणाऱ्या सैनिकांना केंद्रीय कार्यकारी समिती आवाहन करीत आहे की, त्यांनी आपली शस्त्रे तात्काळ खाली ठेवावी, मूठभर जमीनदारांच्या आणि भांडवलदारांच्या हितासाठी आपल्या बांधवांचे रक्त आणखी सांडू नये. जनतेच्या शत्रूंच्या झेंडयाखाली क्षणभरदेखील राहणाऱ्यांना कामगारांच्या, सैनिकांच्या आणि किसानांच्या रशियाचे तळतळाट लागतील.

"कझाकांनो! विजयी जनतेमध्ये येऊन सामील व्हा! रेलकामगारांनो, पोस्टमनांनो, तारवाल्यांनो – सारे सारे जनतेच्या नव्या सरकारला पाठिंबा द्या!"

# दहाव्या प्रकरणाचे परिशिष्ट

## १

## क्रेमलिनचे नुकसान

तोफांच्या सरबत्तीनंतर लागलीच क्रेमलिनमध्ये जाऊन तेथे कितपत नुकसान झाले याची मी स्वत: तपासणी केली. विशेष महत्त्व नसलेल्या छोट्या निकोलाय राजवाड्याचा युंकरांनी बराकींसारखा वापर केला. पूर्वी येथे एखाद्या ग्रँड डचेसचे स्वागत समारंभ होत असत. या राजवाड्यावर केवळ तोफगोळ्यांचा भडिमार झाला एवढेच नाही, तर त्याला भरपूर लुट-ण्यात आले. सुदैवाने ऐतिहासिक मोलाच्या वस्तू तेथे नव्हत्या.

उस्पेन्स्की कॅथेड्रलच्या एका घुमटाला तोफगोळ्याचा मार बसला, पण छतावरचे काही फूट नक्षीकाम कोसळलेले सोडल्यास, बाकी काहीही नुकसान झाले नव्हते. ब्लागोवेश्चेन्स्की कॅथेड्रलच्या दर्शनी आवारातील गिलाव्याच्या चित्रांचे मात्र तोफगोळ्याने फार नुकसान झाले. दुसऱ्या एका तोफगोळ्याचा 'इवान वेलिकी घंटे'च्या कोपऱ्याला तडाखा बसला. चुदोवस्की मठावर सुमारे तीस तोफगोळे उडाले, पण फक्त एकच गोळा खिडकीमधून आत गेला, बाकीच्यांनी विटांच्या भिंती आणि छतावरचे कंगोरे पाडले.

स्पास्कीये मनोऱ्यावरच्या घड्याळाचा चुराडा झाला. त्रोईत्स्की गेटही छिन्नविच्छिन्न झाले होते, पण त्याची सहज दुरुस्ती करण्यासारखी होती. खालच्या मनोऱ्यांपैकी एकाचा विटांचा घुमट कोसळला होता.

सेंट बेसिलच्या प्रार्थनामंदिराला अजिबात धक्का लागलेला नव्हता. तसेच मोठ्या शाही राजवाड्याला धक्का बसलेला नव्हता. त्याच्या तळ-घरात मॉस्को आणि पेत्रोग्रादमधील सर्व भांडारे ठेवलेली होती, तसेच खजिन्यात राजघराण्यातील जडजवाहीर ठेवलेले होते. या स्थळी प्रवेशसुद्धा करण्यात आला नव्हता.

## २

## लुनाचार्स्की यांची घोषणा

"कॉम्रेडहो! देशाचे तुम्ही नवे स्वामी आहात आणि जरी तुम्हाला बरेच काही करायचे आहे व बऱ्याच गोष्टींचा विचार करायचा आहे हे

खरे असले तरी, तुमच्या कला आणि वैज्ञानिक भांडारांचे रक्षण कसे करायचे याची तुम्हाला माहिती पाहिजे.

"कॉम्रेडहो! मॉस्कोत जे काही घडते आहे ते भयानक, कधीही भरून न येणारे दुर्दैव आहे... सत्तेच्या संघर्षात लोकांनी आपल्या वैभवशाली राजधानीचा विध्वंस चालविलाय. या हिंसात्मक संघर्षाच्या काळात, या विध्वंसक युद्धकाळात, सार्वजनिक शिक्षणाच्या कमिस्सारपदावर असणे ही विशेष भयानक बाब आहे. केवळ समाजसत्तावादाच्या विजयाची आशा, नव्या अधिक श्रेष्ठ संस्कृतीच्या उगमाची आशा, मला शांत करते. जनतेच्या कलावैभवाचे रक्षण करण्याची जबाबदारी माझ्यावर पडली आहे...

"जेथे माझा प्रभाव पडत नाही अशा पदावर राहणे मला शक्य नसल्याने, मी राजिनामा दिला.*

"पण कॉम्रेडहो, तुमचा मला पाठिंबा द्या अशी विनवणी करतो... तुमच्यासाठी आणि तुमच्या वंशजांसाठी आपल्या भूमीचे सौंदर्य जतन करा; जनतेच्या मालमत्तेचे राखणदार बना.

"लौकरच, अगदी लौकरच, ज्याला प्रदीर्घ काळ अज्ञानात ठेवले होते अशा अडाण्यातल्या अडाण्यालाही जाग येईल आणि कला म्हणजे आनंदाचे, सामर्थ्याचे आणि शहाणपणाचे केवढे मोठे निधान आहे याची त्याला समज येईल...

सार्वजनिक शिक्षणाचे जन-कमिस्सार
**लुनाचार्स्की.**

३ नोव्हेंबर १९१७."

## ३

# भांडवलदारवर्गासाठी प्रश्नपत्रिका

विभाग . . . . आडनांव . . घर समिती . .
क्र . . . . . . .
पत्ता . . . . . . . नांव क्र . . .

---

*लुनाचार्स्की आपल्या पदावर कायम राहिले. – सं.

| लिंग | वय | उपलब्ध माल | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | कापड | आर्शिन मध्ये | तयार कापडे | नग |
| मासिक सरासरी | | अंतर्वस्त्रांसाठी | | वरचे कोट : | |
| उत्पन्न | खर्च | सुटांसाठी | | हिवाळी | |
| | | वरच्या कोटांसाठी | | उन्हाळी | |
| | | | | शारदीय | |
| | | | | पोषाख आणि सूट | |
| | | | | अंतर्वस्त्रे | |
| मासिक भाडे | | | | बूट | |
| | | | | रबरी पादत्राणे | |
| गाळा | खोली | इतर प्रकार | | | |

खाली सही करणारा मी जाहीर करतो की, वरील तपशील खरा आहे आणि इतरत्र मला कार्ड मिळालेले नाही.

सही . . .
( कार्डधारकाची सही )

मॉस्को . . . १९१ . . .
( घर समितीची मोहोर )

४

## क्रांतिकारक अर्थविषयक उपाययोजना हुकूम

कामगारांच्या आणि सैनिकांच्या प्रतिनिधींच्या मॉस्को सोविएतशी जोडलेल्या लष्करी क्रांतिकारक समितीने माझ्या हाती सोपविलेल्या अधिकारांनुसार मी आज्ञा देत आहे :

१. शाखांसहित सर्व बँका, शाखांसहित मध्यवर्ती सरकारी बचत बँक व टपाल आणि तार कचेऱ्यांमधील बचत बँका २२ नोव्हेंबरपासून सकाळी ११ ते दुपारी १ वाजेपर्यंत, पुढील हुकूम मिळेपर्यंत उघड्या राहतील.

२. पुढील आठवड्याच्या दरम्यान, चालू खात्यांवर आणि बचत बँकांच्या बुकांवर, उपरोल्लेखित संस्थांमधून प्रत्येक ठेवीदाराला १५० रूबलपेक्षा अधिक रक्कम देण्यात येऊ नये.

३. चालू खात्यांवर आणि बचत बँक बुकांवर, आठवड्याला १५० रूबलपेक्षा अधिक रकमा, तसेच इतर सर्व प्रकारच्या खात्यांवरील रकमा २२, २३ आणि २४ नोव्हेंबर या तीन दिवशी, फक्त पुढील बाबींवर देण्यात येतील :

(अ) लष्करी संघटनांच्या खात्यांवर त्यांच्या गरजा भागविण्यासाठी ;

(ब) कारखाना समित्यांनी किंवा कर्मचाऱ्यांच्या सोविएतांनी प्रमाणपत्रे दिलेल्या आणि कमिस्सारांच्या सह्यांची शिफारस जोडलेल्या, किंवा लष्करी क्रांतिकारक समितीच्या आणि विभागीय लष्करी क्रांतिकारक समित्यांच्या प्रतिनिधींनी शिफारस जोडलेल्या तक्त्यांनुसार आणि याद्यांनुसार, कर्मचाऱ्यांचे पगार व कामगारांची वेतने चुकती करण्यासाठी.

४. ड्राफ्टवर १५० रूबलपेक्षा अधिक रक्कम देण्यात येऊ नये. उरलेल्या रकमा चालू खात्यात जमा कराव्या व चालू आज्ञापत्राच्या क्रमानुसार त्या चुकत्या करण्यात याव्यात.

५. या तीन दिवसांमध्ये बँकांच्या इतर सर्व व्यवहारांना मनाई आहे.

६. सर्व खात्यांवर कितीही प्रमाणात पैशांच्या ठेवी स्वीकारल्या जातील.

७. कलम ३ मध्ये निर्देशित केलेल्या अधिकारांचे प्रमाणपत्र देण्यासाठी अर्थ मंडळाचे प्रतिनिधी इल्यीन्का रस्त्यावरील स्टॉक एक्स्चेंजच्या इमारतीत, सकाळी १० वाजल्यापासून दुपारी २ वाजेपर्यंत आपल्या कचेरीत बसतील.

८. आपल्या पैशाच्या रोजच्या व्यवहारांच्या एकूण बेरजांचे आकडे संध्याकाळी ५ वाजायच्या दरम्यान बँका आणि बचत बँका स्कोबेलियेव चौकातील सोविएतच्या मुख्य कचेरीत, लष्करी क्रांतिकारक समितीकडे, अर्थ मंडळासाठी पाठवतील.

९. सर्व प्रकारची कर्जे देणाऱ्या संस्थांच्या सर्व कर्मचाऱ्यांपैकी आणि व्यवस्थापकांपैकी जे या आज्ञापत्रकानुसार वागणार नाहीत, त्यांना क्रांतीचे आणि जनतेचे शत्रू मानून, क्रांतिकारक न्यायालयांपुढे खेचण्यात येईल. जनतेच्या माहितीसाठी त्यांची नांवे प्रसिद्ध करण्यात येतील.

१०. बचत बँकांच्या आणि बँकांच्या व्यवहारांवर नियंत्रण ठेवण्यासाठी, या आज्ञापत्राच्या मर्यादेत, विभागीय लष्करी क्रांतिकारक समित्या तीन प्रतिनिधी निवडतील आणि त्यांच्या कामाची जागा नेमून देतील.

लष्करी क्रांतिकारक समितीचे पूर्णाधिकारी
कमिस्सार, **शेवेर्दिन-माक्सिमेन्को**."

# अकराव्या प्रकरणाचे परिशिष्ट

## १

## या प्रकरणाचा मर्यादा

या प्रकरणात जवळ जवळ दोन महिन्यांमधील घटनांचा आढावा आहे. दोस्तांबरोबरच्या वाटाघाटींचा काळ, जर्मनांबरोबरच्या वाटाघाटींचा आणि शस्त्रसंधीचा काळ, ब्रेस्त-लितोव्स्क येथील शांतता तहाच्या वाटाघाटींचा व सोविएत राज्याच्या पायाभरणीचा काळ, या सर्वांचा समावेश आहे.

परंतु या अत्यंत महत्त्वाच्या ऐतिहासिक घडामोडींचे वर्णन करणे आणि त्यांचा अन्वयार्थ लावणे हा प्रस्तुत पुस्तकाचा हेतू नाही. त्यासाठी अधिक जागेची गरज आहे. म्हणून माझ्या दुसऱ्या पुस्तकासाठी, 'कोर्निलोव ते ब्रेस्त-लितोव्स्क'साठी, मी या घडामोडी राखून ठेवल्या आहेत.

तेव्हा या प्रकरणात, सोविएत सरकारने देशात आपली राजकीय सत्ता दृढ बनविण्यासाठी केलेल्या प्रयत्नांचे वर्णन करण्यापुरतेच मी स्वतःला मर्यादित ठेवले आहे आणि अंतर्गत विरोधी प्रवृत्तींवर सोविएत सरकारने एका पाठोपाठ एक मिळविलेल्या विजयांची रूपरेषा दिली आहे. ही विजय परंपरा ब्रेस्त-लितोव्स्कच्या हानीकारक शांतता-तहामुळे तात्पुरती खंडित झाली होती.

## २

## रशियामधील लोकांच्या हक्कांची घोषणा

**( प्रस्तावना )**

विमोचनाच्या समान ध्वजेखाली कामगार आणि किसानांची ऑक्टोबर क्रांती सुरू झाली.

जमीनदारांच्या सत्तेपासून **किसान** विमुक्त होत आहेत, कारण इतःपर जमीनदारांचा मालमत्तेचा हक्क देशात राहिला नाही—तो नष्ट करण्यात आला आहे. **सैनिक** आणि **खलाशी** सेनापतींच्या एकतंत्री सत्तेपासून मुक्त होत आहेत, कारण यापुढे सेनापतींची नेमणूक निवडणुकीद्वारे होईल आणि

त्यांना प्रसंगी परत बोलावण्यात येईल. **कामगारांना** भांडवलदारांच्या लहरीं-पासून व बेबंद इच्छांपासून मुक्त करण्यात येत आहे, कारण यापुढे गिरण्यां-वर आणि कारखान्यांवर कामगारांचे वर्चस्व स्थापन करण्यात येईल. प्रत्येक सजीव आणि जीवनयोग्य व्यक्तीला तिरस्करणीय शृंखलांपासून मुक्त केले जात आहे.

ज्यांनी दडपशाही व लहरी सत्तेचा जाच सोसला आहे व सोसत आहेत असे फक्त **रशियातील लोक** राहिले आहेत; त्यांच्या विमोचनाला ताबडतोब प्रारंभ केला पाहिजे, त्यांची मुक्तता ठामपणे आणि निश्चितपणे केली पाहिजे.

झारशाहीच्या काळात रशियातील लोकांना पद्धतशीरपणे एकमेकांविरुद्ध चिथावले जात असे. अशा धोरणाचे परिणाम सर्वांना माहीत आहेत; एका बाजूला कत्तली आणि गुंडगिरी, दुसऱ्या बाजूला लोकांची गुलामगिरी.

या लाजिरवाण्या धोरणाची पुन्हा कधीही उजळणी घडू नये. त्याऐवजी यापुढे रशियातील जनतेच्या **स्वेच्छापूर्ण** व **प्रामाणिक** ऐक्याचे धोरण अंमलात आणावे.

साम्राज्यशाहीच्या काळात, मार्च क्रांतीनंतर, जेव्हा कॅडेट भांडवलदार-वर्गाच्या हाती सत्ता गेली तेव्हा चिथावणी देण्याच्या त्या उघडचानागडचा धोरणाच्या ऐवजी रशियातील लोकांकडे भेदरट अविश्वासाने पाहण्याचे धोरण सुरू झाले, छिद्रान्वेषी, लोकांच्या अर्थहीन "स्वातंत्र्या"चे आणि "समते"चे धोरण सुरू झाले. या धोरणाचे परिणाम ज्ञात आहेत: राष्ट्रीय वैरभावनेची वाढ, परस्परांवरील विश्वासाच्या भावनेची हानी.

या खोटेपणाच्या आणि अविश्वासाच्या, छिद्रान्वेषण करण्याच्या व चि-थावणी देण्याच्या, नालायक धोरणाला पूर्णविराम दिला पाहिजे. यापुढे त्या ऐवजी रशियातील लोकांमध्ये **संपूर्ण परस्पर विश्वास** निर्माण करणारे खुले आणि प्रामाणिक धोरण अंमलात आणले पाहिजे.

अशा विश्वासाच्या परिणामीच केवळ रशियातील लोकांचे प्रामाणिक आणि चिरंतन ऐक्य स्थापन केले जाईल.

केवळ अशा ऐक्याच्या परिणामीच रशियातील लोकांच्या कामगारांचे आणि किसानांचे एका भक्कम क्रांतिकारक शक्तीमध्ये रूपांतर होईल व ती शक्ती साम्राज्यवादी-विलीनीकरणवादी भांडवलदारांच्या सर्व प्रयत्नांना प्रतिकार करू शकेल.

३

# आज्ञापत्रे

## बँकाच्या राष्ट्रीयीकरणाविषयी

राष्ट्रीय अर्थव्यवस्थेचे नियमित संघटन करण्याच्या दृष्टीने, बँकेच्या सट्टेबाजीला संपूर्ण खणून काढण्याच्या आणि कामगारांची, किसानांची, सर्व कष्टकरी जनतेची बँकेच्या भांडवलाच्या शोषणातून मुक्तता करण्याच्या दृष्टीने, तसेच जनतेचे आणि अत्यंत गरीब वर्गाचे खरेखुरे हित साधू शकेल अशी रशियन प्रजासत्ताकाची एकच एक राष्ट्रीय बँक स्थापन करण्याच्या दृष्टीने, केंद्रीय कार्यकारी समिती निर्णय घेत आहे:

१. बँकेचा व्यवसाय ही राज्याची मक्तेदारी राहील.

२. सध्या अस्तित्वात असलेल्या सर्व खाजगी जॉइंट-स्टॉक बँका आणि बँकांच्या कचेऱ्या सरकारी बँकेत विलीन करण्यात आल्या आहेत.

३. बंद करण्यात येणाऱ्या संस्थांच्या देण्याघेण्याच्या व्यवहारांची जबाबदारी सरकारी बँकेने घेतली आहे.

४. एका खास आज्ञापत्राद्वारे, खाजगी बँका सरकारी बँकेत विलीन करण्याचा क्रम निर्णित केला जाईल.

५. खाजगी बँकांच्या व्यवहाराची तात्पुरती व्यवस्था सरकारी बँकेच्या बोर्डाकडे सोपविण्यात आली आहे.

६. छोटया ठेवीदारांच्या हितसंबंधांचे रक्षण केले जाईल.

## सर्व लष्करी लोकांच्या दर्जाच्या समानतेविषयी

सैन्यामधील पुर्वीचे विषमतेचे सर्व अवशेष ताबडतोब ठामपणे नष्ट करण्याच्या क्रांतिकारी जनतेच्या इच्छेला अंमलात आणण्याच्या दृष्टीने जन-कमिस्सार मंडळ आज्ञापत्र काढीत आहे:

१. कार्पोरलच्या पदापासून सुरू होणाऱ्या आणि जनरलच्या पदाला समाप्त होणाऱ्या, सैन्यामधील सर्व पदांना आणि श्रेणींना नष्ट करण्यात आले आहे. रशियन प्रजासत्ताकाच्या सैन्यात आता स्वतंत्र आणि समान दर्जाचे नागरिक आहेत व क्रांतिकारक सेनेतील सैनिक असा सन्मान्य किताब ते धारण करतात.

२. पूर्वीच्या पदांशी आणि श्रेणींशी निगडित सर्व खास हक्क, तसेच भेदाची बाह्य चिन्हे, नष्ट करण्यात आली आहेत.

३. किताबाने उल्लेख करून बोलण्याची पद्धत रद्द करण्यात आली आहे.

४. सर्व पदके, किताब आणि खास चिन्हे नष्ट करण्यात आली आहेत.

५. अधिकाऱ्याचे पद नष्ट केल्यामुळे, सर्व वेगवेगळ्या अधिकाऱ्यांच्या संघटना नष्ट झाल्या आहेत.

६. चालू सैन्यामधील ऑर्डर्लींची प्रथा नष्ट करण्यात आली आहे.

**टीप** – फक्त मुख्य कचेऱ्या, न्यायालयांचे भाग, समित्या आणि इतर सेना संघटनांपुरते ऑर्डर्ली ठेवण्यात आले आहेत.

जन-कमिस्सार मंडळाचे अध्यक्ष,
**व्ला. उल्यानोव (लेनिन).**

लष्करी आणि नाविक खात्यांचे जन-कमिस्सार
**क्रीलेन्को.**

लष्करी खात्याचे जन-कमिस्सार
**पदवोयस्की.**

मंडळाचे चिटणीस,
**गोर्बुनोव.**

### सेनेमधील निवड तत्त्वाबद्दल आणि अधिकाराच्या संघटनाबद्दल

१. कष्टकरी जनतेच्या इच्छा अंमलात आणणारी सेना आपल्या सर्वोच्च प्रतिनिधीच्या – जन-कमिस्सार मंडळाच्या – अधिकाराधीन आहे.

२. लष्करी विभागांच्या आणि त्यांच्या संयोगांच्या मर्यादांमधील संपूर्ण अधिकार संबंधित सैनिकी समित्यांच्या आणि सोविएतांच्या हाती दिलेला आहे.

३. फौजांच्या जीवनामधील आणि कार्यामधील ज्या अवस्था आधीच समित्यांच्या अख्त्यारात आहेत, त्या आता औपचारीकरीत्या थेट त्यांच्या नियंत्रणाखाली देण्यात आल्या आहेत. ज्या शाखांच्या कार्यावर समिती वर्चस्व ठेवू शकत नाही त्यांच्यावर सैनिकी सोविएतांचे नियंत्रण स्थापित करण्यात आले आहे.

४. अधिकारी कर्मचारीवर्गाची निवडणूक सुरू करण्यात आली आहे. रेजिमेंटांच्या सेनानायकांपर्यंतचे सर्व सेनानायक – रेजिमेंटच्या सेनानायकासह

—स्क्वाड, पलटणी, कंपन्या, स्क्वाड्रन, बॅटरी, डिव्हिजन आणि रेजिमेंटा यांच्या सार्वत्रिक मतदानामधून निवडण्यात येतील. रेजिमेंटच्या सेनानायका-पेक्षा वरचे सेनानायक आणि सर्वोच्च सेनानायकापर्यंतचे सेनानायक,—सर्वोच्च सेनानायकासह—समित्यांच्या कॉंग्रेसांतर्फे किंवा परिषदांतर्फे निवड-ण्यात येतील.

**टीप**—या ठिकाणी "परिषद" याचा अर्थ, संबंधित समित्यांची एका दर्जाने. खालच्या समित्यांच्या प्रतिनिधींबरोबरची बैठक, असा घ्यायचा. (म्हणजे रेजिमेंटच्या समित्यांची कंपन्यांच्या समित्यांच्या प्रतिनिधींबरोबरची "परिषद".)

५. रेजिमेंट सेनानायकापेक्षा वरच्या दर्जाचे निवडलेले सेनानायक सर्वांत नजीकच्या सर्वोच्च समित्यांनी मान्य केले पाहिजेत.

**टीप**—जर निवडलेल्या सेनानायकाला सर्वोच्च समितीने नकार दिला व नकाराच्या कारणांचे निवेदन सादर केले, तर खालच्या समित्यांनी दुसऱ्यांदा निवड केलेल्या सेनानायकाची नेमणूक मान्य केली पाहिजे.

६. सेनांचे नायक सेना कॉंग्रेसांतर्फे निवडले जातील. आघाडीवरचे सेनानायक संबंधित आघाड्यांच्या कॉंग्रेसांतर्फे निवडले जातील.

७. ज्या तांत्रिक स्वरूपाच्या पदांवर खास ज्ञानाची किंवा इतर व्यावहारिक पूर्वतयारीची आवश्यकता असेल, उदाहरणार्थ: डॉक्टर, अभियंते, तंत्रज्ञ, तार आणि रेडिओ ऑपरेटर, वैमानिक, मोटारतज्ज्ञ इत्यादी; तर असे फक्त खास ज्ञान असलेल्या लोकांची निवड संबंधित सेवांच्या विभागीय समित्यांमार्फत करायला हरकत नाही.

८. सेनाधिकाऱ्यांचे प्रमुख त्या पदासाठी आवश्यक ते खास लष्करी प्रशिक्षण असलेल्या व्यक्तींमधून समितीतर्फे निवडावेत.

९. सेनाधिकारी वर्गाच्या इतर सर्व सदस्यांची नेमणूक सेनाधिकारी प्रमुख करतील व त्या नेमणुकांना संबंधित कॉंग्रेसांतर्फे मान्यता मिळाल्या पाहिजेत.

**टीप**—खास प्रशिक्षण असलेल्या सर्व लोकांची खास यादीत नोंद केली पाहिजे.

१०. प्रत्यक्ष सेवेत असलेल्या सेनानायकांची जर सैनिकांनी कोणत्याही पदावर निवड केली नाही, तर अशा सेनानायकांना परिणामी साध्या सैनिकाचा दर्जा प्राप्त होईल; त्या सर्वांना लष्करी सेवेमधून निवृत्त होण्याचा हक्क राखून ठेवण्यात आला आहे.

११. आर्थिक खात्यांमधील जागा वगळता, हुकुमाशी संबंधित सोडून इतर सर्व कार्यांसाठी, संबंधित नियुक्त सेनानायकांमार्फत जागांच्या नेमणुका केल्या जातील.

१२. सेनाधिकारी वर्गाच्या निवडणुकांसंबंधीच्या तपशीलवार सूचना स्वतंत्रपणे प्रसिद्ध केल्या जातील.

जन-कमिस्सार मंडळाचे अध्यक्ष,
**व्ला. उल्यानोव (लेनिन).**

लष्करी आणि नाविक खात्यांचे जन-कमिस्सार,
**क्रीलेन्को.**

लष्करी खात्याचे जन-कमिस्सार,
**पदवोयस्की.**

मंडळाचे चिटणीस,
**गोर्बुनोव.**"

## वर्ग आणि किताब नष्ट करण्याबाबत

१. सर्व वर्ग आणि वर्गीय विभागणी, सर्व वर्गीय खास अधिकार आणि आखून दिलेल्या मर्यादा, सर्व वर्ग-संघटना आणि संस्था व सर्व नागरी पदांना नष्ट करण्यात आले आहे.

२. समाजातील सर्व वर्ग (उमराव, व्यापारी, मध्यमवर्गीय इ.) आणि सर्व किताब (प्रिन्स, काऊंट आणि इतर) आणि नागरी पदांच्या सर्व उपाधी (प्रिव्ही, सरकारी कौन्सिलर आणि इतर) नष्ट करण्यात आल्या आहेत व रशियन प्रजासत्ताकाचा नागरिक अशी एकच सार्वत्रिक उपाधी प्रस्थापित करण्यात आली आहे.

३. उमराववर्गांच्या मालमत्ता आणि संस्था ताबडतोब संबंधित स्वायत्त झेम्स्त्वोंच्या हाती सोपविण्यात आल्या आहेत.

४. व्यापारी आणि भांडवलदारी संघटनांची मालमत्ता ताबडतोब नगर-पालिकेच्या स्वयंशासनाच्या ताब्यात देण्यात येत आहे.

५. कोणत्याही प्रकारच्या वर्गीय संस्था, त्यांच्या मालमत्तेसकट आणि त्यांच्या दफ्तरखान्यांसकट, नगरपालिकांच्या आणि झेम्स्त्वोंच्या कारभाराच्या ताब्यात देण्यात येत आहेत.

६. या बाबींविषयीची अस्तित्वात असलेली कायद्यांची सर्व कलमे इतःपर रद्द करण्यात आली आहेत.

७. हे आज्ञापत्र ज्या दिवशी प्रसिद्ध होईल त्या दिवसापासून अंमलात येईल आणि कामगारांच्या, सैनिकांच्या, किसानांच्या प्रतिनिधींच्या सोविएतांनी त्याची अंमलबजावणी करावयाची आहे.

या आज्ञापत्राला, २३ नोव्हेंबर १९१७ रोजी भरलेल्या केंद्रीय कार्यकारी समितीच्या बैठकीत मंजुरी देण्यात आली आहे व पुढील लोकांनी सह्या केल्या आहेत :

केंद्रीय कार्यकारी समितीचे अध्यक्ष
**स्वेर्दलोव**

जन-कमिस्सार मंडळाचे अध्यक्ष,
**व्ला. उल्यानोव (लेनिन).**

जन-कमिस्सार मंडळाचे कार्यकारी अधिकारी,
**बाँच-ब्रूयेविच.**

मंडळाचे चिटणीस,
**गोर्बुनोव.**"

३ डिसेंबरला जन-कमिस्सार मंडळाने **निर्णय घेतला** की, "सर्व सरकारी संस्थांमध्ये आणि संघटनांमध्ये, सार्वत्रिक आणि खास स्वरूपाच्या, काम करणाऱ्यांचे पगार निरपवादपणे कमी करण्यात यावेत."

सर्वप्रथम मंडळाने जन-कमिस्सारचा पगार दर महिन्याला ५०० रूबल ठरवला व कुटुंबात काम करण्यास असमर्थ असलेल्या प्रत्येक प्रौढ व्यक्तीमागे १०० रूबल जादा देण्याचे ठरविले.

कोणत्याही सरकारी अधिकाऱ्याला देण्यात येणारा हा सर्वांत जास्त पगार होता.

## ४

काऊंटेस पानिना यांना अटक करून सर्वोच्च क्रांतिकारक न्यायालयासमोर त्यांच्यावर खटला चालविण्यात आला. 'कोर्निलोव ते ब्रेस्त-लितोव्स्क' या माझ्या आगामी पुस्तकात 'क्रांतिकारक न्याय' या प्रकरणात या खटल्याचे वर्णन दिलेले आहे. कैद्याला शिक्षा देण्यात आली की, "पैसे परत करावेत आति सार्वजनिक तिरस्कारापुढे मोकळे सोडण्यात यावे." दुसऱ्या शब्दांमध्ये सांगायचे तर त्यांना मुक्त करण्यात आले!

## ५

## 'द्रुग नरोदा' (मेन्शेविक) तारीख १८ नोव्हेंबर, यामधून :

"बोल्शेविकांच्या "तात्काळ शांतता तहाच्या" गोष्टीमुळे आम्हाला एका गंमतीदार चित्रपटाची आठवण होते... नेरातोव पळताहेत – ट्रॉट्स्की त्यांचा पाठलाग करताहेत; नेरातोव भिंत चढून जातात, ट्रॉट्स्कीही भिंत चढून जातात; नेरातोव पाण्यात सूर मारतात, ट्रॉट्स्की त्यांचे अनुकरण करतात; नेरातोव छपरावर चढून जातात, ट्रॉट्स्की लगोलग त्यांच्या मागे जातात; नेरातोव बिछान्याआड लपतात – आणि ट्रॉट्स्की त्यांना पकडतात! त्यांनी त्यांना धरले! साहजिकच शांतता तहावर ताबडतोब सह्या झाल्या.

"परराष्ट्र खात्याच्या कचेरीत शुकशुकाट आहे. संदेशवाहक अदबीने वागतात, पण त्यांच्या मुद्रांवर उपहासात्मक भाव असतो...

"एखाद्या राजदूताला अटक करून त्याच्याशी शस्त्रसंधीच्या किंवा शांतता तहावर सह्या करण्याची कल्पना कशी आहे? पण हे राजदूतसुद्धा मोठे तऱ्हेवाईक लोक आहेत. जणू काही त्यांनी काही ऐकलेच नाही असा आव आणून ते गप्प राहतात. हे इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी! आम्ही तुमच्याबरोबर शस्त्रसंधीच्या करारावर सह्या केल्या! याबाबत तुम्हाला काहीच माहीत नाही असे शक्य आहे? पण तो करार सर्व वर्तमानपत्रांमधून छापण्यात आला आहे आणि सर्व भिंतींवर तो चिकटवलेला आहे. बोल्शेविकांशप्पत, शांतता तहावर सह्या झाल्यात. आमचे तुमच्यापाशी फार मागणे नाही; तुम्हाला फक्त दोन शब्द लिहायचे...

"राजदूत गप्प राहिलेत. राष्ट्रे गप्प राहिली आहेत. परराष्ट्र खात्याच्या कचेरीत संपूर्ण शुकशुकाट आहे.

"'हे पहा,' रोबेसपियरे-ट्रॉट्स्की आपले साहाय्यक मरात-उरीत्स्की यांना म्हणतात, 'ब्रिटिश राजदूतांकडे पळत पळत जा आणि आम्ही शांततेच्या तहाचा प्रस्ताव मांडतो आहोत म्हणून सांगा!'

"'तुम्हीच जा,' मरात-उरीत्स्की म्हणतात. "ते मला भेटायला तयार नाहीत.'

"'मग त्यांना टेलिफोन करा.'

"'मी प्रयत्न केला. पण रिसीव्हर बाजूला काढून ठेवलाय.'

"'त्यांना तार करा.'

"'केली.'

"'मग, काय परिणाम घडला?'

"मरात-उरीत्स्की उसासा टाकतात आणि उत्तर देत नाहीत. रोबेसपियरे-ट्रॉट्स्की कोपऱ्यात रागाने थुंकतात...

"'हे बघा मरात,' क्षणभरानंतर ट्रॉट्स्की पुन्हा बोलू लागतात. 'आपण क्रियाशील परराष्ट्र धोरण चालवतो आहेत हे पूर्णपणं दाखवून दिलं पाहिजे. कसं करायचं ते आपण?'

"'नेरातोव यांना अटक करण्याचं आणखी एक आज्ञापत्र काढा,' उरीत्स्की मोठा गंभीर आव आणून म्हणतात.

"'मरात तुम्ही मठ्ठ आहात!' ट्रॉट्स्की ओरडतात. एकाएकी ते उठून उभे राहतात, भयानक आणि भव्यपणे, या क्षणाला रोबेसपियरेप्रमाणे ते भासतात.

"'लिहा उरीत्स्की!' कठोरपणे ते म्हणतात. 'ब्रिटिश राजदूताला पत्र लिहा, रजिस्टर पोस्टानं पाठवा आणि पावती मागा लिहा! मी सुद्धा लिहीन! जगातले लोक तात्काळ शांतता तहाची वाट पाहताहेत!'

"परराष्ट्र खात्याच्या भव्य आणि रिकाम्या इमारतीत फक्त दोन टाईपरायटर बडवल्याचा आवाज ऐकू येतोय. खुद्द आपल्या हातांनी ट्रॉट्स्की क्रियाशील परराष्ट्र धोरण चालवीत आहेत..."

## ६

## समझोत्याच्या प्रश्नाविषयी

### सर्व कामगारांच्या आणि सर्व सैनिकांच्या माहितीसाठी

११ नोव्हेंबरला, प्रीअब्राझेन्स्की रेजिमेंटच्या क्लबात, पेत्रोग्राद शिबंदीच्या सर्व विभागांच्या प्रतिनिधींची एक खास सभा झाली.

कोणते समाजवादी पक्ष सोविएतांच्या सत्तेच्या बाजूचे आहेत, कोणते विरुद्ध आहेत, कोणते जनतेच्या बाजूचे आहेत, कोणते विरोधी आहेत व त्यांच्यामध्ये समझोता घडविणे शक्य किंवा नाही, या प्रश्नाची चर्चा करण्यासाठी, प्रीअब्राझेन्स्की आणि सेम्योनोव्स्की रेजिमेंटांच्या पुढाकाराने ही सभा भरली होती.

केंद्रीय कार्यकारी समिती, नगरपालिकेची दूमा, अव्क्सेन्तियेव किसान सोविएत आणि बोल्शेविकांपासून जनवादी-समाजवाद्यांपर्यंत सर्व राजकीय पक्षांच्या प्रतिनिधींना या सभेचे निमंत्रण गेले होते.

सर्व पक्षांची आणि संघटनांची निवेदने ऐकल्यानंतर, प्रदीर्घ काळ विचारविनिमय केल्यानंतर, सभेत प्रचंड बहुमताने निर्णय घेण्यात आला की, फक्त बोल्शेविक आणि डावे समाजवादी-क्रांतिकारक जनतेच्या बाजूचे आहेत; इतर सर्व पक्ष, समझोत्याच्या बहाण्याखाली, नोव्हेंबरातील महान कामगार-किसान क्रांतीमध्ये जिंकलेल्या विजयांपासून जनतेला वंचित करण्याचा केवळ प्रयत्न करीत आहेत.

पेत्रोग्राद शिबंदीच्या या सभेत ६१ अनुकूल, १ विरोधी आणि १२ तटस्थ अशा मतांनी संमत झालेल्या ठरावाचा मजकूर असा:

"सेम्योनोव्स्की आणि प्रीअब्राझेन्स्की रेजिमेंटांच्या पुढाकाराने बोलावलेल्या शिबंदीच्या या परिषदेत, भिन्न राजकीय पक्षांमध्ये समझोता घडवून आणण्याच्या प्रश्नावर सर्व समाजवादी पक्षांच्या आणि जनतेच्या संघटनांच्या प्रतिनिधींचे विचार ऐकल्यानंतर असे आढळून आले आहे की:

"१. केंद्रीय कार्यकारी समितीच्या प्रतिनिधींनी, बोल्शेविक पक्षाच्या प्रतिनिधींनी आणि डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांनी ठामपणे जाहीर केले की, ते सोविएतांच्या सरकारच्या बाजूचे आहेत, जमीनविषयक, शांतता-तहविषयक आणि उद्योगधंद्यांवरील कामगारांच्या वर्चस्वविषयक आज्ञापत्रांना अनुकूल आहेत आणि या भूमिकेवर सर्व समाजवादी पक्षांशी समझोता करण्याची त्यांची तयारी आहे.

"२. त्याच वेळी इतर पक्षांच्या प्रतिनिधींनी (मेन्शेविक, समाजवादी-क्रांतिकारक) एक तर अजिबात उत्तर दिले नाही, किंवा त्यांनी एवढेच जाहीर केले की, सोविएतांच्या सत्तेला त्यांचा विरोध आहे, जमीनविषयक, शांतता-तहविषयक आणि कामगारांच्या वर्चस्वविषयक आज्ञापत्रांना त्यांचा विरोध आहे.

"हे लक्षात घेऊन ही सभा ठराव करीत आहे:

"'१. समझोत्याच्या आडोशाखाली, नोव्हेंबरातील क्रांतीच्या जनतेच्या विजयांना जवळ जवळ नष्ट करण्याची इच्छा धरणाऱ्या सर्व पक्षांचा कडक निषेध व्यक्त करणे.

"'२. केंद्रीय कार्यकारी समिती आणि जन-कमिस्सार मंडळ यांच्यामध्ये संपूर्ण विश्वास व्यक्त करणे व त्यांना पूर्ण पाठिंब्याचे आश्वासन देणे.'

"तसेच सभेला असे सांगावेसे वाटते की, डाव्या समाजवादी-क्रांतिकारक कॉम्रेडांनी जनतेच्या सरकारमध्ये सामील होणे आवश्यक आहे."

## ७

# मद्यप्यांचे दंगे

नंतर असे आढळून आले की, सैनिकांमध्ये दंगे निर्माण करण्यासाठी कॅडेटांनी पद्धतशीर योजना आखल्या होत्या. वेगवेगळ्या बराकींमध्ये टेलिफोन-द्वारे निरोप येत की अमुक पत्त्यावर मद्य देण्यात येत आहे आणि त्या पत्त्यावर सैनिक आले म्हणजे एखादी व्यक्ती त्यांना मद्याचे गुदाम दाखवीत असे...

मद्यपानाविरुद्ध लढा देण्यासाठी एका कमिस्साराची नेमणूक जन-कमिस्सार मंडळाने केली. मद्यप्यांचे दंगे तर त्याने कठोरपणे मोडून काढलेच, पण मद्याच्या हजारो बाटल्या नष्ट केल्या. हेमंत प्रासादाच्या तळघरांमध्ये सुमारे पन्नास लाख डॉलर किंमतीची अतिउंची दुर्मीळ मद्ये ठेवलेली होती. त्या गुदामांमध्ये प्रथम पाणी सोडण्यात आले आणि नंतर ते मद्य क्रॉन्स्ताद्त येथे हलवून नष्ट करण्यात आले.

."क्रांतिकारक फौजांमधील सर्वोत्तम सुपुत्र" असे ट्रॉट्स्की ज्यांचे वर्णन करीत त्या क्रॉन्स्ताद्तच्या खलाशांनी हे काम कमालीच्या स्वयंशिस्तीने पार पाडले...

## ८

# सट्टेबाज

(त्यांच्याविषयीचे दोन हुकूम:)

**लष्करी क्रांतिकारक समितीला जन-कमिस्सार मंडळाकडून**

"सट्टेबाजांमुळे, लुटारूंमुळे आणि रेल्वेमधील, जहाजांच्या कचेऱ्यां-मधील, माल पाठवणाऱ्या कचेऱ्यांमधील त्यांच्या अनुयायांमुळे, युद्धामधून निर्माण झालेल्या विस्कळीत अन्नपुरवठ्याची परिस्थिती आत्यंतिक विकोपाला गेली आहे.

"राष्ट्रावर कोसळलेल्या मोठमोठ्या संकटांचा फायदा घेऊन हे गुन्हेगार दरोडेखोर स्वतःच्या लाभासाठी लक्षावधी सैनिकांच्या आणि कामगारांच्या आरोग्याशी व जीवनाशी खेळत आहेत.

"अशी परिस्थिती आता एकही दिवस अधिक सहन करणे शक्य नाही.

"सट्टेबाजी, घातपात, माल लपवून ठेवणे, कपटाने माल पाठवण्यात दिरंगाई करणे इत्यादी समूळ उखडून काढण्यासाठी लष्करी क्रांतिकारक समितीने निर्णायक उपाययोजना कराव्यात, असे जन-कमिस्सार मंडळ सूचवीत आहे.

"लष्करी क्रांतिकारक समितीच्या खास हुकुमांद्वारे, अशा कृत्यांबद्दल दोषी ठरलेल्या सर्व व्यक्तींना **ताबडतोब अटक करण्यात यावी आणि** क्रांतिकारक न्यायालयासमोर खटला चालू होईपर्यंत **त्यांना क्रॉन्स्तादृत येथील कारागृहात ठेवावे.**

"अन्नपुरवठ्यात लुटारूपणा करणाऱ्यांविरुद्ध लढा देण्यात सहकार्य करण्यासाठी सर्व जन-संघटनांना आवाहन करण्यात येत आहे.

जन-कमिस्सार मंडळाचे अध्यक्ष,
**व्ला. उल्यानोव (लेनिन).**"

## सर्व प्रामाणिक नागरिकांना उद्देशून

"लष्करी क्रांतिकारक समिती आज्ञा करीत आहे:

"दरोडेखोर, लुटारू, सट्टेबाज हे जनतेचे शत्रू म्हणून जाहीर करण्यात आले आहेत...

"लष्करी क्रांतिकारक समिती सर्व सार्वजनिक संघटनांना, सर्व प्रामाणिक नागरिकांना विनंती करीत आहे: त्यांना माहीत होणाऱ्या दरोडेखोरीच्या, लुटारूपणाच्या, सट्टेबाजीच्या सर्व घटना त्यांनी ताबडतोब लष्करी क्रांतिकारक समितीला कळवाव्या.

"या अनिष्टतेविरुद्ध लढा देणे हे सर्व प्रामाणिक लोकांचे काम आहे. ज्यांना जनतेच्या हिताबद्दल आस्था वाटते अशा सर्वांकडून लष्करी क्रांतिकारक समिती साहाय्याची अपेक्षा करते.

"सट्टेबाजांचा आणि लुटारूंचा माग काढण्याचे काम लष्करी क्रांतिकारक समिती अत्यंत कठोरपणे पार पाडील.

**लष्करी क्रांतिकारक समिती.**

पेत्रोग्राद, २ डिसें. १९१७."

## ९

# पुरीश्केविच यांचे कालेदिन यांना पत्र

"पेत्रोग्रादमधील परिस्थिती कमालीची निराशाजनक आहे. बाहेरच्या जगापासून शहराचा संबंध पुरता तुटला आहे आणि शहर पूर्णतः बोल्शेविकांच्या ताब्यात आहे. लोकांना भररस्त्यात पकडले जाते, नेवा नदीत फेकून दिले जाते, बुडवून ठार मारले जाते आणि कोणत्याही आरोपाविना तुरुंगात टाकण्यात येते. बूर्झेव यांना सुद्धा पीटर-पॉल किल्ल्यात कडक पहाऱ्यात अटक करून ठेवलेले आहे.

"ज्या संघटनेचा मी प्रमुख आहे ती संघटना, सर्व अधिकाऱ्यांना व युंकर विद्यालयांमधून उरलेल्यांना एकवटण्याचे आणि त्यांना सशस्त्र बनविण्याचे काम अविश्रांतपणे करीत आहे. अधिकाऱ्यांच्या आणि युंकरांच्या रेजिमेंटा निर्माण केल्याविना परिस्थिती आटोक्यात येणे शक्य नाही. या रेजिमेंटांच्या साहाय्याने हल्ला चढवून पहिले यश मिळाल्यानंतर, आम्ही शिबंदीच्या सैनिकांचा पाठिंबा मागाहून मिळवू शकू; पण त्या पहिल्या यशाविना एकाही सैनिकाबद्दल अपेक्षा बाळगणे शक्य नाही, कारण प्रत्येक रेजिमेंटमध्ये अस्तित्वात असलेल्या गाळामुळे हजारो सैनिकांमध्ये दुही माजली आहे व त्यांना दहशत बसली आहे. ज्यावेळी काहीतरी निर्णायक कृती करून काही साध्य करणे शक्य होते तो क्षण सोडून देण्याच्या जनरल दूतोव यांच्या चमत्कारिक धोरणामुळे बहुतेक कझाकांवर बोल्शेविक प्रचाराचा प्रभाव पडला आहे. वाटाघाटींच्या आणि सवलतींच्या धोरणाला फळे आली आहेत; सर्व प्रतिष्ठितांचा छळ होत आहे व हीनकुलीनांचे आणि गुन्हेगारांचे वर्चस्व माजले आहे – त्यांना गोळ्या घालण्याव्यतिरिक्त आणि फासावर लटकावण्याव्यतिरिक्त दुसरे काहीही करणे शक्य नाही.

"सेनापतीमहोदय, आम्ही तुमची वाट पहात आहोत आणि तुमचे आगमन होताच, आमच्यापाशी उपलब्ध असलेल्या सर्व सैन्यानिशी आम्ही हल्ला चढवू. पण त्यासाठी तुमच्याशी आम्ही काही दळणवळण साधले पाहिजे आणि त्यापूर्वी पुढील मुद्दे स्पष्ट केले पाहिजेत:

"(१) जे तुमच्या नांवाने लढाईत भाग घेऊ शकतील अशा सर्व अधिकाऱ्यांना, तुम्हाला जाऊन मिळण्याच्या बहाण्याखाली पेत्रोग्राद सोडण्याची निमंत्रणे येत आहेत, हे आपल्याला माहीत आहे काय?

“(२) तुमचे पेत्रोग्रादमध्ये केव्हा आगमन होईल असे आम्ही अपेक्षित धरावे? आपल्या हालचालींमध्ये मेळ घालण्याच्या दृष्टीने आम्हाला त्याची माहिती असावी.

“येथील सुजाण लोकांच्या निष्क्रीय राहण्याच्या अपराधामुळे बोल्शेविक-वादाचे जोखड आमच्या मानेवर बसले असले तरी – संघटित करण्यास अवघड असलेल्या बहुसंख्य अधिकाऱ्यांचा अतिमठ्ठपणा कारणीभूत झाला असला तरी – हे सर्व असले तरी आमचा विश्वास आहे की, सत्य आमच्या बाजूचे आहे आणि देशप्रेमाने प्रेरीत होऊन देशाला वाचविण्याच्या हेतूने लढणारे आम्ही दुष्ट आणि गुन्हेगारी शक्तींवर विजय मिळवू. काहीही झाले तरी आम्ही हताश होणार नाही आणि अखेरपर्यंत ठाम राहू.”

पुरीश्केविच यांच्यावर क्रांतिकारक न्यायालयासमोर खटला भरण्यात आला होता व अल्प मुदतीच्या कारावासाची शिक्षा त्यांना देण्यात आली होती...

## १०

# जाहिरातींच्या मक्तेदारीबाबत आज्ञापत्र

१. वृत्तपत्रांमध्ये, पुस्तकांमध्ये, जाहिरातींच्या बोर्डांवर, दुकानांमध्ये, कचेऱ्यांमध्ये आणि इतर ठिकाणी जाहिराती छापणे, ही सरकारची मक्तेदारी आहे असे जाहीर करण्यात येत आहे.

२. फक्त पेत्रोग्रादमधील हंगामी कामगार-किसान सरकारच्या मुखपत्रां-मध्ये आणि स्थानिक सोविएतांच्या मुखपत्रांमध्ये जाहिराती छापायला हरकत नाही.

३. जाहिरातीचा व्यवसाय सरकारच्या हाती येईपर्यंत, वृत्तपत्रांच्या आणि जाहिरात कचेऱ्यांच्या मालकांनी, तसेच या कचेऱ्यांमधील कर्मचाऱ्यांनी, आपापल्या जागांवर रहावे... आपल्या संस्थांचे व्यवस्थापन त्यांनी अखंडपणे चालू ठेवावे, सर्व खाजगी जाहिराती आणि त्यांच्या मिळालेल्या रकमा सो-विएतांच्या हाती सुपूर्द कराव्या, तसेच सर्व हिशेब आणि प्रती स्वाधीन करावी.

४. पैसे देऊन करण्यात येणाऱ्या जाहिरातींचे प्रकाशन करणाऱ्या व व्यवहार पाहणाऱ्या सर्व व्यवस्थापकांनी, तसेच त्यांच्या कर्मचाऱ्यांनी आणि कामगारांनी शहर काँग्रेस घ्यावी आणि प्रथम शहरातील ट्रेड युनियनांमध्ये एकवटावे; नंतर सोविएत प्रकाशनांमध्ये जाहिरातीच्या व्यवसायाचे अधिक

सखोल आणि न्याय्य संयोजन करण्यासाठी, तसेच जाहिरातींच्या सार्वजनिक उपयोगाचे अधिक चांगले नियम तयार करण्यासाठी अखिल रशियन युनियन-मध्ये एकवटावे.

५. दस्तऐवज किंवा पैसे लपवून ठेवल्याबद्दल, किंवा परिच्छेद ३ आणि ४ मधील निर्देशित नियमांचे उल्लंघन केल्याबद्दल, जे लोक दोषी ठरतील त्यांना जास्तीत जास्त तीन वर्षे कारावासाची शिक्षा ठोठावण्यात येईल आणि त्यांची सर्व मालमत्ता जप्त करण्यात येईल.

६. खाजगी प्रकाशनांमध्ये पैसे देऊन जाहिराती छापल्यास किंवा गुप्त स्वरूपात छापल्यासही कडक शासन केले जाईल.

७. जाहिरातींच्या कचेऱ्या सरकार आपल्या ताब्यात घेत आहे, आव-श्यक बाबतीत त्यांच्या मालकांना नुकसानभरपाई देण्यात येईल. जप्त केलेल्या संस्थांच्या छोट्या मालकांना, ठेवीदारांना आणि भागधारकांना त्यांनी गुंत-वलेले सर्व पैसे परत देण्यात येतील.

८. सर्व प्रकाशनगृहांनी आणि सर्वसाधारणपणे जाहिरातीचा व्यवसाय करणाऱ्या प्रत्येक संस्थेने आपला पत्ता ताबडतोब कामगार-सैनिक प्रतिनिधीं-च्या सोविएतला कळवावा आणि आपला व्यवसाय त्याच्या ताब्यात देण्याच्या दृष्टीने पुढील हालचाली कराव्या, अन्यथा परिच्छेद ५ मध्ये निर्देशित केले-ल्या शिक्षेला ते पात्र ठरतील.

जन-किमिस्सार अध्यक्ष,
**व्ला. उल्यानोव (लेनिन).**

सार्वजनिक शिक्षणाचे जन-कमिस्सार,
**लुनाचार्स्की.**

मंडळाचे चिटणीस
**गोर्बुनोव.**"

## ११

## अत्यावश्यक हुकूम

१. पेत्रोग्राद शहर वेढ्याच्या परिस्थितीत सापडल्याचे जाहीर करण्यात येत आहे.

२. रस्त्यांवर आणि चौकांमध्ये सर्व प्रकारच्या सभा घेण्यास व जमाव करण्यास मनाई करण्यात येत आहे.

३. मद्याची कोठारे, गुदामे, कारखाने, व्यवसायाच्या जागा, खाजगी घरे इ. इ. लुटण्याचे प्रयत्न केल्यास **कोणताही पूर्व इशारा न देता मशिन-गनच्या फैरी उडवून ते मोडून काढण्यात येतील.**

४. घर समित्यांना, दरवानांना, चौकीदारांना आणि रक्षकांना सर्व घरांमध्ये, प्रांगणांमध्ये आणि रस्त्यांवर कडक सुव्यवस्था राखण्यास सांगण्यात आले आहे; घरांची दारे आणि वाहनांची प्रवेशद्वारे रात्री ९ वाजता बंद करावीत आणि सकाळी ७ वाजता उघडावीत. रात्री ९ नंतर, घर समित्यांच्या परवानगीने फक्त भाडेकरू आपल्या घरांबाहेर जाऊ शकतील.

५. कोणत्याही प्रकारच्या मद्याचे वाटप, विक्री वा खरेदी करण्याबद्दल दोषी ठरलेल्यांना, तसेच क़लम २ आणि ४ यांची भंग केल्याबद्दल दोषी ठरलेल्यांना, ताबडतोब अटक करण्यात येईल आणि अत्यंत कडक शासन करण्यात येईल.

**दंग्यांविरुद्ध लढा देणारी समिती,**
**कामगार-सैनिक प्रतिनिधींच्या सोविएतांच्या**
**कार्यकारी समितीशी संलग्न.**

पेत्रोग्राद, ६ डिसेंबर,
रात्रीचे ३ वाजता."

## १२

## जनतेला उद्देशून

"कॉम्रेड कामगारांनो, सैनिकांनो, किसानांनो – सर्व कष्टकऱ्यांनो!

"कामगारांची आणि किसानांची क्रांती पेत्रोग्रादमध्ये, मॉस्कोमध्ये विजयी झाली आहे.

"आघाडीवरून आणि खेड्यांमधून दर दिवशी, दर तासाला, नव्या सरकारला अभिनंदनपर संदेश येत आहेत... बहुसंख्य जनता क्रांतीची बाजू घेत आहे हे पाहता क्रांतीचा विजय निश्चित झाला आहे.

"सर्व मालक आणि भांडवलदार, भांडवलदारांशी निकटतेने संबंध राखणारे उच्च कर्मचारी आणि अंमलदार – थोडक्यात म्हणजे सर्व श्रीमंत लोक आणि त्यांच्याशी सख्य राखणारे सर्व – नव्या क्रांतीला वैरभावनेने पाहतात, तिच्या यशाला विरोध करतात, बँकांचे व्यवहार बंद पाडण्याची धमकी घालतात व इतर संस्थांच्या कामात घातपात करतात किंवा अडथळे

आणतात, हे समजण्यासारखे आहे. ह्या वैराला आम्ही टाळू शकत नाही हे प्रत्येक सुजाण कामगार उत्तमपणे जाणतो... बोल्शेविक पक्षाच्या संपूर्ण प्रचारयंत्रणेने हे अनेकदा दाखवून दिले आहे. पण या प्रतिकाराचे कामकरी वर्गांना क्षणभरही भय वाटत नाही.

"बहुसंख्य लोक आमच्या बाजूचे आहेत. आम्ही बहुसंख्य कामगारांच्या आणि सबंध जगामधील दलितांच्या बाजूचे आहोत. न्याय आमच्या बाजूला आहे. आमचा अंतिम विजय नक्की आहे.

"भांडवलदारांचा आणि उच्च अधिकाऱ्यांचा प्रतिकार मोडून काढण्यात येईल. बँकांच्या आणि आर्थिक व्यवहार करणाऱ्या सिंडिकेटांच्या राष्ट्रीयीकरणासंबंधीच्या खास कायद्याविना कुणालाही आपल्या संपत्तीपासून वंचित केले जाणार नाही. हा कायदा तयार होत आहे. एकाही कामगाराचा एकही कोपेक गमावला जाणार नाही; उलट, त्याला मदत केली जाईल. या क्षणाला एकही नवा कर न बसवता, जुन्या राजवटीच्या आज्ञापत्रांनुसार वसूल होणाऱ्या करांची कडक मोजणी करून त्यांवर वर्चस्व प्रस्थापित करणे याशिवाय इतर कोणतीही उपाययोजना सरकार करू इच्छित नाही..

"कॉम्रेड कामगारांनो! **तुम्ही स्वतःच** सरकारला चालवीत आहात हे लक्षात ठेवा. तुम्ही स्वतःच संघटन करून राज्याचा **कारभार आपल्या हाती** घेतल्याविना कुणीही तुम्हाला मदत करणार नाही. **तुमची** सोविएते आता सरकारी सत्तेच्या संस्था बनली आहेत... आपल्या सोविएतांच्या बाजूने एक व्हा. त्यांना प्रबळ बनवा. खालपासून वरपर्यंत सारा कारभार आपल्या हाती घ्या. अत्यंत कडक क्रांतिकारक शिस्तीची स्थापना करा, अराजक निर्माण करण्याचे मद्यप्यांचे, गुंडांचे, प्रतिक्रांतिकारी युंकराचे आणि कोर्निलोववाद्यांचे प्रयत्न निर्दयपणे चिरडून टाका.

"उत्पादनावर आणि उत्पादन वस्तूंच्या हिशेबावर कडक नियंत्रण प्रस्थापित करा. उत्पादनात घातपात करून, धान्यसाठे दडवून ठेवून, इतर उत्पादन वस्तूंचे साठे दडवून ठेवून, धान्याच्या पाठवणींमध्ये अडथळे आणून, रेलमार्गांवर गोंधळ उडवून, टपाल आणि तारखात्यांमध्ये विस्कळीतपणा आणून, किंवा शांतता प्रस्थापित करण्यास आणि किसानांच्या ताब्यात जमीन देण्यास एकूण विरोध करून, जनतेच्या मालमत्तेची हानी करणाऱ्या प्रत्येकाला पकडून जनतेच्या क्रांतिकारक न्यायालयाच्या हवाली करा...

"कॉम्रेड कामगारांनो, सैनिकांनो, किसानांनो – सर्व कष्टकऱ्यांनो! **तुमच्या** सोविएतांच्या हाती **सर्व** सत्ता घ्या... हळू हळू, बहुसंख्य किसानांच्या

संमतीने आणि मान्यतेने, आम्ही समाजसत्तावादाच्या विजयाकडे ठामपणे आणि न घुटमळता वाटचाल करू, त्या विजयावर अत्यंत सुसंस्कृत देशांमधील कामगारवर्गांची अग्रदले शिक्कामोर्तब करतील व त्यामुळे लोकांना चिरंतन शांतता लाभेल आणि हरप्रकारच्या गुलामगिरीतून आणि हरप्रकारच्या शोषणातून त्यांची मुक्तता घडेल.

जन-कमिस्सार मंडळाचे अध्यक्ष,
**व्ला. उल्यानोव (लेनिन).**

पेत्रोग्राद, ५ नोव्हेंबर, १९१७."

## १३

## "पेत्रोग्रादमधील सर्व कामगारांनो!"

"कॉम्रेडहो! क्रांतीचा विजय होत आहे – क्रांती विजयी झाली आहे. सर्व सत्ता आमच्या सोविएतांच्या हाती आली आहे. पहिले आठवडे अत्यंत अवघड आहेत. मोडलेल्या प्रतिगाम्यांचा पुरता निःपात घडवला पाहिजे, आपल्या प्रयत्नांना पुरता विजय प्राप्त करून दिला पाहिजे. या दिवसांत कामगारवर्गाने **सर्वांत जास्त खंबीरपणा आणि सहनशीलता** दाखविली पाहिजे – नव्हे दाखविलीच पाहिजे – ज्यामुळे जनतेच्या नव्या सोविएत सरकारला आपली सर्व उद्दिष्टे अंमलात आणणे सुलभ जाईल. पुढील काही दिवसांत मजूर प्रश्नावरील आज्ञापत्रे जाहीर होतील आणि त्यातील अगदी पहिलेच आज्ञापत्र उत्पादनावरील आणि उद्योगधंद्यांच्या नियमनावरील कामगारांच्या वर्चस्वाबाबत असेल.

"**पत्रोग्रादमध्ये कामगारांचे संप आणि निदर्शने घडल्यास आता केवळ हानी होईल.**

"सर्व आर्थिक आणि राजकीय संप ताबडतोब बंद करण्याची, आपले काम हाती घेण्याची आणि योग्य रीतीने ते पार पाडण्याची आम्ही तुम्हाला विनंती करतो. नव्या सोविएतांच्या सरकारला कारखान्यांमधील आणि सर्व उद्यमांमधील काम चालू राहणे आवश्यक आहे, कारण या कामात कोणताही अडथळा आणल्यास फक्त नव्या अडचणी आमच्यापुढे निर्माण होतील व आहेत त्याच अडचणी आम्हाला पुरेशा झाल्या आहेत. सारे आपापल्या जागी जा.

"आपले काम करणे – हाच आजच्या काळात सोविएतांच्या नव्या सरकारला मदत करण्याचा सर्वोत्तम मार्ग आहे.

"**कामगारवर्गाचा पोलादी निर्धार चिरायू होवो! क्रांती चिरायू होवो!**

**कामगार-सैनिक प्रतिनिधींचे**
**पेत्रोग्राद सोविएत.**

**ट्रेड युनियनांचे पेत्रोग्राद मंडळ.**
**कारखाना समित्यांचे पेत्रोग्राद मंडळ."**

## १४

# आवाहने आणि प्रतिआवाहने

**सरकारी आणि खाजगी बँकांच्या कर्मचाऱ्यांकडून पेत्रोग्रादच्या जनतेला:**

"कॉम्रेड कामगारांनो, सैनिकांनो आणि नागरिकांनो!

"लष्करी क्रांतिकारक समिती "खास नोटिशीमार्फत" सरकारी आणि खाजगी बँकांच्या व इतर संस्थांच्या कर्मचाऱ्यांवर "आघाडीला रसद पुरविण्याच्या सरकारच्या कामात अडथळा आणण्याचे" आरोप करीत आहे.

"कॉम्रेडहो आणि नागरिकहो, सर्वसामान्य श्रमिक सेनेचे एक अंग असलेल्या आम्हांवर आणलेल्या या कुभांडावर विश्वास ठेवू नका.

"आमच्या कठीण श्रमांच्या जीवनात हिंसात्मक कृत्यांनी हस्तक्षेप करण्याच्या सतत धमक्या मिळत असताना काम करणे आम्हाला कितीही अवघड जात असले तरीही, आमचा देश आणि क्रांती विनाशाच्या काठावर उभी आहेत हे समजल्यामुळे कितीही निराशाजनक वाटत असले तरीही, आम्ही, इतकेच नव्हे तर आम्ही सर्व, वरपासून खालपर्यंत, कर्मचारी, हस्तकारागीर, हिशेबनीस, मजूर, निरोप्ये इ., आघाडीला आणि देशाला अन्न, कापडलत्ता आणि दारूगोळा इ. पुरविण्याशी संबंधित आमची कामे पुरी करण्याचे चालू ठेवले आहे.

"अर्थविषयक आणि बँकेच्या व्यवहारांबाबत तुम्हाला अपुरी माहिती आहे हे ओळखून, कॉम्रेड कामगारांनो आणि सैनिकांनो, तुमच्याचसारख्या कामगारांविरुद्ध तुम्हाला चिथावण्यात येत आहे, कारण आघाडीवर बांधव सैनिकांच्या होणाऱ्या उपासमारीची आणि मरणाची जबाबदारी दोषी व्यक्तीं-

पासून बाजूला वळवून सार्वत्रिक दारिद्र्याच्या आणि अव्यवस्थेच्या ओझ्याखाली आपली कर्तव्ये पार पाडणाऱ्या निष्पाप कामगारांवर ढकलणे इष्ट ठरले आहे.

"**कामगारांनो आणि सैनिकांनो, आठवण ठेवा! कष्टकरी जनतेचाच कर्मचारी हा एक भाग आहेत आणि कष्टकरी जनतेच्या हिताच्या बाजूने कर्मचारी नेहमी उभे राहिलेत व नेहमी उभे राहतील, आणि आघाडीसाठी व कामगारांसाठी आवश्यक असलेला एकही कोपेक कर्मचाऱ्यांकडून कधीही अडवून ठेवण्यात आलेला नाही आणि कधीही अडवला जाणार नाही.**

"६ नोव्हेंबरपासून २३ नोव्हेंबरपर्यंत, म्हणजे १७ दिवसात, आघाडीवर **५० कोटी** रूबल पाठवण्यात आले आणि मॉस्कोला **१२ कोटी** रूबल धाडण्यात आले, त्याशिवाय इतर शहरांना पाठवलेल्या रकमा वेगळ्या.

"जनतेच्या संपत्तीचे कर्मचारी रक्षण करीत आहेत आणि सबंध देशाचे प्रतिनिधित्व करणारी घटनात्मक सभा ही या संपत्तीची एकमेव मालक आहे, अशा परिस्थितीत अज्ञात हेतूंसाठी पैसे देण्यास कर्मचारी नकार देत आहेत.

"आपल्या हातात कायदा घ्या असे तुम्हाला आवाहन करणाऱ्या निंदकांवर विश्वास ठेवू नका!

**सरकारी बँकेच्या कर्मचाऱ्यांच्या**
**अखिल रशियन युनियनचे मध्यवर्ती बोर्ड.**

**पतपेढ्यांच्या कर्मचाऱ्यांच्या अखिल**
**रशियन ट्रेड युनियनचे मध्यवर्ती बोर्ड."**

## पेत्रोग्रादच्या नागरिकांना उद्देशून

"नागरिकहो! या कठीण काळात रशियाच्या रक्षणासाठी श्रमणाऱ्या पुरवठा खात्यामधील कर्मचाऱ्यांविरुद्ध आणि इतर पुरवठा संघटनांमधील कामगारांविरुद्ध भयानक निंदानालस्ती करून बेजबाबदार लोक तुमच्यापुढे खोटेपणा सूचित करीत आहेत, त्यावर विश्वास ठेवू नका. नागरिकहो! चिकटवलेल्या पोस्टरांवर छापले आहे की तुम्ही आम्हाला जीवे मारावे; घातपात केल्याचे आणि संप केल्याचे खोटे आरोप आमच्यावर लादले आहेत, रशियन जनतेला उपासमारीच्या संकटांपासून वाचविण्यासाठी आम्ही अविश्रांतपणे आणि अखंडपणे प्रयत्न करीत आलो आहोत आणि अजूनही प्रयत्न करीत आहोत, तरी लोकांच्या यातनांचे आणि संकटांचे खापर आम-

च्या माथ्यांवर फोडण्यात येत आहे. कमनशिबी रशियाचे नागरिक म्हणून सर्व काही सहन करावे लागत असूनही, सैन्याला आणि जनतेला वस्तूंचा पुरवठा करण्याच्या अवजड आणि जबाबदारीच्या कामाला आम्ही एका तासापुरतेसुद्धा सोडलेले नाही.

"थंडीने गारठलेल्या आणि भुकेल्या, आपल्या रक्ताची किंमत देऊन व यमयातना सोसून आमच्या अस्तित्वाची राखण करणाऱ्या सैन्याची प्रतिमा आमच्या नजरेपुढून क्षणभरही बाजूला होत नाही.

"नागरिकहो! आपल्या लोकांच्या जीवनातील आणि इतिहासातील अत्यंत काळयाकुट्ट दिवसांमध्येसुद्धा जर आम्ही तगून राहिलो असू, पेत्रोग्राद-मधील दुष्काळाला प्रतिबंध करण्यात जर आम्हाला यश आले असेल, अफाट, जवळजवळ अमानवी प्रयत्न करून संकटग्रस्त सैन्याला आम्ही जर अन्नाचा आणि वैरणीचा पुरवठा करू शकलो असू, तर ते केवळ आम्ही प्रामाणि-कपणे आपले काम करणे चालू ठेवले होते आणि अद्याप काम करीत आहोत म्हणून...

"सत्ता बळकावणाऱ्यांच्या "शेवटच्या इशाऱ्याला" आम्ही उत्तर देतो: देशाला नष्ट होण्यापासून वाचविण्यासाठी सर्व काही पणाला लावणाऱ्या आम्हाला, तुमच्यासारख्या देशाला विनाशाकडे नेणाऱ्यांनी धमक्या घालू नयेत. आम्ही धमक्यांना भीत नाही; हालअपेष्टांमध्ये सापडलेल्या रशि-याची पवित्र प्रतिमा आमच्यापुढे उभी राहते. आमचे देशाबाबतचे कर्तव्य पार पाडण्यात जोपर्यंत तुम्ही आम्हाला प्रतिबंध करीत नाही, तोपर्यंत सैन्या-ला आणि जनतेला अन्नपुरवठा करण्याचे काम आम्ही अखेरपर्यंत पार पाडीत राहू. याउलट घडले तर सैन्याला आणि जनतेला दुष्काळाच्या संकटांना तोंड द्यावे लागेल, पण त्याची जबाबदारी हिंसात्मक दुष्कृत्ये करणाऱ्यांवर राहील.

**पुरवठा खात्याच्या**
**कर्मचाऱ्यांची कार्यकारी समिती."**

## सरकारी अधिकाऱ्यांना

"कळविण्यात येत आहे की, सरकारी आणि सार्वजनिक संस्थांमधील नोकरी सोडलेल्या सर्व अधिकाऱ्यांनी आणि व्यक्तींनी, किंवा घातपात केल्या-बद्दल किंवा मुक्रर केलेल्या दिवशी कामावर येण्यात कुचराई केल्याबद्दल ज्यांना बडतर्फ करण्यात आले आहे अशा लोकांनी मिळालेला आपला आगाऊ

पगार २७ नोव्हेंबर १९१७ पूर्वी, ते ज्या ठिकाणी नोकरी करीत होते त्या ठिकाणी परत आणून दिला पाहिजे.

"जर त्यांनी असे केले नाही तर अशा लोकांना खजिन्यामधील मालमत्ता चोरल्याबद्दल जाब द्यावा लागेल आणि लष्करी क्रांतिकारक न्यायालयासमोर त्यांच्यावर खटला भरण्यात येईल.

**लष्करी क्रांतिकारक समिती**

२४ नोव्हेंबर, १९१७."

## पुरवठा करणाऱ्या खास बोर्डाकडून

"नागरिकहो!

पेत्रोग्रादला पुरवठा करण्याच्या आमच्या कामाची परिस्थिती दर दिवशी अधिक अवघड बनत आहे.

"लष्करी क्रांतिकारक समितीचे कमिस्सार आमच्या कामात अजूनही हस्तक्षेप करीत आहेत व तो हस्तक्षेप आमच्या कार्याला कमालीचा हानीकारक ठरत आहे.

"**त्यांच्या लहरी कृत्यांमुळे,** आमच्या हुकुमांना त्यांनी रद्द करण्यामुळे, **सर्वनाश घडण्याचा धोका आहे.**

"जनतेला पुरवठा करण्यासाठी जेथे मांस आणि लोणी ठेवले होते त्या शीत गुदामांना सीले ठोकण्यात आली आहेत व **वस्तू खराब होऊ नयेत म्हणून** तपमानाचे नियंत्रण करणे आम्हाला अशक्य होऊन बसले आहे.

"एक गाडी बटाटे आणि एक गाडी कोबी ताब्यात घेऊन कुठे पाठवण्यात आले त्याची कुणालाही माहिती नाही.

"ज्या मालाला जप्त करण्यात येत नाही (हलवा) असा माल कमिस्सार जप्त करतात आणि एक दिवस एका कमिस्साराने स्वतःच्या वापरासाठी हलव्याच्या पाच पेट्या जप्त केल्या.

"**आमच्या गुदामातील माल आम्ही बाहेर काढू शकत नाही,** तेथे स्वतःच स्वतःची नेमणूक करून घेतलेले कमिस्सार माल बाहेर जाऊ देत नाहीत आणि अटक करण्याच्या धमक्या घालून आमच्या कर्मचाऱ्यांना दहशत घालतात.

"**पेत्रोग्रादमध्ये जे काही चालले आहे ते प्रांतांमध्ये सर्व माहीत झाले आहे आणि दॉनहून, सैबेरियातून, वोरोनेझहून इतर ठिकाणांहून पीठ आणि धान्य पाठविण्यास लोक नकार देत आहेत.**

**"हे फार काळ चालू शकणार नाही.**

"आमच्या हातून काम सुटत चालले आहे.

"लोकांना याची माहिती करून देणे हे आमचे कर्तव्य आहे.

"शेवटच्या संधीपर्यंत आम्ही लोकांच्या हिताचे रक्षण करीत राहू.

**"आगामी दुष्काळ टाळण्यासाठी आम्ही सर्व काही करू, पण या कठीण परिस्थितीत जर आमचे काम थांबवावे लागले, तर तो आमचा दोष नाही हे जनतेला माहीत असावे..."**

## १५

## घटनात्मक सभेच्या पेत्रोग्रादमधील निवडणुका

पेत्रोग्रादमध्ये एकोणीस पक्षांनी जागा लढवल्या. या निवडणुकांचे ३० नोव्हेंबरला प्रसिद्ध झालेले निकाल पुढीलप्रमाणे:

| पक्ष | मते |
|---|---|
| जन-समाजवादी | १९१०९ |
| कॅडेट | २४५००६ |
| किसान डेमोक्रॅट्स | ३७०७ |
| बोल्शेविक | ४२४०२७ |
| समाजवादी-विश्ववादी | १५८ |
| सामाजिक-लोकशाहीवादी आणि समाजवादी-क्रांतिकारक युक्रेनी व ज्यू कामगार | ४२१९ |
| महिलांच्या हक्कांचा संघ | ५३१० |
| समाजवादी-क्रांतिकारक (अबारोन्त्सी) | ४६९६ |
| डावे समाजवादी-क्रांतिकारक | १५२२३० |
| जनविकास संघ | ३८५ |
| जहाल लोकशाहीवादी | ४१३ |
| ऑर्थोडॉक्स पॅरिश | २४१३९ |
| देशरक्षक महिला संघ | ३१८ |
| कामगार, सैनिक, किसानांचा स्वतंत्र संघ | ४९४२ |
| ख्रिश्चन डेमोक्रॅट्स (कॅथलिक) | १४३८२ |
| संयुक्त सामाजिक-लोकशाहीवादी | ११७४० |

| | | |
|---|---|---|
| मेन्शेविक | . . . . . . . . . . . . . . | १७४२७ |
| 'येदिन्स्त्वो' गट | . . . | १८२३ |
| कझाक सैनिकांचा संघ | . . . . . . | ६७१२ |

## १६

## मध्यवर्ती नगर दूमाशी संलग्न असलेल्या सार्वजनिक शिक्षण आयोगाकडून

"कॉम्रेड कामकरी पुरुषहो आणि कामकरी महिलांनो!

"सुट्टीपूर्वी काही दिवस आधी, सार्वजनिक शाळांमधील शिक्षकांनी संप पुकारला आहे. शिक्षक भांडवलदारांची बाजू घेऊन कामगार-किसानांच्या सरकारला विरोध करीत आहेत.

"कॉम्रेडहो, पालकांच्या समित्या संघटित करा आणि शिक्षकांच्या संपाविरुद्ध ठराव मंजूर करा. कामगारांच्या आणि सैनिकांच्या प्रतिनिधींच्या वॉर्ड सोविएतांना, ट्रेड युनियनांना, कारखाना आणि पक्षीय समित्यांना निषेध सभा घ्यायला सांगा. तुमच्या जवळच्या साधनांमधून नाताळची झाडे आणि मुलांसाठी करमणुकीचे कार्यक्रम आयोजित करा व सुटीनंतर, दूमा ठरवून देईल त्या तारखेला शाळा उघडल्या जाव्यात अशी मागणी करा.

"कॉम्रेडहो, सार्वजनिक शिक्षणाच्या बाबीमध्ये आपले स्थान बळकट करा, शाळांवर कामगारवर्गीय संघटनांचे नियंत्रण असावे असा आग्रह धरा."

**मध्यवर्ती नगर दूमाला संलग्न**
**असलेला सार्वजनिक शिक्षण आयोग."**

## १७

## जन-कमिस्सार मंडळाकडून कष्टकरी कझाकांना

"कझाक बंधूंनो!

"तुमची फसवणूक केली जात आहे. लोकांविरुद्ध तुम्हाला चिथावले जात आहे. तुम्हाला सांगण्यात आले आहे की, कामगार-सैनिक-किसान प्रतिनिधींची सोविएते तुमची शत्रू आहेत, त्यांना तुमची कझाक भूमी, तुमचे कझाक "स्वातंत्र्य", तुमच्यापासून हिरावून घ्यायचे आहे. कझाकांनो,

त्यावर विश्वास ठेवू नका... तुम्हाला अज्ञानात आणि गुलामीत ठेवता यावे म्हणून तुमचेच सेनापती आणि जमीनदार तुम्हाला फसवीत आहेत. आम्ही, जन-कमिस्सारांचे मंडळ, स्वतःच तुम्हा कझाकांना उद्देशून पुढील शब्दात निवेदन करीत आहोत. त्या शब्दांना लक्षपूर्वक वाचा आणि कोणते सत्य आहे व कोणती क्रूर फसवणूक आहे ते तुम्हीच ठरवा.

"कझाकाचे जीवन आणि सेवा म्हणजे नेहमी गुलामी व कारावास होता. सत्ताधाऱ्यांनी पहिली हाक घालताच आपल्या घोड्यावर ताबडतोब खोगीर चढवून कझाकाला मोहीमेवर दौडत जावे लागे. आपल्या स्वतःच्या कष्टांनी मिळवलेल्या पैशांमधून आपले सर्व लष्करी सामान कझाकाला घ्यावे लागे. कझाक लष्करी मोहीमेत असताना त्याच्या शेताची दुर्दशा होते. ही अवस्था चांगली का? नाही, ती कायमची बदलून टाकली पाहिजे. **कझाकांची बंधनातून मुक्तता केली पाहिजे.** नवी जनतेची सोविएत सत्ता कष्टकरी कझाकांच्या मदतीला यायला तयार आहे. पण त्यासाठी खुद्द कझाकांनी जुनी व्यवस्था नष्ट करण्याचा निर्धार केला पाहिजे, त्यांना गुलामीत ठेवणाऱ्या अधिकाऱ्यांच्या, जमीनदारांच्या, श्रीमंतांच्या आधीन राहण्यास त्यांनी नकार दिला पाहिजे, आपल्या मानांवरील शापित जू त्यांनी झुगारून दिले पाहिजे. उठा कझाकांनो! एकवटा! नव्या, ताज्या, अधिक सुखी जीवनात प्रवेश करण्याचे जन-कमिस्सार मंडळ तुम्हाला आवाहन करीत आहे.

नोव्हेंबर आणि डिसेंबरात पेत्रोग्रादमध्ये कामगारांच्या, सैनिकांच्या आणि किसानांच्या प्रतिनिधींच्या सोविएतांच्या अखिल रशियन काँग्रेसा भरल्या. त्या काँग्रेसांनी भिन्न ठिकाणांची सर्व सत्ता सोविएतांच्या हाती दिली, म्हणजेच लोकांनी निवडून दिलेल्या लोकांच्या हाती दिली. इतःपर, लोकांना उच्च पदांवरून आज्ञा ठोकणारे आणि पिटाळणारे सत्ताधारी किंवा अधिकारी रशियात असू नयेत. जनता स्वतःच सत्ता निर्माण करते आहे. सेनापतीला सैनिकापेक्षा जास्त अधिकार नाहीत. सारे समान आहेत. कझाकांनो, विचार करा, हे चूक किंवा बरोबर? कझाकांनो, या नव्या व्यवस्थेत सामील होण्याचे आणि **कझाक प्रतिनिधींची** तुमची स्वतःची **सोविएते** निर्माण करण्याचे आम्ही तुम्हाला आवाहन करीत आहोत. या सोविएतांच्या हाती भिन्न स्थळांची सर्व सत्ता असली पाहिजे. सेनापतीच्या दर्जावर असलेल्या हेत्मानांच्या हाती नव्हे, तर कष्टकरी कझाकांच्या निवडलेल्या प्रतिनिधींच्या हाती, तुमच्या स्वतःच्या विश्वासू खात्रीशीर माणसांच्या हाती सत्ता असली पाहिजे.

"सर्व जमीनदारांची जमीन कष्टकरी लोकांच्या ताब्यात द्यावी असा ठराव सैनिक, कामगार आणि किसान प्रतिनिधींच्या अखिल रशियन काँग्रेसांनी संमत केला आहे. कझाकांनो, हे योग्य आहे की नाही? कोर्निलोववादी, कालेदिनवादी, दूतोववादी, कराउलोववादी, बार्दिझीवादी सर्वस्व पणाला लावून श्रीमंतांच्या हिताचे रक्षण करू पहात आहेत आणि जमीनदारांच्या हाती जमिनी कायम रहाव्यात यासाठी रशियाला रक्ताच्या पाटांमध्ये बुडवायला ते तयार आहेत. पण कष्टकरी कझाकांनो, तुमचे स्वतःचे दारिद्र्यामुळे, दडपशाहीमुळे आणि जमिनीच्या अभावामुळे हाल होत नाहीत का? माणशी ४-५ देस्यातिन पेक्षा अधिक जमीन असलेले कितीसे कझाक आहेत? पण ज्यांच्या स्वतःच्या हजारो देस्यातिन जमिनी आहेत असे जमीनदार त्याशिवाय कझाक सैन्याच्या जमिनी बळकावू पहात आहेत. नव्या सोविएत कायद्यांनुसार, कझाक जमीनदारांच्या जमिनी कोणतीही नुकसानभरपाई न देता कझाक कामगारांच्या, अत्यंत गरीब कझाकांच्या, ताब्यात दिल्या पाहिजेत. तुम्हाला सांगण्यात येत आहे की, सोविएतांना तुमच्या हातून जमिनी हिसकावून घ्यायच्या आहेत. तुम्हाला कोण घाबरवतो? श्रीमंत कझाक, ज्यांना माहीत आहे की, **जमीनदारांच्या जमिनी तुमच्या हाती देण्याची सोविएत सत्तेची इच्छा आहे.** कझाकांनो, आता तुम्हीच ठरवा, कोणाच्या बाजूने तुम्ही उभे रहाल: कोर्निलोव आणि कालेदिन यांच्यासाठी, सेनापती आणि श्रीमंत यांच्यासाठी, का किसान, सैनिक आणि कामगार प्रतिनिधींच्या सोविएतांसाठी.

"अखिल रशियन काँग्रसने निवडलेल्या **जन-कमिस्सार मंडळाने, कोणत्याही राष्ट्राची हानी किंवा नुकसान न करता, तात्काळ शस्त्रसंधी करण्याचे व सन्मान्य लोकशाहीवादी शांतता तह करण्याचे, सर्व राष्ट्रांना आवाहन केले आहे.** सर्व भांडवलदार, जमीनदार, सेनापती-कोर्निलोववादी सोविएतांच्या शांततावादी धोरणाविरुद्ध उठले आहेत. युद्धामुळे त्यांना नफे मिळत होते, सत्ता लाभत होती, बहुमान लाभत होते. आणि तुम्ही कझाक सैनिकांनो? तुम्ही कारणाशिवाय, हेतूशिवाय, तुमच्या बांधव सैनिकांप्रमाणे आणि खलाशांप्रमाणे नष्ट होत होता. या तिरस्करणीय युद्धाला आरंभ झाल्याला लौकरच साडेतीन वर्षे पुरी होतील; सर्व देशांमधील भांडवलदारांनी आणि जमीनदारांनी आपल्या स्वतःच्या नफ्यांसाठी, आपल्या जागतिक दरोडेखोरीसाठी हे युद्ध निर्माण केले. कष्टकरी कझाकांना या युद्धाने केवळ विध्वंस आणि मरण आणले. कझाक शेतकी जीवनाचे सारे उगम युद्धाने

शोषून घेतले. आपल्या सबंध देशाचे आणि विशेषत: कझाकांचे रक्षण करण्याचा एकमेव उपाय म्हणजे ताबडतोबीचा व प्रामाणिक शांतता-तह. जन-कमिस्सारांच्या मंडळाने सर्व सरकारांना आणि लोकांना उद्देशून जाहीर केले आहे: आम्हाला दुसऱ्या लोकांची मालमत्ता नको आणि आमची मालमत्ता देऊन टाकण्याची आमची इच्छा नाही. विलीनीकरणांशिवाय आणि नुकसानभरपाईशिवाय शांतता-तह व्हावा. प्रत्येक राष्ट्राने स्वत:चे भवितव्य ठरवावे. एका राष्ट्राचे दुसऱ्यावर दडपण असू नये. अशा प्रकारचा प्रामाणिक, लोकशाहीवादी, जनतेचा शांतता-तह जन-कमिस्सार मंडळ सर्व सरकारांपुढे, सर्व लोकांपुढे, दोस्तांपुढे आणि शत्रूंपुढे मांडत आहे. आणि फलश्रुती दिसू लागल्या आहेत: **रशियन आघाडीवर शस्त्रसंधी घडला आहे.** इत:पर तेथे सैनिकाचे आणि कझाकाचे रक्त सांडत नाही. आता कझाकांनो, ठरवा: ही विध्वंसक, अर्थहीन, गुन्हेगारी कत्तल पुढे चालू ठेवायची तुमची इच्छा आहे? तर मग जनतेचे शत्रू असलेल्या कॅडेटांना पाठिंबा द्या, १ जुलैच्या आक्रमक चढाईत तुम्हाला लोटणाऱ्या चेर्नोव, त्सेरेतेली, स्कोबेलियेव यांना पाठिंबा द्या; आघाडीवर सैनिकांना आणि कझाकांना मृत्युदंडाची शिक्षा सुरू करणाऱ्या कोर्निलोवला पाठिंबा द्या. **पण जर तुम्हाला तात्काळ आणि प्रामाणिक शांतता तह हवा असेल, तर सोविएतांच्या आघाड्यांमध्ये सामील व्हा आणि जन-कमिस्सार मंडळाला पाठिंबा द्या.**

"कझाकांनो, तुमचे भवितव्य तुमच्या हाती आहे. आपले समान शत्रू, जमीनदार, भांडवलदार, कोर्निलोववादी अधिकारी, भांडवलदारी वृत्तपत्रे, तुमची फसवणूक करीत आहेत आणि तुम्हाला विनाशाच्या मार्गाकडे लोटत नेत आहेत. ओरेनबुर्ग येथे दूतोव यांनी सोविएतला अटक केली आणि ठाणबंद फौजेला नि:शस्त्र केले. दॉन प्रांतामधील सोविएतांना कालेदिन धमक्या देत आहेत. त्यांनी प्रांतात युद्धपरिस्थिती जाहीर केली आहे व आपल्या फौजा ते गोळा करीत आहेत. कराउलोव कॉकेशसमधील स्थानिक टोळ्यांना गोळ्या घालून मारीत आहेत. कॅडेट धनिक आपल्या लक्षावधी रूबलचा त्यांना पुरवठा करीत आहेत. जनतेची सोविएते दडपून टाकणे, कामगारांना आणि किसानांना चिरडून टाकणे, सैन्यात पुन्हा चाबकाचा अंमल प्रस्थापित करणे व कष्टकरी कझाकांची गुलामगिरी कायम करणे, हे त्यांचे समान उद्दिष्ट आहे.

"या जनतेविरुद्धच्या गुन्हेगारी बंडाला मोडून काढण्यासाठी आमच्या क्रांतिकारक फौजा दॉन आणि उरालच्या दिशेने निघाल्या आहेत. बंडखोर

सेनापतींशी कोणत्याही वाटाघाटी न करण्याची, निर्णायकपणे आणि निष्ठुरपणे वागण्याची, क्रांतिकारक फौजांच्या नायकांना आज्ञा दिलेली आहे.

"कझाकांनो! तुमच्या बांधवांचे रक्त अजूनही सांडायचे किंवा नाही हे आता तुमच्यावर अवलंबून आहे. आम्ही तुमच्यासमोर मैत्रीचा हात पुढे करीत आहोत. जनतेच्या शत्रूंविरुद्ध सर्व जनतेशी सामील व्हा. कालेदिन, कोर्निलोव, दूतोव, कराउलोव आणि त्यांच्या सर्व साहाय्यकांना व दुष्कृत्यांमध्ये मदत करणाऱ्यांना जनतेचे शत्रू म्हणून जाहीर करा. तुमच्या स्वतःच्या फौजांच्या साहाय्याने त्यांना अटक करा आणि सोविएत सत्तेच्या हवाली करा. त्यांचा खुल्या आणि सार्वजनिक क्रांतिकारक न्यायासेनासमोर निवाडा केला जाईल.

"कझाकांनो! कझाक प्रतिनिधींची सोविएते स्थापन करा. कष्टांनी राठ बनलेल्या तुमच्या हातांमध्ये कझाकांच्या सर्व घडामोडींची व्यवस्था घ्या. तुमच्या स्वतःच्या श्रीमंत जमीनदारांपासून जमिनी काढून घ्या. युद्धाने उध्वस्त झालेल्या कष्टकरी कझाकांच्या जमिनींच्या लागवडीसाठी त्यांचे धान्य घ्या, त्यांची शेतवाडीवरील मालमत्ता आणि गुरेढोरे घ्या.

"कझाकांनो, जनतेच्या सामायिक उद्दिष्टासाठी लढायला पुढे चला!

"कष्टकरी कझाक चिरायू होवोत!

"कझाकांचे, सैनिकांचे, किसानांचे आणि कामगारांचे ऐक्य चिरायू होवो!

"कझाकांच्या, सैनिकांच्या, कामगारांच्या आणि किसानांच्या प्रतिनिधींच्या सोविएतांची सत्ता चिरायू होवो!

"युद्ध मुर्दाबाद! जमीनदार आणि कोर्निलोववादी सेनापती मुर्दाबाद!

"शांतता आणि जनतेची बांधिलकी चिरायू होवोत!

**जन-कमिस्सार मंडळ."**

## १८

# सोविएत सरकारचा राजनैतिक पत्रव्यवहार

ट्रॉट्स्कींनी दोस्तांना आणि तटस्थ राष्ट्रांना पाठवलेली पत्रे, तसेच जनरल दुखोनिन यांना दोस्तांच्या लष्करी ॲटॅचींनी पाठवलेले पत्र, ही खूप मोठी पत्रे असल्याने प्रस्तुत ठिकाणी देणे शक्य नाही. शिवाय या पुस्तकाचा संबंध नाही अशा सोविएत प्रजासत्ताकाच्या इतिहासाच्या दुसऱ्या अवस्थेशी ती

संलग्न आहेत. सोविएत सरकारच्या परराष्ट्रसंबंधांविषयीची ती पत्रे आहेत. 'कोर्निलोव ते ब्रेस्त-लितोव्स्क' या दुसऱ्या पुस्तकात मी त्यांचा तपशीलवार समाचार घेतला आहे.

## १९

## दुखोनिन यांच्या विरोधी आघाडीला आवाहने

"...शांततेच्या लढ्याला भांडवलदारवर्गाने आणि प्रतिक्रांतिकारक सेनापतींनी विरोध केला आहे...

"वृत्तपत्रांमधील बातम्यांवरून असे कळते की, माजी सरसेनापती दुखोनिन यांच्या मुख्य ठाण्यात भांडवलदारांचे आणि दोस्तांचे हस्तक: वेर्खोव्स्की, अव्क्सेन्तियेव, चेर्नोव, गोत्झ, त्सेरेतेली इ. गोळा होत आहेत. असेही भासते की, सोविएतांविरुद्ध एक नवी सत्ता स्थापन करण्याचा त्यांचा विचार आहे.

"कॉम्रेड सैनिकांनो! आम्ही उल्लेखलेल्या सर्व व्यक्ती आधी मंत्री होत्या. केरेन्स्कींच्या आणि भांडवलदारवर्गाच्या कलाने ही माणसे वागली. १ जुलैच्या आक्रमक चढाईला आणि युद्ध लांबवायला ते जबाबदार आहेत. त्यांनी किसानांना जमिनी देण्याचे आश्वासन दिले व मागाहून भूमी समित्यांच्या सदस्यांना अटक केली. सैनिकांना त्यांनी पुन्हा मृत्युदंडाची शिक्षा लागू केली. फ्रेंच, इंग्रज आणि अमेरिकन धनिकांच्या आज्ञा ते पाळतात...

"जन-कमिस्सार मंडळाच्या आज्ञा पाळण्यास नकार दिल्याबद्दल जनरल दुखोनिन यांना त्यांच्या सरसेनापतीपदावरून बडतर्फ करण्यात आले आहे... उत्तरादाखल ते दोस्तांच्या साम्राज्यवादी राष्ट्रांच्या लष्करी अ‍ॅटॅचींचे पत्र सैनिकांमध्ये वाचायला फिरवीत आहेत आणि प्रतिक्रांतीला भडकवण्याचा प्रयत्न करीत आहेत...

"दुखोनिन यांच्या आज्ञा पाळू नका! त्यांच्या चिथावणीकडे लक्ष देऊ नका! त्यांच्यावर आणि त्यांच्या प्रतिक्रांतिकारक जनरलांच्या गटावर सावधपणे नजर ठेवा..."

## २०

## क्रीलेन्को यांच्याकडून हुकूम क्रमांक दोन

"...आज्ञा अंमलात आणण्यास विरोध केल्याबद्दल, यादवी युद्धाचा नव्याने भडका उडविण्यास अनुकूल असे गुन्हेगारी कृत्य केल्याबद्दल, माजी

सरसेनापती जनरल दुखोनिन यांना जनतेचे शत्रू म्हणून जाहीर करण्यात येत आहे.

"जे लोक दुखोनिन यांना पाठिंबा देतात त्या सर्वांना, त्यांच्या सामाजिक किंवा राजकीय स्थानाचा विचार न करता, किंवा त्यांच्या पूर्वेतिहासाचा विचार न करता, अटक करण्यात येईल. खास अधिकार दिलेल्या व्यक्ती हे अटकसत्र पार पाडतील. उपरोक्त हुकुमांची अंमलबजावणी करण्यासाठी मी जनरल मानीकोव्स्की यांची नेमणूक करीत आहे..."

# बाराव्या प्रकरणाचे परिशिष्ट

## १

## किसानांच्या प्रश्नांना उत्तर

किसानांकडून होणाऱ्या असंख्य चौकशा लक्षात घेता, प्रस्तुत ठिकाणी खुलासा करण्यात येत आहे की, यापुढे देशामधील सर्व सत्ता कामगारांच्या, सैनिकांच्या आणि किसानांच्या प्रतिनिधींच्या सोविएतांच्या हाती आहे. पेत्रोग्राद आणि मॉस्कोमध्ये कामगारांच्या क्रांतीने विजय मिळविल्यानंतर, रशियामधील इतर सर्व ठिकाणी ती आता विजय मिळवीत आहे. जमीनदारांविरोधी, भांडवलदारांविरोधी किसानवर्गाच्या समूहांचे, गरीब किसानांचे, बहुसंख्य किसानांचे कामगारांशी सख्य घडविण्याची कामगारांचे आणि किसानांचे सरकार हमी देत आहे.

म्हणून किसान प्रतिनिधींची सोविएते, त्यापूर्वी सर्वप्रथम विभागीय सोविएते आणि त्या अनुषंगाने प्रांतांमधील सोविएते, ही आत्तापासून आणि घटनात्मक सभेचे अधिवेशन भरेपर्यंत, आपापल्या स्थळी सरकारी सत्ता असलेल्या पूर्णाधिकारी संस्था म्हणून काम करतील. सोविएतांच्या दुसऱ्या अखिल रशियन काँग्रेसने सर्व जमीनदारांचे जमिनींवरील हक्क **रद्द केले आहेत.** मध्याच्या हंगामी कामगार आणि किसान सरकारने जमीनविषयक आज्ञापत्र एव्हाना जाहीर केले आहे. या उपरोक्त आज्ञापत्राद्वारे, आजपर्यंत जमीनदारांच्या ताब्यात असलेल्या सर्व जमिनी आता संपूर्णरीत्या किसान प्रतिनिधींच्या सोविएतांच्या ताब्यात दिल्या गेल्या आहेत.

वोलोस्त भूमी समित्यांनी ताबडतोब सर्व जमीनदारांपासून आपल्या ताब्यात घ्यायच्या आहेत आणि इतःपर सर्व खाजगी इस्टेटी सार्वजनिक माल-

मत्ता बनल्या आहेत व म्हणून त्यांचे लोकांनी स्वत:च रक्षण केले पाहिजे ही गोष्ट ध्यानात घेऊन, त्या जमिनींचा कडक हिशेब ठेवला पाहिजे, त्यांची सुव्यवस्था कायम राखली पाहिजे आणि सबंध इस्टेटीचे रक्षण केले पाहिजे. क्रांतिकारक सत्तेच्या आज्ञापत्रांचे पालन करण्यासाठी, किसान प्रतिनिधींच्या विभागीय सोविएतांच्या संमतीने, वोलोस्त भूमी समित्यांनी दिलेले सर्व हुकूम हे इत:पर पूर्णत: **बंध** आहेत आणि त्यांचे बिनचूकपणे पालन करण्यात यावे.

सोविएतांच्या दुसऱ्या अखिल रशियन काँग्रसने नेमलेल्या कामगारांच्या आणि किसानांच्या सरकारला, जन-कमिस्सार मंडळ असे नांव देण्यात आले आहे.

प्रत्येक ठिकाणची संपूर्ण सत्ता आपल्या हाती घेण्याचा हुकूम जन-कमिस्सार मंडळ किसानांना देत आहे.

कामगारांकडून किसानांना हरतऱ्हेचा आणि पूर्ण पाठिंबा मिळेल, यंत्रे आणि उपकरणे यांच्याशी संबंधित सर्व गरजा भागविण्याची व्यवस्था केली जाईल आणि किसानांनी धान्याची वाहतूक करण्यास मदत करावी अशी ते विनंती करीत आहेत.

जन-कमिस्सार मंडळाचे अध्यक्ष,

**व्ला. उल्यानोव (लेनिन).**

---

‘जगाला हादरवलेले दहा दिवस’ हे जॉन रीड या अमेरिकन कम्युनिस्ट लेखकाचे पुस्तक अमेरिकेत १९१९ मध्ये प्रकाशित झाले आणि सोविएत समाजसत्तावादी प्रजासत्ताक संघात रशियन भाषेत प्रथम १९२३ मध्ये प्रसिद्ध झाले. त्यानंतर त्याचे पुनः प्रकाशन होत आले आहे. अमेरिकन आवृत्तीला लिहिलेल्या प्रस्तावनेत व्लादीमिर इल्यिच लेनिन यांनी या पुस्तकाची फार मोठी प्रशंसा केली होती. ऑक्टोबर समाजसत्तावादी क्रांतीचा खराखुरा वृत्तांत त्यात सादर केलेला आहे व ती जनतेची खरीखुरी क्रांती होती असे त्यात वर्णन केलेले आहे. जनतेच्या इतिहास घडवणाऱ्या सृजनशीलतेचे त्यात ठळकपणे दर्शन घडविले आहे आणि कामगारवर्गाच्या, किसानांच्या व सैनिक-समूहांच्या इच्छेचे प्रतिनिधत्व करणाऱ्या बोल्शेविकांनी पार पाडलेल्या अतुलनीय भूमिकेचे दर्शन घडविले आहे.

महान ऑक्टोबर क्रांती ही मानवाच्या इतिहासात पहिली अभूतपूर्व अशी होती. तिचे निर्माण, नेतृत्व आणि संघटन बोल्शेविक पक्षाने आणि लेनिन यांच्या नेतृत्वाखालील पक्षाच्या मध्यवर्ती समितीने केले.

क्रांतीचा क्रम, तिच्या सर्व संभाव्य नागमोडी वाटा, क्रांतिकारक जनतेचे वर्तन आणि विरोधी वर्गांचे व पक्षांचे वर्तन, या सर्व गोष्टी बोल्शेविक पक्षाने आणि त्याचे नेते लेनिन यांनी अचूकपणे अपेक्षित धरल्या होत्या. उठावाचे नेतृत्व करणाऱ्या विविध संस्थांची कार्ये – बोल्शेविक पक्षाची पोलिट ब्यूरो आणि पक्ष-केंद्र, पेत्रोग्राद सोविएत आणि लष्करी क्रांतिकारक समिती, उठावावर नेतृत्व करणारी तिची क्रियाशील मुख्य कचेरी – ही सर्व लेनिन यांच्या विचारांमधून जन्माला आली होती.

कामगारवर्गीय क्रांतीच्या सामर्थ्यावर विश्वास नसलेल्या आणि रशिया-

मध्ये तिचा विजय होईल यावर श्रद्धा नसलेल्या संधिसाधूवाद्यांबरोबरच्या संघर्षांमध्ये लेनिन यांचे विचार व्यवहारात अंमलात आणण्यात आले. हे संधिसाधूवादी पराभूत मनोवृत्तीचे होते. त्यांनी एक तर जनतेच्या सशस्त्र उठावाच्या लेनिन यांच्या योजनेला प्रत्यक्षात विरोध केला किंवा उठावाच्या विचाराला मान्य करण्याचा पुरस्कार केला व प्रत्यक्षात मात्र तो उठाव निश्चितपणे पराभूत होईल अशी डावपेचात्मक योजना सुचवली.

उठावाच्या पूर्वकाळी लेनिन यांनी लिहिलेले लेख व पत्र (सप्टेंबर-ऑक्टोबर) यांच्यात लोकांच्या विजयाबद्दल जबरदस्त विश्वासाची भावना ओथंबलेली होती; क्रांतीच्या आणि तिच्या विरोधकांच्या छावणीमध्ये वर्चस्वाने अस्तित्वात असलेल्या परिस्थितीचे समतोलपणे मूल्यमापन करून त्यावर ही श्रद्धा आधारलेली होती. क्रांतीच्या ऐन कसोटीच्या क्षणाला शत्रूसमोर शस्त्रे खाली ठेवू पाहणाऱ्यांना त्यांनी उघडकीला आणले व झोडपून काढले.

'अरिष्ट परिपक्व झाले आहे' या नांवाच्या २९ सप्टेंबरच्या लेखात लेनिन यांनी बोल्शेविक पक्षाच्या मध्यवर्ती समितीच्या सदस्यांच्या – झिनोवियेव, कामेनियेव आणि ट्रॉट्स्की व पक्षाच्या वरच्या पातळीवरील त्यांचे मूठभर अनुयायी यांच्या – भूमिकेवर टीका केली होती. बोल्शेविकांनी पूर्व-संसदेत भाग घ्यावा असा आग्रह धरणाऱ्या झिनोवियेव आणि कामेनियेव यांच्यावर लेनिन यांनी हल्ला चढवला होता; कारण त्यामुळे क्रांतिकारक शक्ती सैद्धांतिकदृष्ट्या नि:शस्त्र बनल्या असत्या व उठावाची तयारी करण्यापासून त्या विचलित झाल्या असत्या. ट्रॉट्स्की यांच्यासारख्या "सोविएतांच्या काँग्रेसची **वाट पाहण्याची** पुरस्कार करणाऱ्या, आणि तात्काळ सत्ता हाती घेण्यास **विरोध** करणाऱ्या, ताबडतोब उठाव करण्यास **विरोध** करणाऱ्या," सर्व व्यवहार्य कार्यांमधील सर्वात तातडीच्या कार्याला **विरोध** करणाऱ्या पुढाऱ्यांनाही लेनिन यांनी उघडकीस आणले.

"त्या प्रवृत्तीवर किंवा मतावर **मात केली** पाहिजे," लेनिन यांनी संतापाने लिहिले होते. "अन्यथा बोल्शेविक स्वत:ला सदैव **लांच्छन चिकटवून घेतील** आणि पक्ष म्हणून **स्वत:चा नाश ओढवून घेतील.** असा क्षण गमावणे आणि सोविएतांच्या काँग्रेसची "वाट पहात बसणे" म्हणजे **कमालीचा वेडपटपणा** किंवा **शुद्ध विश्वासघात** ठरेल... सोविएतांच्या काँग्रेसची "वाट पहायची"... म्हणजे ज्या वेळी आठवडे आणि दिवस-सुद्धा **सारे काही** ठरवितात अशा वेळी **आठवडे** गमावण्यासारखे आहे...

आत्ता सत्ता हाती घेण्यापासून अलिप्त राहणे, "वाट पाहणे", मध्यवर्ती कार्यकारी समितीच्या बोलण्यांमध्ये गुंतून राहणे, (सोविएतांच्या) मुखपत्रासाठी भांडण्यात आपल्याला मर्यादित करून घेणे, "काँग्रेससाठी लढणे" म्हणजे **क्रांतीला अपयशी करण्यासारखे** आहे." (लेनिन, संकलित साहित्य, खंड २६, पाने ८३, ८४.)

लेनिन यांनी मध्यवर्ती समितीमध्ये पराभूतवाद्यांविरुद्ध चिकाटीने दिलेला लढा अखेरीस यशस्वी झाला. १० ऑक्टोबरला मध्यवर्ती समितीने लेनिन यांचा चालू परिस्थितीवरील अहवाल ऐकला आणि लेनिन यांनी लिहिलेला ठराव मंजूर केला; त्या ठरावात मान्य केले होते की, उठाव करणे अपरिहार्य व तातडीचे होते आणि सूचित केले होते की, सर्व पक्षीय संघटनांनी या विचाराला आपल्या प्रत्यक्ष कार्यात अंमलात आणावे. झिनोवियेव आणि कामेनियेव यांनी या ठरावाविरुद्ध मत दिले. ट्रॉट्स्कीसुद्धा आपल्या भूमिकेला चिकटून राहिले आणि त्यांनी सुचविले की, सोविएतांच्या दुसऱ्या काँग्रेसचे उद्‌घाटन होईपर्यंत उठाव करण्यात येऊ नये; याचा अर्थ सरळ टाळाटाळ करणे असा होता व त्यामुळे उठावाचा दिवस शत्रूला आधी माहीत झाला असता.

२३ ऑक्टोबरला पेत्रोग्राद सोविएतच्या सर्वसदस्य बैठकीत आणि इतरत्रही ट्रॉट्स्कींनी आपला हा दृष्टिकोन प्रगट केला होता. ट्रॉट्स्की यांचे निवेदन जॉन रीड आपल्या पुस्तकात असे नमूद करतात – बोल्शेविकांनी केव्हा कृती करण्याचे ठरविले आहे असे विचारले तेव्हा ट्रॉट्स्की उत्तरले:

"हे सत्तांतर अखिल रशियन काँग्रेसमार्फत घडविण्यात येईल... आम्हाला आशा आहे की, जनतेच्या संघटित स्वातंत्र्यावर आधारलेली सत्ता आणि अधिकार यांना अखिल रशिया काँग्रेस आपल्या हाती घेईल." (या पुस्तकातील पान १०१ पहा.)

या सर्वनाशी डावपेचांना लेनिन यांनी विरोध केला आणि २४ ऑक्टोबरला मध्यवर्ती समितीच्या सदस्यांना पत्र लिहून आवाहन केले की, कोणत्याही परिस्थितीत, त्याच सायंकाळी, त्याच रात्री, सरकारला अटक करून सरळ सरळ सत्ता हाती घ्यावी. "आपण थांबू नये! आपण सर्व काही गमावून बसू!.. क्रांतिकारक आज विजयी होऊ शकत असताना (आणि आज ते नक्की विजयी होतील) जर ते टाळाटाळ करीत बसले तर इतिहास त्यांना कधीही क्षमा करणार नाही, कारण उद्या खूप काही गमावण्याचा धोका आहे, खरे म्हणजे सारे काही गमावण्याचा धोका आहे.

आपण जर आज सत्ता काबीज केली तर सोविएतांना विरोध करून नव्हे, सोविएतांच्या वतीने काबीज करीत आहोत... २५ ऑक्टोबरच्या अस्थिर मतदानाची वाट पाहणे म्हणजे शुद्ध विनाश ठरेल किंवा निव्वळ औपचारीकपणा ठरेल. क्रांतीच्या कसोटीच्या क्षणी, असे प्रश्न मताने न सोडविता बळाच्या जोरावर सोडविण्याचा लोकांना हक्क आहे आणि ते त्यांचे कर्तव्य आहे; क्रांतीच्या कसोटीच्या क्षणी आपल्या प्रतिनिधींची वाट न पाहता त्यांना दिशा दाखविण्याचा त्यांना हक्क आहे आणि ते त्याचे कर्तव्य आहे." (संकलित साहित्य, खंड २६, पाने २३४-३५).

२४-२५ ऑक्टोबरच्या रात्री स्मोल्नी येथे येऊन लेनिन यांनी उठावाचे संपूर्ण नेतृत्व आपल्या हाती घेतले. २५ ऑक्टोबरच्या रात्री, डझनावारी कामगार आणि सैनिक, लाल रक्षक तुकड्यांचे प्रमुख व विभागीय, कारखान्यांचे, सैनिक तुकड्यांचे निरोप्ये लेनिन यांना स्मोल्नीमध्ये भेटले. लष्करी क्रांतिकारक समितीने फार मोठ्या प्रमाणावर कारवाई सुरू केली आणि लेनिन यांच्याकडून ज़ोरदार प्रेरणा मिळालेल्या कामगारांच्या आणि सैनिकांच्या क्रांतिकारक पुढाकाराचा विसंबनीय पाठिंबा तिला मिळाला.

लेनिन यांचे बुद्धिमान डावपेच विजयी ठरले.

लेनिन यांच्यात प्रचंड बौद्धिक आणि सैद्धांतिक शक्ती सामावली होती व त्याच्या जोडीला त्यांच्यापाशी संघटन कौशल्य होते आणि यातच त्यांच्या दुर्दम्य शक्तीचे गमक साठवलेले होते. सप्टेंबर आणि ऑक्टोबरमधील आपल्या डावपेचात्मक पत्रांमधून मांडलेल्या लेनिन यांच्या योजनेनुसार, उठावाचे नेतृत्व करणारे पक्ष-केंद्र आणि लष्करी क्रांतिकारक समिती अचूकपणे वागले.

जॉन रीड यांनी लेनिन यांचे एक असामान्य पुढारी म्हणून वर्णन केले आहे. ते खरोखरीच असामान्य होते! पश्चिम युरोपीय धाटणीच्या सामाजिक-लोकशाहीवादी पुढाऱ्याच्या दिखाऊपणाचा त्यांना तिटकारा होता. ते अगदी कमालीचे साधे होते आणि त्याच वेळी आपल्या वागण्यात आणि विचारात कमालीचे बुद्धिमान होते. जॉन रीड यांनी वर्णिल्याप्रमाणे त्यांच्यापाशी "अत्यंत गहन विचार सोप्या शब्दांमध्ये सांगण्याची, प्रत्यक्ष परिस्थितीचे विश्लेषण करण्याची हातोटी होती. आणि धूर्तपणाबरोबरच कमालीचे बौद्धिक धाष्टर्य होते." हे सर्व गुण महान लेनिन यांच्या अंगी जनतेशी निकट संबंध राखण्यामधून निर्माण झाले होते. जनतेला ते इतिहासाची निर्माती मानीत आणि तिच्या सृजनशील विधायक शक्तीमध्ये त्यांची अमर्याद श्रद्धा होती.

२५ ऑक्टोबरच्या दुपारी, पेत्रोग्राद सोविएतच्या सर्वसदस्य बैठकीत, जनतेच्या विजयी उठावानंतर केलेल्या आपल्या पहिल्याच भाषणात, लेनिन यांनी जनतेच्या अंतिम विजयामध्ये आपली प्रगाढ निष्ठा व्यक्त केली होती. नव्या, सोविएत रशियाच्या भवितव्याचा बारकाईने विचार करून त्यांनी अत्यंत साध्या व वेधक शब्दांमध्ये बोल्शेविकांपुढील आणि बाकीच्या जनसमूहांपुढील ऐतिहासिक कार्यांची रूपरेषा सांगितली होती. ते म्हणाले होते की, समाजसत्तावादी कामगारवर्गीय राज्याची उभारणी करणे आणि रशियामध्ये समाजसत्तावादी विजयाची प्राप्ती करणे हे त्या लोकांवर अवलंबून आहे.

सोविएतांच्या दुसऱ्या काँग्रेसमध्ये ट्रॉट्स्कींच्या पराभूतवादी निवेदनाचे बोल्शेविकांच्या विचारपूर्ण आशावादाने जोरदार खंडन केले. काँग्रेसमधील ट्रॉट्स्की यांच्या भाषणातील संबंधित उतारा जॉन रीड यांनी अशा प्रकारे उद्‌धृत केला आहे:

"जर युरोपवर साम्राज्यवादी भांडवलदारांची सत्ता चालू राहिली, तर क्रांतिकारक रशियाचा अपरिहार्यपणे पराभव होईल... फक्त दोनच पर्याय आहेत ; एक तर रशियन क्रांती युरोपात क्रांतिकारक चळवळ सुरू करील, किंवा युरोपीय सत्ता रशियन क्रांती नष्ट करतील!" (पान १८९ पहा.)

ट्रॉट्स्की असा विचार करीत होते, कारण विजयी रशियन कामगारवर्गाला कामकरी किसान कधी क्रांतिकारक पाठिंबा देतील, यावर त्यांचा विश्वास नव्हता. कामगारवर्ग किसानसमूहांना आपल्या बाजूस जिंकून घेण्यास समर्थ होता यावर त्यांचा विश्वास नव्हता. १९०५ साली त्यांनी मांडलेल्या "कायम क्रांतीच्या" मेन्शेविक विचारप्रणालीमागेसुद्धा त्यांची हीच भावना होती. या विचारप्रणालीनुसार, मुख्य युरोपीय देशांमधून कामगारवर्गाने सत्ता जिंकल्याशिवाय, समाजसत्तावादी क्रांती एका देशात जिंकू शकणार नाही. ऑक्टोबर क्रांतीच्या जरा आधी, ट्रॉट्स्की यांनी 'शांतता कार्यक्रम' ह्या आपल्या पुस्तिकेत लिहिले होते: "जर्मनीमध्ये क्रांती घडल्याशिवाय रशिया किंवा इंग्लंडमध्ये विजयी क्रांतीचा विचारच करता येत नाही, किंवा रशिया आणि इंग्लंडमध्ये क्रांती घडल्याशिवाय जर्मनीत क्रांती विजयी होऊ शकत नाही." जोपर्यंत मुख्य युरोपीय देशांमधील कामगारवर्गाच्या विजयाची जोड मिळत नाही तोपर्यंत समाजसत्तावादी क्रांती विजयी होऊ शकत नाही, ही विचारधारा ट्रॉट्स्की यांनी जॉन रीडना १७ ऑक्टोबरला दिलेल्या मुलाखतीमधूनही व्यक्त केली होती. भावी सरकारच्या परराष्ट्र धोरणाविषयी

बोलताना ट्रॉट्स्की म्हणाले होते: "युद्धाच्या शेवटी युरोपचे नवनिर्माण मुत्सद्द्यांकडून नव्हे, तर कामगारवर्गाकडून झालेले मी पाहतो. युरोपचा प्रजासत्ताक संघ, युरोपची संयुक्त राज्ये..." (पान ९०-९१ पहा). अशा प्रकारे, एका देशात समाजसत्तावाद विजयी होऊ शकतो या लेनिनवादी कामगारवर्गीय क्रांतीच्या सिद्धांताविरुद्ध, ट्रॉट्स्की यांनी आपल्या "कायम क्रांती"च्या पराभूतवादी सिद्धांतामधून निर्माण झालेला स्वतःचा युरोपच्या संयुक्त राज्यांचा विचार मांडला.

रशियामधील इतिहासप्रवर्तक घडामोडींच्या कठोर तर्कशास्त्रामुळे, पराभूतवादी धोरणाचा पुरस्कार करणाऱ्यांना वारंवार आपल्या विचारांविरुद्ध बोलणे आणि कृती करणे भाग पडले. उठावाच्या वेळी ट्रॉट्स्कींच्या बाबतीत असे घडले. त्यावेळी ते पीटर्सबर्ग सोविएतचे अध्यक्ष होते व क्रांतीच्या वस्तुनिष्ठ क्रमामुळे त्यांना लेनिन यांच्या डावपेचात्मक धोरणाचे अनुसरण करणे भाग पडले. २५ ऑक्टोबरच्या पेत्रोग्राद सोविएतच्या सभेत कुणीतरी आपल्या जागेवरून ओरडले की, विजयी उठावाची घोषणा ही बेकायदेशीर होती, कारण सोविएतांच्या अखिल रशियन काँग्रेसने आपली इच्छा बोलून दाखविण्यापूर्वीच ही घोषणा झाली. तेव्हा लेनिनवादी डावपेचांना अनुसरून यांनी प्रत्युत्तर दिले होते, कारण बंड करून उठलेली जनता विजयी झाली होती या सत्याला सामोरे जाणे त्यांना भाग पडले होते. ते म्हणाले होते: "पेत्रोग्रादच्या कामगारांच्या आणि सैनिकांच्या उठावामध्येच सोविएतांच्या अखिल रशियन काँग्रेसची इच्छा गृहीत धरलेली आहे!" (पान १२८ पहा.) आपल्याला असे आढळून येते की, दोनच दिवसांपूर्वी, २३ ऑक्टोबरला पेत्रोग्राद सोविएतच्या सर्वसदस्य बैठकीत ते जे काही बोलले होते, त्याच्या सर्वस्वी उलट बोलणे त्यांना भाग पडले होते.

पण ट्रॉट्स्कींच्या दृष्टिकोनाचा संधिसाधूवादी आशय आणि रशियात समाजसत्तावादी क्रांती घडण्याची व समाजसत्तावाद विजयी होण्याची शक्यता नाकारणारे त्यांचे सातत्यशील अनुयायी व इतर पराभूतवादी यांच्या दृष्टिकोनाचा आशय, ऐतिहासिक घटनांच्या तर्कशास्त्राने बदलला नाही आणि बदलू शकला नाही. त्यांचे असे मत बनले होते की, देशामध्ये संसदीय पद्धतीचे भांडवलदारी प्रजासत्ताक स्थापित करणे ऐतिहासिकदृष्टचा अपरिहार्य होते. सोविएत राज्याला दृढ करण्याच्या आणि सोविएत समाजसत्तावादी प्रजासत्ताक संघात समाजसत्तावादी समाज निर्माण करण्याच्या लेनिनवादी सार्वत्रिक धोरणाला विरोध करणाऱ्या विश्वासघातकी कृत्यांच्या मालिकेने,

त्यांची पक्षामधील व देशामधील नंतरची वाटचाल भरलेली दिसते. ब्रेस्त येथील शांतता-तहाच्या बोलण्याच्या वेळी त्यांनी घेतलेली भूमिका पूर्णपणे देशद्रोही होती. नव्या आर्थिक धोरणामार्फत समाजसत्तावादी उभारणी करण्याच्या लेनिन यांच्या डावपेचांवर त्यांनी शाब्दिक आतषबाजी करून हल्ले चढविले. समाजसत्तावादी उद्योगीकरणाच्या आणि शेतीचे सामुदायिकीकरण करण्याच्या लेनिनवादी धोरणाचा पुरस्कार करणाऱ्या पक्षाच्या मध्यवर्ती समितीची त्यांनी नालस्ती केली. लेनिनवादी सर्वसाधारण धोरणाविरुद्ध या पराभूतवाद्यांच्या गटांनी आणि विभागांनी अविरत संघर्ष केल्याच्या परिणामी, ते पक्षामधून पूर्णपणे फुटून निघाले आणि त्यांनी सोविएत-विरोधी भूमिका घेतली, हे अगदी स्वाभाविक आणि अपरिहार्य होते.

जॉन रीड यांना आपल्या पुस्तकासाठी ज्या वस्तुनिष्ठ परिस्थितीमध्ये माहिती गोळा करावी लागली व घटनांचे आकलन करून घ्यावे लागले, त्यामुळे उठावापूर्वी आणि उठावाच्या वेळी बोल्शेविक पक्षाच्या केंद्रांचा अपेक्षेप्रमाणे ठोस रीतीने आणि तपशीलवार अभ्यास त्यांना करता आला नाही, कारण उठावाच्या पूर्वी बोल्शेविक पक्षाने आणि लेनिन यांनी जे काही केले ते भूमिगतरीत्या करावे लागले होते. म्हणून लेनिन यांनी आणि त्यांच्या निकटवर्ती सहकाऱ्यांनी पराभूतवाद्यांविरुद्ध आणि ट्रॉट्स्की यांनी पुरस्कारलेल्या डावपेचात्मक धोरणाविरुद्ध चिकाटीने झुंज दिल्याचा पुरेसा पुरावा या पुस्तकात आढळत नाही. याचमुळे, ऑक्टोबर क्रांतीच्या प्रारंभीच्या दिवसांमधील ट्रॉट्स्कींच्या उद्‌गारांचे विसंगत स्वरूप जॉन रीड यांच्या ध्यानात येऊ शकले नाही.

जॉन रीड यांनी असे म्हटले की, बोल्शेविक तीन दिवसांपेक्षा अधिक काळ सत्तेवर राहतील यावर कदाचित लेनिन, ट्रॉट्स्की आणि पीटर्सबर्गमधील कामगार आणि साधे सैनिक यांच्याव्यतिरिक्त कुणाचाही विश्वास नव्हता, तेव्हा त्यांनी स्वतःचीच फसवणूक केली होती. लेनिनना, मध्यवर्ती समितीला आणि बहुसंख्य स्थानिक बोल्शेविक संघटनांना खात्री पटली होती की, विजय कायम स्वरूपाचा होता. फक्त दिवाळखोर मेन्शेविक आणि समाजवादी-क्रांतिकारक पक्ष, पदभ्रष्ट शोषक वर्गांमधील लोक आणि त्यांचे हस्तक व बोल्शेविक पक्षातील मूठभर पराभूतवादी यांनी, विजयी क्रांतीच्या अपरिहार्य पाडावाचे "भाकित" केले होते. सोविएतांच्या अखिल रशियन कॉंग्रेसमध्ये, रशियामधील क्रांतीच्या भवितव्याबाबत ट्रॉट्स्कींनी काढलेली कमालीची निराशावादी मुक्ताफळे याच विशिष्ट काळातील

आहेत. सशस्त्र उठावाचा आरंभ करण्याचा निर्णय मध्यवर्ती समितीने कोणत्या परिस्थितीत घेतला याबाबतचा रीड यांचा अहवाल, ऐतिहासिक वस्तुस्थितीशी विसंगत आहे (पान ७६ पहा.)

या सर्व उणीवा असूनही आणि पुस्तकात विविध चुका घडूनही, जॉन रीड यांचा हा अहवाल म्हणजे, महान ऑक्टोबर समाजसत्तावादी क्रांतीशी जास्तीत जास्त जवळीक राखणारे खरेखुरे वर्णन आहे, हे मूलभूत सत्य नाकारता येणार नाही.

उठावाचे सूत्रचालन करणाऱ्या वैध केंद्रांच्या वर्तनात, उठाव करणाऱ्या लोकांच्या शौर्यात, धैर्यात आणि क्रांतिकारक कार्यात मूर्त रूप घेतलेल्या लेनिन यांच्या, बोल्शेविक पक्षाच्या, विचारांनी लेखक प्रभावित झाला होता. यामुळेच समोर उलगडत गेलेल्या क्रांतिकारक घटनांच्या गर्भित आशयाचे आकलन करून घेणे व त्यांच्यामधील खोल ऐतिहासिक अर्थ जाणून घेणे, चौकस दृष्टी लाभलेल्या या कट्टर क्रांतिकारक व प्रतिभाशाली लेखकाला शक्य झाले. त्यातच पुस्तकाचे मुख्य वैशिष्टच सामावलेले आहे. लेनिन यांनी म्हटल्याप्रमाणे "कामगारवर्गीय क्रांती आणि कामगारवर्गीय अधिसत्ता म्हणजे खरोखरीच काय याचे आकलन करण्यास अत्यंत महत्त्वाच्या अशा घडामोडींचे प्रामाणिक आणि अत्यंत ठळक दर्शन ते घडविते."

रशियामधील ऑक्टोबर क्रांतीच्या ज्या महान सत्याला रीड यांनी आपले पुस्तक अर्पण केले, ते अमेरिकन आणि इतर साम्राज्यवाद्यांच्या विरोधी होते. रशियन कामगारांनी, किसानांनी आणि सैनिकांनी ज्या क्रांतिकारक धाष्टर्याचा व शौर्याचा प्रभावी आदर्श मांडला होता, त्यापासून शोषित जनतेचे लक्ष दुसरीकडे वेधावे म्हणून हे साम्राज्यवादी आपल्या वृत्तपत्रांमधून बोल्शेविकांविरुद्ध खोटयानाटया बातम्या छापीत होते. जॉन रीड यांनी गोळा केलेले साहित्य जप्त करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. रीड यांच्या प्रकाशकाच्या कचेऱ्यांवर धाडी घालून त्यांच्या पुस्तकाचे हस्तलिखित चोरण्याचा व नष्ट करण्याचा, लागोपाठ सहा वेळा भाडोत्री हस्तकांनी प्रयत्न केला.

पण एवढ्या सर्व अडचणी आणि संकटे येऊनही, जॉन रीड यांच्या 'जगाला हदरवलेले दहा दिवस' या पुस्तकाचे १९१९ मध्ये अमेरिकेत प्रकाशन झाले. मानवतेच्या इतिहासात एका नव्या युगाचा आरंभ करणाऱ्या, कामगारवर्गीय क्रांत्यांच्या युगाचा आरंभ करणाऱ्या, रशियामधील विजयी समाजसत्तावादी क्रांतीचा खराखुरा वृत्तांत जगाला सांगणारे, परदेशी प्रकाशित झालेले ते पहिले पुस्तक होते.

अल्बर्ट विल्यम्स

# जॉन रीड

यांचे

# चरित्र

कोल्चाक सेनेसाठी लष्करी माल चढविण्यास नकार देणाऱ्या पहिल्या अमेरिकन शहरातील पहिले कामगार, प्रशांत महासागराच्या किनाऱ्यावरील पोर्टलॅंड येथील होते. याच शहरात २२ ऑक्टोबर १८८७ रोजी जॉन रीड यांचा जन्म झाला.

त्यांचे वडील कष्टाळू आणि खुल्या अंतःकरणाच्या पुरोगामी लोकांपैकी एक होते. जॅक लंडन यांनी आपल्या पश्चिम अमेरिकेच्या पार्श्वभूमीवरील कथांमध्ये त्यांचे वर्णन केले आहे. त्यांची बुद्धी तीक्ष्ण होती आणि ढोंगीपणाचा व खोटेपणाचा त्यांना राग होता. प्रभावी आणि श्रीमंत माणसांची बाजू घेण्याऐवजी ते त्यांना विरोध करीत. जेव्हा राज्याची जंगले आणि इतर नैसर्गिक साधनसंपत्ती गिळंकृत करण्यासाठी मोठ्या कंपन्यांनी आपल्या नांग्या पसरल्या, तेव्हा त्यांनी कडवा लढा दिला. त्यांचा छळ करण्यात आला, मारहाण करण्यात आली व कामावरून त्यांना काढून टाकण्यात आले. पण ते शत्रूसमोर कधीही नमले नाही.

अशा प्रकारे जॉन रीड यांच्यासाठी त्यांच्या वडिलांनी उत्तम वारसा मागे ठेवला – लढवय्याचे रक्त, उत्तम बुद्धी, धीट आणि कणखर स्वभाव. जॉन यांच्या या गुणांचा विकास फार लौकर घडला. शाळा संपल्यावर ते हार्वर्ड येथे गेले. हार्वर्ड विद्यापीठ म्हणजे तेल उद्योगातील सम्राटांच्या, कोळसा खाणींच्या कोट्यधीशांच्या आणि पोलाद उद्योगपतींच्या मुलांचे माहेरघर. त्या सर्वांना खात्री असे की, चार वर्षांच्या खिलाडू, चंडोल जीवनानंतर आणि "निर्विकार विज्ञानाचा निर्विकारपणे अभ्यास केल्यानंतर" त्यांची मुले जहालवादाचा किंचितही स्पर्श न होता बाहेर पडतील. चालू

व्यवस्थेचे पुरस्कर्ते म्हणून – प्रतिगामित्वाचे श्वेत रक्षक म्हणून – लक्षावधी अमेरिकन युवकांची महाविद्यालयांमधून आणि विद्यापीठांमधून जोपासना करण्याचा हा खासा मार्ग आहे.

जॉन रीड यांनी हार्वर्डमध्ये चार वर्षे घालवली. त्यांच्या व्यक्तिमत्वामधील गोडव्यामुळे आणि त्यांच्या बुद्धिमत्तेमुळे त्यांनी सर्वांची मने जिंकली. श्रीमंत आणि खास हक्क लाभलेल्या वर्गांमधील लोकांच्या मुलांशी त्यांचा दररोज संपर्क येत होता. समाजशास्त्राच्या भक्तिपरायण अध्यापकांची अगडबंब भाषणे त्यांनी ऐकली. भांडवलशाहीचे मोठे धर्मगुरु असणाऱ्यांची, राजकीय अर्थशास्त्राच्या प्राध्यापकांची प्रवचने त्यांनी ऐकली. आणि त्या धनिकांच्या साम्राज्यामधील बालेकिल्ल्यात अखेरीस त्यांनी एक समाजवादी मंडळ स्थापन केले. त्या बुद्ढाचार्यांच्या तोंडावर ही जबरदस्त चपराक होती. ही केवळ एक पोरकट लहर आहे असे समजून तेथील थोरांनी स्वतःचे सांत्वन केले. ते म्हणाले होते, "कॉलेज सोडून तो जगाच्या व्यवहारात प्रवेश करील तेव्हा त्याचा हा जहालवाद आपोआप विरत जाईल."

जॉन रीड यांनी आपला अभ्यास पुरा केला, पदवी मिळवली, विस्तृत जगात पदार्पण केले आणि एका रात्रीत त्यांनी जगाला जिंकले. आपल्या जीवनविषयक प्रेमाने, उत्साहाने आणि आपल्या लेखणीने त्यांनी ते जिंकले. विद्यार्थीदशेत असतानाच, 'लॅम्पून' नामक एका विनोदी पत्रिकेचे संपादन करून, हलक्याफुलक्या व तेजस्वी शैलीवरील आपले प्रभुत्व त्यांनी सिद्ध केले होते. आता त्यांनी कविता, कथा आणि नाटके यांचा ओघ निर्माण केला. प्रकाशकांनी त्यांच्यावर मागण्यांचा वर्षाव केला, सचित्र मासिके त्यांना अवाढव्य रकमा देऊ लागली आणि मोठ्या वृत्तपत्रांनी त्यांना आंतरराष्ट्रीय घडामोडींचा आढावा घ्यायला सांगितले.

अशाप्रकारे ते जगामधल्या राजमार्गांचे प्रवासी बनले. ज्यांना जगामधील तत्कालीन घडामोडींशी परिचय हवा असे, त्यांना फक्त जॉन रीड यांचा माग ठेवावा लागे, कारण जेथे जेथे मोठ्या घडामोडी घडत तेथे तेथे एखाद्या वादळी पक्ष्याप्रमाणे ते वेगाने जाऊन थडकत असत.

पीटरसन येथील कापड गिरण्यांच्या संपाचे क्रांतिकारक तुफानामध्ये रूपांतर घडले तेव्हा जॉन रीड तेथे हजर होते.

कोलोराडो येथे रॉकफेलरचे गुलाम आपल्या बिळांमधून सरपटत बाहेर आले आणि सशस्त्र रक्षकांच्या दंडुक्यांना व रायफलींना न जुमानता त्यांनी

माघारी जाण्यास नकार दिला. जॉन रीड तेथे होते आणि बंडखोरांना पाठिंबा देत होते.

मेक्सिकोत रोजगारावर काम करणाऱ्या मजुरांनी बंड उभारले आणि पान्चो व्हिलाच्या पुढारीपणाखाली ते राजधानीकडे निघाले. जॉन रीड घोड्यावर बसून त्यांच्या बरोबर जात होते.

अगदी अलिकडील या मोहीमेचा वृत्तांत 'मेट्रोपोलिटन'मध्ये प्रसिद्ध झाला व नंतर 'क्रांतिकारक मेक्सिको' या पुस्तकात प्रसिद्ध झाला. "सभोवर महाप्रचंड निवडुंगांनी आणि स्पॅनिश बागनेटांनी रक्षित" लाल आणि जांभळ्या टेकड्यांचे व अफाट वाळवंटाचे रीड यांनी वर्णन केले होते. त्या अमर्याद मैदानांना पाहून ते मंत्रमुग्ध झाले, तेथील जनतेने तर त्यांना अधिकच आकर्षित केले. जमीनदार आणि कॅथलिक चर्च तेथील लोकांचे निर्दयपणे शोषण करीत होते. डोंगराळ कुरणांमधून कळप हाकणाऱ्या, मुक्ती फौजांना जाऊन मिळण्यास उत्सुक असलेल्या, रात्रीच्या वेळी शेकोट्यांभोवती बसून गाणी गाणाऱ्या व थंडीची-भुकेची पर्वा न करता, फाटक्यातुटक्या कपड्यात, अनवाणी अवस्थेत आपल्या भूमीसाठी आणि स्वातंत्र्यासाठी शौर्याने लढणाऱ्या त्या लोकांची वर्णने जॉन रीड यांनी केली होती.

साम्राज्यवादी युद्ध सुरू झाले आणि जेथे तोफ धडाडत होती तेथे जॉन रीड जात होते–फ्रान्समध्ये, जर्मनीत, इटलीत, टर्कीमध्ये, बाल्कनमध्ये आणि इथे रशियातसुद्धा. झारच्या अधिकाऱ्यांचा विश्वासघातकीपणा उघडकीस आणल्याबद्दल आणि ज्यूंविरोधी दंग्यांमध्ये त्यांचा हात होता अशा तऱ्हेची माहिती गोळा केल्याबद्दल त्यांना आणि विख्यात कलाकार बोर्डमन रॅबिन्सन यांना पोलिसांनी पकडले होते. पण नेहमीप्रमाणे आपली खुबी वापरून, योगायोगाने किंवा युक्तीने त्यांनी आपली सुटका करून घेतली व हसत हसत नव्या साहसात त्यांनी उडी घेतली.

त्यांना थोपविण्याएवढे संकट कधीच मोठे नव्हते. धोका हा त्यांच्या दृष्टीने स्वाभाविक होता. प्रवेशाला मनाई केलेल्या प्रदेशात आणि आघाडीवरील खंदकांमध्ये ते नेहमी घुसत असत.

जॉन रीड आणि बोरीस राईनस्टाईन यांच्याबरोबर १९१७ च्या सप्टेंबरात रीगा आघाडीवर मी गेलो होतो, त्या[illegible] मला आठवण आहे. आमची मोटार दक्षिणेला वेन्देनकडे जात होती आ[illegible] त्याचवेळी जर्मन तोफखान्याने त्या छोट्या खेड्यावर मारा सुरू केला. जॉन रीड यांच्या

दृष्टीने ते खेडे तात्काळ जगामधील सर्वांत स्वारस्यपूर्ण ठिकाण बनले. तिथे जाण्याचा त्यांनी आग्रह धरला. आम्ही सावधगिरीने पुढे सरकत चाललो होतो तेवढ्यात अचानक एक मोठा तोफगोळा आमच्यामागे फुटला व नुकतेच ज्या रस्त्यावरून आम्ही आलो होतो तेथे धुराचे आणि धुळीचे काळे कारंजे उसळले.

आम्ही एकमेकांना घाबरून बिलगलो, पण मिनिटभरानंतर जॉन रीड यांचा चेहरा आनंदाने उजळून निघाला होता. त्यांची कोणती तरी आंतरीक गरज भागली होती असे भासत होते.

अशाप्रकारे त्यांनी जगभर प्रवास केला, सर्व देशांमध्ये, सर्व आघाड्यां-वर, एका विलक्षण साहसामागून दुसऱ्याकडे ते जात राहिले. पण ते सामान्य साहसबाज नव्हते, फिरते पत्रकार नव्हते, लोकांच्या यातना अत्यंत निर्विकारपणे पाहणारे निरीक्षक नव्हते. सर्व अराजक, घाण आणि रक्त-पात, त्यांच्या न्यायाच्या आणि औचित्याच्या भावनेला दुखावत होते. या सर्व वाईट गोष्टी समूळ उपटून टाकाव्या म्हणून सातत्याने ते त्यांचे उगम खणून काढीत होते.

प्रवासाहून ते न्यूयॉर्कला परतत ते विश्रांतीसाठी नव्हे, तर नवे काम आणि चळवळ करण्यासाठी.

मेक्सिकोहून परतल्यावर त्यांनी जाहीर केले होते: "होय, मेक्सिको-मध्ये बंड सुरू झाले आले आहे आणि अंदाधुंदी माजली आहे, पण त्याची जबाबदारी भूमीहीन मजूरांवर नाही, तर सोने आणि बंदुका तेथे पाठवून तेढ वाढविणाऱ्या अमेरिकन आणि ब्रिटिश प्रतिस्पर्धी तेल कंपन्या त्याला जबाबदार आहेत."

पिटरसनहून परत आल्यावर त्यांनी मॅडिसन स्क्वेअर गार्डनमध्ये एक प्रचंड नाटकाचा खेळ सादर केला. त्याचे नांव होते: 'पिटरसनच्या काम-गारवर्गाची भांडवलाविरुद्ध लढाई'.

कोलोराडोहून ते परतले लूडलो येथील कत्तलींची वर्णने करायला. सैबेरियामधील लेना खाणींमधील कत्तलींच्या भयानक कथाही त्यापुढे किंचित फिक्या पडल्या. खाणकामगारांना त्यांच्या घरांबाहेर कसे हाकलण्यात आले, तंबूमध्ये ते कसे राहिले, त्या तंबूंवर पेट्रोल ओतून त्यांना कसे पेटविण्यात आले आणि पळणाऱ्या कामगारांवर सैनिकांनी कशा गोळ्या झाडल्या, आणि डझनावारी बायका व मुले आगीत जळून कशी मेली, याची वर्णने त्यांनी केली होती. कोटयधीशांचे सम्राट रॉकफेलर यांना उद्देशून ते म्हणाले

होते: "ह्या तुमच्या खाणी, हे तुमचे भाडोत्री मारेकरी. तुम्ही खुनी आहात!"

रणांगणांवरूनसुद्धा एखाद्या युद्धग्रस्त राष्ट्राच्या अत्याचारांविषयी पोकळ बडबड करीत ते परतले नाही, तर हे युद्ध म्हणजेच एक निव्वळ पशुता आहे, परस्परविरोधी साम्राज्यवाद्यांनी संघटित केलेले रक्तस्नान आहे, अशी शापवाणी उच्चारीत ते आले. 'लिबरेटर' नांवाच्या जहाल क्रांतिकारक नियतकालिकाला आपले सर्वोत्तम लिखाण ते मोफत देत असत. त्यात त्यांनी एक ज्वलज्जहाल साम्राज्यवादविरोधी लेख छापला होता: 'तुमच्या सैनिक मुलाचे हात बांधून टाका'. त्यांच्यावर आणि इतर संपादकांवर न्यूयॉर्कमधील कोर्टात आत्यंतिक देशद्रोहाचा आरोप ठेवण्यात आला. देशप्रेमी वृत्तीच्या ज्यूरींमार्फत आरोपींना दोषी ठरविण्याचा फिर्यादी वकीलाने चंग बांधला होता. खटला चालू असताना कोर्टाच्या इमारतीशेजारी बँड उभा करून त्याला राष्ट्रगीते वाजवायला लावण्यापर्यंत त्यांची मजल गेली होती. तरीही रीड आणि त्यांचे साथी आपल्या विचारांना घट्ट चिकटून राहिले. सामाजिक क्रांतीसाठी क्रांतिकारक ध्वजेखाली काम करणे हे आपले कर्तव्य आहे असे आपण मानतो, असे रीड यांनी जेव्हा निर्भयपणे जाहीर केले तेव्हा फिर्यादी वकीलांनी त्यांना विचारले:

"या युद्धात अमेरिकेच्या झेंड्याखाली तुम्ही लढाल?'

"नाही, मी लढणार नाही," रीड यांनी ठामपणे उत्तर दिले.

"का नाही?"

उत्तरादाखल रीड यांनी आवेशपूर्ण भाषण केले. रणांगणांवर पाहिलेली विदारक दृश्ये त्यांनी वर्णन केली. त्यांचे कथन एवढे खरे आणि प्रभावी होते की, काही पूर्वग्रहदूषित मध्यमवर्गीय ज्यूरींच्या डोळ्यांतसुद्धा अश्रू उभे राहिले आणि संपादकांना सोडून देण्यात आले.

अमेरिकेने जेव्हा युद्धात प्रवेश केला होता तेव्हा रीड यांच्यावर शस्त्रक्रिया झाली होती व त्यांचे एक मूत्रपिंड काढून टाकण्यात आले होते. लष्करी सेवेला डॉक्टरांनी त्यांना अपात्र ठरविले होते.

"मूत्रपिंड गमावल्यामुळे दोन राष्ट्रांमधल्या युद्धात सेवा बजावण्यापासून माझी सुटका झाली असली, तरी वर्गांमधील युद्धात सेवा बजावण्यापासून त्यामुळे माझी मुक्तता झालेली नाही," ते म्हणाले होते.

१९१७ च्या उन्हाळ्यात रीड गडबडीने रशियाला आले. आधीच्या क्रांतिकारक चकमकींमध्ये त्यांना महान वर्गीय युद्धाची चाहूल लागली होती.

त्यांनी ताबडतोब परिस्थितीचा अभ्यास केला आणि कामगारवर्गाने सत्ता जिंकणे तर्कशुद्ध व अपरिहार्य आहे, याची त्यांना जाणीव झाली. पण दिरंगाईमुळे आणि लांबणीवर टाकण्यामुळे ते अस्वस्थ झाले होते. दररोज सकाळी उठल्यानंतर, अद्याप क्रांती सुरू झालेली नाही हे पाहून, त्यांना दाहासारखी चमत्कारिक भावना त्रास देत असे. अखेरीस स्मोल्नीने इशारा दिला आणि लोक क्रांतिकारक संघर्षाला सरसावले. साहजिकच जॉन रीड त्यांच्यासमवेत पुढे गेले. ते सर्वत्र हजर होते: पूर्व-संसदेच्या विसर्जनाला, अडथळे उभारण्याच्या स्थळी, भूमीगत अवस्थेमधून लेनिन आणि झिनोवियेव बाहेर आले तेव्हा टाळयांच्या प्रचंड कडकडाटात त्यांचे स्वागत झाले त्यावेळी आणि हेमंत प्रासादाचा पाडाव होताना...

पण हे सर्व त्यांनी आपल्या पुस्तकात वर्णन केले आहे.

या ठिकाणाहून त्या ठिकाणी जात, जेथे सापडेल तिथून त्यांनी माहिती गोळा केली. 'प्रावदा' आणि 'इझ्वेस्तियाच्या' संपूर्ण फायली त्यांनी गोळा केल्या, सर्व निवेदने, पुस्तिका, पोस्टरे, जाहिराती गोळा केल्या. पोस्टरांचा त्यांना विशेष नाद होता. दर वेळी एखादे नवे पोस्टर लागले म्हणजे जर ते मिळविण्याचा दुसरा मार्ग नसेल, तर भिंतीवरून सरळ टरकावून घेण्यास ते मागेपुढे पहात नसत.

त्या दिवसांमध्ये पोस्टरे एवढ्या चटकन आणि एवढ्या मोठ्या संख्येने छापली जात की, ती चिकटवायला कुंपणांवर जागा शिल्लक उरत नसे. कॅडेटांची, सामाजिक-क्रांतिकारकांची, मेन्शेविकांची, डाव्या समाजवादी-क्रांतिकारकांची आणि बोल्शेविकांची पोस्टरे एकमेकांवर चिकटवली जात व त्यांचा एक जाड थर बनत असे. एके दिवशी रीड यांनी एकावर एक अशी चिकटवलेली १६ पोस्टरे टरकावली. माझ्या खोलीत ते पळत पळत आले व कागदांचा तो भला मोठा गठ्ठा दाखवीत म्हणाले: "पहा, एका फटक्यात मी सबंध क्रांतीला आणि प्रतिक्रांतीला खिशात घातलं!"

अशा प्रकारे वेगवेगळ्या मार्गांनी त्यांनी प्रचंड संग्रह केला. तो संग्रह एवढा चांगला होता की, १९१८ नंतर न्यूयॉर्क बंदरात जेव्हा त्यांचे आगमन झाले तेव्हा अमेरिकेच्या अॅटर्नी-जनरलांच्या हस्तकांनी तो जप्त केला. पण त्याचा परत ताबा मिळविण्यात रीड यशस्वी झाले. न्यूयॉर्कमधील आपल्या खोलीत त्यांनी तो लपवून ठेवला आणि तेथेच भुयारी रस्त्यांच्या खडखडाटात व खाली-वर धावणाऱ्या गाड्यांच्या गोंधळात 'जगाला हादरवलेले दहा दिवस' हे आपले पुस्तक टंकलिखित केले.

सर्वसाधारण वाचकापर्यंत ते पुस्तक पोहोचू [illegible] फॅसिस्टांना वाटणे स्वाभाविक होते. हस्तलिखित चो[illegible] कचेरीला त्यांनी सहा वेळा फोडले. आपल्या प्रकाशकाच्या [illegible] छायाचित्रावर जॉन रीड यांनी लिहिले होते: "या [illegible] करताना सर्वनाशापासून थोडक्यात बचावलेल्या होरेस लाई[illegible] प्रकाशकाला."

रशियाबद्दलची सत्य परिस्थिती सांगण्याच्या त्यांच्या [illegible] हे पुस्तक म्हणजे केवळ एकमेव निर्मिती नव्हती. भांडवल[illegible] कोणतेही सत्य नको होते. रशियन क्रांतीबद्दल त्यांना तिरस्कार [illegible] धास्ती वाटत होती, म्हणून खोट्यानाटचा बातम्यांच्या महापु[illegible] बुडवून टाकण्याचा त्यांनी प्रयत्न केला. राजकीय व्यासपीठांवरून, [illegible]-गृहांच्या पडद्यांवरून, वृत्तपत्रांच्या आणि मासिकांच्या स्तंभांमधून [illegible] निंदेचा अखंड ओघ वहात होता. जी नियतकालिके [illegible] रीड यांच्या-मागे त्यांच्या लेखांसाठी धावत होती, ती आता त्यांचे लिखाण छापीनात. तरीही ते रीडना गप्प बसवू शकले नाही. अनेक सार्वजनिक सभांमधून ते बोलले.

त्यांनी स्वतःचे मासिक सुरू केले. डाव्या समाजवाद्यांच्या 'रेव्होल्यूशनरी एज' या नियतकालिकाचे व नंतर 'कम्युनिस्ट'चे ते संपादक बनले. 'लिबरेटर'साठी त्यांनी लेखांमागून लेख लिहिले, अमेरिकाभर त्यांनी प्रवास केला, परिषदांमध्ये भाग घेतला, आपल्या भोवतालच्या लोकांना सत्याचे ज्ञान करून दिले, आपल्या उत्साहाचा आणि क्रांतिकारक जोमाचा त्यांच्यावर परिणाम घडवला व अखेरीस सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे ज्याप्रमाणे हार्वर्ड विद्यापीठाच्या ऐन गाभ्यात त्यांनी समाजवादी मंडळ स्थापन केले होते त्याप्रमाणे अमेरिकन भांडवलशाहीच्या ऐन गाभ्यात त्यांनी कम्युनिस्ट-कामगार पक्ष स्थापन केला.

नेहमीप्रमाणे "पंडित" चुकले. जॉन रीड यांची जहाल विचारसरणी म्हणजे "तात्पुरती वेडाची लहर" नव्हती. त्यांनी कितीही भाकिते केली तरी बाहेरच्या जगाचे वारे लागल्यानंतर रीड यांची त्या विचारसरणीपासून मुळीच मुक्तता झाली नाही. उलट त्यांचा जहालवाद दुप्पट झाला. जॉन रीड यांनी संपादित केलेल्या 'व्हॉईस ऑफ लेबर' या नव्या कम्युनिस्ट मुखपत्रावरून त्यांचा जहालवाद किती खोलवर आणि बळक[illegible]ला होता त्याची प्रचीती येत होती. खराखुरा क्रांतिकारक देशात अवतरला आहे

याची अखेरीस अमेरिकन भांडवलदारवर्गाला जाणीव झाली. "क्रांतिकारक" या एकाच शब्दाने त्यांचा थरकाप होऊ लागला. हे खरे होते की, फार फार पूर्वी, अमेरिकेचे आपले स्वतःचे क्रांतिकारक होते आणि आत्तासुद्धा 'अमेरिकन क्रांतीच्या सुकन्या' व 'अमेरिकन क्रांतीचे सुपुत्र' यांसारख्या संस्थांना अमेरिकेत मान दिला जात होता व त्यांच्यामार्फत प्रतिगामी भांडवलदारवर्ग १७७६ च्या क्रांतीला मुजरे करीत होता. पण ते क्रांतिकारक फार पूर्वीच मरण पावले होते. तर जॉन रीड हे एक धडधडीत जिवंत क्रांतिकारक होते, भांडवलदारवर्गाला ते एक आव्हान, एक आपत्ती होते.

रीड यांना कडीकुलुपात ठेवण्यावाचून त्यांना दुसरे गत्यंतर नव्हते. त्यांना एकदा दोनदा नव्हे—वीस वेळा अटक करण्यात आली. फिलाडेल्फिया येथे पोलिसांनी सभागृहाला टाळे लावले व रीड यांना ते बोलू देईनात. तेव्हा ते एका साबणाच्या खोक्यावर चढून उभे राहिले आणि रस्त्यावर उभ्या राहिलेल्या गर्दीपुढे त्यांनी व्याख्यान दिले. ती सभा एवढी यशस्वी झाली आणि त्यांना एवढ्या लोकांनी पाठिंबा दिला की, जेव्हा "शांतताभंग" केल्याचा रीड यांच्यावर आरोप ठेवण्यात आला, तेव्हा ते दोषी असल्याचा निकाल ज्यूरी देईनात. प्रत्येक अमेरिकन शहराने जॉन रीड यांना निदान एकदा तरी अटक केली होती. पण ते नेहमी जामीनावर आपली सुटका करून घेत, किंवा मदत मागून घेत आणि इतरत्र हल्ला चढवण्यासाठी घाईगर्दीने निघून जात.

आपल्या संकटांचे आणि पराभवांचे खापर रशियन क्रांतीच्या माथ्यावर फोडण्याची पश्चिमी भांडवलदारवर्गाला सवय लागली होती. त्या क्रांतीचा एक सर्वांत जाचक अपराध म्हणजे एका प्रतिभाशाली अमेरिकन तरुणाला तिने क्रांतीचा कट्टर पूजक बनविले होते. भांडवलदारवर्ग अशा पद्धतीने विचार करीत होता. प्रत्यक्षात ते पूर्णतः खरे नव्हते.

रशियाने जॉन रीड यांना क्रांतिकारक बनविले नव्हते. ते जन्माला आले त्या दिवसापासून अमेरिकन क्रांतिकारकाचे रक्त त्यांच्या नसांमधून वहात होते. मांदे चढलेले, आत्मतुष्ट आणि प्रतिगामी राष्ट्र म्हणून जरी नेहमी अमेरिकनांचे चित्रण केले जात असले, तरी बंड आणि संताप त्यांच्या नसांमधून वाहतात. पूर्वीच्या महान बंडखोरांची आठवण करा—थॉमस पेन, वॉल्ट व्हिटमन, जॉन ब्राऊन आणि पार्सन्स यांची आठवण करा. त्याचप्रमाणे जॉन रीड यांचे सध्याची सहकारी बिल हेवूड, रॉबर्ट मायनर, रूटेनबर्ग आणि फॉस्टर यांची आठवण करा. होमस्टेड, पुलमन आणि

लॉरेन्स यांच्यामधील रक्तपाती औद्योगिक संघर्ष व मागील [illegible] कामगारांचे लढे आठवा. ते सर्व नेते आणि जनसमूह पूर्णतः अमेरिकन कुळीचे होते. सध्या स्पष्टरूपाने दिसत नसली, तरी अमेरिकन स्वातंत्र्य बंडाची दाट भावना मिसळलेली आहे.

म्हणून जॉन रीड यांना रशियाने क्रांतिकारक बनविले असे म्हणता येणार नाही. पण **शास्त्रशुद्धरीत्या विचार करणारा एक सातत्यशील** क्रांति-कारक मात्र त्यांच्यामधून रशियाने निर्माण केला. हे फार मोठे काम होते. त्यामुळे त्यांच्या टेबलावर मार्क्स, एंगल्स आणि लेनिन यांच्या पुस्तकांचे गठ्ठे आले. त्यामुळे इतिहासाचे आणि घटनाक्रमाचे त्यांना आकलन झाले. त्यामुळे त्यांच्या काहीशा संदिग्ध मानवतावादी विचारांचे, खंबीर आणि अर्थशास्त्रामधील कठोर सत्यांची जोड लाभलेल्या विचारांमध्ये रूपांतर घडविणे त्यांना शक्य झाले. आणि अमेरिकन कामगारवर्गीय चळवळीचा शिक्षक बनण्याची व आपल्या विचारांना त्यांनी जो शास्त्रशुद्ध आधार दिला होता तोच त्या चळवळीला देण्याचा प्रयत्न करण्याची, त्यांना प्रेरणा मिळाली.

"जॉन, राजकारण हे तुझं क्षेत्र नाही!" त्यांचे मित्र त्यांना सांगायचे. "तू कलावंत आहेस, प्रचारक नाहीस. सृजनशील साहित्यिक कार्यासाठी तू तुझ्या अंगच्या गुणांचा वापर केला पाहिजे!" या सत्याची त्यांना वारंवार जाणीव व्हायची, कारण त्यांच्या डोक्यात सदैव नव्या कवितांनी, नव्या कादंबऱ्यांनी, नाटकांनी गर्दी केलेली असायची; अभिव्यक्ती मिळ-विण्यासाठी, निश्चित रूप घेण्यासाठी त्यांचे थैमान चाललेले असायचे. त्यांनी आपला क्रांतिकारक प्रचार बाजूला ठेवून टेबलाशी बसावे असा मित्रांनी आग्रह केला तेव्हा रीड हसून उत्तरले: "ठीक आहे, मी तसं करीन."

परंतु आपले क्रांतिकार्य त्यांनी कधीही थांबवले नाही. तसे करणे त्यांना जमलेच नाही! रशियन क्रांतीने त्यांचे अंतःकरण, त्यांचे मन काबीज केले होते. तिने त्यांना वाकबगार बनवले होते आणि त्यांच्या चंचल अराज-कवादी भावनांना आवर घालून कम्युनिझमची काटेकोर शिस्त लावली होती. जळती मशाल हाती घेतलेला प्रेषित बनवून तिने त्यांना अमेरिके-मधील शहरांना पाठविले होते. अमेरिकेमधील दोन कम्युनिस्ट पक्षांना एकत्र करण्याच्या कामासाठी १९१९ मध्ये कम्युनिस्ट इंटरनॅशनलमध्ये भाग घ्या-यला तिने त्यांना मॉस्कोला पाचारण केले होते.

क्रांतिकारक विचारप्रणालीच्या नव्या वस्तुस्थितींनी सज्ज होऊन ते

पुन्हा गुप्तपणे न्यूयॉर्कला जाण्यासाठी निघाले. पण एका खलाशाने विश्वासघात केल्यामुळे त्यांना जहाजावरून खाली उतरवून फिन्लंडमधील कारागृहात एकाकी बंदिवान करून ठेवण्यात आले. तेथून ते परत रशियाला आले, 'कम्युनिस्ट इंटरनॅशनल'मध्ये लिखाण केले, नव्या पुस्तकासाठी साहित्य जमवले आणि बाकूमधील पौर्वात्य लोकांच्या काँग्रेसला प्रतिनिधी म्हणून हजर राहिले. त्यांना विषमज्वराची बाधा झाली (बहुधा कॉकेशसमध्ये) आणि कमालीच्या श्रमांनी थकल्या अवस्थेत त्या आजाराला बळी पडून रविवार तारीख १७ ऑक्टोबर १९२० ला त्यांचा अंत झाला.

सोविएत समाजसत्तावादी प्रजासत्ताक संघात लाल सेनेने ज्याप्रमाणे शौर्याने प्रतिक्रांतीविरुद्ध सामना दिला, त्याचप्रमाणे जॉन रीड यांच्यासारख्या इतर अनेकांनी अमेरिकेत आणि युरोपात प्रतिक्रांतिकारक आघाडीविरुद्ध शौर्याने दोन हात केले. काही दंगलींना बळी पडले, तर काहींना कारावासांमध्ये कायमचे गप्प करण्यात आले. एकजण फ्रान्सला परतत असताना श्वेतसागरावरील तुफानात मरण पावला. एक जण हस्तक्षेपाविरुद्धची निषेधपत्रके विमानातून खाली टाकत असताना सान-फ्रान्सिस्को येथे विमानामधून खाली पडून मेला. क्रांतीविरुद्ध साम्राज्यवादाने हिंस्र हल्ला चढवला होता हे खरे असले तरी, जर हे लढवय्ये नसते तर तो अधिक हिंस्र बनला असता. प्रतिक्रांतीचा दाब नरम करण्यात त्यांनीही आपली कामगिरी बजावली. केवळ रशियन, युक्रेनी, तातार आणि कॉकेशसमधील लोकांनीच रशियन क्रांतीला मदत केली असे नाही. कमी प्रमाणात का होईना, पण फ्रेंच, जर्मन, इंग्रज आणि अमेरिकेतील लोकांनीही मदत केली. या "बिगर रशियन व्यक्तीं"मध्ये जॉन रीड ठळकपणे उठून दिसतात, कारण ते असाधारण प्रतिभाशाली होते व ऐन तारुण्यात त्यांचे निधन घडले...

हेल्सिंगफोर्स आणि रेवेल येथून जेव्हा त्यांच्या मृत्यूची बातमी आमच्यापर्यंत येऊन पोचली, तेव्हा प्रतिक्रांतिकारक अफवांच्या कारखान्यांमधील रोजच्यापैकी ही एक अफवा आहे, असे प्रथम आम्हाला वाटले. पण जेव्हा लुईस ब्रयांट यांनी त्या धक्कादायी बातमीला दुजोरा दिला, तेव्हा मात्र त्या बातमीच्या खोटेपणाची आशा आम्हाला दुःखाने सोडावी लागली.

जॉन रीड जेव्हा वारले तेव्हा ते निर्वासित होते आणि पाच वर्षांचा कारावास त्यांची वाट पहात होता हे खरे होते तरी, एक कलाकार आणि व्यक्ती म्हणून भांडवलदारी वृत्तपत्रांनीही त्यांना गौरवांजली वाहिली. भांडवलदारवर्गाने सुटकेचा निश्वास टाकला : त्यांच्या खोटेपणाला कसे उघडकीस

आणायचे, याची चांगली माहिती असलेले, आपल्या लेखणीच्या फटकाऱ्यांनी त्यांच्यावर कठोरपणे प्रहार करणारे, जॉन रीड आता राहिले नव्हते.

अमेरिकेमधील जहाल जगाची कधीही भरून न येणारी हानी झाली. अमेरिकेबाहेर राहणाऱ्या कॉम्रेडांना रीड यांच्या निधनाने तेथे किती हानी झाली त्याची कल्पना येणार नाही. माणूस आपल्या विचारांसाठी मरण पत्करतो, हे रशियनांना स्वाभाविक वाटते, ही गोष्ट ते अपेक्षित धरतात. इथे सोविएत रशियामध्ये लक्षावधींनी समाजसत्तावादासाठी मरणाला कवटाळले. पण अमेरिकेत तुलनात्मकरीत्या त्याहून थोडा कमी त्याग घडला. आपण असे म्हणू शकता की, कम्युनिस्ट क्रांतीचे जॉन रीड हे पहिले हुतात्मा होते, पुढच्या हजारो हुतात्म्यांचे अग्रदूत होते. वेढ्यात सापडलेल्या दूरवरच्या रशियामध्ये त्यांच्या उल्केसारख्या जीवनाचा अचानक अंत घडला तेव्हा अमेरिकन कम्युनिस्टांना जबरदस्त धक्का बसला.

त्यांच्या स्नेह्यांना आणि साथींना एकच सांत्वन आहे की, जॉन रीड यांना या जगात सर्वांत जास्त आवडलेल्या एकमेक स्थळी – क्रेमलिन भिंतीनजीकच्या चौकात – चिरनिद्रा देण्यात आली आहे.

त्यांच्या समाधीवर त्यांच्या व्यक्तित्वाशी सुसंगत स्मारक उभारण्यात आले आहे – ग्रॅनाईटचा न तासलेला एक शिलाखंड. त्यावर कोरले आहे:

**"जॉन रीड, तिसऱ्या इंटरनॅशनलचे प्रतिनिधी, १९२०."**

